दुखावणें, वेडावणें, डोकावणें. **आवा**—कुणबावा. **आविष्ट**—कोपाविष्ट, लोभाविष्ट. **आस**—भगास, भकास. **आसें**—मुंडासें. **आळ**—चिकाळ, दुधाळ, बंबाळ. **आळा**—जिव्हाळा ल्व्हाळा, डोंबाळा. **आळी**—कागाळी, आरोळी. **आळू**—दयाळू, मायाळू, कृपाळू, कष्टाळू, निद्राळू. **आळें**—खणाळें, खुटाळें, दिवाळें, विटाळें. **ई**—मापी, सुती, हौशी, माघी, पुशी. **ईक**—सोयरीक, मोकळीक, आगळीक. **ईट**—रागीट. **ईण**—बाळंतीण, सवाशीण, सासुरवाशीण **ईल**—दोंदील, अंडील, वरकशील, शेवटील. **ईळ**—गोडीळ, तपीळ. **इष्ट**—चविष्ट, नादिष्ट, नेमिष्ट, पापिष्ट, छांदिष्ट. **उकली**—धनुकली, अंडुकली; चांदुकली. **उडा**—खरजुडा. **उरडा**—भटुरडा, नखुरडा. **उरी**—देसुरी. **उला-ली-लें**-बारुळा-ळी-ळें, सोलुला-ली लें. **उ**—दांडू, भोंकू, बंबू, लंबू. **ऊक**—काटूक, किडूक, चिंधूक, हाडूक, भेटूक. **ऊण**—एकूण. **ऊत**—धडूत, बहूत. **ऊन**—इकडून, पासून, येथून, तेथून, आंतून. **ऊरा-ऊरगा-डा**—भटूरा, भटूरगा, भटूरडा. **ऊल**—कणगूल, परडूल, पडगूल, करंडूल. **ऊस**—आंबूस, तांबूस, टिपूस, बापूस. **ऊळ**—पांगूळ, पिठूळ, वातूळ. **ऊं**—टिपूं, रेडकूं, मांजरूं, बकरूं, शेरडूं, करडूं. **ए**—कडे, वाटे. **एं**—बाळंतें, मेंगें. **एज**—भकेजणें, रागेजणें. **एटा**—कोशेटा. **एण**—भातेण. **एता**—ओलेता. **एर-एरें**—जुनेर, जुनेरें, फणेरें. **एरा**—पातेरा, घाणेरा. **एल**—तिळेल, मोगरेल, खोंचरेल, उंडेल. **एला**—उंचेला काळेला, कोडगेला, जाडगेला. **एली**—खांदेली, भागेली, दंडेली. **ओका**—चिंचोका. **ओटी**—चिंधोटी, धांदोटी, रेघोटी फासोटी. **ओडा**—लांबोडा, हातोडा. **ओती**—घडोती, घडूत, घडोत. **ओत्रा**—एकोत्रा, दुहोत्रा, दिढोत्रा. **ओपा**—शिळोपा, एकोपा, सुखोपा, हातोपा. **ओबा**—घरोबा, गणोबा, भोरोबा, आजोबा. **ओर**—टपोर, पिठोरा, पिठोरी. **ओशी**—अंबोशी. **ओसा**—हातोसा, आडोसा. **ओळ**—आजोळ, पंजोळ. **ओळा**—आठोळा, सातोळा, **ओळी**—फांसोळी, मासोळी, चिरटोळी. **ओळें**—पिंडोळें, भिंडोळें, भेडोळें. **अंड**—भावंड, नातवंड, नातोंड, नातुंड. **अंडी**—पोतंडी, मुसंडी, **अंत**—बाळंत, जिवंत. **क**—धडक, थडक. **कट**—धुरकट, भुसकट, तेलकट, मेणकट. **कड**—वरकड. **कडी**—छकडी. **कन**—झटकन, फटकन, चटकन, पटकन. **कर**—खोडकर, खेळकर, साळकर, कामकर. **करी**—देणेकरी, घेणेकरी, रीणकरी, कामकरी, गांवकरी. **करू**—यात्रेकरूं होतकरू. **कली**—धनुकली. **कळ**—पचकळ, फटकळ. **का**—थेंबका, चुळका, मणका, पुंजका खुळका. **कार**—पुढाकार, नकार, डकार, हुकार. **कारा**—हुकारा, होकारा. **की**—खोतकी, गांवकी, शेतकी. **कुची**—अणकुची. **कुला**—चिमकुला, सोनकुला. **कुली**—फुसकुली, अंडकुली, चांदकुली. **कुळा, कोळा**—काटकुळा, काटकोळा. **कूट**—हिरकूट, **कूल**—घरकूल, मडकूल. **कूर**—ढोणकूर. **कें**— बिंडकें, पुडकें, नाळकें, ओंडकें, होडकें. **को**—धनको, रिणको. **कोळ**—काठकोळ, किरकोळ. **क्या**—पाणक्या. **खा**—नवखा, बुडखा. **खुरा, खोरा**—डावखुरा, डावखोरा. **खोर**—कागाळीखोर, भांडखोर, चाहाडखोर. **गट**—खोलगट, चारगट. **गत**—कलागत, कामगत, दिवसगत, ओशाळगत. **गळ**—वेडगळ. **गा**—सोटगा, जुडगा, वाडगा, खळगा, मुलगा. **गिरी**—शिपायगिरी, वैद्यगिरी, लुचेगिरी. **गी**—पोटगी. **गूत, द**—नाळगूत, **गें**—झारगें, वाडगें. **गेला**—रोडगेला, दांडगेला, वेडगेला, जाडगेला. **चट**—गुळचट, भेणचट, पाणचट. **चा**—एकदांचा, केव्हांचा, आजचा, कालचा, आतांचा. **चार**—पाहुणचार, मेहुणचार. **चें**—लोणचें. **जा**—दुजा, तिजा. **जी**—रामजी, विठोजी, रघोजी, मालोजी. **ट**—अरबट, रेंवट, मातट, आंबट, खारट, तिखट. **टळ**—वावटळ. **टा**—रोपटा, बाहुटा, चोरटा, पोरटा, गोरटा. **टी**—आगटी, शेकटी, शेपटी, भुगटी, थापटी. **ठण**—गोठण, पायठण, गांवठण. **ठा**—गावठा, उंबरठा, गारठा. **ठी**—गांवठी. **ड**—रातड, जखखड. **डा**—जरडा, गधडा, बापुडा, विंचडा. **डी**—पोतडी, चिंधडी, डफडी, पानडी, वावडी. **डें**—अंगडें, कुंचडें, सुपडें, रुपडें. **ढळ**—गांवढळ. **ढा, ढें**— गांवढा, गावढें. **ण**—ढुंगण, कुंपण, गोफण, पोखरण. **णा**—(गुणितार्थी) दुणा. **णी**—चांदणी, नथणी, दुधाणी. **णें**—चांदणें. **ता**—गोणता, कोणता, जोगता, भलता. **तें**—रायतें, ओलेतें. **थळ**—पाणथळ, नवथळ. **था**—चवथा. **दर**—एकंदर. **दा**—पाचुंदा. **दां**—एकदां, पांचदां, अनेकदां, पुष्कळदां. **दाड**—भगदाड. **दार**—नोकरदार, छानदार, खुबीदार, अंमलदार. **प**—कोळपणें, झोडपणें. **पट**—सालपट, लोळपट. **पण, पणा**—मनुष्यपण, देवपणा, थोरपण, लहानपण. **पट्टी**—धुळपट्टी, हजामपट्टी, तासडपट्टी, झोडपट्टी. **पें**—जावपें. **प्रा**—कांठप्रा, खुंटाप्रा. **पा**—हातपा, टोणपा, वेडपा, वजपा. **फट-ड**—कानफट-ड, गालफट-ड. **बा**—कोठिंबा, पाठिंबा. **मट**—वसमटणें, चुरमटणें. **मंत**—श्रीमंत, बुद्धिमंत. **या**—टकल्या, ओनाम्या, मस्कऱ्या, पिरपिऱ्या. **र**—सासुर माहेर. **रा**—शिवरा, लातरा, दांतरा, डावरा. **राव**—अरेराव, तिरशिंगराव, झुंजारराव. **री**—रुपेरी, सोनेरी, कणेरी,

पायरी, पोटरी. **रूं**—मेंढरूं, शिंगरूं, म्हसरूं, रांडरूं, लेंकरूं. **रूड**—मिसरूड, म्हसरूड. **रें**—टोपरें, डफरें, डबरें. **ल**—तांबूल, डोंबल. **लग**—नातलग, जिवलग, डांकलग. **लट**—अंगलट. **ला**—मागला, पुढला, आंतला, बाहेरला, मधला. **ली**—टिकली, डावली, ताटली, दिवली, शिंपली. **लें**—झबलें, तांबलें, पिठलें. **लंड**—अधलंड, मधलंड, धर्मलंड. **व**—सटवणें, सठवणें. **वट**—मसणवट, धुळवट, मळवट. **वटा**—मुखवटा, दुखवटा, उंचवटा. **वटी**—राजवटी हातवटी. **वंट**—वाळवंट, सुरवंट. **वंटा**—वरवंटा. **वठा**—अंगवठा, दारवठा. **वडा**—म्हारवडा, रांडवडा, आठवडा, **वंड**—नातवंड, पणतवंड, भावंड. **वण**—दांतवण, हगवण. **वणी**—गुळवंणी, चिंचवणी, उन्हवणी, हातवणी. **वंत**—भगवंत, गरजवंत, धनवंत, बलवंत. **वर**—आजवर, कालवर, जोंवर, येथवर, तेथवर. **वरा**—फुलवरा किंवा फुलोरा. **वला**—कानवला, गव्हला. **वली**, **उली**—मावली किंवा माउली. **वळ**—शितवळ, उघ्रावळ, गयावळ, प्रयागवळ, **वळा**—अंगवळा, तोंडवळा, एकवळा. **वा**—गारवा, ओलावा, थंडावा, गोडवा. **वाईक**—नातेवाईक, तऱ्हेवाईक. मासलेवाईक. **वाणा**—गोजिरवाणा, लाजिरवाणा, वाईटवाणा. **वान**—गाडीवान, बागवान. **वार**—बेतवार, एकवार, दोन वार. **वाला**—गाडीवाला, कंठीवाला, भाजीवाला. **वी**—ठाणवी, थोरवी. **वीस**—वाढवीस, **वें**—जोडवें. **शा**—बहुशा, अनेकशा. **शीर**—अनुभवशीर, कायदेशीर, वक्तशीर. **शां, शी, शीं, शें**—आतांशीं, विटाळशी, गर्भारशी. **स**—डोळस, रूपस, गोंडस, हाडस. **सट**—भोळसट. **सर**—मऊसर, गोडसर, आंबटसर, जाडसर. **सरा**—दुसरा, तिसरा. **सा**—धडसा, भलतासा, इवलासा, कवडसा. **सें**—बाळसें, बोंडसें. **हेरी**—दुहेरी, तिहेरी, चव्हेरी, पांचफेरी. **ळ**—गांठळ, हातळ, प्रेमळ, दयाळ, कृपाळ. **ळा**—कपळा, माथाळा, अंधळा, पांगळा. **ळी**—मासळी, फासळी, कांठळी, गुठळी.

**सामासिक शब्द**—याखेरीज मराठींत दोन शब्द एकत्र येऊन त्यांचा समास झाला असतां केव्हां केव्हां त्यांचा अर्थ मूळ शब्दांपेक्षां व्यापक अगर भिन्न होतो. संस्कृत भाषेंतील अनेक सामासिक शब्द मराठींत जसेच्या तसेच घेतले जातात व कांहीं समास मराठीमध्यें स्वतंत्रपणें होतात. यासंबंधीं माहिती कोणत्याहि व्याकरणांतील समास प्रकरणामध्यें आढळेल, तथापि त्यांच्या दिग्दर्शनापुरतीं कांहीं उदाहरणें पुढें विवेचन गाळून दिलीं आहेत.

**अव्ययी भाव**—यथाशक्ति, प्रतिक्षण, दरदिवस, प्रत्यक्ष, समक्ष, बिनधोक, हरघडी, जागोजाग, दारोदार, घरानघर इ.

**तत्पुरुष**—तोंडपाठ, कपाळकरंटा, पांचपट, देशगत, काकबलि, गायरान, गर्भगळित, जन्मखोड, धर्मवेड, आंबराई, तोंडसुख, घरकलह, तोंडीलावणें, ग्रंथकार, गृहस्थ, पांथस्थ, घातुक, रेचक, बोटचेपे, पळीवाढें, मळेकरी, गळेकापू, अजाण, अपुरा, अवगुण.

**कर्मधारय**—काळमांजर, शेंडेनक्षत्र, दालचिनी, उपजतवेडा, गडीमाणूस, निराशा, पंचवटी, पंचारती, त्रिदळ, पांचशेरी.

**मध्यमपदलोपी**—साखरभात, कांदेपोहे, साखरलिंबू, घोडनवरी, घागरगड, उंबरघाट.

**द्वंद्व**—बहीणभाऊ, सुखदुःखें, दहीभात, दौतलेखणी, दारूगोळा, काजळकुंकू, रांडमुंड, शेतमळा, इडापिडा, चट्टीपट्टी, घोडाबिडा, भलतासलता, लुंगासुगा, पोरसोर.

**बहुव्रीहि**—कृतकृत्य, दशमुख, निर्धन, शूलपाणी, मानधन, काळतोंड्या, वीरपुरुष, अल्पमोली, पायाशुद्ध, चंद्रमुखी, शिवशब्द, यशोधन, गायमुख्या, अनाथ, दुतोंडें, निधारी, उपदेश, सजोड, सढळ, केशाकेशी, लठ्ठालठ्ठी, निर्लेप, विरूप.

**विशेष समास**—खेपेगणिक, भारंभार, अपरंपार, हातोहात, रातोरात, दिवसाढवळ्या, डोळढापे, गळपट्टी, गलेलठ्ठ, गळेकापू, डोकेफोड, साळवाडा, चोळखण, बाळदाणी, मिरपूड, सोनचांफा, वरोपचार, मनकामना, कोंडमारा, सोडमुंज, सांडपाणी, आपमुख, पोटदुखी, भावजय, मरतमढें, आंबटढाण, कडूजहर, काळाढोण, लालभडक, सडेतोड.

**अभ्यस्तशब्द**—यांचे पूर्णाभ्यस्त, अंशाभ्यस्त व अनुकरणवाचक असे तीन प्रकार असून त्यांचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत. **पूर्णाभ्यस्त**—घरघर, गांवगांव, हालहाल, काळेकाळे, गोरेगोरे, गोडगोड, थोडाथोडा, वेगवेगळा,

नेऊंनेऊं, करूंकरूं, गेलागेला, जाजा, हंसतहंसत, उडतउडत बोलतांबोलतां रडूनरडून, मारामार, धांवाधांव, हळूहळू, बरबर, पुन्हापुन्हा, छीछी, गोडस्गोड, लालचलाल, उगीचच्याउगीच, पुढचेपुढें, मागचेमागें. **अंशाभ्यस्त**—लाडीगोडी, आगतस्वागत, उलटसुलट, असातसा, समजणेंउमजणें, बोलणेंचालणें, कधींमधीं, शेजारीपाजारी, दाणादुणा, जाडजूड, अर्धामुर्धा, जळफळणें, धुसमुसणें, दगडबिगड, आंबटचिंबट, गेलाबिला, पिळूनबिळून, लुंगासुंगा, चट्टामट्टा, टकमक, करणेंसवरणें, पुसतपास, केरकचरा. **अनुकरणवाचक**—किरकिर, खटपट, लटपट, हळहळ, फलकलाट, चकचकाट, गरगरीत, चमचमीत, गडगडणें, धडधडणें, कडाडणें, चकाकणें, भरारणें, घमघम, चरचर, खदखद.

**अनिर्बंध साधितशब्द**—वर उल्लेखिल्याखेरीज कांहीं अनियमित साधित शब्द आढळतात. उदा:—अगडबंड, आकडंतिकडं, ओक्साबोक्सी, अननंतननं, लटपटपंची, रक्तबंबाळ, साळकायगोळकाय, लडंभारती, ढकलपंचविशी.

**फार्शी-अरबी प्रत्ययः**—फार्शी अरबी शब्द आपल्या मराठींत बरेच आले आहेत. त्या भाषांतहि प्रत्यय लागून कांहीं शब्द बनविले जातात. हे प्रत्यय आपणांस समजणें अगत्याचें आहे असें वाटल्यावरून त्यांचीं कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत:—**आ:**—गर्मा; पन्हा । पह्ना । पह्न् = रुन्दी. **आई:**—फार्शीत रोशनाई हा एकच शब्द आई प्रत्यय लागून झालेला दिसतो, मराठींत पुढील उदाहरणें आहेत, अमिराई ( प्रभाकर १३९ ) कादीमाई ( राजवाडे ८।११९ ); गनिमाई ( खरे ६।२७९६ ); जबराई ( परशराम १३९ ); जलदाई; दिरङ्गाई यांतील आई हा प्रत्यय निष्कारण आहे; दुनियाई ( राजवाडे ५।२० ) दुरुस्ताई ( जोरा ५ ); नरमाई ( जोरा ६ ); नाजुकाई; बारकाई, सराफाई; सुस्ताई इत्यादि. **ई:**—एकी; कार्कुनी; खुबी; दानाई; दुही; सबुरी वगैरे. **की:**—हा प्रत्यय गीचेंच रूपान्तर असावें, गन्दकी । गन्दगी = घाण; जामीनकी; दर्म्यानकी ( खरे १०।५२९६ ); मुजावरकी ( राजवाडे १५।२६ ); खाजकी ( राजवाडे १२।१९२ ); शहाजादकी । शाहझादगी (ऐटी ५१) हा प्रत्यय मराठींत चांङ्गलाच रूढ झाला आहे. **गिरीः**—[ फार्शी गर हा कर्तृवाचक प्रत्यय आहे; याला ई लागून गरी हा संयुक्त प्रत्यय सिद्ध होतो. खझानचीगरी, गुमास्तगरी, मुत्सद्दीगिरी, बख्शीगरी व सिपाहगरी अशा कांहीं थोड्या शब्दांत पदवीदर्शक अगर कार्यदर्शक म्हणून गरी या प्रत्ययाचा स्वतन्त्र उपयोग आढळतो, गीर या धातूला ई लागून घेणें या अर्थाचा गिरी फक्त कबजगिरी, खर्चगिरी, दस्तगिरी, व मुलूखगिरी या चार शब्दांत दिसतो ] गुमास्तेगिरी, शिपायगिरी, मुत्सद्दीगिरी. **गी:**—हा प्रत्यय मुळांत अकरान्त शब्दासच लागतो, जसें बन्द बन्दगी, इतर उदाहरणें अजुर्दगी अमुदगी, खफगी गिर्धीदगी, खानगी, बिदागी. **आत्**—कित्येक अरबी भाववाचक नामांच्या अन्तीं अत् येतो, अरबींतील ईयत् हा प्रत्यय कैफियत, खससीयत, जाहलीयत, मालकीयत, वाकफीयत, वाहदीयत, वगैरे ५-६ शब्दांत आढळतो, पुढील शब्द त लागून झालेले आहेत. खलीपत, नायबत, वजीरत, हेजिबत, वगैरे. **अल्पत्वदर्शक नामें**—इचा ( बगिचा-बाघ् ), क ( जम्बूरक; बदक-बत् ) व—चा ( गालीचा ) हे प्रत्यय लागून होतात. **स्थानदर्शक नामें**—पुढील प्रत्यय लागून सिद्ध होतात. **आबाद:**—अहमदाबाद, हैदराबाद, वगैरे. **खाना** ( फा०खाना=गृह ) अदब्खाना, अजायब्खाना, घुसलखाना, दारूखाना वगैरे. **गाह, गा:**—इद्गा, कम्चर्गा=सेनामध्य, किल्लेगाह=वन्दनस्थान, खाब्गा =निद्रागृह, जागा, दर्गा, पागा, वगैरे. **दान:**—अङ्गुस्तान, कलम्दान, जुज्दान, चिराग्दान, तावदान, शामदान वगैरे. **दाणी:**—( हें दान्चेंच रूपान्तर आहे ) अत्तरदाणी, पिकदाणी, चहादाणी वगैरे. **स्तान:**—कबरस्तान, तुर्कस्तान, हिंदुस्तान, वगैरे.

**नामसाधित कर्तृवाचक शब्द पुढील प्रत्यय लागून होतात**—**ची**—खजानची, तबल्ची, तास्ची, नगारची, नशेक्ची, मर्फाची, मशाल्ची. **जी**—खजान्जी, दिवाणजी, मशाल्जी, भियाजी. **गर**—कारीगर, जादूगर, जीनगर, बाजीगर, सौदागर. **गार**—कमान्गार, कल्हईगार, कारीगार, किमयागार, खिद्मत्गार, गुन्हेगार, जादूगार, नकास्गार, मदतगार, माहितीगार, शिकल्गार. **बान**—पास्बान, मेहेर्बान. **वान**—बाग्वान, दर्वान, सार्वान.

**विशेषणें व नामें सिद्ध करण्याचे इतर प्रत्यय**— **ई**—अमली, अस्मानी, कबजी, कलमी, जबाबी, हौसी, वगैरे. **ई**— [ फार्शी, द्रव्यदर्शक ईनपासून ] आयनी, चर्मी, चौबी, जरी, पश्मी, बिरंजी, रंगी, सङ्गी, **ईन**—रङ्गीन, सङ्गीन. **आना**—जखमाना, जनाना, तल्याना, दिवाणा, मर्दाना, माहाना, मेहनताना, मोताना,

ईना--छर्चीना, जख्मीना, रोजीना, सालीना. मन्द--अकल्मन्द, आर्जूमन्द, एहसान्मन्द, कसल्मन्द, दौलामन्द, नियाज्मन्द, फिकीरमन्द, बहरामन्द, रजामन्द. वजा--काडीवजा. वन्त; वन्द--खुदावन्त, गरज्वन्त, दौलतवन्त, फिकीरवन्द, रजावन्त. वार--आसामीवार, इस्मनवेशीवार, उमेद्वार, कलमवार, कैदूवार, खुलासेवार, तालेवार, बखतवार, बयान्वार, बाबत्वार, शिस्तवार. शाई--[फा. शाही = राज्य] काफर-शाही, शिवशाही, नोकरशाही, लोकशाही, शिन्देशाही, बाबाशाही. शीर--अद्बशीर, आराम्शीर, कायदेशीर, दाखलेशीर, नफेशीर, फाकेशीर, मस्लतशीर, मोहीमशीर, वक्तशीर, हङ्गामशीर हवाशीर, वरीलपैकीं कांहीं विशेषणें क्रियाविशेषणासारखीं उपयोगिलीं जातात.

धातूस इश लागून--[मराठींत उपान्त्य इ दीर्घ होते अगर ए होते अगर तिचा अ होऊन कित्येकदां ती गळते; व अन्त्य शचा विकल्पें करून स होतो,] अज्मास, अज्माईश, अफ्जायश, आरास, कशीश, कोशीस, खाईश, नवाजीस, नालीस, निगारीश, पर्वेश, पुर्शीस, पैमास, फर्मास, बक्शीस, बारीश, मालीस, रञ्जीस खेश, साजीश. याच तऱ्हेनें पैदास व बालाईश हे दोन शब्द पैदा व बाला या दोन विशेषणांपासून सिद्ध झालेले आहेत. वरील नामांस निरर्थक ई लागून कसोशी, बक्षिसी इत्यादि रूपें प्रचारांत आलेलीं आहेत. धातूस--आ लागून--अन्देशा धातूस--आक् लागून--खुराक, पोशाख. धातूचाच क्रियावाचक नामासारखा उपयोग--अङ्गेज, अन्दाज, गुजर, गुजार, जोसताब, दर्गुजर, फरेब, शिताब, साज वगैरे. क्रियापदाचाच नामासारखा उपयोगः-आमदन, कर्दन--बस्तन वगैरे. क्रियापदांतील अन्त्य अन् काढून उरलेल्या भूतकाळ रूपाचाच नामासारखा उपयोगः-आमद गुजास्त, निशस्त, फरोख्त, फिरस्ताद, बर्खास्त, पैवस्त, रक्त, शिकस्त. भूतकाल रूपास--आ--अ (ह्) लागून होणाऱ्या भूतकालवाचक अव्ययाचाच नामासारखा उपयोग--गुमास्ता, नविश्ता, बस्ता, मुर्दा, शिकस्ता, दोन भिन्न क्रियापदांच्या भूतकालीन-रूपांच्या द्वन्द्व समासानें--आमद्रफ्त, खरेदीफरोक्ती, सुदानत. एकाच क्रियापदाच्या धातूस व भूतकालीनरूपास उनें जोडून अगर त्याशिवाय-गुफ्तगो, बन्दोबस्त.

धातुसाधित कर्तृवाचक शब्द पुढीलप्रमाणें होतात. (अ) धातूस--इन्दा (अन्दा) लागून--निशिन्दा, नविसन्दा, परिन्दा, पोशिन्दा, फामिन्दा, बाजिन्दा, शर्मिन्दा, साजिन्दा. धातूस--आ लागून--दाना, तवाना. धातूस--ना हा उपसर्ग लागून नातवान, नादान, नादार. भूतकालीनरूपास--ना उपसर्ग लागून-ना-बूद (आ) नामास पुढील धातू लागून--अन्दाज (= फेंक)--गोलन्दाज, जालन्दाज, तिरन्दाज, बर्कन्दाज, व त्याच धर्तीवर घरन्दाज, कारन्दाज, सरन्दाज. आवर (= आण)--जोरावर, दिलावर. आवीज़ (= घर)--दस्तैवज. कन्द--(= खोद)--मोहर-कन्द. कस (= ओढ)--अर्कस, तार्कस, बार्कस, त्याच धर्तीवर गान्जेकस जोरकस. कून--(= कर)--कार्कून. खाह (= इच्छ)--खातर्खाह, खैर्खाह, दिलखा, तनखा, दौलतखाह. खोर (= खा)--कर्जेखोर, चुगलखोर, जिद्दखोर, तक्रारखोर. गीरं (= धर)--अब्दागीर, अस्मानगीर, जहांगीर, दस्तगीर, दामन्गीर, दिल्गीर, आणि त्याच धर्तीवर तमासगीर, दुवार्गीर. गुजार (= ठेव)--गई गुजार, गिले-गुजार, गोश्गुजार, नजर्गुजार, माल-गुजार, शुक्र-गुजार. गो (= बोल)--कानुगो, रास्तगो, गरज्गो, सक्तगो. तरास (= काप) जबा-तरास, कलम्तरास, सङ्ग-तरास, सुम्ब-तरास. तलब (= माग)--ज्यादा-तलब, मरामत-तलब, रजा-तलब. दान (= जाण)--कदर्दान. दार (ठेव, धारण कर)--अजूर्दार; कबिलेदार, छान्दार, तऱ्हेदार, दम्दार. दोज (= शिव)--चर्मदोज, जमीन्दोज, हवादोज. नवाज (= पाळ, बाजीव)--गरीब-नवाज, चङ्ग-नवाज, तासे-नवाज. नवीस-नीस (= लिही)--अखबार-नवीस, नक्ल-नवीस, चिटणीस, वाकनीस. निगार (= लिही) वकायेनिगार. नशीन (= बैस)--किल्लेनशीन, जन्नत्नशीन, तख्त-नशीन, पडदे-नशीन, मस्नद्शीन, बेहेस्तनशीन; त्याचधर्तीवर खातर्नेशीन, गादीनशीन. नुमा--(= दाखव)--किब्लेनुमा, खुश्नुमा, फलक्नुमा. पर्दाज (= कर)--कार्पर्दाज. पर्वर (= पाळ)--गरीब-पर्वर. परस्त (= भज)--बुतपरस्त, हक-परस्त. पाश (= शिम्पड)--गुलाब-पाश. पजीर (= स्वीकार)--सुरतपिजीर. पैवन्द (= जोड)--अबद-पैवन्द. पोस (= आच्छादन कर, परिधान कर)--कुल्हापोश, खान्पोश, गर्दपोस, पलङ्गपोस, पायपोस, शिलेपोस. फराज (= उञ्चव)--सर्फराज. फरोश (= वीक)--बुत्फरोश, मेवेफरोश. बन्द (= बान्ध) नालबन्द, पगडबन्द. बर्दार (= उचल)--खास-बर्दार, चौरी-बर्दार, निशाण-बर्दार, बंदूक-बर्दार, हुके-बर्दार, हुकूम-बर्दार. बर (= हरण कर, ने)--दिल्बर, पैगम्बर. बाज (= खेळ)--आतस्बाज़, कत्तलबाज़, कायदेबाज़, कुर्रेबाज़,

जहाँबाज़्, दगलबाज़्, दगेबाज़्, दारूबाज़्, नजर्बाज़्, निशानफेबाज़्, मन्सुबेबाज़्. वगैरे **बीन** ( = पहा )—तमास्बीन, दुर्बीण, बारीकबीन. **बोस** ( = चुम्ब )— कदम्बोस. **माल** ( = चोळ )—गोश्माल, दस्तमाल, रुमाल, पायमाल. **याब** ( = मिळव )—काम्याब, बार्याब. **रुबा** ( = हरण कर )—केरबा, दिलरुबा. **रुबू** ( = झाड )—जारुब ( झाडू.) **रेज** ( = ओत )—रङ्गरेज. **शिकन** ( = फोड )—बुत्शिकन.

**नामास पुढील पूर्वगामी शब्दयोगी अव्ययें लागून विशेषणें सिद्ध होतात. जेर**—( खालीं ) जेर्दस्त; जेर्जत, जेर्बार. **ब**—( बा-दार या अर्थी ):—ब-अब्रु, ब-जमियत वगैरे. **बा:**—बा-जमियत, बा-वक्र, बा-वकूफ **बर:**—बर्जोर, बर्पा, बर्तर्फ, बर्बाद वगैरे. **बे:**—( नि: या अर्थी ) बे-इतल्ला, बे-इनाम, बे-कायदा, बे-कार, बे-कुसूर. बे-कैद, बे-खबर, बे-गुमान, बे-चिराग, बे जा, बे-जाब, बे-तकशीर, बे-ताब, बे-तालूक, बे-दखल, बे-दम, बे-दर्द बे-दाजा, बे-निहायत, बे-पर्वा, बे-पाया, बे-फाम, बे-फिकिर, बे-बन्द, बे-बाक, बे-मालून, बे-मब्लग वगैरे. **ला:**—( अरबीना ):—लाइलाज, ला-चार, लाजबाब, लावलद. पुढील विशेषणें लागून तत्पुरुष समासाचीं विशेषणें होतात. **जमा**—खजाने-जमा, पोते-जमा, सरकार-जमा. **तरीक**—( दाखल ) तोफातरीक, नजराणातरीक, सलाहतरीक **दाखल**—कैद-दाखल, खजाने-दाखल, खेमे-दाखल, डेरे-दाखल, हवेली-दाखल, **पूर**—पुर् ( पूर्ण ):—अकलपूर, खजानेपूर, पैकेपूर. **बन्द**—कलम्बन्द, किल्लेबन्द, जीन-बन्द, दस्तबन्द वगैरे. **वजा**—( = रितीची, तुल्य ):— काडीवजा. **लायक**—इज्जतलायक, खात्रीलायक, तारीफलायक, तोफालायक.

**सामासिक नामें:**—पुढीलप्रमाणें सिद्ध होतात. द्विरुक्तीनें होणाऱ्या समाहार द्वन्द्वांचीं उदाहरणें:— अबरचबर, अलाबला, अवाई-तवाई, अमन-चमन, बाकी-साकी, बारीक-सारीक. ज्या समासांत दुसरें पद हें पहिल्या पदाचें अनेक वचनाचें रूप असतें अशा इतरेतर द्वन्द्वाचीं उदाहरणें:—अमीर-उमराव, कान-काननात, खत-खतूत, खबर-अखबार, गरीब-गुरीब, गरीब-गुरबा.

समानार्थक दोन शब्दांचा समास केल्याचीं उदाहरणें अगणित आहेत त्यांचे तीन वर्ग पडतात. ज्यांत दोन्हीं पदें फार्शी किंवा अरबी आहेत. अक्कल-हुशारी, आलम-दुनिया, कर्जे-वाम, ज्यांत दुसरें पद मराठी आहे—अक्कल-बुद्धी अम्मल-बजावणी, इमान-प्रमाण, कज्जा-कटकट, कागद-पत्र, कोल-बोल, खबर-बात, खर्च-वेंच, खेश-सोयरे, चीज-वस्त दारू-फुलसरा, बाजार-हाट, मामूल-वहिवाट, मेवा-मिठाई, रङ्ग-ढङ्ग वगैरे. ज्यांत पहिलें पद मराठी आहे—कावा-दावा, चूक-गलत, जीव-जान, दङ्गा-मस्ती, दाब-रुबाब, दाम-दिरम, थट्टा-मस्करी, धन-दौलत, धर-बन्द, न्याय-दाद, न्याय-मन्सुबी, नांव-किताबती, पीळ-पेच, बळ-जोरी, मान-मरातब रीत-रिवाज वगैरे. मूळ फार्शीत उ या उभयान्वयी अव्ययानें जोडले गेलेल्या शब्दांतून ते मराठींत येतांना मधील अव्यय गळतें; व या समासाचा अर्थ अधिक व्यापक असतो. अहाली-मवाली, आब-हवा, आमदरफ्त, कार्भार, खरेदी-फरोक्त, छान-छोक, जफ्त-रफ्त,:जाब्साल, नान्-कुराण, रद्-बदल वगैरे. याच धर्तीवर मराठींत पुढील सामासिक शब्द बनविले गेलेले आहेत:—अत्तर-गुलाब अलङ्ग-नौबत, अस्मानी-सुल्तानी, उजू-तवाजू गरिबी-हरिफी, गोर-कफन, जमा-खर्च, तवा-तोबा, तोक-जञ्जीर, रङ्ग-बहार, वगैरे. नामांची द्विरुक्ती होऊन मध्यें आ येऊन झालेले समास सम्शेरा-सम्शेर, पैगामा-पैगामी वगैरे.

**गैर, ना, व बे हे उपसर्ग**, लागून नञतत्पुरुष सामासिक नामें सिद्ध होतात.— गैर-अब्रू, गैर्-इतबार, गैर्-किफायत, गैर-नफा, गैर-फायदा, गैर्-मर्जी, गैर्-मेहेनत, गैर्-मेहेर्बानी, गैर्-मोसम, गैर्-रहा, गैर्-राबता, गैर्-वाका, गैर्-हङ्गाम, गैर्-हजिरी, गैर्-दुर्मत; ना-इत्यफाक, ना-इलाज, ना-उमेद, ना-कुवत, ना-तवानगी, ना-दौलतखाई, ना-मर्दुमी, ना-माफकत, ना-मेहेर्बानी, ना-रजावन्ती; बे-अक्कल, बे-अब्रू, बे-आब, बे-इज्जत, बे-इतबार, बे-इलाज, बे-कानू बे-किलाफ, बे-खातरी, बे-जाबता, बे-तर्तूद, बे-दस्तूर, बे-दाद, बे-दावा, बे-दुवा, बे-निगा, बे-बर्कता, बे-बाकी, बे-बुनियाद, बे-मुन्सफी, बे-मोहर, बे-वक्त, बे-शिरस्ता, बे-शिस्त, बे-हङ्गाम, बे-हिम्मत, बे-हिशेब, बे-दुर्मत.

**ऐन, नव, नेक, बद हीं विशेषणें**, लागून समास सिद्ध होतात—ऐन्-खर्च, ऐन्-जमा, ऐन्-ज्वानी. ऐन्-हङ्गाम इत्यादि. नव्-कीर्द, नव्-खरीद, नव्-जवान, नव्-निघादास्त. नेक्-नजर, नेक्-नियत, नेक्-सल्ला बद्-अमल, बद्-नकश, बद्-नजर, बद्-नाम, बद्-नियत, बद्-फैल, बद्-मामला, बद्-रस्ता, बद्-रहा, बद्-वक्र बद्-सलूक.

या प्रमाणें थोडक्यांत मराठी भाषेच्या व्याकरण रचनेचा इतिहास देऊन मराठी भाषेंत जे अनेक साधित शब्द तयार होऊन शब्दांची भर सारखी पडत आहे त्या क्रियेचें स्वरूप थोडक्यांत सोदाहरण दिग्दर्शित केलें आहे. या प्रमाणें सामान्यतः मराठी भाषेचें जागतिक भाषांत स्थान कोणतें आहे तिचा प्रसार कोणत्या प्रदेशांत आहे तिची उत्पत्ति व वाढ कसकशी होत गेली व तिची घटना कोणत्या प्रकारची आहे हें आतांपर्यंतच्या प्रस्तावनांत नमूद केलें आहे.

या विभागाची प्रस्तावना तयार करीत असतां रा. यशवंत गणेश फफे यांनीं केलेल्या मराठी व्याकरणासंबंधींच्या कांहीं टिपणांचा उपयोग करण्यांत आला आहे. तसेंच खालील ग्रंथांचाहि बराच आधार घेतलेला आहे त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत.

1 Linguistic Survey of India by G. A. Grierson Vol. VII. 2 मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरण प्रबंधकार—मो. स. मोने. ३ मराठी व्याकरणावरील निबंध—कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर, ४ मराठी व्याकरणाची कुलकथा—रा. अ. का. प्रियोळकर, ५ अर्वाचीन मराठी साहित्य–रा. नेने व इतर, ६ शास्त्रीय मराठी व्याकरण–कै. मोरो केशव दामले. ७ मराठी भाषेची घटना व मराठी शब्दसिद्धी—कै. रा. भि. जोशी ८ फारशी–मराठी कोश—प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन. महाराष्ट्र साहित्य पत्रिका—महाराष्ट्र साहित्य परिषद. व प्रस्तावनेंत उल्लेखिलेलीं व्याकरणें इ. इ.

यशवंत रामकृष्ण दाते.

*

॥ श्री ॥

# महाराष्ट्र शब्दकोश

## विभाग सहावा

## म

**म**—व्यंजनमालेंतील पंचविसावें व्यंजन. या अक्षराच्या मुख्य चार अवस्था दाखवितां येतात. पहिली अशोकाच्या गिरनार लेखामध्यें, दुसरी महाक्षत्रप शोडासच्या वेळच्या (ख्रिस्तपूर्व १ ल्या शतकाचा सुमार) मथुरा येथील जैन लेखांत, तिसरी समुद्रगुप्ताच्या अलाहाबादच्या स्तंभावर (इसवी सन चवथें शतक), व चवथी राजा यशोधर्मन्च्या वेळच्या मंदसोर लेखांत (इ. स. ५३२).

**मार**—(संक्षेप) मजकूर.

**मअ**—क्रिवि. सह. [अर.]

**मअदन**—स्त्री. खाण. [फा.]

**मअनी**—पु. अर्थ. [अर.]

**मअसूम**—वि. निरपराधी. [अर.]

**मइदा, मइदान, मइदालकडी, मइना, मईद, मईल, मईलखोर**—मैदा इ० पहा.

**मऊ**—वि. १ कोमल; मृदु; शिथिल (अवयवाचा). २ गुळगुळीत; खरखरीत, खडबडीत नव्हे असें. ३ (ल.) सौम्य; शांत; नम्र; रागीट नसलेला; कठोर नसलेला (माणूस, भाषण) [सं. मृदु; प्रा. मउ] **म्ह०** मऊ सांपडलें म्हणून कोंपरानें खणूं नये. =एखाद्याच्या चांगुलपणाचा फार फायदा घेऊं नये. **०पायांचा**-वि. (स्त्रियांचे पाय मऊ असतात त्यावरून ल.) नपुंसक. **०रेशीम-सूत**-वि. १ रेशमासारखा किंवा सुतासारखा मऊ; अतिशय मऊ. २ (ल.) अतिशय गरीब, दीन; नरम. **०सर**-वि. किंचित् मऊ; साधारण मृदु.

**मऊ**—पु. (व.) वाणी या जातीच्या ज्वारीचा (जोंधळ्याचा हुरडा).

**मऊज**—स्त्री. मौज पहा.

**मकई**—स्त्री. (ना. बडोदें) मका. [हिं. गु.] **०भुट्टा**-पु. मक्याचें कणीस. 'या दिवशीं, भाज्या व मकईभुट्टे श्री. बाप्पा बाया व मानकरी मंडळी...याजकडे पाठविण्यांत येत असतात.' -ऐरा १२५.

**मकडी**—स्त्री. माकडीण. (पुढील एका म्हणींतच या शब्दाचा उपयोग केला जातो). [सं. मर्कटी प्रा. मक्कडी] **म्ह०** लकडीवांचून मकडी वळत नाहीं (वठणीस येत नाहीं) =मूर्ख मनुष्य मारावांचून वठणीवर येत नाहीं.

**मकण**—न. मक्याचा कडबा; मकाण पहा.

**मकण**—न. (राजा.) मजल; टप्पा. मकाण पहा. 'अजून पांच मकणें राहिलीं आहेत.'

**मकतल-ळ**—न. (नारायणपेठेजवळील एका गांवाचें नांव. या ठिकाणीं जाडेंभरडें व हलक्या दर्जाचें कापड तयार होतें. यावरून) जाडयाभरडया व विटणाऱ्या कापडाचा आंगरखा, बंडी इ० -वि. जाडेंभरडें आणि विटकें (कापड). याच्या उलट अणखर.

**मक(ख)तूल**—पु. रेशमाची कंकरी, कांकरी; लड; पीळ घातलेलें किंवा वळीव रेशीम. [अर. मख्लूत=मिश्र, गुंतीचें ?]

**मकबरा**—पु. कबर; समाधिस्थळ. [अर. मक्बर]

**मकर**—न. १ कुटिलपणा; फसवणूक; ढोंग. 'त्यांच्या हरामजाद्या व मकर सर्व नवाब बहादूर यांचे ध्यानांत' -रा १९.५९. २ कपट; फितुरी; दगा. ३ लबाडी; क्लृप्ती. [अर. मक्र] **०फरेब**-पु. लुच्चेगिरी; फितुरी; कुटिलपणा. 'इंग्रज मकरफरेब बहुत जाणतात.' -पया ४७६. **मकर-री**-वि. १ कपटी; दांभिक; कुटिल. 'कुमशेलवाले आले ते काबूची; बहुतां प्रकारें बजिदी करितील, लालुच दाखवितील, जात मकरी!' -रा १९.६०. २ धूर्त; युक्तिबाज.

**मकर**—पु. १ मगर; नक्र; सुसर. मकराचें चिन्ह (चित्र) मदनाच्या ध्वजावर असतें असें मानलेलें आहे व म्हणून त्यास मीनकेतन, मकरध्वज म्हणतात. 'बळानें काढूं ये मणि मकरदाढेंत दडला।' -वामन, स्फुट श्लोक (नवनीत पृ. १३३). २ मगरासारखा एक काल्पनिक प्राणी. ३ (ज्यो.) बारा राशींपैकीं दहावी

रास. ४ (नृत्य.) दोन्ही हातांचीं बोटें सरळ पसरून आंगठा ऊर्ध्व करणें व उजवा हात डाव्या हाताच्या पाठीवर ठेवणें व हात अधोमुख करणें [सं.] **०कुंडल**-न. मकरमाशाच्या आकाराचा पुरुषांच्या कानांतील अलंकार; मकराच्या आकाराचें कुंडल. 'मकर कुंडलें तळपती श्रवणीं।'-तुगा १. **०तुंड-तोंड**-न. मगराच्या तोंडासारखा केलेला रथाचा अग्रभाग, रथाची दांडी. 'मिळौनि मकरतोंडां मकरतोंडें। सरथियांचा तोंडीं सुनि खांडें।' -शिशु १०४७. -ज्ञा ११.२९३. **०ध्वज**-पु. १ मदन; कामदेव. 'ज्याचे जानूवरी मकरध्वजा। जोडली बरव।'-ज्ञा ११.६०१. २ असंभोगजन्मा मारुतीपुत्र. **०रास**-स्त्री. दहावी रास; या राशींत पूर्वाषाढा नक्षत्राचा शेवटचा चरण, उत्तराषाढा व श्रवण या दोन नक्षत्रांचा समावेश होतो. **०रेषा-वृत्त**-स्त्री न. विषुववृत्तापासुन दक्षिणेस २३॥ अंशांवर असणारें वृत्त. याच्यापलीकडे दक्षिणेस सूर्याची गति नाहीं. उत्तरेकडे २३॥ अंशावर असणाऱ्या वृत्तास कर्कवृत्त म्हणतात. **०संक्रमण-संक्रांत-ति**-नस्त्री. १ सूर्याचें धनराशीहून मकरराशीस जाणें. २ (विशेषतः संक्रांत.) एक सण; उत्तरायणाचा आरंभ. या दिवशीं अयनश्राद्ध, तिलपात्रदान, एकमेकांस तिळगूळ वाटणें इत्यादि करितात. **मकरालय**-पु. समुद्र. 'मकरालय लंघाया मत्ता मशका कसा उडालास।'-मोद्रोण १.२२. [मकर+आलय] **मकरी**-स्त्री. मगराची मादी. 'म्हणोनि माझी वैखरी। मौनाचेंही मौन करी। हे पाणियावरी मकरी। रेखिली पां।' -अमृ १०.१७.

**मकरंद**—पु १ फुलांतील मध; पुष्परस. 'लतेतळीं, रुंद निरुंद कालवे। गळोनि तेथें मकरंद कालवे।' -र ८. २ सुवास. 'जैसी कमळकळिका जालेपणें। हृदयींचिया मकरंदातें राखों नेणें।' -ज्ञा १०.१२७. ३ भिजविलेल्या रव्याच्या गोळ्या तुपांत तळून नंतर साखरेच्या पाकांत बुडवून करतात तें एक पक्वान्न. [सं]

**मकराणी**—स्त्री. मक्रान प्रांतांतील रहिवाशी. एका जातीचें नांव व त्या जातीचा मनुष्य. 'अहमदखां, मकराणी समजून इंदूर छावणींतून बडे साहेबांचे हुकुमानें काढून दिला.' -विक्षिप्त ३.२३०.

**मकसुद, मक(ख)सूद**—पु. अभिप्राय; हेतु. मक्सुद पहा. -पेद २१.३२.

**मकळी**—स्त्री. ज्वारीवरील रोग; सजगुऱ्यावरील रोग; तिळाच्या झाडावरील किडा; हा ढेंकूण खातो.

**मका**—पु. एक तृणधान्य; मकई पहा. याचा मुख्य उपयोग चारा व अन्न म्हणून होतो. दाण्याच्या रंगावरून याच्या पांढरा, तांबडा, पिंवळा, काळा, इ० जाती आहेत. हें धान्य पौष्टिक, थंड व वातुळ आहे. **मकाण**-न. मक्याचा कडबा; मक्याचीं कणसें कापून घेतल्यावर राहिलेलीं ताटें. [मका+तृण] **मकाणा**-पु. १ मक्याचा दाणा. २ (मकाणे) मक्याच्या लाह्या. ३ कमलबीज; हें मक्यासारखें असतें यावरून यासहि म्हणतात. याच्या लाह्या करितात. ४ मक्यावर होणारा काजळी नांवाचा रोग; मेरड. [मका+दाणा] **मक्याण** न. १ मक्याची उपळ; २ मक्याचा कडबा; मक्याचीं ताटें.

**मकाण-न**—न. १ राहण्याची जागा; घर; ठिकाण. २ मुक्कामाची जागा; वाटेंत थांबण्याचें ठिकाण; पल्ला; टप्पा ३ व्याप; पोंच; विस्तार (मन, सामर्थ्य इ० चा.); (भाषणाचा) ओघ. [अर. मकान्] **मकाणांत येणें**-(एखादी गोष्ट) टप्प्यांत येणें.

**मकातीब**—न. पत्रें. 'हमेशा मकातीब पाठवून दोस्ती-येकजहती दीन-ब-दीन ज्यादा होय.' -रा १०.३१२. [अर. मकातीब्. मक्तूबचें अव.]

**मकार**—पु. प्रणवाची किंवा ओंकाराची तिसरी मात्रा. 'अकार उकार मकार। तिन्ही मिळून ओंकार।' 'वरी मकारांत सोपान। तें सांडोनियां गहन। काखेसूनियां गगन। भरलें ब्रह्मीं।'-ज्ञा १२.५६. **०पंचक**-न. 'म'नें सुरू होणारे पांच शब्दः-मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा, मैथुन. ह्या पांच गोष्टींना शाक्त लोकांत विशेष मान्यता देतात. 'मकारपंचकं येणें करून पापाचा नाश होतो कीं।'

**मकारिम**—स्त्री. स्पृहणीय कृत्य; उदारता. [अर.]

**मकुड्याचा खिळा**—पु. पसरट माथ्याचा खिळा.

**मकूदाणा**—पु (अशिष्ट) योनिलिंग **मकोडा**-वि. (बायकांत व बदफैली लोकांत रूढ) फाकडू; मारू [? हिं. मकोडा=मुंगळा]

**मक्कलशूळ**—पु. बाळंतिणीच्या हृदयांत, मस्तकांत व बस्तींत होणारा शूळ. हा वाताच्या प्रकोपानें रक्ताचा अवरोध झाला म्हणजे उत्पन्न होतो. -योर २.६४०.

**मक्को**—पु. मुंजफळ. -मुंव्या ११०.

**मक्त(क्त)सर**—पु. हक्कदार किंवा कामदार नव्हत अशा जुन्या वतनदारांची पदवी. 'विलेस राजश्री शिवाजीपंत कार्कून मख्तसर आहेत.'-रा ८.१६४. -वाडमा ४४. [फा.मुख्तसर ?]

**मक्ता-क्ता**—पु. १ विशिष्ट अटींवर काम करण्याचा किंवा कांहीं पुरविण्याचा हक्क व जबाबदारी; उक्तें काम. २ ठेका; बोली; कंत्राट; इजारा; हमी. (क्रि० घेणें) 'आम्ही तुम्हांस सुशिक्षित करूं असा आम्हीं कांहीं मक्ता घेतलेला नाहीं.' ३ खंड; उत्पन्नाचा ठराविक अंश; जमीनीच्या मालकी हक्काबद्दल मालकास द्यावयाचा मोबदला-धान्य अगर नक्त रक्कम. [अर.

मक्तअ ] मक्तेकरी-दार-वाला-पु. १ ठेकेदार; कंत्राटदार. २ मक्ता घेणारा शेतकरी; खंडकरी. ०गुत्ता-पु. १ ठराविक रकमेपेक्षां जास्त न देण्याच्या करारानें घेतलेलें शेत. २ असा कायम धाऱ्याचा करार. मक्तेदारी-स्त्री. इजारा; इजाऱ्याची पद्धत. मक्त्याची मामलत-स्त्री. मक्त्यानें दिलेली जिल्ह्याची मामलत, राज्याधिकार. याच्या उलट कच्ची मामलत.

**मक्ता**—क्रिवि. (राजा.) पुरेसें; जितक्यास तितकें.

**मक्तूब**—वि. उपर्युक्त; संबोधित; मजकूर. 'सरकार मक्तु-बाचे कार्पर्दाजाच्या दरखास्ती प्रमाणें अमलांत येईल.' -पेश. ५७ [अर. मक्तूब् ]

**मक्बूल**—वि. मान्य; मंजूर; सन्मानित. [अर.]

**मक्मूर**—वि. निशेमुळें तर्र झालेला; निशेबाज. [अर. मख्मूर ]

**मक्रबी**—वि. १ पाश्चात्य. २ उत्तर आफ्रिकेंतील. [अर. मघ्रबी ]

**मक्रमत**—स्त्री. कृपा. [अर.]

**मक्सी**—पु. घोड्याचा रंग. -अश्वप १.२८.

**मक्सूद**—पु. हेतु; मतलब. 'तुझा काय मक्सुद (?) तो सांगणें. -रा १५.३७. [अर. मक्सुद् ]

**मख**—पु. यज्ञ. हा शब्द समासांत पूर्वपदीं व उत्तरपदींहि येतो. पूर्वपदीं-मख-मंडप-भूमि-रक्षण-विघ्न-सामग्री, इ० उत्तरपदीं-हयमख, शतमख इ० 'जे राजधर्म सुरतरुसख मखसे सुखद उत्सवद नाकीं।' -मोसभा १.१५. [सं.]

**मख**—पु. मगज; गीर, गाभा; मोख पहा. [मोख]

**मख**—वि. आंतल्या गांठीचा. मख्ख पहा.

**मखण**—न. लोणी; माखण पहा. 'यानें चोरून खावें मखण अनुभवें हें मला पूर्ण ठावें।' -अकक. २ विसुदाम ७३.

**मखदूर**—पु. मगदूर पहा.

**मखम(मा)ल, मखमुल, मख्मल**—स्त्री. १ एक प्रकारचें अतिशय मृदु वस्त्र. २ एक फुलझाड. -न. त्याचें फूल. [फा. मख्मल् ] मखम(ख्म)ली-माली-वि. मखमलीचा; मखमली-सारखा. 'सोनेरि पलंगावर गाद्या मख्मली पसरल्या चादरा त्यावर त्या मख्मली।' -प्रला २२९. ०किडा-पु. एक तांबडा, सपक्ष व अनेक पाय असलेला पावसाळी किडा; देवगाय; गोसाई. हा मृगारंभीं दिसतो.

**मखर**—न. १ कागदाच्या जाळ्या, उंची वस्त्रें इ० सभोंवतीं लावून देवाच्या मूर्ति, सन्माननीय पुरुष इ० साठीं प्रसंगविशेषीं करतात ती सुशोभित जागा. 'त्या निंदी श्रीकृष्णा कीर्ति श्री-शांति-मूर्तिच्या मखरा।' -मोसभा २.३६. २ प्रथम ऋतु प्राप्त झाला असतां न्हाणवलीस जींत बसवितात ती आळीची ताटी; अशा ताटया लावून केलेली जागा. ३ (व.) पोळ्याच्या दिवशीं बैलाच्या कपाळावर बांधावयाचें लाकडी, कागदी बाशिंग. मखऱ्या-पु (व.) ज्याच्या डोक्यावर मखर बांधतात तो बैल.

**मखलाशी-सी, मख्ल(ल्ला)शी**—स्त्री. १ हिशेब, कागदपत्र इ० मंजूर करणें; तो बरोबर आहे असा, मान्यतेचा, पसंतीचा शेरा; (सामा.) मान्यता; मंजूरी. २ सनद, नेमणूक, इनाम, दस्तऐवज इ० मंजूर झाल्याबद्दलचा सरकारचा शिक्का, निशाणी, सही. 'यांचे यादींत मखलासी जाहली असे.' -वाडदुबा ८४. ३ एकाखालीं एक रकमा मांडून केलेली गोळा-बेरीज; तेरीज. ४ वादाचा निकाल; निर्णय. ५ फार देणें, घेणें असतां सरकार इ० पासुन थोड्या द्रव्यानें करून घेतलेली तोड. 'याची मखलशी करून खरा होईल त्याचे स्वाधीन करावी.' -वाडबाबा २.७१. ६ (ल.) साफसुफी; सारवासारव; वरवरची बोळवण. ७ (ल.) टीका; मल्लीनाथी; भाष्य. [अर. मुखल्लस्= शुद्ध, बिनचूक] ०करणें-सुधारणा करणें; नीटनेटकें स्वरूप देणें. 'जें मनांत होतें तें एकदम बाहेर पडलें. आतां किती जरी कळाकुसरी आणखी मखलाशी केली तरी मी फसायची नाहीं.' -जग हें असें आहे.

**मखा-ख्खा**—पु (व.) गोटया खेळण्यासाठीं जमिनींत केलेला खळगा; गल.

**मखी-ख्खी**—स्त्री. १ बंदुकीच्या टोंकाला नेम धरण्यास उपयोगी असतें तें चिन्ह; माशी. २ खोंच; मर्म; गर्भितार्थ; आशय (भाषण, कविता इ० चा.) ३ युक्ति; रीत; खुबी; मर्म (एखाद्या कृतीचें, कोड्याचें) [सं. मक्षिका. प्रा. मक्खिआ; हिं. मख्खी ] ०उतरणें-हुबेहूब, बिनचूक अनुकरण, नक्कल करणें.

**मख्ख**—वि. आपले विचार कोणाला न कळूं देणारा; आंतल्या गांठीचा. [मेख ?]

**मख्खम**—वि. १ मजबूत; बळकट; भक्कम (इमारत, पदार्थ). २ मोठें; अवाढव्य; अवजड (ओझें इ०). खंमाल पहा.

**मख्खीचूस**—वि. (ना.) अत्यंत कंजुष; कवडीचुंबक. [हिं. मक्खी=माशी+चूसना=चोखणें ]

**मख्दू(ग्दू)म**—पु धनी; मालक. 'सत्यापा मग्दूम सल्गरेकर याची स्त्री.' -ख ७.३७२१. [अर. मख्दूम् ]

**मख्फी**—वि. गुप्त. कुफिया पहा. [अर.]

**मख्मूल**—वि. टवटवीत; तजेल; तर्र. 'मख्मूल फूल गुल-गुल्ति ऐन रंगात।' -प्रला २३८. [अर. मख्मूर ]

**मग**—पु. मीडियांतील एक जात; प्राचीन पारशी धर्मातील पुरोहितवर्ग. सूर्योपासक लोक. -ज्ञाको. (म) ५.

**मग**—क्रिवि. १ त्यावर; नंतर; पुढें. २ लवकरच; अंमळ-शानें; थोड्या वेळांत. ३ असें आहे त्याअर्थी. 'पाऊस तर पुष्कळ पडला मग पिकें कां नाहीं आलीं ?' ४ पुष्कळदां पाद-पूरक म्हणून योजितात. 'जाईन मग तुझें काय जातें.' [ वेप्रा. मगा—ग्ग=पश्चात्; म. मागें ]

**मगतून, मगत्यान**—क्रिवि. (कों. कु.) मागाहून; नंतर. –लोक २.८०. **मगन, मगनूशानि**—क्रिवि. (खा. व.) नंतर; थोड्या वेळनें.

**मगज**—पु. १ गीर; गाभा; रसाळ पदार्थ. 'मग पाहतां दिसें सगळें। परि मगज हारपे।' –कथा ७.६.५३. २ शेंगेच्या आंतील दाणा, गर इ० मऊ पदार्थ. ३ भाकरींतील मऊ भाग. ४ हाडांतील मृदु अंश. ५ बोज; प्रतिष्ठा; महत्त्व. 'आपला मगज राखणें। कांहीं तरी।' –दा ११.१०.२३. ६ डोक्यांतील मेंदु. ७ सार; तथ्य. [ फा. मघ्ज; तुल. सं. मज्जा ]

**मगजी**—स्त्री. १ कड; कांठ. २ शोभेची, नक्षीची किनार, कांठ; फीत; झालर. [ फा. मघ्झी ] ०**दार**—वि. सुशोभित कांठ, किनार असलेलें (वस्त्र).

**मगण**—न. (महानु.) महिमा; गहनता. 'चांग मगण वाढिनलें। शांतीचें पैं।' –भ.ए ४३. [ सं. महार्घ; म. महाग ]

**मगदुमी, मगदुमीसाखर**—स्त्री. पिठी साखरेचा एक प्रकार. 'चिनी साखर पांढरी, मगदुमी तैसीच नाबद्री।' –कचे-सुच ८.

**मगदूर, मग्दूर**—पु. १ शक्ति; सामर्थ्य; ताकद; जोर. –दिमरा १.१६. २ योग्यता; किंमत. 'पूर्वी बंदरावर मालाच्या मगदुराप्रमाणें गलबतावर जकात पडे.' –कोरकि १४. [ अर. मक्‌दूर ]

**मगन**—वि. १ (प्र.) मग्न. कांहींएक विचारांत गुंतलेला, गुंग झालेला; चूर; दंग. 'तेथेंच जाले मगन हो।' बयाबाई राम-दासी प्र. ९२, पद ८. २ संतुष्ट; आनंदित; खूष. [ सं. मग्न ] ०**मस्त, मगरमस्त**—वि. १ (ल.) धुंद झालेला; गर्विष्ठ; उन्मत्त; मगरूर झालेला. २ अतिशय मस्त; बेफाम झालेला. मगरमस्त पहा. 'कोतल नर कोतवाल वारण मगनमस्त किल करित।' –ऐपो २००.

**मगम**—वि. (व) १ पोटभर; पुरेसें. 'मगम पोट भरलें म्हणजे खाण्यावर वासना होत नाहीं.' २ संतुष्ट. 'वरणभात मिळाला कीं मनुष्य मगम राहतो.'

**मगमगीत**—वि. सुवासानें युक्त; घमघमीत पहा. 'मधुररसें रसाळें। अति निर्मळें मगमगीतें।' –एभा १८.९०.

**मगर**—पुस्त्री. सुसर; नक्र; एक जलचर प्राणी. [ सं. मकर; प्रा. मगर ] ०**गंड**—वि. माजलेला; मस्त. ०**मस्त**—वि. १ अत्यंत गर्विष्ठ; उन्मत्त (माणूस). २ घष्टपुष्ट; मस्त; न दमणारें (जना-वर). ३ झिंगलेला. मगनमस्त पहा. ०**मिठी**—स्त्री. १ मगराची मिठी. यावरून २ (ल.) अतिशय घट्ट, न सुटणारी मिठी, पकड, छाप. 'अज्ञानाच्या मगरमिठीहून अधिक जाचक अशी गोष्ट नसेल.' –नि. ३ एखाद्या लांबलचक व कंटाळवाण्या भाषणानें एखाद्यास गुंतविणें, हालूं न देणें. ०**मुशी**—स्त्री. मुशी नांवाच्या समुद्रांतील माशाची एक जात. **मगरजाळ**—न. (गो.) कोळ्याचें जाळें. [ मगर+जाळें ]

**मगर**—उभ. परंतु; पण. 'करार होणें राहिला, मगर बोल-ण्यांत शपथपूर्वक आलें आहे.' –रा ५.६. [ फा. मगर् ]

**मगरी**—स्त्री. १ छपराचें आढें; पाटेस (क्रि० बांधणें) २ वाफ्यांतील रोपांची रांग, ओळ. ३ भिंतीची मुंढेरी, वरवंडी. ४ बागेंत वाफ्यांना पाणी देण्यासाठीं बांधलेला उंच पाट. ५ (कु.) मिरचीचें रोप लावण्यासाठीं केलेला मधारा, वरवंडी. [ हिं. मग्री ]

**मगरूर**—वि. गर्विष्ठ; चढेल; उन्मत्त; प्रतिष्ठित. [ अर. मघ्रूर ] **मगरुरी, मग्रुरी**—स्त्री. गर्व; चढेलपणा; उन्मत्तपणा; घमेंड. 'शेवटीं दादासाहेबांस यावें, साक्षी द्यावी हें कांहीं त्यांच्या मनांत नाहीं व गोष्टीही मगरूरीच्या...' –पया १०. [ अर. मघ्रूरी ]

**मंगल**—न. १ भाग्य; सुदैव; कल्याण. २ लग्न, मुंज, इ० शुभकार्ये. ३ शुभकार्य, ग्रंथ पठण इ०च्या आरंभीं म्हणतात ते ईश्वरस्तुतिपर श्लोक; मंगलाचरण पहा. आरंभींचें–मध्यचें–शेवटचें मंगल असे याचे तीन भाग कधीं कधीं करण्यांत येतात. –पु. मंगळ नांवाचा एक ग्रह. –वि. शुभ; सुलक्षणी; कल्याणकारक. [ सं. ] ०**कार्य**—न. लग्न, मुंज इ० शुभ विधि. ०**जननी**—स्त्री. (काव्य) पृथ्वी, मंगल ग्रहाची माता. [ सं. ] ०**दायक**—वि. शुभदायक. [ सं. ] ०**निधि**—पु. कल्याणाचा ठेवा, सांठा. ०**भवानी**—स्त्री. (निंदा, उपहास याअर्थी) अचरट, मूर्ख स्त्री. ०**वाद्य**—न. मुंज, लग्न यांसारख्या शुभप्रसंगीं वाजविण्याचें वाद्य. (वाजंत्री, इ०) ०**वार**—पु. मंगळवार; भौमवार. ०**सूत्र**—न. मंगळसूत्र पहा. ०**स्नान**—न. अंगाला तेलें, उटणें लावून उष्णोदकानें केलेलें स्नान; अभ्यंगस्नान; न्हाणें. **मंगलागौरी**—स्त्री. देवी; पार्वती. **मंगलागौरीव्रत**—न. लग्नानंतर मुलींनीं पांच वर्षे श्रावण महिन्यां-तील प्रत्येक मंगळवारीं करावयाचें मंगळागौरी पूजेचें व्रत. **मंगलाचरण**—न. १ ग्रंथ, कथा, पुराण इ०च्या आरंभीं केलेली ईश्वराची स्तुति २ कुलदेवतेचें नामस्मरण. ३ कोणत्याहि कार्याचा आरंभ, सुरवात. (क्रि० करणें). **मंगलाष्टक**—न. लग्न, मुंज इ० कार्याच्या वेळीं म्हणावयाचीं आशीर्वादार्थी शुभदायक पद्यें, प्रत्येक. [ मंगल+अष्टक ] ०**घट्ट करणें**—मंगलाष्टकें म्हणावयास शिकणें. ०**गात बसणें**—रडत, चरफडत बसणें. **मंगलाक्षता**—

क्लीअव. मंगलप्रसंगीं आशीर्वाद देतांना ब्राह्मण इ०नीं मस्तकावर टाकलेले कुंकुमयुक्त तांदूळ; मंत्राक्षता. [ मंगल+अक्षत ]

**मगस**—पु. (प्र.) मगज पहा.

**मंगळ**—पु. सूर्यमालेंतील एक ग्रह; भूमिपुत्र. हा तांबूस वर्णाचा असुन पृथ्वीच्या अगदीं जवळ आहे. फलज्योतिषांत हा क्रूर ग्रह मानिला जातो. [ सं. ] ०**उखा**-स्त्री. सुखप्रकाश. -मनको. ०**जननी**-स्त्री. पृथ्वी. ०**भगिनी**-स्त्री. १ सीता, द्रौपदी या पृथ्वीपासुन जन्मल्या म्हणून यांच्याबद्दल योजितात. 'मंगळ-भगिनीच्या वरप्रसन्नें।' -दावि ४४२. २ (लग्न सोहळ्यांतील) करवली. ०**माठ्या**-वि. मूर्ख; मठ्ठ; अडाणी (शिवी). [मंगळ+माठ] ०**वार**-पु. भौमवार. **मंगळाई देवी**-स्त्री. एक क्षुद्र देवता. 'मंगळाई देवी म्हणे श्रीगुरु वरिष्ठा।' -सप्र ५.१३. **मंगळी**-वि. (बे.) सोंगाडी (स्त्री).

**मंगळ**—न. मंगलकारक गाणें; मंगलाचरण. 'अहिवा मंगळ गाती।' -वसा ४९. -नपु. (व.) मंगलाष्टक. -नवि. मंगल पहा. [ सं. मंगल ] (वाप्र.) ०**गात बसणें**-रडत, दुःख करीत बसणें. ०**मातणें-माजणें**-१ अव्यवस्थितपणें कसें तरी केलें जाणें (लग्न). २ (मंगलकार्यांत) सोंवळें ओवळें इ०चा विचार न राहणें. सामाशब्द- ०**आरती, मंगळारती**-स्त्री. १ देव-पूजेच्या समाप्तीच्या पूर्वी तबकांत नीरांजनें ठेवून तोंडानें आरती म्हणत देवाला ओवाळणें. २ आरतीचें तबक. 'मग उजळोनि मंगळारती। वोवाळिला रुक्मिणीपती।' ०**कूळ**-पु कल्याण करणारा. -मनको. ०**तुरें**-न. मंगलवाद्य पहा. [ मंगल+तूर्य ] ०**दायक**-न. लग्न, विवाह इ०कार्ये. 'लटिकें करिती मंगळदायकें। लटिकींच एकें एकां व्याही।' -तुगा २५. ०**धाम**-न. (काव्य) १ चांगल्या वस्तूंनीं भरलेलें गृह. २ (ल.) देव; साधुपुरुष इ० **निधि**-पु. कल्याणाचा ठेवा, खाण. ०**भारणी**-स्त्री. परस्परांनीं परस्परांच्या पायांत पाय घालून ते चेपण्याचा प्रकार. ०**मूर्ति**-पु. गणपति. ०**सूत्र**-न. लग्नांत वर वधूच्या गळ्यामध्यें दोऱ्यांत मणि ओंविलेलें जें सौभाग्यचिन्ह बांधतो तें. (कु.) मंगळसुत. ०**सरी**-स्त्री. मंगळसूत्र. 'कीं अलंकार घातले संपूर्ण। परी मंगळ-सरीविण व्यर्थची।' -भवि ६.४४. **मंगळागौर-री**-मंगलागौरी इ० पहा.

**मंगळणें**—उक्रि. १ चकविणें; ठकविणें; भोंदणें; फसविणें. २ (ल.) चळविणें; गोड बोलून इष्ट हेतु साध्य करून घेणें; वश करणें. ३ (अश्लील) भोगणें; हेपलणें. तंतरणें पहा. **मंगळीचा**-पु. (एक शिवी) अवैवाहिक संबंधापासुन झालेला इसम; अनौरस; कडू.

**मगां, मगाशीं**—(प्र.) मघां, मघाशीं पहा.

**मंगी**—वि. (नंदभाषा, व्यापाऱ्यांत रूढ) आठ संख्या. 'सुतपेटीचा भाव मंगी आहे.'

**मंगी-गू**—स्त्री. मांजरीला लाडिकपणें संबोधितात. **मंगोडें**-न. (बालभाषा) मांजर.

**मंगूस, मंगूसवेल**—(प्र.) मुंगूस; मुंगूसवेल पहा.

**मगे-ग्ये**—क्रिवि. (राजा. कु.) नंतर; मग. [ मग ]

**मगे**—क्रिवि. (कु.) म्हणजे. [ म्हणजे-म्हंजे-म्हंगे-मगे ]

**मंगेरा, मंग्यारो**—पु. (कु. गो.) पाचोळा; केरकचरा इ० एकत्र करण्याचें लांकडी पावडें.

**मगोळ**—स्त्री. (सुतारी धंदा) कानशीचा एक प्रकार.

**मग्न**—स्त्री. (शाप. रसा.) चांदीसारखा पांढरा व फार तेजस्वी असा एक धातु. याचे पुष्कळ संयुक्त पदार्थ बनतात मग्नक्षार हें एक चांगलें रेचक आहे. (इं.) मॅग्नेशियम्.

**मग्न**—वि. १ पाणी इ० मध्यें बुडालेला. 'अयोध्यापुरीं वाजती शंख भेरी। नभीं देव ते मग्न चिंता समुद्रीं।' -मुरामायण अयोध्या ७. २ (ल.) एखाद्या कामांत तल्लीन, दंग, चूर झालेला. [ सं. ]

**मग्रब, मग्रबाई**—पुस्त्री. सूर्यास्त. 'मगरबाचे समई नबाब येकामुदौलाचे घरास गेले.' -रा ७.१४६. [अर. मघ्रब=पश्चिम]

**मघई**—स्त्री. बनारस येथें मिळणाऱ्या विड्याच्या पानांची एक जात. हीं पानें सुवासिक व उत्कृष्ट चवदार असतात. -वि. मगधदेशाचें; मागधी. [ सं. मगध; प्रा. मगह ]

**मघमघणें**—अक्रि. घमघमणें; गोड, खमंग वास येणें; सुवास दरवळणें. 'ऐसें कमळ अति सुंदर। षड्विकार तेचि केसर। वैराग्य कर्णिका सघर। मघमघी थोर सुवासें।' -एभा २७.२३२.-मुआदि १०.९९. **मघमघ, मघमघीत**-वि. घमघमीत. 'मघमघ बहु अन्नें सेवितां भक्ष्य धाले।' -माधव, रामायण बालकांड ६०. 'मघमघीत सुपरिमळें। सफळफळें रुक्मिणी।' -एरुस्व १५.२५. [घमघम चा वर्णव्यत्यास; प्रा. मघमघ=फैलावणें;तुल०का.मग=वास]

**मघवा**—पु. इंद्र. [ सं. ]

**मघा**—स्त्रीअव. सत्तावीस नक्षत्रांपैकीं दहावें नक्षत्र (अनेक-वचनी प्रयोग). [ सं. ]

**मघां, मघाशीं-सीं**—क्रिवि. नुकताच; थोड्या वेळापूर्वी. 'तो मघांच आला तूं मात्र आतां आलास.'

**मॅच**—स्त्री. खेळ; सामना. 'मॅच झाली त्या सुमाराला कांहीं कांहीं दिवस जरी उचाकी होती ...' -सुदे ७९ [ इं. ]

**मंचक, मंच**—पु. १ पलंग; माचा; कोच; बाज. २ शेतांत पाखरें राखण्यासाठीं केलेला माळा; माचा; उंच केलेली जागा. ३ सिंहासनविशेष. [ सं. ] **मंचकारोहण**-न. १ राज्याभिषेकाचा एक प्रकार. हा सिंहासनारोहणापेक्षां कमी दर्जाचा आहे.

'राजारामानें दोनदां मंचकारोहण केलें.' (एकदां शिवाजीच्या मृत्यूनंतर व एकदां संभाजीच्या वधानंतर). २ बाळंतिणीस बाळंत झाल्यावर प्रथमच बाजेवर निजविण्याच्या विधीसहि म्हणतात.

**मचकट**—वि. कांहींसें मचूळ; मचूळ पहा.

**मचकमचक**—क्रिवि. पदार्थ खातांना होणारा मचमच असा आवाज करून. [ध्व.]

**मचकूर**—पुवि. (विरू.) मजकूर पहा.

**मचणें**—अक्रि. (कु.) १ माजणें; बोकाळणें; अनियंत्रितपणें चालणें (दांडगाई, धिंगामस्ती, खिदळणें इ०). 'काय वेड्यांचा बाजार मचला.' फुगणें; वाढणें. 'कलम ज्यारीचे घटाव मचले।' -ऐपो २१४. ३ (ना.) भांडाभांडीला सुरवात होणें; एकेरीवर येणें. [हिं. मचना] **मचविणें**-उक्रि. (निदार्थी.) उपस्थित करणें, चेतविणें, माजविणें, करणें (भांडण; लुच्चेगिरी; दंगाधोपा इ०). [मचणें]

**मचपत्री**—स्त्री. (वे.) शेवंतीप्रमाणें आकार व वाढ असलेली एक औषधी वनस्पति. हिचा रस जनावराच्या पोटदुखीवर उपयोगी आहे. [सं. मंचपत्री]

**मचमच**—स्त्री. १ खातांना होणारा तोंडाचा आवाज. २ (ल.) व्यर्थ, निरर्थक केलेली बडबड. [ध्व.] **म्ह०** खाणें थोडें मचमच फार. **मचमच-मचां**-क्रिवि. खातांना, चुंबन घेतांना इ० वेळीं होणाऱ्या आवाजाप्रमाणें आवाज करून.

**मचमचीत**—वि. १ पचपचीत; बेचव; पाणचट. २ (ल.) निःसत्त्व; निर्जीव; नीरस. [ध्व.]

**मचवा**—पु एक प्रकारचें लहान गलबत; बलावापेक्षां मोठी होडी. 'बेलापूर येथील बातमीचा मचवा जाया झाला आहे.' -समारो ३.२२०. [पोर्तु. मांचुआ]

**मॅचा**—पु (वे) आटयापाटयांचा खेळ.

**मचांग**—पु (व.) शिकार किंवा गवंडीकाम इ० साठीं घातलेला माचा; माळा. मंच पहा.

**मचाड**—वि. (ना.) गचाळ; शिळपट.

**मंची-जी**—स्त्री माती, विटा इ० इकडून तिकडे वाहून नेण्याचें कुंभाराचें साधन; कोळंबें. [सं. मंच]

**मचूळ**—वि. १ पूर्णपणें खारट नाहीं आणि गोड नाहीं असें (पाणी). २ बेचव; नीरस; पाणचट (पाणी, फळ इ०).

**मच्चा**—वि.मधचा-ला;मध्यें असलेला. [मध्यचा] **मच्च्यामध्यें; मच्चेमध्यें**-क्रिवि. १ ज्याचा विचार घेणें किंवा ज्यास कळविणें जरूर आहे त्यास न कळत (जाणें, देणें, करणें). 'मला न सांगतां न विचारतां त्यास कारभार मच्च्यामध्यें सांगितला.' २ भलत्यावर, तिऱ्हाइतावर बिनाकारण परिणाम होईल अशा रीतीनें. 'ते दोघे भांडले आणि सोडवावयास जो गेला त्यानें मच्च्यामध्यें शिव्या खाल्ल्या.'

**मच्छ**—पु. १ (प्र.) मत्स्य; मासा; एक जलचर प्राणी. २ (ल.) पाण्याच्या जोराच्या गतीस विरोध करून पाण्याचा जोर कमी करणारा जो भिंत, पूल इ०च्या रचनेंतील कुऱ्हाडीच्या ठोकाच्या आकाराचा भाग बांधतात तो. [सं. मत्स्य] **मच्छयंत्र**-पुन. खलाशाचें दिशा दाखविणारें यंत्र; होकायंत्र. [सं.] **मच्छिंद्री**-पु. जोंधळयाची एक हलकी जात. याचें कणीस वांकडें असून दांडा वांकडा असतो. दाण्याचें भोंड लाल असतें. -कृषि २६६. **मच्छीगोता**-पु. (मल्लविद्या) कुस्तींतील एक डाव. जोडीदाराच्या-चड्डीस लंगोटा खोंवतात त्या ठिकाणीं-धरून जोडीदारास थोडा मागें हिसका देऊन आपण जोडीदाराच्या मागें बसून आपल्या दुसऱ्या हातानें त्याचा पाय घोटयाजवळ धरून त्याला आपल्या पुढें चीत पाडणें. **मच्छीमार**-पु. मासे मारणारा कोळी; धीवर; (माळवी) मछलेटा. 'तिचें पाणी बहुत चांगलें असतां, कोळी मच्छीमार खाजणांतील येऊन विहिरींत पाय धुतात.' -समारो ३.२१२. **मच्छीमारी बोट**-स्त्री. मासे मारण्यासाठीं असलेलें लहान गलबत. मत्स्य पहा,

**मच्छर**—नपु. डांस; एक सपाद क्षुद्र प्राणी. [सं. मशक, मत्सरा; हिं.] **०दाणी-नी**-स्त्री. निजल्यावर डांस, ढेकूण इ०चा उपद्रव निवारण्यासाठीं केलेली बारीक जाळीदार कापडाची खोली.

**मछरु**—पु. (काव्य) मत्सर; द्वेष. 'नको रे मना मछरु दंभभारु।' -राम ६. [सं. मत्सर; प्रा. मच्छर]

**मज**—सना. १ मला; मजला. 'त्याचें मज मृषा गमे हनन।' -मोकर्ण ६.४. २ माझ्या. 'मजवर आपले अनंत उपकार आहेत.' [सं. अहं] **म्ह०** (व.) मज पहा फूल वाहा, घर पाहा हगून जा. =स्वतःपुरताच स्वच्छपणा. **मजपें**-माझ्याकडे. 'मजपें दुर्जे आलें तें देव जाणे वो।' -तुगा १४१.

**मंज**—न. (वे.) दंव; दंहिंवर; धुकें. [का. मंजु]

**मजकूर, मज्कूर**—पु १ लेखी माहिती; हकीकत; पत्रांतील वर्तमान. २ तोंडीं सांगितलेली बातमी, माहिती; बोलणें. ३ हकीकत; गोष्ट. 'त्यानें केवळ कच्चा मजकूर सांगितला.' ४ उल्लेख; निवेदन; आढळ. (क्रि० निघणें; येणें; चालणें). ५ किंमत; पाड; हिशेब. 'इराणीचा मजकूर किती? मारून धुडकावून देऊं!' -पाब ३२. ७ युक्ति; उपाय; तजवीज. 'याचा मजकूर काय करावा?' -भाब ४. ६ विचार; मसलत; बेत. 'नबाब शास्ताखान याची रवानगी करावी असा मज्कूर करून...' -सभासद २६. -वि. १ पूर्वी सांगितलेला; उपरिनिर्दिष्ट (कागदपत्रांत उपयोग). 'मौजे मजकूरचा पाटील गेला.' २ (चुकीनें) चालू; सध्याचा; वर्तमान. जसें:-सालमजकूर; माहेमजकूर. [अर. मझ्कूर्] **०करणें**-भाषण करणें; बोलणें. 'तुम्ही काय मजकूर

केला।' -ऐपो ४१. **मजकुरी**-वि. ज्यांत कांहीं मजकूर, हकीकत, माहिती आहे असा (कागद, भाषण इ०).

**मजगतीं**—क्रिवि. (गो.) मध्यंतरीं; दरम्यान [सं. मध्य; प्रा. मज्झ] **मजवेलो**-वि. (राजा. कुण.) मधला; मधचा. -मसाप २ १०५.

**मजत**—स्त्री. (राजा. कुण.) मदत पहा. 'चडेवांबी चार दी येवन मजत करती.' -मसाप २.४.११०.

**मंजन**—न. १ दांत, हिरडया इ० घांसण्याच्या उपयोगाचें कोणतेंहि चूर्ण, औषध. २ पदार्थ घासुन स्वच्छ करण्याचें कोणतेंहि साधन. [सं.]

**मजबूत-द**—वि. १ बळकट; भक्कम; दृढ; टिकाऊ; भरीव. २ (ल.) कायम; निश्चित; दृढ; खंबीर (भाषण, वचन). [अर. मझ्बूत्] **मजबूतमिजाज**-वि. स्थितप्रज्ञ. 'आंसाहेब दूरंदेश व मजबूत-मिजाज' -पया ४६५. **मजबुती, मज्बुती-दी**-स्त्री. १ बळकटी; भक्कमपणा; दृढता; पक्केपणा (इमारत इ०चा) 'जागां जागां गडकोट यांसि ताकीद करून मजबुदी करविली.' -सभासद ३२. २ बंदोबस्त. 'मोदी यास हस्तगत करून इकडे मज्बुतीनें पाठवून द्यावा' -दिमरा १.३००. ३ (ल.) कायमपणा; निश्चितपणा; (भाषण, वचन इ०चा) [फा. मझ्बूती]

**मजबूर, मज्बूर**—वि. १ लाचार; निराश्रित. २ जुलुमास बळी पडलेला. [अर. मज्बूर्]

**मजमू**—स्त्री. १ वसुली. २ वसुलीचें काम; मजमूदारी. 'येथील मजमू जगन्नाथ नारायण यांजकडे आहे.' -समारो ३.६. [अर. मज्मूअ] ०**दार**-पु वसुलीअधिकारी; मुख्य हिशेब-तपासनीस. सर्व महत्त्वाच्या कागदपत्रांवर मंजूर म्हणून हा मोर्तबसुद करीत असे. मुजुमदार. [फा. मज्मूआदार्] ०**दारी**-स्त्री. वसुलीचें काम; मजमू.

**मजमून, मज्मून**—पु १ पत्रांतील मजकूर; वृत्तांत. 'तेरावे व दहावे दफेतील जो मज्मून त्याचा मत्लब या फर्देत आला.' -रा ७ ३. २ विषय; आशय; सारांश; मजकूर पहा. [अर. मझ्मून]

**मंजयाला**—वि. (कु) मधला; मधचा. [सं. मध्य; प्रा. मज्झ]

**मजरा-रे**—पुन. १ शेतीच्या सोयीसाठीं शेताच्याजवळ व गांवापासुन जरा लांब राहिलेल्या शेतकऱ्यांची दहापंधरा झोपड्यांची वसाहत; वाडी, गांवचा परिकर. '... प्रांत कर्नाळा पैकीं तालुके नेरळाकडील खेरीज वरवण करून देहे व मजरे व खारी. ...' -समारो १.१६६. [अर. माज्री]

**मजरा**—वि. कमी; वजा. मुजरा पहा. 'तेणेंप्रमाणें मजरा पडेल म्हणोन सनद.' -वाडबाबा २.१५८. [मुज्रा]

**मंज(जि)री**—स्त्री. अनेक फुलें ज्यास एकापुढें एक लागलीं आहेत असा तुळस, सबजा इ०चा दांडा; मोहोर; तुरा; केसर. 'कापुरकेळीचां पदरीं। दिसति तुळसिचेया मंजिरी।' -भाए ३३. [सं. मंजरी]

**मंज(जि)री**—स्त्री. लहान टाळ. नृत्याच्या वेळीं ताल धरण्याकडे हिचा उपयोग करतात. 'सुरताल पखवाज खंजिरींत मंजरींत बासरीं।' -राला ३१. [सं. मंजीर]

**मजल**—स्त्री. १ एका दिवसांत साधारणपणें आक्रमिला जाणारा रस्ता; पल्ला; टप्पा. (क्रि० छाटणें; आटपणें; मारणें; उरकणें; गांठणें; ठोकणें; करणें). २ एका दमांत, एकदम, न थांबतां केलेला प्रवासाचा भाग. 'आम्ही प्रहरास चार कोस मजल आटपिली.' ३ प्रवासाचा शेवट, शेवटचा भाग. 'मी संध्याकाळीं मजलेस जाऊन ठेपेन' ४ उतरण्याची व विसाव्याची जागा. 'मजलीस येतांच गंजीफा खेळत बसले.' -ख ११.५९८०. ५ एखाद्या कामांतील टप्पा; भाग; कोणत्याहि कामाचा पार पडलेला भाग, पल्ला. ६ शेवट; अंत (काम इ०चा). 'तें कार्य इतक्या मजलेस आलें आहे परंतु मजलेस पोहोंचेल तेव्हां खरें.' [अर. मन्झिल्] ०**दरमजल**-क्रिवि. मजल करीत करीत (मध्यें न थांबतां); कूचदरकूच. 'तुम्ही मजल दरमजल जाल वीं रहात रहात जाल?'

**मज(जा)लस, मजालीस**—स्त्री. १ दरबार; राजसभा. 'दाद फिर्याद मजालसींत ऐकून घेऊन' -मराचिथोशा ३३. २ सदरेची जागा; बैठकीची जागा; दिवाणखाना. 'महोत्सहामध्यें आपण बसते जागीं नृत्य गायनादि न करवितां बाहेरल्या बाहेर मजलसींत करवावें.' -मराआ ११. ३ थोर, विद्वान्, सन्माननीय लोकांची सभा. ४ (सामा.) बैठक; सभा. 'जाउलीच्या मैदानीं बैसले शिपाई मजलशीं।' -ऐपो ६७. [अर. मज्लिस्]

**मजला**—पु. १ इमारतीचा ताल, माळा, माडी. २ (वस्त्राचा कांठ, लाकूड, दगड इ० वरच्या) नक्षीकामाचा निरनिराळा भाग. ३ नौकाफलक; गलबताचें पृष्ठ. ४ थर; पापुद्रा; पडदा. [अर. मन्झिला] **मजली**-वि. १ मजला असलेलें (घर, जहाज). २ एंकावर एक किनारी असलेलें (वस्त्र). 'एक-दु-तिमजली पैठणी.' **सातव्या मजल्यावर बसणें**- १ इमारतीच्या सर्वांत उंच भागांत असणें. २ (ल.) उच्च पदावर स्थित होणें.

**मजा**—स्त्री. १ रुचि; चव; स्वाद; खुमारी. २ गंमत; मौज; करमणूक. [फा. मझा] ०**दार**, **मजेदार**-वि. १ रुचकर; स्वादिष्ट; लज्जतदार; चवदार. २ गमतीचा; मौजेचा; ३ सुरेख; उत्कृष्ट; अप्रतिम; श्रेष्ठ. [फा मझा+दार्] ०**दारी**, **मजेदारी**-स्त्री. १ स्वादिष्टपणा; रुचकरपणा. २ गोडी; आवड; सुखकारिता. मनोरंजकता (गाणें, खेळ, नाच इ०ची). ३ मोहकता; सुंदरपणा;

सुरेखपणा. ( पदार्थाचा ). ४ प्रिय; कोमल भाषण, कृति; गोडी-गुलाबीचें बोलणें. **मजेदारीचा शब्द**-पु. लाडीगोडीचें भाषण; गुलगुल गोष्टी.

**मंजा**—पु. स्त्रीची आर्जवें पुरुष करीत आहे अशा मजकुराची लावणी; कलगी; याच्या उलट पंजा. ०**उतरणें**-१ एखाद्याच्या तोंडावरून हात खालीं आणून दाखणें; हात ओवाळणें.

**मजाख**—स्त्री. थट्टा; मस्करी; चेष्टा; विनोद. [ अर. गुज. ]

**मजारला**—वि. ( कों. ) मधला; मधचा. [ मध्य ]

**मजाल**—स्त्री. सामर्थ्य; ताकद; बिशाद; शक्ति. [ अर. मजाल् ]

**मंजिष्ठ**—नपु. एक प्रकारचा औषधी वेल, वनस्पति. याच्या मुळ्यांपासून तांबडा रंग करतात. [ सं. मंजिष्ठा; हिं. ] ०**मेह**–पु. १ तांबडी लघवी होण्याचा विकार. २ असली तांबडी लघवी; प्रमेह पहा. [ सं. ]

**मॅजिस्ट्रेट**—पु. फौजदारी खटले चालविणारा न्यायाधीश व मुलकी खात्यांतील अधिकारी; मामलेदार [ इं. ]

**मंजी**—स्त्री. ( कों. नाविक ) ( प्र. ) मंची; गलबताचा एक प्रकार.

**मंजी**—उश. ( माण. ) म्हणजे.

**म(मं)जीट-ठ, मजीत-द्**—वि. १ मळकट; जुना; खराब झालेला. ' सनगें मजीद एकूण चौपटा. ' –वाडसमा १.१४८. २ फिकट; मंद; निस्तेज; विटलेला ( रंग, रंगीत वस्त्र इ० ); ३ ( ल. ) चांगली उपस्थित नाहीं अशी, विसरलेली आहे अशी ( विद्या, कला, इ० ). –पु. ( सराफी ) जुना, मळकट मोती; [ अर. मजीद् ]

**मजील**—स्त्री. मजल पहा.

**मंजु**—वि. १ सुंदर; सुरेख; मोहक; रमणीय. २ मंजुळ; कोमल; मधुर ( आवाज ). [ सं. ]

**मजुमु, मजुमदार-री**—मजमू, मुजुमदार, मुजुमदारी पहा.

**मजुरा**—पु. मुजरा पहा. [ अर. मुज्रा ] ०**करणें-देणें**–( मूळ, मुख्य रकमेंत ) वजा घालणें; सूट देणें. ' त्याप्रमाणें शिबंदीचा खर्च सरकारांतून मजुरा दिला जाईल. ' –थोमारो १.८. ०**जकात**–स्त्री. आयात मालावरील घेतलेल्या जकातीपैकीं तोच माल बाहेर देशीं पाठविल्यावर परत मिळणारा भाग. ०**दास्त**–स्त्री. शेतवाडीसंबंधीं जें सरकारला द्रव्य द्यावयाचें त्या द्रव्यांतून सरकारला प्रत्यक्ष दिलेल्या धान्य, गवत इ० मालाच्या किंमतीची वजा केलेली रकम.

**मंजुल-ळ, मंजूळ, मंजुळवाणा**—वि. १ कानास गोड लागणारा; मधुर, ( आवाज, ध्वनि ). २ सौम्य; झुळुझुळु वाहणारा; मंद ( वारा ). [ सं. मंजुल ]

**मंजु(जू)षा**—स्त्री. पेटी. [ सं. ]

**मजूर**—पु. दिवसास अमुक पैसे देऊं अशा करारानें कामाला लाविलेला इसम; गडी; काबाडकष्ट करणारा; कुली; मोलारी. [ फा. मझ्दूर ] **म्ह**० दिवस बुडे मजूर उडे. ०**कर-करी-दार-वाला, मजूर्दार**-पु. मजूर; भाडोत्री माणूस. ' तोंपर्यंत केवळ मजूर्दाराप्रमाणें करूं नये. ' –ख ८६३. **मजु(जू)री**–स्त्री. १ मजुरास त्याच्या कामाबद्दल दिलेला पैसा; रोजमुरा; वेतन. २ मोलानें केलेली अंगमेहनत; मजुराचें काम. [ फा. मझ्दूरी ]

**मंजूर**—वि. १ कबूल; पसंत; मान्य; इष्ट. ' टीपूचा आमचा स्नेह आहे परंतु राव पंतप्रधान यांचा स्नेह आम्हांस अधिक मंजूर. ' –ख ८.४११६. २ कायम करणें; मान्य करणें ( खालच्या कोर्टाचा निकाल इ० ). ३ परवानगी. ४ पाहिलेलें. [अर. मन्झूर ]

**मंजुरी**–स्त्री. स्वीकृती; कबुली; मान्यता.

**मजोरी**—वि. ( प्र. ) माजोरी; उन्मत्त; गर्विष्ठ. ' मजोरी ढंग ना सोडी । ' –राला ७३.

**मज्जन**—न. १ बुडणें; बुडी मारणें; बुडविणें. २ स्नान. ' जों मज्जनें करिति त्या यमुनेंत नारी । ' –वामन कात्यायनी व्रत ३२. [ सं. ]

**मज्जा**—स्त्री. १ हाडांतील मऊ पदार्थ; अस्थिसार. ' आंतली मज्जा काढी । अस्थिगत । ' –ज्ञा ६.२१८. २ चरबी; मेद. ' अस्तींचा पुंजा । गुंडाळिला मज्जा । ' –भाए ७६१. ३ मेंदु; मगज. ' भय चिंता रोगांनीं ग्रासिलें काळीज मज्जाला । ' –ऐपो ३९७. ४ झाडांतील पोषक रस; गीर; सत्त्व. [ सं. ] ०**गत**–वि. मांसांत, हाडांतील धातूंत भिनलेला ( रोग ). ०**तंतु**–पु. मेंदु, पृष्ठवंशरज्जु इ०स जोडलेल्या दोरांपैकीं प्रत्येक; ( इं. ) नर्व्ह. ०**मेह**–पु. १ लघवींतून शरीरांतील सत्त्व निघून जाण्याचा विकार. २ अशा तऱ्हेची लघवी; प्रमेह पहा. ०**स्थान**–न. मस्तुलुंग; मेंदू. –बालरोगचिकित्सा ७४.

**मज्जाव**—पु. ( जाण्यायेण्याला ) प्रतिबंध; मनाई; बंदी; आडकाठी. [ हिं. मत्+जाव=जाऊं नको ]

**मॅज्या**—न. खेळण्याची गोटी; बैदूल.

**मझहला, मझेला**—पु. १ संकट; पेंच. २ बखेडा; घोळ. ' पागेकडील कारभाराचा येक महिना कम-कसर मोठा मझेला पडला होता. ' –रा ७.६९. २ हगामा; गडबड; धुमाकूळ; गर्दी. ' मझ्हला तमाशाचाच दिसतो. ' –रा ६.५९३ [ फा. मझ्हला ]

**मझारिआन्**—पु. शेतकरी. –आदिलशाही फर्मानें. [ फा. ]

**मटकणें, मटकाविणें**—सक्रि. १ झडप घालून पकडणें. एकदम धरणें ( धावणारा माणूस, चेंडू, वस्तु इ० ). २ एकदम खाऊन टाकणें; मटामट खाणें. ३ हुशारीनें चटकन पटकाविणें ( पैसा, नफा इ० ). ४ एकदम घट्ट मिटणें ( तोंड, डोळे ). [ध्व. मट ! ]

**मट-कन-कर-दिनीं-दिशीं, मटक्कदिशीं**-क्रिवि. १ चटकन; पटकन; झटकन; चुटकीसरशीं. ' ती त्या उंचवटयावर मटक्कदिशीं बसली ; ' -कोरकि ४५७. २ स्तब्धपणें; मुकाटयानें; तोंड न उघडतां; गुपचुप. ( क्रि० बसणें; असणें, राहणें; होणें ). [ ध्व. ] **मटकमटक**-क्रिवि. अधाशीपणानें खातांना तोंडाच्या, ओठाच्या होणाऱ्या आवाजाप्रमाणें आवाज करून. **मटगोळा**-पु. एका दमात खाल्लेला कांहीं खाद्य पदार्थ. ' मुलानें भाताचा मटगोळा करून टाकला.' **मटमट-मटां**-क्रिवि भराभर अधाशी पणानें खाणें, मुके घेणें, एकदम उठणें किंवा बसणें, एकदम कांहींएक वस्तु पकडणें इ० त्या होणाऱ्या आवाजाप्रमाणें आवाज करून. ( क्रि० खाणें; जेवणें; घेणें; उठणें; धरणें; झेलणें ).' देउनि मिटक्या मटमट घटघट त्या स्वाहितासुगुदका पी । '-मोकर्ण ४५.१४. **मटमटावणें**-सक्रि मटकावणें; मटवन खाऊन टाकणें; अधाशीपणानें भराभर खाणें. **मटमुट-मटां**-क्रिवि. माटमुट; धागधुग; धसधस; धडधड होऊन. ' माझा जीव मटमुट करतो. ' **मटाट-टां, मटामट-मुटां**-क्रिवि ( मटमटचा अतिशय ) मटमट असा जोराचा आवाज करून. ' मुके मटामट अगणित घेत । ' -आई.

**मटकणें**—सक्रि ( व ) मुरडणें.

**मटका**—पु. कंबर. ( क्रि० बसणें; जिरणें, ). ' त्या कामांत त्याचा मटकाच बसला. '

**मटका**—पु. मटकींतला एक भेद.

**मटकी**—स्त्री एक कडधान्य; मठ. [ सं. मट्टक ]

**मटकेंच**—क्रिवि. ( ना. व. ) थोडया वेळापूर्वी; नुकताच; आतांच.

**मटगा**—वि. आंखूड; तोकडा; लांडा. [ का. मट्ट=आंखूडपणा ]

**मटन**—न. बकरा इ० चें मांस; सागोती. [ इं. ]

**मंटप**—पु. ( गो. ) मंडप पहा. ' मंटपसभेसी दाटी पूर्ण। ' -दावि ३३.

**मटवालकी**—स्त्री. ( बे. ) गवंडी, सुतार यांचें एक हत्यार; गुण्या; काटकोन्या. [ का. मट्ट=गुण्या ]

**मटा**—वि. ( क. कुण. ) मोठा; बडा ' मटा लागून गेलायस कीं नाहीं ? ' [ मोठा ]

**मटा(ठा)र**—पु. एक प्रकारचें कडधान्य; पांढरा वाटाणा. [ हिं. मटर ]

**मटाळू**—न. ( व.) एक प्रकारचा वेल व त्याचें फळ. हें उपासाला भाजून खातात.

**मट्ट**—क्रिवि. स्तब्ध; कांहीं एक न बोलतां; मुकाटयानें ( क्रि० बसणें; असणें; राहणें; होणें. ) -वि. १ जागच्याजागीं एकदम थांबणारा; बसणारा ( बुजलेला घोडा, जनावर इ० ). २ नेटानें धरणें देऊन बसणारा ( मनुष्य ). ३ मंद; आळशी; मठ्ठ. [ सं. मठः दे. प्रा. मठ्ठ=मंद ] **०माया होणें**-( क. ) नाहींसें होणें; गप्प, गार होणें.

**मट्टा**—पु. ( तंजा. ) झाडाची साल; वल्कल. [ ता मेट्ट ]

**मट्टी**—स्त्री. माती. [ सं. मृत्तिका प्रा.मट्टी ] **मट्टी पलिद करणें**-( ना. ) शरीराची नासाडी करणें; सर्व नाश करणें.

**मट्ट्यास येणें**—फार चालण्यानें, श्रम केल्यानें थकणें; जेरीस येणें; मेटाकुटीस येणें. [ मेटें ]

**मठ**—पु ( संगीत. ) कर्नाटक संगीत पद्धतींतील एक ताल. ह्याचे मात्रा प्रकार पांच आहेत ते असेः-८ १०,१२,१६,२०.

**मठ**—पु एक प्रकारचें कडधान्य; मटकी पहा.

**मठ**—पु. शिकारीकरितां बसण्यासाठीं खणलेला खळगा. -मनोहर मासिक मे १९३६.

**मठ**—पु १ पाठशाळा; धार्मिक शिक्षणसंस्था. २ आश्रम, गुहा. ३ यती, गोसावी ब्रह्मचारी इ०चें राहण्याचें स्थान. ' गंधर्व मोडोनिया मठीं । आलीस का । ' -कथा २.१२.७१ ४ लहान देऊळ. ५ स्थान; जागा. ' ना ते साटवण मठ । ब्रह्मविद्येचे ' -ऋ २७. [ सं. ] **०भिक्षा**-स्त्री ( भिक्षा मागण्यासाठीं बाहेर न जातां ) मठात मिळालेली भिक्षा. **मठाधिकार**-पु. गोसावी, बैरागी, संन्यासी इ० चा विवक्षित काळापर्यंत मठात राहण्याचा हक्क. [ मठ+धिकार ] **मठाधिकारी, मठाधिपति, मठाधीश, मठपति**-पु मठांत राहण्याचा हक्क असलेला गोसावी,यति,बैरागी इ० **मठारा**-पु. ढोंगी साधू. ' सांडा सांडा रे मठारे । एकी गांठी सर्वे धुरें । ' -तुगा ३२५५. **मठिका, मठी**-स्त्री. १ लहान मठ. २ ( विनयानें उल्लेख करतांना ) लहान घर. ३ ( व ) चावडी.

**मठ-ठ्ठ**—वि. १ मंद; सुस्त; संथ ( बैल, टोणगा इ० ). २ बुद्धिहीन; जडबुद्धि. [ सं. मृष्ट=गुळगुळीत धुतलेला; देप्रा. मढ्ढ ]

**मठा-ठ्ठा**—पु १ लोणी न काढतां ढवळून पातळ केलेलें दहीं. ' पन्हें फुटाचें मठ्ठा मिठ्ठा । ' -अमृत ३५. २ घट्ट ताक.

**मठाटी-डी**—स्त्री. ( व ) बैलाच्या डोक्यावरील सुताच्या दोरीचा साज. [ सं मस्त(क); प्रा. मत्थ+ताटी ] **०झाडणें**-( व. ) खरडपट्टी काढणें. **०हालविणें**-(व.) कान धरून हालविणें.

**मठा(ठ)रणें, मठाळणें**—सक्रि. ( घडकाम ) १ नव्या भांड्याला ठोके मारणें; सफाई, झिलई करणें. २ गोंजारणें;चुचकारणें. ३ मन वळविणें; अनुकूल करणें. -अक्रि. १ ( जखम ) बरी होत येणें, भरत येणें. [ सं. मृष्ट; प्रा. मट्ठ ? ] **मठार**-१ (जरतारीची) तार चपटी करण्याचें हत्यार. **मठारणी, मठारणें**-स्त्रीन. सोनार, तांबट इ० चा साखळया इ० साफ करण्याचा, सफाई देण्याचा, पोंचे काढण्याचा एक हातोडा.

**मठारणें**—अक्रि. १ (व.) सुस्त होणें; मंद होणें. 'अलीकडे पोरगा फारच मठारला आहे.' [मद्र] २ माजणें; गर्विष्ठ, उन्मत्त होणें. 'जो गर्वाहंकारें वाढे। दंभे मठारुनी चढे।' -ज्ञाप्र २३०. [देप्रा. मड्डर=गर्व]

**मठ्ठ, मठ्या, मठ्ठया**—वि.क्रिवि. मठ्ठ पहा.

**मड-डें**—न. १ (कों.) प्रेत; मुडदा; मढें. 'चितेवरी शोभल मड।' -दावि १४७. २ उपद्रवी, त्रासदायक माणूस; पीडा; लचांड. ३ (गो.) देवादिकांचा अंगांत होणारा संचार; अवसर; घुमारा; किंवा असा संचार झालेला माणूस. [सं. मृत; प्रा. मड; का. मडि=मरणें]

**मंड**—पु. १ आजाऱ्याला देण्यासाठीं भाताच्या लाह्या शिजविलेलें पाणी. २ भाताची पेज (औषधी). ३ कोणत्याहि पदार्थाचें सत्त्व, सार, तवंग, निवळी, साय. ४ मद्य. [सं.]

**मंड**—वि (वे.) १ हट्टी; काम न ऐकणारा. 'काय मंड मुलगा आहस बुवा!' २ बोथट; मंद धारेची (सुरी, चाकू, इ०). [सं. मंद; का. मड्ड]

**मंडई**—स्त्री. भाजीपाल्याची जेथें मोठ्या प्रमाणावर खरेदी विक्री होते असें शहरांतील ठिकाण; भाजीपाल्याचा बाजार. [हिं. मंडी]

**मंडक**—पु. गव्हाच्या पिठापासून केलेलें एक पक्वान्न; मांडा पहा. [सं.]

**मडकी-कें**—स्त्रीन. पाणी भरण्याचें मातीचें भांडें; डेरा; माठ. [वै. सं. मणिक; देप्रा. मडक्क] **मडकूल**—न लहान मडकें; गाडगें. **मडकींभांडीं-हंडरीं**—न.अव. स्वयंपाकाचीं भांडीं-कुंडीं (समुच्चयानें). **मडक्यांतली वरू-वरव**—स्त्री. १ मडक्यांतलें शिलकी धान्य. २ (ल.) अल्पस्वल्प संग्रह. वरव पहा. 'कोंकणातलें पीक मडक्यांतली वरव.'

**मडखूंठ**—स्त्री. (कु.) मळणीचें गवत वरखालीं करण्याची काठी. [? का. मडिके=शेतकीचें एक औत]

**मडगा-गे, मडघा**—पुन. १ नरडें; गळयाचा पुढचा भाग.-शर. २ अंमल; सत्ता. 'आज तो रानटी व जुनाट मडघा मोडून दयाळु इंग्रजांचा सुधारणेचा...' -खेया २८. ३ स्थान; घर. 'भेदाभेदाचा मडघा मोडिला'। -दा ५.९.३९ [मठ-ढ]

**मडगें**—न. (व.) एक धान्य.

**मडचणें**—क्रि. (वे.) घडी घालणें; दुमडणें [का. मडचु]

**मंडण**—न. (कु.) मनुष्यांचा समुदाय; मंडळी. [सं. मड्-मंड]

**मंडन-ण**—न. १ शोभा; थाटमाट; सुशोभितपणा. २ अलंकार; भूषण; दागिना. 'सकळा भूषणां भूषण। ते मंडण तिन्हीं लोकीं।' -एरुस्व ३.४६. 'राम योग्यांचें मंडन।' -भूपाळी. ३ सजविणें; शोभविणें; थाटमाट करणें. ४ (वादविवादांत मुद्यांचें) समर्थन; सिद्ध करणें; स्थापन. याच्या उलट खंडन. ५ उत्सवप्रसंग; समारंभ. ६ मेघमंडल; मेघांचें आकाशांत गोळा झालेलें पटल. (क्रि० घालणें). [सं. मंडन]

**मंडप**—पु. १ लग्न, मुंज इ. प्रसंगीं घरापुढें खांब पुरून ऊन इ० पासून निवारण होण्यासाठीं वस्त्रादींनीं आच्छादिलेली जागा; मांडव. २ वेल इ० स चढावयासाठीं केलेला कामटया इ०चा मांडव; लताकुंज. ३ सभामंडप; देवळांतील श्रोते, भाविक लोक इ० ना बसावयासाठीं गाभाऱ्यापुढें असलेली जागा. ४ (ल.) मेघांचें आकाशांत गोळा झालेलें पटल; मेघपटल. 'पावसानें मंडप घातला' ५ धाबें; माळवद. 'मढ मंडप चौबारी। देखे धर्मसाळां। -ऋ २०. [सं.] **०ताणणें**-मंडप घालणें-उभारणें. 'आसन घालुनि प्राणायामें। चित्त चतुष्टय मंडप ताणूं।' -मध्व ५२१. **०घ(घु)सणी**-स्त्री. (गर्दीत अंगाला अंग घासलें जातें यावरून) मंडपांत होणारी अतिशय गर्दी; खेंचाखेंच. 'तों मंडपघसणी होतसे देख। मार्ग न दिसे जावया।' -ह ३४.९२. -वेसीस्व ३.६९. **०देवता**-स्त्री. लग्न इ० प्रसंगीं घातलेल्या मंडपाची प्रत्येक खांबाच्या ठिकाणीं पूजिली जाणारी अधिष्ठात्री देवता. **०शोभा**-स्त्री १ हंडया, झुंबरें, सुंदर वस्त्रें इ०नीं केलेली विवाहादिप्रसंगीच्या मंडपाची शोभा. २ थोर, विद्वान् लोकांच्या आगमनानें मंडपास आलेली शोभा; मांडवशोभा. **०प्रतिष्ठा**-स्त्री. मंडपदेवतेची यथाविधि केलेली स्थापना. **मंडपी**-स्त्री. १ देवाच्या मूर्तीवर टांगलेला कामटयांचा फुलवरा. २ लहान मंडप. **मंडपोद्वासन**-न. लग्न इ०प्रसंगीं घातलेल्या मंडपांत आवाहन करून स्थापिलेली जी देवता तिचें त्या प्रसंगाच्या समाप्तीस केलेलें विसर्जन; मंडपदेवतोत्थापन. [सं. मंडप+उद्वासन]

**मडम, मड्डम**—स्त्री. १ युरोपियन स्त्री. २ (उप.) सुधारलेली, फॅशनेबल स्त्री. ३ पत्नी; राणीसाहेब. 'आपली एल्एल्. बीची परीक्षा पास होते आहे तों आपल्या मडमसाहेब वयांत येऊन मुंबईस ठेवल्याच!' -मोर. ४ [इं. मॅडम]

**मडमडणें**—अक्रि. (ताप, दुखणें इ०चीं पूर्वचिन्हें म्हणून) अंग मोडून येणें; कसकसणें (अंग).

**मंडल-ळ**—न. १ वर्तुळ; वलय; घेर; परिघ; चक्र. २ चंद्र, सूर्य इ०चें बिंब. 'प मंडळ आणि चंद्रमा। दोनी नव्हती सुवर्मा।' -ज्ञा १४.४०५. ३ प्रांत; क्षेत्र; वीस किंवा चाळीस योजनापर्यंतचा आसमंतांतील प्रदेश; भोंवतालचा प्रांत. ४ बारा चक्रवर्ती राजांनीं ज्या प्रांतावर राज्य केलें तो प्रांत, राष्ट्र. ५ (यावरून) प्रांत; देश; राज्य. जसें-कुरुमंडल. ६ समुदाय; समूह; सभा; समाज; टोळी. ७ वर्तुळाकार ठिपके असलेलें कोड.

८ देवतेची स्थापना करण्यासाठीं काढलेली एक गूढ वर्तुळाकार आकृति. व्रतोद्यापनप्रसंगीं देवतांची स्थापना करण्यासाठीं विशिष्ट रंगानें रंगविलेलीं सर्वतोभद्र, लिंगतोभद्र इं०मडळें प्रत्येकीं. ९ एक निरुपद्रवी सर्प. १० देवास नैवेद्य दाखवितांना पात्राखालीं पाण्याची (चौकोनी, वर्तुळाकार, त्रिकोणी इ०) काढलेली आकृति. ११ सैन्याची वर्तुळाकार रचना. १२ चुन्याच्या घाणीची वर्तुळाकार चाकोरी. १३ बेचाळीस दिवसांचा काल. 'त्यासि एक मंडळ सांग। पठणें करूनि कार्यसिद्धी।'–व्यं ९४. १४ (समासांत) शरीराचा तो तो भाग. जसें– मस्तक–कुच–कर्ण–मंडल. 'तेआं नाभिमंडळा आगाधा। समवेत ब्रह्में पेलिलें दोंदा।'–ऋ ९०. १५ (कु.) समुद्राच्या तळाशीं असलेले खडक. १६ राजमंडल. [सं. मंडल] **०फिरणें**–वर्तुळाकार, गोल फिरणें. **मंडळावर धरणें**–मंडलाकार, बाटोळें फिरविणें (घोडा इ. स.). **०गति (बाहु)**–पु. (नृत्य.) बाहू वर्तुळाकार फिरविणें. **०देवता**–स्त्री.अव. १ एखाद्या व्रताच्या आरंभीं सर्वतोभद्र, लिंगतोभद्र इत्यादि मंडलांवर पूजिल्या जाणाऱ्या देवता. २ (ल.) राजाच्या बरोबरचे सरदार, प्रधान. ३ राजसभा; दरबार. ४ कोणत्याहि सरदाराचा, थोरमाणसाचा लवाजमा. **०वत्**–क्रिवि. वर्तुळाप्रमाणें; वाटोळा; चक्राकार. **०वत**–न. अनेक पानें चोयांनीं टोंचून जेवणासाठीं केलेलें जेवणाचें पान; पत्रावळ. [मंडल+पत्र] **०स्वस्तिक(करण)**–न. (नृत्य) ऐंद्र स्थानांत उभें राहणें व हातांचें स्वस्तिक करणें व आपल्या समोर बसलेल्या मनुष्याला अभिमुख दिसतील असे तळहात वर ठेवणें. **मंडली-ळी**–स्त्री. १ मनुष्यांचा जमाव, समुदाय, संघ. २ (कायदा) एकमेकांशीं भागीदारी असणाऱ्या माणसांचा समुदाय, मंडळ. (इं) फर्म. ३ स्पर्श केल्याबरोबर वेटोळें करून बसणारा अनेक पायांचा एक किडा, वाणी. ४ (ख्रि.) सार्वत्रिक मंडळी; पिता, पुत्र व पवित्र आत्मा असा जो सनातन एकच देव त्याजवर भाव ठेवून स्वतःस ख्रिस्ती म्हणविणाऱ्या पृथ्वीवरील सर्व लोकांचा संघ. (इं) एक्लेशिया. 'आणखी मी तुला सांगतों कीं, तूं पेत्र (खडक) आणि या खडकावर मीं आपली मंडळी रचीन.'–मत्त १६.१८. ४ (ख्रि.) स्थानिक मंडळी; ईश्वरोपासना, शुद्धाचरण व ख्रिस्ताच्या राज्याचा विस्तार हे हेतू पुढें ठेवून विधिपूर्वक स्थापित झालेला व सार्वजनिक उपासनेसाठीं नियमितपणें एकत्र जमत असलेला ख्रिस्ती लोकांचा संघ. (इं.) कॉंग्रिगेशन. ५ (गहूं, बाजरी, भात इ०) पिकाच्या पेंढयांची वर्तुळाकार गंजी. ६ पति किंवा पत्नी परस्परांविषयीं बोलतांना योजितात. **मंडली(ळी)क**–पु. १ मंडळ, थवा, पथक इ० चा नायक. २ मांडलिक. 'उखरडा धाधाविलें। मंडळीकु निघालें।'–शिशु ५०४. **मंडलेश्वर**–पु. १ सार्वभौम राजा. २ मांडलिक राजा. [मंडल+ईश्वर]

**मंडली**—पु. रत्नाच्या दलालाचें एक प्राचीन नांव.

**मड(ढ)वळ**—पु. (कु. बे.) परीट; धोबी. **म्ह०** (गो.) मडवळाचें मढें भायेर काढल्याबगर कळाना=धोब्याचे स्वतःचे कपडे कोणते हें तो मेल्यावर कळावयाचें (खरी स्थिति शेवटीं कळतें). [का. मडिव]

**मंडवळी**—स्त्री. (विरू.) मुंडावळी पहा.

**मंडवारी**—पु. (परदेशी तेली) लग्नसमारंभांत मांडवांत मधला खांब मेहुणा पुरतो व त्याबद्दल मानाचा म्हणून जो सवा आणा त्याला मिळतो तो. –बदलापूर २७१. **०लाण्या**–पु. तेल्यांत जातीचे पंच येऊन त्यांनीं विवाहमंडप स्थापणें. –बदलापूर २७.

**मडवी**—पु. कोळयांतील गांवदेवीचा पुजारी. –बदलापूर २५४.

**मंडवीबाळया**—स्त्री. बाळयांचा एक प्रकार. –अफला ५५. [मंडप+माळी]

**मंडाई**—स्त्री. मंडई पहा. [हिं.]

**मंडाई, मंडावण**—स्त्रीन. सावकारापासुन पैसा कर्जाऊ घेतला असतां त्याच्या संतोषार्थ ठरलेल्या व्याजापेक्षां अधिक दिलेलें द्रव्य; मनोती.

**मंडाण-न**—न. १ आकाशांतील मेघांचें पटल; मेघाच्छादन. (क्रि० घालणें). 'पावसानें मंडाण घातलें आहे.' २ (ल.) शोभा; अलंकार; दागिना. 'घराचें मंडान वायकोच.' [सं. मंडन]

**मंडावळ-ळी**—स्त्री. (विरू.) मुंडावळी पहा.

**मंडा(डो)ळी**—स्त्री. मंडली (किडा) पहा.

**मडिग**—पु. कानडी अस्पृश्यांची एक जात; मांग. [का.]

**मंडित**—वि १ सुशोभित; अलंकृत. 'मग काढिली पत्रिका। कुंकुम मंडित सुरेखा।' –एरुस्व ३.५२. २ (ल.) भूषित; शोभिवंत; सौंदर्ययुक्त केलेला. 'शांति क्षमा दया विशेष। तेणें मंडित सत्पुरुष।' [सं.]

**मडी**—स्त्री. (बे.) वाफा; आळें. [का.]

**मंडी**—स्त्री. (तंजा) दगडाचें पसरट तोंडाचें भांडें; दगडी.

**मंडूक**—पु. बेडूक. [सं.] **०प्लुतिन्याय**–पु. बेडकाप्रमाणें उडया मारीत मारीत–मधलाभाग गाळून–भराभर केलेलें काम. **मंडूकानुवृत्ति**–स्त्री. टाळाटाळी; वगळणें; गाळणें. **मंडूकासन**–न. प्रथम मांडी घालून बसणें. नंतर दोन्ही पायांचे तळवे उताणे करून मांडया ढोपरासह रुंद करून उताणे तळव्यावर कुल्ले टेकणें. नंतर दोन्ही हात ढोपरावर टेकणें. –संयोग. ३३७.

**मंडूकी**—स्त्री. घोडयाच्या खुराचा शेवटचा भाग. –अश्वप. १.६४. **मंडूकता**–स्त्री. घोडयाच्या पायाचा एक रोग. –अश्वप २.३८.

**मंडुर**—पु. १ लोखंडाचें कीट, जंग. २ त्यापासून केलेलें औषध; एक रसायण. [सं.]

**मडें-ढें**—न. प्रेत; मुडदा; शव. 'देह पडतां म्हणती मडें।' –दा १३.६.२३. [सं. मृत; प्रा. मड; का. मडि=मरणें] ०**पाताळावर**-(गो.) ठार मारणें. **मडयाच्या ताळ्याचें-ताळूवरचें लोणी खाणारा**-पु. (ल.) अतिशय नीच व लोभी-मनुष्य. **मड्यावर पाय देऊन जाणें-करणें**-मरणोन्मुख मनुष्याकडेहि दुर्लक्ष्य करून (कांहीं जरुरीच्या कामानिमित्त) दुसरीकडे निघून जाणें. **मेलें मडें आगीला भीत नाहीं**-कोडग्या व निगरगट्ट माणसाबद्दल योजितात. म्ह० १ केश उपटल्यानें काय मडें हलकें होतें? २ (गो.) मडें गेलें मसणा, त्याची ना वासना. ३ (व.) मडयास शृंगार नाहीं रयतेला उपकार नाहीं. ०**कळा**-स्त्री. १ मरणसमयीं तोंडावर येणारा फिकटपणा, पांडुरता. २ (ल.) केलेल्या गुन्ह्याच्या भीतीमुळें चेहऱ्यावर दिसणारा निस्तेजपणा. ०**पंचक**-न. वैशाख महिन्यातील धनिष्ठा नक्षत्रापासून पाच नक्षत्राचा काल (धनिष्ठापंचक). या अवधींत मृत्यु फार होतात. ०**पेंड**-न. मढ्याची जकात. –अस्पृ ३८.

**मंडोदरी**—स्त्री. (अप.) मंदोदरी पहा.

**मंडोसरी**—स्त्री. (व) फोडणीचें वरण; आमटी. [मंदसोर]

**मंडोळ**—पु. (कु.) अंड्यातील पिवळा बलक.

**मंडोळी**—स्त्री (विकृ.) मुंडावळ पहा.

**मडौरा**—पु. (महानु) घागरघुमा नावाचें मातीच्या घड्याचें डमरूसारखें वाद्य. 'मडौराचां बबाळी। योगिनीचक्राचां गोंदळीं।' –शिशु ४४६. [सं. मृद्=माती+डौर=डमरू]

**मड्डा**—वि (व. ना) अतिशय आंबट (दहीं इ०). 'भाव जबर आणि दहीं मड्डा.'

**मड्डुक**—न मडकें. 'दृष्टांत वे शुक्रहि मड्डुकभाजनाचे। तैसेच नेत्र अति दारुण दुर्जनाचे।' –वामन, हरिविलास २५९.

**मढ**—पु कळी; अंकुर. 'तो तृतीय-नयनाचा मढु। फुटला जैसा।' –ज्ञा ११.३०४.

**मढ**—पु १ मठ पहा. –पाटणचा शिलालेख शक ११२८ २ कोठडी. 'मग आघवींचि सर्ढी। धानाच्या आतुल्या मढीं।' –ज्ञा १८.७४२. [स. मठ प्रा. मढ; हिं. पं. मढी] **मढगा**-पु. मठ; आश्रम; घर. मडगा पहा. [मठिका]

**मढणं, मढविणें**—क्रि. सोनें, चांदी, वस्त्र, कातडें इ०नीं एखाद्या पदार्थाच्या आंतल्या किंवा बाहेरच्या बाजूस थर, आच्छादन देणें; लपेटणें; आच्छादणें, आस्तर घालणें; मुलामा देणें. 'स्तंभ मढिलें दिव्य सुवर्णें।' –मुआदि ४१.८. –ज्ञा १७.२५१. 'सुवर्णांशगी देऊ मढऊन।' –नव १७ १३५. [हिं.] **मढणावळ, मढवाई**-स्त्री. मढविण्याची मजुरी, किंमत. **मढवणी, मढवणूक**-स्त्री. मुलामा देण्याची, मढविण्याची क्रिया. **मढींव**-वि. मढविलेलें; मुलामा दिलेलें.

**मढी**—स्त्री. १ साधु, बैरागी इ०ची लहानशी झोपडी; मठी; लहान मठ. 'गांवाबाहेर आंत कोसावर गोसाव्याची मढी।' –पला ८२. २ डोंगर इ० च्या पायथ्याशीं पाण्यासाठीं खणलेली खळी; झरा; टांकें. [मठी]

**मढू**—वि. (अशिष्ट) मधुर; गोड (फळझाड, फळें). जसें-मढू-चिंच-बोर-लिंब. 'कडू खातां मढू आलें मी गर्भीण झालें तधीं।' –पला १०२. [सं. मधु]

**मण**—पु. १ एक वजनी किंवा मापी परिमाण; हें निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळें असतें. मापी मण बारोली किंवा सोळोली (१२, १६ पायल्यांचा) व वजनी ४० शेरांचा साधारणपणें असतो. २ मणानें मापलेलें-मोजलेलें धान्य, पदार्थ. ३ जमिनीचें सह्रा बिघ्याचें एक परिमाण. [सं. मान; अर. मन्] ०**खाण**-पु. सुमारें एक मण. **मणका**-पु. १ एक मणाचें माप किंवा वजन. २ एक मणाच्या मापाचें भांडें, पाटी इ०; एक मण वजनाचा दगड इ० **मणकी**-स्त्री. एक मणाचें धातूचें किंवा दगडाचें वजन.

**मणका**—पु. १ मोटा मणि. 'मणका येक त्यांनीं बांधिला पायासीं।' –रामदासी. २ गळ्याच्या पुढील भागावरील उंचवटा; कंठमणि; घांटी. ३ माकडहाड; गुदास्थि ४ पृष्ठवंशरज्जूतील दुव्यासारखा भाग प्रत्येकी ५ गळ्यात बांधावयाचा मंत्रसिद्ध ताईत, तोडगा. ६ घोड्याच्या गळ्यांत बांधतात तो मणि. ७ कप्पी; खोबणीचें चाक; (इं.) पुली. ८ छत्रीच्या ज्या भागांत काड्या बसवितात तो चक्राकार अवयव. [मणि] ०**ढला करणें**-१ बेदम मारणें. २ अतिशय कष्ट करणें.

**मण(न)गट**—न. १ हाताचा पंजा आणि कोपर यांमधील भाग; (सामा.) मणिबंध; पंज्याचा सांधा. २ पाऊल व पायाची नळी याच्यामधील सांध्याचें हाड; घोटा; पायाचा डोळा;-गोफा. ३ घोड्याच्या पायाचा सांधा. ४ (ल.) उपाय; मार्ग; योग्यता (शक्ति पैसा, विद्या इ०ची). [सं. मणि+कट] म्ह० ज्याच्या मणगटास जोर तो बळी. ०**घेणें**-बोंबा मारणें; बोंबलणें. ०**धरणें**-एखाद्यास कांहीं अपराधांत पकडणें; आरोप ठेवणें. **मणगटांत-मणगटास जोर असणें**-द्रव्य, अधिकार, योग्यता, शारीरिक शक्ति इ० बाबतींत समर्थ असणें. **मणगटावर केस येणें**-हातांतील जोर नाहींसा होणें; एखादें काम करावयाला असमर्थ असणें **मणगटावर गोणी पडणें-येणें**-(ल) एखादें कष्टाचें किंवा जबाबदारीचें काम लादलें जाणें. **मणगटावर तेल-तेल चुना घालणें-ओतणें**-बोंबा मारणें; बोंबलत सुटणें (कांहीं एक विदेविषयीं अज्ञ). **मणगटावर**

तेल घातलें पाहिजे-मूर्ख, अडाणी मनुष्यास उद्देशून योजितात. मणगटासारखें मणगट पाहून कन्या द्यावी, मणगटासारखें मणगट पहावें-शरीर, पैसा, परिस्थिति इ० बाबतींत कन्येशीं जुळणारा वर पहावा. मणगटाशीं मणगट घासणें-एखाद्याशीं बरोबरी, स्पर्धा करणें. मणगटी-स्त्री. लहान मुलांच्या मणगटांत घालण्याचा मण्यांचा एक अलंकार.

मणगणें—क्रि. (कों.) चण्याची डाळ व तांदुळाचें पीठ यांत गूळ घालून कालवून तें एकत्र शिजविणें.

मणा—पु. (प्रा.) (विरू.) मणी (मदन मध्यें पहा).

मणि-णी—पु. १ हिरा; माणिक; रत्न; माळेंत ओंवण्याचा गोलक, गोळी. 'मकरकुंडलें तळपती श्रवणीं। कंठीं कौस्तुभमणि विराजित।' -तुगा १. दगड, लाकूड इ० कातून, घडून तयार करतात ती गोलवस्तु. २ शिश्नाची बोंडी. ३ योनिलिंग; दाणा. ४ (ल.) कोणत्याहि गुणानें श्रेष्ठ, ललामभूत मनुष्य. ५ ज्याच्या भोंकातून दोरी ओंवून एखादी जड वस्तु वर उचलतात, खेंचतात किंवा भारा, ओझें इत्यादि आवळतात ती लाकडाची कप्पी; (इं.) पुली. ६ निकणांतून पाखडून निघालेले पोंचट दाणे मदन पहा. ७ सापाच्या किंवा हत्तीच्या डोक्यांतील एक रत्न. 'क्रोधें चवताळतो ज्यापरी जातिवत जो फणी। तयाचा कोणी हरितां मणी।' -विक ३२. ८ पुरुषाचें रेत. ९ लोखंडाच्या पत्र्यास भोंक पाडण्याकरितां त्याच्याखालीं ठेवतात तो छिद्रयुक्त ठोकळा. [सं. मणि] म्ह० सुतासाठीं मणि फोडणें-अत्यंत अल्प लाभासाठीं फार मोठी हानि करून घेणें. एका माळेचे मणी-(जपाच्या माळेंतील मणी सारखेच असावे लागतात यावरून ल.) एकसारखे वाईट, दुर्वर्तनी. ०कंठ-पु पक्षिविशेष; ताम; चाष. ०कर्णिका-स्त्री. १ काशी येथील एक तीर्थ. २ एक विशिष्ट आकाराची पाणी पिण्याची लोटी, तपेली [सं] ०कार-पु जवाहिरी; जव्हेरी; मण्यार. [सं.] ०घोळणी-स्त्री. मणी तयार करण्याचें सोनाराचें एक उपकरण. ०ज-वि. अंड्यापासून उत्पन्न झालेला (पक्षी इ०); अंडज. 'परि आधीं तंव स्वेदज। जारज उद्भिज मणिज।' -ज्ञा १५.१४८ [सं.] ०नीभ-वि सर्व शरीराचा रंग गौरवर्ण व फक्त टाळूच्या ठिकाणीं तांबडा असा (घोडा) -अश्वप १ २२. ०पु(पू)र-न. (योग) नाभिस्थानाजवळील एक चक्र. या ठिकाणीं डं पासून फं पर्यंत अक्षरें असून, मोक्षदायी म्हणून या चक्राचें चिंतन करतात. 'नाभिस्थानीं मणिपुर कमळ।' -विउ १.५०. 'मणिपूरेंसीं झुंजे। राहोनियां।' -ज्ञा ६.२१५. ०बंध-पु. १ मणगट. २ एक वृत्त. याच्या चरणांत नऊ अक्षरें व भ, म, स हे गण असतात. उदा० 'द्रव्य मिळावें याकरितां। कां हलक्यांना आजेवितां। काय नव्हे हो तो धनवान्। ईश रमेचा जो भगवान्।' [सं.] ०भूमिकाकर्म-न. ६४ कलांपैकीं एक कला; त्रिकोण, चतुष्कोन इ० आकृतींत जमिनीवर मण्यांची रचना करणें. [सं.] ०भूषण-न. रत्नांचा अलंकार. 'अष्टादशपुराणें। तींचि मणिभूषणें।' -ज्ञा १.५. [सं.] ०मंगळसूत्र-न. १ मुहूर्तमणि व मंगळसूत्र. २ स्त्रियांचा मणि व मंगळसूत्र एकत्र ओवलेला एक अलंकार. मणखुरा-पु. सोनाराची मणि इ०करण्याची ऐरण. [मणि+खुरा] मणदोरा-पु १ गाडीवरचें ओझें बांधावयाची दोरी व ज्याच्या भोंकातून दोरी ओवून खेचतात तो मणी, ठोकळा समुच्चयानें. २ नदी ओलांडणारी नाव इकडेतिकडे वाहवत जाऊं नये म्हणून नदीच्या दोन्ही काठांवर पुरलेल्या दोन खांबांना बांधलेली दोरी व तिच्यावरून सरकणारा लाकडी मणी, ठोकळा. ३ पिशवी, बटवा इ०चें तोंड उघडावयाची किंवा बंद करावयाची दोरी; धांवता दोरा; ओढदोरा. ४ लोंबत सोडलेला पडदा ज्या दोरीवरून सरकविला जातो ती दोरी. ५ स्त्रिया कंबरेला बांधतात तो अभिमंत्रित दोरा. ६ वस्त्राच्या शेवटीं किंवा ताग्याच्या शेवटीं जे आडवे जाड धागे ठासलेले असतात ते समुच्चयानें. [मणि+दोरा] मणेर, मण्यार-पु. एक विषारी सापाची जात. मणेरी, मण्यार-पु. १ एक जात किंवा तींतील व्यक्ति. हे लोक बांगड्या, मणी, कांकणें तयार करतात व विकतात. २ स्टेशनरी सामान विकणारा दुकानदार. ३ जवाहिऱ्या; सराफ. मणेरी, मण्यारी-वि. १ मण्यार लोकांसंबंधीं. २ स्टेशनरी सामानासंबंधीं. -मुव्या ११.

मणिक—न. मडकें; डेरा. 'पावुनिहि अमरमणि कीं कारासदनात शिखिशिखां जसि मणिकीं।' -मोकृष्ण २.२०. [वै. सं.]

मण्यारी—पु. (कों.) एक प्रकारचा मासा.

मत्—सना. (समासांत) माझें. उदा० मद्गृह; मत्सदृश. [सं.]

मत—न. १ अभिप्राय; मनांतील विचार; निश्चय; कल्पना; भावना; बुद्धि. २ विशिष्ट विचारसरणी. ३ पंथ; मार्ग; पक्ष (धर्म, तत्त्वज्ञान यांतील). ४ पाखंड; पाखंडमंडळ. 'जेणें मतें उच्छेदुनि समस्त। शुद्ध मार्ग वाढविला।' ५ म्हणणें; सांगणें. 'चालों न वंचि मत, करि मन तैशाचेंहि वश्य पाप तिचें।' -मोमंभा ३. ५२. ६ संमति; मान्यता; अनुमति. ७ निवडीची नोंदणी, हक्क. (इं.) व्होट. 'पुरुषांना मतांचा कैवार तर बायकांना मुलाबाळांचा कैवार.' -नारुकु ३.६४. -वि. मान्य; कबूल असलेलें. 'कार्यें दोन्हींहि दासामरतरुसि मतें तें कळे उद्धवाम।' -मोकृष्ण ७१. २. [सं.] ०देणें-१ एखाद्या वादग्रस्त प्रश्नाच्या निर्णयार्थ सभासदानें अनुकूल किंवा प्रतिकूल अभिप्राय देणें. २ निवडणुकींत आपली निवड नोंदणें (इं.) व्होट टाकणें. मतणें-अक्रि. मतें, विचार इत्यादि बाबतींत जुळणें; एकमत होणें. 'दोन आसामीची एक जोडी करून मतून येतां कीं नाहीं?' -सुको ७९. ०दार-

वि. मत देण्याचा हक्क असलेला. ०पत्रिका-स्त्री. १ साक्षीभूत, आधारभूत लेख; प्रमाण. 'पुराणें इयेविषीं। मतपत्रिका।'-ज्ञा १३.६६. २ जीवर मत नोंदतात तो कागद. (इं.) व्होटिंग पेपर. ०प्रदर्शक-वि. केवळ मताचें दिग्दर्शन करणारा. 'अमुक सभा मतप्रदर्शक स्वरूपाची आहे.'-के १.२३५ ०मतांतर-न मतभिन्नता; भिन्न भिन्न मतें. ०वाद-पु. आग्रह. 'एकाचा मतवाद निश्चितीं। करितां श्रुतिवाक्य व्युत्पत्ती।'-एभा २६.१८४. ०वादी-वि. स्वतःच्या मतांविषयीं दुराग्रही. ०स्वातंत्र्य-न. स्वतःचा अभिप्राय देण्याचें व त्य प्रमाणें वागण्याचें स्वातंत्र्य. 'शिक्षकांच्या मतस्वातंत्र्याचा प्रश्न निघालेला होता.'-केले १. २०३. मताधिकार-पु मत देण्याचा अधिकार. मता(त्ता)भिमान-पु. स्वतःच्या मताचा अभिमान. मता(त्ता)भिमानी-वि. स्वतःच्या मताचा अभिमान बाळगणारा; मतवादी.

**मंत**—नामांचीं विशेषणें करण्याकरितां युक्त ह्या अर्थी त्यांस जोडलेला अनुबंध जसें-बुद्धिमंत; शक्तिमंत. मान पहा. [सं. मत्]

**मतकापड**—न. (विरू.) मातकापड पहा.

**मतंग, मतंगज**—पु. हत्ती. [सं.]

**मतपिसें**—न. (कों.) मुद्दाम पांघरलेलें वेड.

**मतमान**—पु (कु.) मान.

**मंतरणें**—उक्रि. १ अभिमंत्रित करणें; मंत्र घालणें; भारणें; मंत्रानें युक्त करणें (अक्षता, इ०). २ (ल.) एखाद्याला कांहीं सांगून, गोड बोलून वश करून घेणें. [मंत्र]

**मतलई, मत्लई**—स्त्री. (नाविक) जमिनीवरून समुद्राकडे वाहणारा वारा; पूर्व किंवा ईशान्य दिशेकडून वाहणारा वारा. [अर. मत्लअ=उगवत]

**मतलब**—पु. १ हेतु; उद्देश; इच्छा. 'मुन्शी बोलावून पत्र लिहावयाचा मतलब सांगितला.'-रा ५.१७९. २ आशय; सारांश; तात्पर्य (लेख, पत्र इ०चा). ३ मसलत; बेत. [अर. मत्लब्] मताल(ली)ब, मतलबचें-अव. 'जे मतालब, स्वामींचे असतील ते सर्व होऊन येतील.'-रा ८.२०३. 'ऐवज वेऊन सर्व मतालीबचा बंदोबस्त करून घ्यावा.'-दिमरा २.११. मतलबदार, मतलबी-१ स्वार्थी; स्वार्थसाधु. २ कपटी; लुच्चा. मतलबी यार-पु. हितचिंतक मित्र.

**मतवाला**—वि. (लावणी) इष्कबाज; ख्याली; विलासी; रंगेल. 'गळी पडून म्हणे रडरडून नार मतवाली। मी येतें अहो सुभेदार बसा तरीं खालीं।'-प्रला १९४. [सं. मद; मत्त]

**मंतव्य**—वि. मनन करण्यास, चिंतण्यास योग्य. 'तेणेंचि कळे मनासि मंतव्य।'-एभा ३.६४०. -न. मनन; मनोव्यापार; विचार. 'मनासीं मंतव्य बुद्धीसीं बोधव्य।' 'प्रस्तुत पुस्तकांत दयानंदाचें चरित्र व मंतव्य हें मुख्यतः सांगावयाचें असल्यामुळें ...'-स सं २.१२८. [सं.] मंता-वि. मनन करणारा. 'मन, मंता, आणि मनन। याचें समूळ भान उच्छेदी।'-एभा १४. ४२८.

**मति**—स्त्री. १ बुद्धि; जाणण्याची शक्ति. 'कशी हीन झाली तुझी मति।'-ऐपो १४६. २ मन; अंतःकरण. ३ विचार; हेतु. बुद्धि पहा. [सं.] ०चालणें-आकलन होणें. 'आपली बरीच मति चालते.'-विवि ८.३.४७. ०प्रकाश-वि. ज्ञानवान; बुद्धिवान. 'विनायका अभयदाता। मतिप्रकाश करीं मज।'-गुच १.११. ०भ्रम-विभ्रम-पु. चूक; चुकीचा समज; बुद्धिभ्रंश. 'तिये मूर्ख मतिभ्रमें। मी कर्ता म्हणे।'-ज्ञा ३.१७८. ०मंद-वि. बुद्धीनें कमी; जड बुद्धीचा; मठ्ठ. [सं] ०मान्-वंत-वि. बुद्धिमान्; शहाणा; धूर्त. 'तंव एकीं मतिवंतीं। या बोलाचिया खंतीं।'-ज्ञा १३.४०.

**मती, मतीत, मट्टी**—स्त्री. (विणकाम) जिभई; कापड विणीत असतां तें आकसूं नये म्हणून त्याच्या दोन्ही काठास ताण देण्याची पट्टी. हिच्या दोन्ही टोकास अणकुचीदार व सुईसारखे बारीक खिळे असून ते कापडांत गुंतवितात.

**मंतु**—पु. अपराध; गुन्हा; अन्याय. 'तुझ्या जिरविले बहु प्रगतमंतु पोटेंपण।'-केका १८ [मन्-मंतु]

**मतेरी-ली**—स्त्री. (नाविक) बोमाचें शीड बांधण्याचा दोर. हा मोठ्या डोलकाठीस बांधतात आणि तिसरें शीड उभारल्यावर नाळीस बांधतात.

**मतेलांड**—न. (कु.) लचांड; ब्याद; कटकट.

**मतोळा**—पु. गोंधळ; घोटाळा; नुकसान. 'नव्हे मतोळयाचा वाण नीच नवा नारायण।'-तुगा ३३०७. [मत]

**मत्कुण**—पु. ढेकूण. [सं.]

**मत्छ**—पु. मासा; (प्र.) मत्स्य. 'मत्छ आठविता पाळी।'-दावि ४८१. [मत्स्य अप.]

**मत्त**—पु. (संगीत) एका तालाचें नांव. ह्यांत अठरा मात्रा व नऊ विभाग असतात.

**मत्त**—न. (विरू.) मत पहा.

**मत्त**—वि. १ झिंगलेला; धुंद झालेला. २ माजलेला; उन्मत्त; गर्विष्ठ (मद्य, द्रव्य, कीर्ति इ० मुळें). 'स्वधर्मरूप क्रतु। नानुष्ठी जो मत्तु।'-ज्ञा ३.१३९. ३ वेडापिसा. [सं.] ०मयूरी-स्त्री. एक समवृत्त. ह्याच्या प्रत्येक चरणांत तेरा अक्षरें व म, त,य,स,ग हे गण असतात. उदा० माता भ्राता तूं भयनाशा सखया जी। गेले स्नाना विप्र तयां अन्न न भाजी। आतां देती शाप सहासी वनि कृष्णा। हाका मारी मत्तमयूरीपरि कृष्णा।' [सं] ०मयूरी-वीणा-पु. (संगीत) सारमंडल पहा. ०मुद्रा-वि. उन्मत्त

दिसणारा. 'महाहटी विशाळ । एक पिसाळ मत्तमुद्रा ।' -एभा १४.२०७.

**मत्तर**—पु. जमीन मोजण्याचें एक परिमाण. 'त्या मल्लानें आपल्या शेतापैकीं सहा मत्तर जमीन दुर्गा देवतेच्या रंगांगभोगासाठीं दिली.' -केसरी १०.७.३६.

**मतल्लि (करण)**—न. (नृत्य) पाय वाटोळे फिरवून पुन्हां जवळ आणणें व हात उद्वेष्टित करून अपविद्ध करणें.

**मत्ता**—स्त्री. द्रव्य; संपत्ति; मिळकत; जिंदगी. [अर. मताअ] म्ह० काडीची सत्ता आणि लाखाची मत्ता (बरोबर होत नाहीं)

**मंत्र**—पु. १ गूढशक्तियुक्त वाक्य किंवा अक्षरें. (क्रि० घालणें; मारणें; टाकणें; फुंकणें) मंत्राचा उपयोग मारण, मोहन, वशीकरण, स्तंभन, उच्चाटन, आकर्षण ह्याकरितां करतात. 'जे शस्त्रविद्यापारंगत। मंत्रावतार मूर्त ।' -ज्ञा १.१०९. २ देवतास्तुतिपर पवित्र वचन. उदा० 'ॐ विष्णवे नमः' ३ वेदभागविशेष; वेदसंहिता. ४ मसलत; गुप्त सल्ला, उपदेश; विचार. (क्रि० सांगणें; देणें). 'धर्मे म्हणे सिद्धि भजे यन्मंत्रा जेविं वासवा रंभा।' -मोसभा १.५३. ५ युक्ति; कल्पित. 'रसु होआवा अतिमात्रु। हा घेतासि कविमंत्रु।' -ज्ञा १३.६३५. ६ गुप्त गोष्ट; गुह्य. 'झांकुनि मंत्र पृथेनें अति दुःसह दुःख मज दिल्हें बा हें ।' -मोशांति १.८. [सं.] ०बोधास-गुणास-प्रत्ययास-प्रतीतीस-कळूं-येणें-मंत्र परिणामकारक होणें, अनुभवास येणें. **मंत्रणें**-क्रि. (विरू.) मंतरणें पहा. ०अक्षता **मंत्राक्षतता**-स्त्री अव. १ मंत्रानें संस्कारलेले तांदूळ. २ (ल.) आशीर्वाद. 'त्यास व्यासवाल्मिकादि देति मंत्र अक्षता।' -मध्व १९. ३ (वि ल.) शिव्यांचा भडिमार. (क्रि० देणें; मारणें) ०कौटाल-न. चेटुकविद्या 'सभामोहन भुररीं चेटकें। साबर मंत्रकौटालें अनेकें। -दा ५.२.२. ०चळ-पु १ मंत्रप्रयोगांत चूक होऊन लागणारें वेड. 'मंत्रचळ नाना खेद। नामनिष्ठे नासती।' -दा ४.३.१२. २ (ल.) वेड लागल्यासारखी, बावचळल्यासारखी होणारी स्थिति. (क्रि० लागणें) ०चळ्या-वि. १ मंत्रप्रयोगांत चूक झाल्यामुळें ज्यास वेड लागलें आहे असा. २ लहरी; बेफाम. ३ भ्रमिष्ट; बावचळलेला; तीच तीच गोष्ट पुन्हां पुन्हां करणारा. ०जागर-पु अनेक ब्राह्मणांनीं एकमेकांसमोर बसून एका पक्षानें एक वाक्य म्हटल्यावर त्या पुढील वाक्य दुसऱ्या पक्षानें म्हणावें असें वेदमंत्र म्हणणें; वेदघोष करणें. ०तंत्र-पु.अव. १ जादू-टोणे; तोडगे; जपजाप्य; छांछूं इ०. २ युक्त्या प्रयुक्त्या; डावपेच. (क्रि० लटपटणें; डगमगणें; डळमळणें; कोसळणें; ढासळणें; हरणें). ०पुष्प-पु देवाची संध्याकाळची आरती वगैरे झाल्यावर विशिष्ट वेदमंत्र मोठमोठ्यानें म्हणून देवास फुलें वगैरे वाहणें. ०पुष्पांजलि-स्त्री. १ पूजेनंतर ओंजळींत फुलें घेऊन समंत्रक देवास वाहणें; मंत्रपुष्प. २ (ल.) शिव्यांचा वर्षाव, लाखोली, भडिमार. (क्रि० करणें; वाहणें; अर्पिणें). ०प्रयोग-पु. १ मंत्राचा प्रत्यक्ष अनुभव पाहणें. २ जादूटोणा करणें; मंत्र घालणें. ०मुख-पु आपल्या उपयोगापुरतेच ज्यास मंत्र येतात असा ब्राह्मण. ०वादी-वि. मंत्र व त्यांचा उपयोग जाणणारा; मंत्री; मांत्रिक. ०विद्या-स्त्री. १ वेदविद्या. 'मंत्रविद्येसि माहेर । ब्राह्मण जे।' -ज्ञा ९.४७५. २ जादूटोणा करण्याची कला. ०शक्ति-स्त्री १ युद्धाच्या तीन शक्तींपैकीं दुसरी. बाकीच्या दोन-प्रभुशक्ति व उत्साहशक्ति. २ मंत्राचें सामर्थ्य, प्रभाव. ०शास्त्र-न. विवक्षित देवतेपुढें कोणते मंत्र म्हणावयाचे हें शिकविणारें शास्त्र; मंत्र विद्या. ०षडक्षरी-स्त्री. 'रामकृष्णहरी' हीं अक्षरें. 'होऊनी सावध उघडीले नेत्र । आठवला मंत्र षडक्षरी ।' -ब ७७. ०साधन-न. मंत्रशास्त्रांत सांगितलेले विधि व नियम पाळून मंत्राचा उपयोग करण्याची शक्ति मिळविणें. ०सिद्धि-स्त्री. मानवी सामर्थ्याच्या आटोक्याबाहेर असलेल्या आठ शक्तींपैकीं एक. ०स्नान-न. प्रत्यक्ष स्नान न करतां कांहीं मंत्र म्हणून जो स्नानाचा गौण प्रकार म्हणून विधि करतात तो. ०ज्ञ-वि. मंत्र जाणणारा; मांत्रिक. 'देखा मंत्रज्ञु बरळु जाय।' -ज्ञा १.१९०. **मंत्राग्नि**-पु. उत्तरक्रियेचे मंत्र म्हणून प्रेताचें केलेलें दहन; सशास्त्र दहन. याच्या उलट भडाग्नि. [मंत्र+अग्नि] **मंत्रित**-वि. मंतरलेलें. **मंत्री**-पु १ प्रधान; अमात्य; राजाचा सल्लागार. २ (सामा.) सल्ला देणारा; उपदेश करणारा. ३ राजाच्या अष्टप्रधानांपैकीं एक; न्यायाधीश. ४ मंत्र जाणणारा व त्याचा उपयोग करणारा; मांत्रिक. **मंत्रोपचार**-पु. मंत्रप्रयोगाचे विशिष्ट विधि, नियम. [मंत्र+उपचार] **मंत्रोपदेश**-पु १ मंत्र देणें (गुरूनें शिष्यास). 'मातेच्या दर्जाला जेव्हां चढावें तेव्हां मंत्रोपदेश देणाऱ्या गुरूची पायरी बायकांना प्राप्त होते.' -मेनका ६८. २ सल्लामसलत; उपदेश. [मंत्र+उपदेश] **मंत्रोपासना**-स्त्री. मंत्र साध्य करून घेण्याचे नियम पाळणें. (क्रि० देणें). [मंत्र+उपासना]

**मत्लूब**—अ. जरूर; अवश्य. 'सामान जंगी सर्कारांत मतलूब जाल्यास बेपारी...यांजपासोन बिला महसूल खरेदी करण्याची परवानगी असावी.' -रा ७.९४. [अर. मत्लूब]

**मत्सर**—पु. डांस; मच्छर पहा. [सं. मत्सरा] ०दानी-स्त्री. (प्र) मच्छरदाणी पहा.

**मत्सर**-पु. दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणें; द्वेष; हेवा; स्पर्धा. यास्ककालीं याचा अर्थ लोभ असा होता. [सं.] **मत्सरी**-वि. द्वेष, हेवा करणारा; द्वेष्टा. [सं.]

**मत्स्य**—पु. १ मासा; मच्छ; एक जलचर प्राणी. २ एकमेकांना छेदणाऱ्या दोन वर्तुळांत समान असा भाग. ३ मनुष्याच्या तळहातावर किंवा तळपायावर रेषांची बनलेली विशिष्ट आकृति. हें चांगल्या नशिबाचें लक्षण समजतात. ४ तीळ (मनुष्य इ०च्या शरीरावरील). ५ विष्णूचा पहिला अवतार. [सं.] ०घ्न-पु मासे मारणारा; धीवर. 'तो मत्स्य मत्स्यघ्न विदारी । तंव लोह निघे त्याचे उदरीं ।'-एभा १ ३८४. ०जयंती-स्त्री. विष्णूनें ज्या दिवशीं मत्स्यावतार धारण केला तो दिवस: चैत्र शुद्ध प्रतिपदा. [सं.] ०देश-पु. कानपूर, मिरजापूर इ० प्रदेश -अश्वप १.३४. ०पुराण-न. अठरा पुराणांपैकीं एक. ०यंत्र-न. १ मच्छयंत्र पहा. २ मासा बसविलेलें, फिरतें वेधण्याकरितां केलेलें यंत्र. **मत्स्यावतार**-पु. विष्णूच्या दहा अवतारांपैकीं पहिला [मत्स्य+अवतार] **मत्स्यासन**-न. पद्मासन घालून नंतर तसेंच पाटीवर उताणें निजणें व हाताचा कवा घालून डाव्या हातानें उजव्या हाताचें बावखड व उजव्या हातानें डाव्या हाताचें बावखड धरणें आणि दोन्ही हाताच्या तिढयावर डोकें टेवणें. -संयोग ३१८. **मत्स्याहारी**-वि. मासे खाणारा. याच्या उलट शाकाहारी. [सं. मत्स्य+आहारी] **मत्स्यी**-स्त्री. (काव्य) माशाची मादी. [सं.] **मत्स्यीं(त्स्य)द्रनाथ**-पु. नवनाथांपैकीं एक. नवनाथ पहा. 'निरालंबदेशीं अनूपम्य राजा । नमस्कार मत्स्यींद्रनाथासि माझा ।'-अकक २.२०२. **मत्स्येंद्रासन**-न योगशास्त्रांतील एक आसन. **मत्स्योदरी**-स्त्री. काशी येथील भैरवाच्या देवळापर्यंत आलेला गंगा नदीचा पूर. [मत्स्य+उदर]

**मथक**—न. मुख्य ठाणें, ठिकाणा. 'माल्टा (वेलेटा) बंदर भूमध्य समुद्रांतील अत्यंत महत्त्वाचें नौकाखात्याचें आणि वैमानिक खात्याचें मथक आहे'-किर्लोस्कर मासिक, जून १९३६. (इं.) हेडक्वार्टर्स. [सं. मस्तिष्क; मस्तक]

**मथणें**—अक्रि संगनमत करणें; एकत्र होणें. 'ते दोघे मथले आणि घर फोडलें.' [मत]

**म(मं)थणें**—उक्रि. १ घुसळणें; मंथन करणें. 'ना तरी शब्दब्रह्माब्धि । मथिलेया व्यासबुद्धि ।'-ज्ञा १.५१. २ वादविवाद, चर्चा, वाटाघाट करणें. ३ छाननी, संशोधन, परीक्षण करणें. ४ एखाद्या गोष्टीविषयीं (मनांत) विचार, मनन, चिंतन करणें. ५ अनुकूल करून घेणें; वळविणें. ६ (काव्य) ठार मारणें. 'श्वेतहयें अंबष्ठ श्रुतायुनामा रणांगणीं मथिला।'-मोकर्ण ३.२५. ७ पराभव करणें. 'तव बळ मथितो त्यातें मारुनि सार्थी रणीं निज स्वार्था।'-मोकर्ण १२.३. ८ घासणें: मंथन करणें. 'जैसें काष्ठें काष्ठ मथिजे । तेथ वन्हि एक उपजे।'-ज्ञा १.२४३. [सं मंथन] **मंथणी-नी**-स्त्री. १ रवी; घुसळणी. २ मंथण्याची, घुसळण्याची क्रिया ३ सोनाराचें मणि तयार करण्याचें हत्यार. **मथणी-नी**-स्त्री. ताक करण्याचा डेरा; माथणी.

**मं(म)थन**—न. १ दहीं इ० घुसळण्याची क्रिया. 'कुंकुमादि चर्चुनि मंथनालागीं आरंभिती।'-घनश्यामाची भूपाळी पृ २१. २ अग्निहोत्र्यानें अरणी नांवाच्या लाकडावरील खळगीत लांकडाचा शकु सामर्थ्याप्रमाणें फिरवून अग्नि उत्पन्न करण्याची क्रिया. ३ (ल.) वादविवाद; चर्चा; वाटाघाट; ऊहापोह. 'अध्यात्मविद्या भेदाभेद। मथन जेथें।'-दा १८५. ४ वध; जखमी करणें. 'तव्हां करील कोणी भलता त्वद्वीर मन्मथन राजा।'-मोभीष्म १.८७. [सं.] ०सार-पु (काव्य) चंद्र (हा समुद्रमंथनापासुन निघाला म्हणून). 'किं मथनसाराचें बीज। धर्म म्हणति प्रळयबीज।' ०साराचें बीज-न १ कांहीं अशक्य किंवा अविद्यमान वस्तु. २ लोणी; नवनीत. **मंथरी**-स्त्री घुसळतांना रवीभोंवतीं गुंडाळलेली दोरी. **मंथान मंथा**-पु. १ मंथन करण्याचा दंड; रवी. २ (अरणीवर) घासून अग्नि उत्पन्न करण्याचें लांकूड 'आणि वैराग्याचा हृदयारणीं मंथा। विवेकु केला।'-ज्ञा ४ १३०. **मथित**-न १ वादविवाद; चर्चा; वाटाघाट २ लोणी 'हें शब्दब्रह्माचें मथितें। श्रीव्यासप्रज्ञेचें हातें।'-ज्ञा १५.५७१ ३ तत्त्व; सारांश 'तेथें आनंदें बोलतु । भक्तीचें मथितु वासुदेवाप्रती।'-एभा ५ ४८८. -वि. १ घुसळलेलें; मंथन केलेलें (दहीं इ०). २ (ल.) चर्चिलेला; वाटाघाट केलेला (विषय) **मथितार्थ**-पु. वादाचा निष्कर्ष; तात्पर्य; सारांश; रहस्य. 'तेथ उद्धवासि श्रीअनंत। ज्ञानमथितार्थ सांगत।'-एभा १५.१० **मथितोष्ण, मंथोष्ण**-वि. नुकतेंच घुसळल्यानें गरम झालेलें (ताक).

**मथव(वि)णें**—उक्रि. वश करणें; वळविणें. 'रघोजीनें शिद्यास मथवून भोपाळ काबीज करावयाचें ठरविलें।'-विवि ८.७.१३९. [मथणें]

**मथ(था)ळा**—पु. १ हुंडी देणारा हुंडीवर श्रीकाराच्याखालीं करतो ती सही. २ डोकें; माथा. ३ लेखाच्या माथ्यावर लिहिलें असतें तें लेखाचें नांव; शिरोनाम; (इं.) हेडिंग 'अर्थसूचक प्रश्नाच्या मथळ्याखालीं जो एक निबंध लिहिला आहे...' -केले १.१४८. ४ समईच्या खालची बैठक, बूड. [माथा]

**मंथा**—पु. (कुंभारी) १ मडक्यांना झिलई देण्यासाठीं कुंभार ज्याचा उपयोग करतात तो कांचेचा मणि. २ (खा.) अशा मण्यांची माळ. या माळेनें मातीचें भांडें तेल लावून घांसतात. [सं. मंथ]

**मथाटी**—स्त्री. (व.) बैलांच्या शिंगाभोंवतीं बांधलेली दुहेरी जाड दोरी. [माथा]

**मथित**—स्त्री. (विणकाम) कापडास ताण देण्याचें एक उपकरण; मती, मतीत पहा.

**मथुरी**—स्त्री. एक लहान वृक्ष.

**मद**—पु. १ धुंदी; कैफ; मत्तपणा ( दारू, धन, विद्या, कुलिनता इ०मुळें आलेला ). ( समासांत उत्तरपदीं ) धन-विद्या-स्वरूप-तारुण्य-मद. २ उत्कट कामेच्छा; कामवासना. ३ माजलेल्या हत्तीच्या गंडस्थळांतून निघणारा चिकट द्रव्याचा स्राव. 'प्रवृत्तिकर्णाच्या चाळीं। उठिला मदगंधानिळीं।'—ज्ञा १७.६ ४ पुष्परस; फलरस. ५ गर्व; ताठा; अभिमान; अरेरावी. 'संपत्तिमदु सांडिजे। कुरवंडी करूनी।'—ज्ञा ९.३८१. ६ वेड; उन्माद. ७ आसव; मद्य; दारू. ८ रंगेलपणा; चेष्टा; ख्याल; विलास ( तारुण्यांतील ). 'देती बळें चावुनि दाम दांतें। सोसूं किती ह्या प्रमदामदातें।' [ सं. ] ०कारी—वि. कैफ उत्पन्न करणारें; कैफी. ०गज—पु. उन्मत्त हत्ती. ०त्रय—पु. विद्या, धन व कुल ( किंवा तारुण्य, धन व सत्ता ) या तिहींचा मद. 'अहंकारचिया चळिया। वरि मदत्रयाचिया उकळिया।'—ज्ञा ७.७५. ०मुख—पु. (ल.) मदोन्मत्त हत्ती. 'जैसा सिंहाचिया हांका। युगांतु होय मदमुखा।'—ज्ञा १.२१५. ०विव्हल-ळ—वि. कामविकारानें विव्हल, वेडा झालेला. मदणें—अक्रि. मत्त होणें; माजणें; क्षिणणें. 'गाति किती किति नाचति हांसति ते निजती रडती मदले।'—गंगाधर, रस. कल्लोल २०. मदात्यय—पु. १ मदामुळें झालेला अतिशयित विकार. २ गर्व, ताठा इ०चा नाश. मदात्यय-वायु—पु. उन्माद; उन्मादवायु. मदांध—वि. ( द्रव्य, विद्या इ०च्या ) गर्वानें ज्याचा विचार नष्ट झाला आहे असा; उन्मत्त. [ सं. मद+अंध ] मदिणी—स्त्री. हत्तीण. —शर. मदोत्कट—वि. गंडस्थळांतून मदस्राव होत असलेला ( हत्ती ). [ सं. मद+उत्कट ] मदोन्मत्त—वि. ( श्रीमंती, विद्या, कुल इ०नीं ) माजलेला; उन्मत्त, धुंद झालेला. [ सं. मद+उन्मत्त ]

**मद**—पु. ( बे. ) कचऱ्यासहित भात. मळलेलें पण स्वच्छ न केलेलें भात; मदन. [ सं. मृद्—मर्द् ]

**मंद**—पु. शनि हा ग्रह.—वि. १ ज्यास फारसा वेग, चलाखी नाहीं असा; संथ; धिमा. २ ( ल. ) मूर्ख; मठ्ठ; निर्बुद्ध. 'रजरागी महा मंद। जाण प्रसिद्ध उद्धवा।'—एभा १३.२८०. ३ जड; आळशी; सुस्त. ४ अस्पष्ट; किंचित् अंध ( दृष्टि ). ५ अंधुक; प्रभाहीन; निस्तेज (प्रकाश). 'जेवीं सूर्योदयापुढें चांदू। होय मंदू निजतेजें।'—एभा १३.४७०. ६ सौम्य; गालांतल्या गालांत केलेलें (हास्य). 'वदन मिरवे मंदहसितें।' ७ हलु लु वाहणारी; सौम्य (वाऱ्याची झुळुक). ८ नक्षत्रांच्या अंधमंदादि प्रकारांपैकीं एक वर्ग. यांत मृग, आश्लेषा, हस्त, अनुराधा, उत्तराषाढा, शततारका व अश्विनी हीं नक्षत्रें येतात. हें नक्षत्र असतांना हरविलेली वस्तु लवकर सांपडत नाहीं. ९ बारीक; हलका ( आवाज, ध्वनि ). १० सामर्थ्यहीन; असमर्थ; कमजोर. 'त्याचे उपदेशीं ब्रह्मा मंदू। माझेनिही बोध न करवे।'—एभा १३.१५८. [ सं. ] ०पडणें—१ संथपणानें, सुस्ताईनें चालणें ( काम, धंदा ). 'हल्लीं तुमचे कामाचें मंद पडलें आहे.'—शाको. २ कमजोर होणें ( सांथ, आजार ). ०केंद्र—न. ( ज्यो. ) मंदोच्च पहा. [ सं. ] ०गति-गामी—वि. ज्यास फारसा वेग नाहीं असा; कमी वेगाचा. [ सं. ] ०फल—न. ( ज्यो. ) मध्यम ग्रहाला ज्या फलाचा संस्कार केला असतां मंदस्पष्ट ग्रह होतो असें गणितागत अंशात्मक फल. —माधवचंद्रोबा कोश. [सं.] ०बुद्धि-मति—वि. जड बुद्धीचा; मठ्ठ. [ सं. ] ०भाग्य—वि. कमनशिबी; दुर्दैवी. ०मधुर—वि. १ गोड; आल्हाददायक ( फळ, वास, आवाज, वाद्य, काव्य इ० ). २ सौम्य; मोहक; रम्य ( वारा, हास्य, गाणें, बोलणें ). ०रूप—न. १ सूक्ष्मरूप. —मनको. 'जो हा ठावचेंही मंदरूपें। उवायिलेपणें हारपे।'—अमृ १.३५. २ स्थिरपणा; अचलपणा. ०वाणी—स्त्री. भाषणांत सावकाशी; ओघ, किंवा आकर्षकता नसणें; वक्तृत्वाचा अभाव. 'माझी अतिमंदवाणी। तयाची महिमा काय वाणी।'—वि. सावकाश, छाप न पडण्यासारखें बोलणारा; बोलण्यांत अकुशल. [ सं. ] ०वात—पु. सौम्य, झुळु झुळु वाहणारा वारा; वाऱ्याची झुळूक. 'गंगातटीं सेविती मंदवातें।' [ सं. ] ०वार-वासर—पु. शनिवार [ सं. ] ०वाहकता—स्त्री. ( शाप. ) पदार्थांतून उष्णता लवकर जात नाहीं असा पदार्थाचा गुणधर्म. ( इं. ) बॅड कंडक्शन. ०विसर्जक—वि. ( शाप. ) जो लवकर उष्णता बाहेर टाकीत नाहीं असा ( पदार्थ ). ( इं. ) बॅड रेडिएटर. ०वीर्य—वि. सौम्य गुणाचें, प्रभावाचें ( औषध इ० ). ०वेळ-वेळा—स्त्री. ( ज्यो. ) ज्या समयीं आरंभिलेलें कार्य लवकर तडीस जात नाहीं तो समय; प्रतिकूळ वेळ. ( क्रि० लागणें ). ०शोषक—वि. ( शाप. ) जो उष्णता लवकर शोषित नाहीं असा ( पदार्थ ). ( इं. ) बॅड ॲब्सॉर्बर. ०सुगंध—वि. सौम्य व सुवासिक ( वारा, वाऱ्याची झुळुक ). ०स्मित-हास्य—न. गालांतल्या गालांत हसणें. 'मंदस्मित वदनीं मिरवे।'—वि. गालांतल्या गालांत हंसणारा; हंसतमुख. ०स्मितवदन—न. हास्यमुख; प्रसन्नमुख. मंदणें—अक्रि. १ कमी, मंद होणें; 'मती मंदली पातकांचें नि गुणें।'—राक १ पृ.१५. २ थांबणें. 'मी वंदीन पदारविंद म्हणुनी जातां पथीं मंदली।'—आ शबरी ४. ३ मंद होणें; थकणें. 'मथितां मंदले देव दैत्य।'—मुआदि ४.११२. मंदवा—पु. ( प्रां. ) मंदाई पहा. मंदा—पु. मंदी, मंदाई पहा.—वि. १ स्वस्त. २ चलती, मोसम, हंगाम नसलेला. मंदाई—स्त्री. १ सुस्तपणा; धीमेपणा; स्वस्थपणा; ढिलाई ( काम, धंदा, इ० मध्यें ) २ कमजोरपणा ( सांथ, रोग इ०चा ). ३ स्वस्ताई; उतार ( भाव इ० मध्यें ) मंदाग—स्त्री. सौम्य अग्नि. [ मंद+आग ] मंदागीं—क्रिवि. १ सौम्य अग्नीवर ( शिजविणें, भाजणें. ) 'ती भाजी मंदागीं शिजूं दे.' २ सौम्य; बारीक ज्योतीनें ( दिवा जळणें ). मंदाग्नि—पु. ( ल. ) मंद जठराग्नि; पचनशक्ति

कमजोर असणें. -वि. ज्याचा जठराग्नि प्रदीप्त नाहीं असा (मनुष्य). **मंदावणें**-अक्रि. (शब्दशः व ल.) मंद होणें; कमी होणें; रेंगाळणें; आळसावणें. 'मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं। मंदावों लागती।'-ज्ञा १६.१२. **मंदाविणें**-सक्रि. सौम्य, मंद, कमी करणें. **मंदावा**-पु (शब्दशः व ल.) मंदपणा; सुस्तपणा; आळस. **मंदाळणी**-वि. ज्यांत मीठ कमी घातलें आहे असा (पदार्थ.)[मंद+अलवण-अळणी] **मंदी**-स्त्री. मंदाई पहा. **मंदोच्च**-नपु. ग्रहाच्या कक्षेतील सूर्यापासून अति दूरचा बिंदु; सूर्योच्च. याच्या उलट शीघ्रोच्च. [सं. मंद+उच्च] **मंदोष्ण**-वि. साधारण उष्ण; कोंबट. [सं. मंद+उष्ण]

**मदगडी-ढी**—स्त्री. बहादूरखानीपेक्षां हलका मध्यम प्रतीचा दौलताबादी कागद. मधघडी पहा.

**मदगर्भ-र्भी**—पुस्त्री. मधगर्भ पहा.

**मद(दा)ड, मद्दड, मंदट-र**—वि. मंदबुद्धि; सुस्त; जड; मठ्ठ.

**मदत-द**—स्त्री. साहाय्य. -वि. साहाय्य करणारा; जोडीदार; मदतनीस; पाठिंबा देणारा. 'मी तुला मदत आहें. भिऊं नको.' [अर. मदद्] **०इमदाद**-स्त्री. साहाय्य; निकडीची मदत. 'जूद-तर खर्चाची मदत-इमदाद पोख्त ऐवज देऊन रवाना करून पाठवावें.'। -पया ३.८७. [अर. इम्दाद्=मदत] **०खर्च**-पु. खर्ची; मदत करण्याबद्दल दिलेला पैका. 'आणि मुलाजमत जालिया मदतखर्चेही उमदा देतील.'। -रा ८.२१२. **०गार-नीस**-वि. १ उपकारकर्ता; मदत, आश्रय देणारा. २ सहाय्यक; जोडीदार; दुय्यम (कारकून, लेखक इ०). [फा. मद्दगार] **०गारी-निशी**-स्त्री. सहाय्य करणें; मदत करणें. 'नाईक यांस गुप्तरूपें तुम्ही मदतगारी करून......'-रा ११.२३. [फा. मद्दगारी] **०माश**-स्त्री. निर्वाहासाठीं दिलेली मदत. 'मदतमाश म्हणजे निर्वाहाकरितां'-वाड-सनदा ८३. [अर. मआश्=जीवन] **मदती**-वि. मदत करणारा; मदतगार. 'मसलतीस मदती असणें.'-रा १५.३६३.

**मदत-द**—स्त्री. एक प्रकारचा ओढण्याचा कैफी पदार्थ (अफू, विडयाचीं पानें इ० पासून केलेला). [सं. मद हिं. मद]

**मदंती**—स्त्री. (संगीत) अठराव्या श्रुतीचें नांव. [सं.]

**मदन**—न. कणसें एकदां तुडवून काढलेलें गोंडासहित धान्य; दाणे व भूस ह्यांचें मिश्रण. ह्याला पहिलें मदन असेंहि म्हणतात. दुसऱ्यांदा तुडवून निघालेल्या धान्यास दुसरें किंवा आकणाचें मदन म्हणतात व तिसऱ्यांदा कणसें तुडवून निघालेल्या धान्यास तिसरें किंवा निकणाचें मदन म्हणतात. परंतु कांहीं प्रांतांत वेगवेगळ्या तुडवणीवरून धान्याचे रास, आकण, निकण, व मणी किंवा रास, कांडें, मातेरें, फंजट किंवा वरळें असेहि प्रकार करतात. हे शब्द (त्यांच्या अनुक्रमाप्रमाणें) पहा. [सं. मर्दन; प्रा. मद्दन] **म्ह०** पहिली रास, दुसरें आकण, तिसरें निकण, चौथा मणी त्यास बळुता धणी.

**मदन**—पु. १ कामदेव. २ काम; संभोगाविषयींची इच्छा; विषयविकार. [सं.] (**मुखावरून, तोंडावरून, स्वरूपावरून**) **०ओंवाळून टाकणें-ओंवाळणें**-एखाद्या मनुष्याचें सौंदर्य मदनापेक्षांहि अधिक आहे असें दाखविण्यासाठीं योजितात. **०कामेश्वर**-पु. एक कामोद्दीपक रासायनिक औषध. **०तात**-पु कृष्ण. 'मदनतात मनमोहन मुरली वाजवी कुंजवनीं।' **०फळ**-न. गेळफळ. **०बाण**-पु. १ मदनाचे बाण, आयुधें. हे पांच आहेत; (अ) (फुलें) अरविंद, अशोक, चूत, नवमल्लिका व नीलोत्पल. (आ) (विकार) उन्मादन, तापन, शोषण, स्तंभन,व संमोहन. 'बाधि मदन बाण घे प्राणदान दे दावि हरी वदना।' -देप ७४. २ एक फुलझाड; जाईची एक जात. 'तिनें एक मदनबाणाचें पुष्प खोंविलें।'-चंद्र ५४१. **०मस्त**-वि. कामविकारानें बेफाम, उन्मत्त झालेला. **०मूर्ति**-स्त्री. १ कामदेव. २ सुंदर, सुस्वरूप मनुष्य; मदनाचा पुतळा. **मदनाचा पुतळा**-पु. अत्यंत सुंदर मनुष्य. 'पाहीन ना आतां कसला मदनाचा पुतळा हिला नवरा मिळतो तो!'-पकोघे. **मदनाची छडी**-स्त्री. अत्यंत सुंदर स्त्री. 'तूं कशी सुरेख मदनाची छडी आहेस.'-मृ ९. **मदनांतक, मदनारी**-पु. शिव; शंकर. 'अशेषांही रुद्रांमाझारीं। शंकर जो मदनारी।'-ज्ञा १०.२२५. [सं. मदन+अंतक, अरि]

**मदनजर**—न लक्ष्य; ध्यान 'याजकरितां मसलहतीस मदनजर राखून...'-पया ४६९. [फा. मद्द-इ-नझर =कृपावलोकन, उत्तेजन]

**मदनाई(य)क**—पु. माळेतील मधला मणि, हिरा. 'मदनाईक बदामी.'-वाडमा १.१५९. [सं. मध्यनायक]

**मदनी**—स्त्री. एक झाड; गेळ. मदनफल पहा.

**मंदर, मंदराचल**—पु. देवदानवांनीं ज्यानें समुद्रमंथन केलें तो पर्वत. 'देवा मंदराचेनि अंगलगें। ठायीं ठायीं श्वापदांचीं दागें।'-ज्ञा ११.२५७. [सं.]

**मदलस**—स्त्री. (प्र.) मजलस पहा. **मदलसी**-स्त्री. सभा. -मब ६७.

**मदलस-सा**—पु. मांडव, छत इ०चा मध्यभाग; चांदणी 'हिरियांच्या मदलसा झळकती।'-रावि ३६.५६. 'निळयाच्या मदलसा जडित। वरी मुक्तांचे राजहंस खेळत।'-ह २.२२. [सं. मध्य+लस्=विलसणें ? मसलंद पहा.]

**मदवी**—स्त्री. उंची रेशमी वस्त्र; (सामा.) वस्त्र. 'आतां अविद्येचिया गांवीं। मोहाची वेढूनि मदवी।'-ज्ञा १८.६९०.

'मदवीयेची वरी चोळी। बिरडें काढिलें मुक्ताफळीं।' -कथा ४. ८.४६. [?]

**मंदा**—स्त्री. (संगीत) तिसऱ्या श्रुतीचें नांव.

**मंदा**—पु. घोड्याच्या लगामाचा प्रकार. -अश्वप १.१८५.

**मंदाकिनी**—स्त्री. १ आकाशगंगा; आकाशांतील चांदण्यांचा शुभ्र पट्टा. 'नील गगनावरी सुंदर। मंदाकिनीवोघ दिसे शुभ्र।' २ भागीरथी नदी. [सं.]

**मंदाक्रांता**—स्त्री. एक वृत्त. याच्या चरणांत सतरा अक्षरें व म, भ, न, त, त, ग, ग हे गण असतात. उदा० 'ह्याहा देवी हृदय फुटतें देह माझा गळाला। वाटे शून्य त्रिभुवन मला, अंतरात्मा जळाला।' [सं.]

**मदार**—स्त्रीपु. १ उंटाच्या पाठीवर असणारा उंच भाग; वशिंड. २ भिस्त; दृष्टि; लक्ष्य. 'अक्षरावर मदार नाहीं अर्थावर आहे.' ३ मुसलमानांचें थडगें. 'तुका म्हणे बावी। मोडूनि मदार बांधावी।' -तुगा ६२२. ४ मुख्य आधार; केंद्र; सत्ता. 'पादशाही मदार आपलें हातास आला असतां...' -इमं ९८. ५ आंस; भार. 'इब्राहीम आदीलशानें पादशाही कारभाराचा मदार महाराजाचे सिरीं टाकिला.' -इम ९७. ६ इतबार. 'त्या फौजेंत अवघा मदार तुमचाच आहे.' -पया १४९. ७ ठराव. 'तेव्हां मदार झाला कीं अक्षय तृतियेस निरोप यावा.' -ख ५. २५९३. [अर. मदार्]

**मंदार**—पु. १ पांढऱ्या रुईचें झाड; मांदार. २ एक कल्पवृक्ष. ३ एक पुष्पवृक्ष. [सं.] ०**माला**—स्त्री. एक वृत्त; अश्वधाटी. याच्या चरणांत सवीस अक्षरें व त, त, त, त, त, त, त, ग हे आठ गण असतात. उदा० 'वाचाळ मी नीट पाचारितों धीट याचा नयो वीट साचा हरी।' [सं]

**मदारुलमहाम**—पु. १ राजसत्तेचा मुख्य केंद्र, आंस. २ मुख्य प्रधान; कारभारी. ३ नाना फडणविसांचा किताब. [अर. मदारुल्महाम्म्]

**मदारी**—पु. जादूगार; बहुरूपी; डोंबारी; गारुडी; नजरबंदीचे खेळ करणारा. ज्याच्यावर सर्व खेळ अवलंबून आहे असा. [मदार हिं.]

**मदालसा**—स्त्री. मस्त स्त्री.

**मदिर**—पु. घोड्याच्या खुराचा खालील भाग. -अश्वप. १.६४.

**मंदि(दी)र**—न. १ गृह; घर. (समासांत) राज-देव-हृदय-मंदिर. २ देवालय; देऊळ. (समासांत) शिव-विष्णु-दत्त-मंदिर. [सं.]

**मदिरा**—स्त्री. दारू; मद्य. [सं.]

**मदीय**—वि. माझा. [सं.]

**मंदील**—पु.न. जरीची काडी, कांठ असलेलें पागोटें, फेटा इ० [अर. मिन्दील्]

**मंदोदरी**—स्त्री. १ बेडकी. २ रावणाच्या बायकोचें नांव. [सं. मंद+उदरी]

**मंदोरा**—पु. (प्र.) मणदोरा पहा.

**मंदोसरी**—स्त्री. (माण.) फोडणीचें वरण; ढकू. मंडोसरी पहा.

**मंदोसा**—पु. दाराच्या दोन चौकटींना काटकोनांत सांधणारा चौरस तुकडा.

**मद्द**—पु. (सराफी) (हिऱ्याच्या खाणींतील) कठिण रेतीचा गट्टा.

**मद्दड**—वि. मठ्ठ; जड; मंदबुद्धि. मदड्ड पहा. 'झुलु किंवा हॉटेन्टॉट लोकांसारखे बुद्धीनें ते खास मद्दड नाहींत.' -सासं २. ३५१. [का. मदड्ड=मूर्खपणा]

**मद्य**—न. मदिरा; दारू. [सं.] ०**पा-पी**-वि. दारू पिणारा; दारुड्या, 'मद्यपाआंगींचें वस्त्र। कां लेपाहातींचें शस्त्र।' -ज्ञा १३.५३२. ०**पान**-न. दारू पिणें. ०**पाननिषेध**-पु. दारू पिण्याबद्दल निषेध; दारू न पिण्याबद्दलची चळवळ 'सरकारनें द्रव्यशोषणाकडे नजर देऊन मद्यपाननिषेधाचे पाय तोडावे. ...' -के १.२५९. ०**मंड**-पु. सातूच्या दारूवरील फेसाळ साय; सुरा-मंड; कारोत्तर. ०**सार**-न. (शाप.) अल्कोहल.

**मंद्र**—पु. नाभिस्थानचा गंभीर नाद. एक स्वर, ध्वनि. [सं.] ०**नाद**-पु. (संगीत) हृदयांतून निघणारा नाद. ह्या नादाचा उपयोग जवळच्याशीं बोलतांना करतात. ०**सप्तक**-न. (संगीत.) मंद्रनादयुक्त सात स्वरांचा समुदाय. ०**स्वर**-पु. (संगीत) रागालाप सुरू असतां तो मंद्रसप्तकांतील अमुक स्वरापर्यंत जावा अशी मर्यादा दाखविणारा त्या सप्तकांतील स्वर.

**मद्रा**—पु. कापडाची एक जात; अलवण. -मुंव्या १२३.

**मद्राशी-सी**—वि. मद्रास प्रांतासंबंधीं. ०**चप्पल**-स्त्री. चप्पल (वाहाणां)ची एक जात.

**मध**—स्त्रीपु. १ मधमाशा गोळा करतात तो गोड रस, दाट द्रव. २ फुलांतील रस; मकरंद. ३ फणसांतील गोड द्रव; गऱ्यांतील पाणी. गऱ्यांचीं साठें वाळवून एकत्र रचून ठेविलीं असतां त्यांतून जो द्रव निघतो तो. [सं. मधु] **मधाचें बोट लावून ठेवणें-लावणें-दाखविणें**-(ल.) लालूच, आशा दाखविणें. ०**पिंपळी**-स्त्री. मध आणि पिंपळी यांची एक औषधी कृती. ०**पुळी, मधरा**-(प्र.) मधुपुळी, मधुरा पहा. ०**पोळें**-न. मधमाशा जेथें मध सांठवितात तें घर. ०**माशी**-स्त्री. मध गोळा करणारी माशी. ०**शर्करा**-स्त्री. फळें, मध इ० गोड पदार्थांत सांपडणारी साखर; फलशर्करा. (इं.) ग्ल्युकोज. ०**पाणी**-न. मध आणि पाणी

मगरूर; मस्तवाल. ०**मोड**-पु. (विशेषतः म्हैस, घोडी यांची) मैथुनेच्छा शमविणें. [ माज+मोड ] **माजरा-माजिरा**-वि. १ मादक. विशिष्ट धान्यें व वनस्पतींसंबंधीं योजतात. उदा ०माजरा हरीक, माजरा गोंवल, माजरी खडसांबळी, इ०याच्या उलट. गोडा हरीक; गोडा गोंवल इ०. २ बेहोष; उन्मत्त; शेफारलेला; मगरूर. 'जो सावध घे मदिरा । तो होउनि ठाके माजिरा ।' -ज्ञा १७. ११३ ३ चोखंदळया; चवचाल **माजऱ्या हरीक**-पु हरकाची मादक काळया टरफलाची जात. याच्या उलट गोडाहरीक. **माजरु-रू**-वि. (व.) १ मस्तवाल. २ माजलेला. **म ज़रें**-न. मादक असलेलें धान्य, वनस्पति खाल्ल्यानें उत्पन्न होणारा कैफ, धुंदी. -वि. कैफ उत्पन्न करणारें. **माजवण**-न. १ उन्मत्तपण. २ मादक पदार्थ. 'कां माजवण दीजे मर्कटा ।' -ज्ञा ३.९. ३ अधिकता. 'चंचळपणाचें माजवण । घेतलें जेणें ।' -स्वादि १.५. १८.०**वणें**-अक्रि माजणें. ०**विणें**-सक्रि. उन्माद आणणें; जास्त, अधिक करणें **माजिवटा**-पु. १ उन्माद; गुंगी. 'पातलिया मरणाचा माजिवटा ।' -ज्ञा ८.२०८ २ मरण **माजिवडें**-वि मस्त.

**मा(मां)जण**—न १ देवाच्या मूर्तीला तेल, शेंदूर इ०लावणें लेपणें. २ असा लेप लावण्याचें द्रव्य. ३ माज; स्वयंपाकाच्या भांड्यावर फासण्याची राख व माती. [सं. मार्जन] **मा(मां) जणें**-सक्रि. १ तेल, शेंदूर इ०कांनीं देवाच्या मूर्तीस लेप लावणें. माती, राख इ०स्वयंपाकाच्या भांड्यावर फासणें. २ फासणें; लेपडणें; माखणें. 'त्याला काय बक्षीस तर तेलशेंदराचें माजणें. -नामना ३२. **माजविणें**-सक्रि. १ (खडू, माती इ०) पाटीवर फासणें. २ शेंदूर, राख, माती इ०नीं देवाची मूर्ती, शरीर, स्वयंपाकाचीं भांडीं इ०) माखणें. [मार्जन]

**माजणें**—अक्रि. १ मादक पदार्थ, औषधें यांचा अंमल, चढणें; कैफ चढणें; झिंगणें; धुंद होणें. २ फुगणें; शेफारणें; चढून जाऊन तोरबाज, दांडगा, उन्मत्त होणें. 'माजो बाहुबळें न छात्र ।' -मोउद्योग १३ १५. ३ मर्यादेबाहेर पुष्ट, मस्त, तुंद होणें (खुराक खीरपुरी इ०कांनीं) ४ पुष्कळ, पूर्णपणें, उफाड्यानें वाढणें; फोफावणें. (पीक). ५ मुलुखभर पसरणें; दूरवर प्रसृत होणें (बातमी, गोष्ट). 'बातमी माजली.' ६ वाढणें; वृद्धि पावणें; सर्व बाजूंनीं विस्तार होणें (धंदा, गांव, रान यांचा). 'कारखाना माजला, वस्ती माजली, झाडी माजली.' ७ अमर्याद वाढणें. फुगणें 'दरिद्र माजलें, महागाई माजली, गोंधळ माजला.' ८ संवकणें (जीभ, हात इ०). 'जिव्हा माजली हात माजला.' [सं. मद्, माद्य; प्रा. मज्य] **म्ह०** माजली महारीण फोपसाला जहार.

**मां(मा)जर**—न १ एक लहान ग्राम्य जनावर; बिल्ली. याचा रंग पांढरा, काळा, पिवळा, उदी, सुगी इ०, केस मऊ व तुळतुळीत, डोळे घारे व शेपूट लांब असतें. हें उंदीर मारून खातें यास अंधारांत फार चांगलें दिसतें. रानमांजराची जात फार क्रूर असते २ गाजराचा गाभा, सुळा. [सं. मार्जार; प्रा. मंजार] **म्ह०** १ मांजराचे गळयांत घांट कोणी बांधावी ? =(स्वसंरक्षणार्थ युक्ति म्हणून सर्व उंदरांनीं, मांजराच्या गळयांत घांट बांधल्यानें तिचा आवाज होऊन मांजर आलेलें कळेल, असें ठरविलें पण घांट बांधण्यास कोणी पुढें होईना यावरून) दिसण्यांत सोपी पण करण्यास अशक्य अशी गोष्ट २ (व.) मांजरीचे दांत तिच्या पिलास खात नाहींत=आपलें मनुष्य कितीहि बोललें तरी राग येत नाहीं. ३ मांजर गेलें लुटी आणि आणल्या चार मुठी ०**आडवें येणें**-(ल.) एखाद्या कामास अडथळा होणें, येणें. (मांजर आडवें आल्यानें कार्य सिद्धीस अडथळा येतो अशी समजूत आहे यावरून.) ०**मारणें**-पाप करणें; (मार्जारवध हें एक पातक आहे यावरून ल.) अपराध, गुन्हा करणें. **माझ्या घरांत मांजर व्याली काय ?** -ज्यानें भेटीस यावयाचें सोडलें आहे त्यास म्हणतात. **मांजराचा मावशी**-स्त्री. चिचुंद्री (कारण मांजर ह्या प्राण्यास मारीत नाहीं). **मांजराचे पाय**-पुअव. (ल.) गिचमिड, चिडविड अक्षर. कुत्र्याचे पाय या शब्दाशीं सामान्यतः जोडून उपयोग. **मांजराचे पाय कुत्र्यावर करणें**-एखाद्या गोष्टींत, कामांत कांहीं तरी लटपट, गडबड करणें. सामाशब्द- ०**झांज-प**-संधिप्रकाश व रात्र यांच्या दरम्यानची वेळ (या वेळीं मांजरें दृष्टीस पडत नाहींत यावरून). ०**डोळ्या**-वि. मांजराच्या डोळ्याप्रमाणें डोळे असलेला; घारडोळ्या. ०**मुतवणी**-न. कोमट पाणी, द्रव ०**वेल**-स्त्री. तांदुळाची एक जात. **मांजरी**-स्त्री. १ खाकेंत होणारी गांठ. (या गांठीवर उपाय म्हणून तीवर लोणी लावून तें मांजराकडून चाटवितात. यावरून); खाकमांजरी पहा २ घुसळखांबाच्या खांच्या फासाच्या दोऱ्या प्रत्येकी; मांजरें, मादिरें ३मांजराना फार प्रिय असलेली एक वनस्पति. ४ (कों.) किसणी; विळी. ५ (कों.) मांजराची स्त्री; भाटी. ६ (गो.) चटई (लव्हाळयाची). ०**कवळप**-(कों.) अंथरूण गुंडाळणें. **मांजरू**-न मांजर (कोणत्याही लिंगीं—लडिवाळपणानें, तिरस्कारानें). **मांजरें**-न. घुसळखांबाची दोरी. **मांजऱ्या**-स्त्रीअव उंदऱ्यामांजऱ्या पहा.

**मां(मा)ज(द)रपाट**—पु. मद्रीपोलम येथील जाड्याभरड्या कापडाची एक जात.

**माजरी**—स्त्री. गवताबरोबर उगवणारें एक तण.

**माजवळ**—वि. (गो) मध्यम.

**माजवी**—स्त्री. (राजा.) टेंकडीच्या उतरणीवर केलेला चौथरा; माची. [मध्य. माज]

**माजा**—पु. मायफळ. [फा. माजू]

**माजा**—वि. (काव्य) माझा. 'कोण निवारील शाप हा माजा ।' -मोआदि २.६. [प्रा.]

**मांजा-ज्या-झा**—पु. १ मेण, तेल, अंड्याचा बलक आणि काचेची पूड यांचें दाट मिश्रण, खळ. २ हें मिश्रण लावलेला पतंगाचा दोर. [ सं. मंड; हिं. ]

**माजाड**—न. १ पाठीचा कणा व कंबर यांचा सांधा. २ कटिप्रदेश; माज ( निंदेनें, तिरस्कारानें. ) [ माज=कंबर ]

**माजिटा**—पु उत्कर्ष. -हंको. [ प्रा. ]

**मांजिठें**—न. १ ( मदानु. ) मंजिष्ठ. 'ऐसी भीतभंगा नेहटी। सपोतें मांजिठीं।'-ऋ ६९. २ तांबडें वस्त्र. 'प्रणवाचिये पेठे। जाहलें शब्द ब्रह्म मांजिठें।'-ज्ञा ६.१०९. [ सं. मंजिष्ठ ]

**माजिला**—वि. मधला. [ सं. मध्य ] **माजिवटा**-पु. १ मध्यभाग, मध्य. 'शांतीचा माजिवटा। ठाकिला जेणें।'-ज्ञा १२.१४३. २ भर. 'ऐसीया बोधाचा माजिवटा।'-ज्ञा १८.११८७. **माजिवटें-डें**-क्रिवि. मध्यें; आंत.

**माजिवडा-डां**—वि. मध्याचा आश्रय करून राहणारा. -क्रिवि. मध्यें. 'जेथें आकाराचिया माजिवडां। येणें जाणें पडे निवाडा।'-सिसं ६.१३७.

**माजी**—वि. १ भूतकालीन; गत. २ रद्द; गैरचालू; अनुपस्थित. ( क्रि० पडणें ). 'हा नवा रुपया होतांच तो रुपया माजी पडला.' 'माजी-मामलेदार, कारकून' [ अर. माझी=गत ] **०करणें-पाडणें-घालणें**-रद्द करणें.

**माजी-जीं**—क्रिवि. ( काव्य ) आंत; मध्यें; मधें. 'विपरीत ज्ञानें लीन होय। माजीं अज्ञानासी।'-विउ ३.४१. [ सं. मध्य; प्रा. मध्यें, मंज्झ, माज्झ; सिं. मंझु; हिं. मांझ, माझ; बं माझ ] **माजीवटा**-क्रिवि. मध्यें. 'यालागी सहज भजनामाजीवटा। जाहला तो पैठा अनहंकृती।'-एभा २.४३९.

**मांजी**—( सांकेतिक ) आठ. संख्या.

**माजु**—पु. १ मध्यभाग; कंबर; माज. 'अतिशयें माजु साना। होता अभिमान पंचानना।'-एभा १४.४९२. २ मस्ती; माज. [ मध्य ]

**मांजुळणी**—स्त्री. ( ना. ) रांजणवाडी.

**माजूफल**—न. मायफळ. [ सं. ]

**माजू( जु )म**—स्त्री. साखर, बदाम, पिस्ते इ० मसाला घालून बनविलेल्या भांगेच्या वड्या. [ अर मअजून् ] **माजुमी**-वि. १ माजूम खाण्याची संवय असलेला. २ माजूम मिसळलेला ( बर्फी इ० पदार्थ ).

**माजूर**—वि. ( अशिष्ट ) माहीत. [ अर. मआजूर ]

**माजूर-माजोरा-री**—वि. चढेल; उन्मत्त; गर्विष्ठ; मस्तवाल; माजलेला. **माजुरकी, माजुरी**-स्त्री. गुरमी; मगरूरी; मिजाज. -वि. मस्तवाल; उन्मत्त; गर्विष्ठ. **माजुरमत**-न. आडदांड मत; अहंपणानें, हट्टानें धरलेला मुद्दा. ( क्रि० धरणें ).

**माज्या**—पु. मोटेच्या वरच्या बाजूचा तुकडा.

**माझा**—वि. स्वतःचा; माजा; मम. मी शब्दाचें षष्ठीचें रूप. [ सं. अस्मत् ] **म्ह०** माझी बाई गुणाची पायलीभर चुनाची= रडत असलेल्या मुलीस समजावितांना थट्टेनें म्हणतात. **०मी**-क्रिवि. मी एकटा; दुसऱ्याची मदत न घेतां. **माझिये**-क्रिवि. माझ्या. 'मनीं माझिये हीत ऐसेंचि होतें।'-राक १.३७. **माझें**-वि. मी याचें षष्ठीचें नपुंसकलिंगी रूप. [ सं. अस्मत; प्रा. मज्झ=माझें ] **म्ह०** १ माझें मला होईना अन् पावणा दळून खाईना. २ ( व ) माझेंच नाक वर=हरला तरी ज्याची मुजोरी जात नाहीं अशा माणसासंबंधीं. **माझें तुझें म्हणणें**-( आचरणांत ) पक्षपात करणें. 'माझें तुझें हें म्हणशील जेव्हां।'-सारुह ७.१२१. [ प्रा. ] **माझेंमाझें म्हणणें**-न सर्व ठिकाणीं आपलेपणा दर्शविणें; सर्व माझेंच आहे असें म्हणणें. 'माझें माझें म्हणतोसी। म्हणौनियां।'-दा ३.१०.५०. **माझ्या( मज )कडे तरी पहा**-माझी तरी दया येउंदे. 'नादा एकत्र, नको द्वेष करूं मजकडेचि बा! पाहे।'-मोउद्योग २१.११. **माझ्या बापाच्यानें, हें होणार नाहीं**-हें करण्यास मी अत्यंत असमर्थ आहे. **माझ्या वरत**-क्रिवि. ( व. ) माझ्याच्यानें; माझ्याकडून.

**माझारीं**—शअ. १ ( काव्य ) आंत; मधें; मध्यें. 'पै ध्यातां आपणचि परी। ध्यानरूप वृत्तिमाझारी।'-ज्ञा १८.१०३३ २ -क्रिवि मध्यभागीं. 'दिसतो उचित पदें माझारीं।'-ज्ञा १.८. [ सं. मध्य ]

**माट**—पु. ( गो ) अति गोड खाल्यामुळें तोंडास बसलेली मिठी. [ मिटणें ]

**माटकुला**—वि. लहान आकाराचा; चिमुकला.

**माटमु( मू )ट**—स्त्री. भयामुळें उद्भवलेली चिंता. ( क्रि० करणें ). -क्रिवि. धागधुग होऊन; भयभीत होऊन. 'माझा जीव माटमुट करतो.' [ ध्व. ]

**माटऱ्या, माट्या**—पु. ( व. ) सोसाट्याचा वारा; वावटळ.

**माटव**—पु. ( कु. ) मांडव. [ सं. मंडप ]

**माटवी**—स्त्री. ( कु. ) गणपती इ०च्या मूर्तीवर फळें वगैरे बांधण्याकरितां केलेली लाकडी मंडपी; माळी. [ सं. मंडप ] **०बांधणें**-( कु. ) गणेशचतुर्थीला गणपतीवर लाकडी चौकटीस फळें इ० बांधणें.

**मां( मा )टु( टू )ळणें**—अक्रि. खुंटणें; वाढ संपणें. 'नाना फळतिये वेळे। केळीची वाढी मांटुळे।'-ज्ञा १८.१०८२.

**माठ**—पुस्त्री. एक पालेभाजी. ही सर्वत्र व सर्वकाळीं होते. तांबडा व पांढरा असे याचे दोन प्रकार आहेत. लावल्यापासून तीन आठवड्यांत खाण्याजोगी होते. [ सं. मारिश ]

**माठ**—पु. पसरट असा मातीचा घडा; रांजण. -स्त्री. (कु.) चिकण माती असलेली जागा. [ सं. मृद्+घट; मृत्तिका+घट ] ०ली-स्त्री. (कु.) मातीचें लहान भांडें.

**माठ**—वि. १ चापटसर; खालपट; किंचित् उतरतें (छप्पर इ०); याच्या उलट खर किंवा पाणढाळ. २ टिल्लू; खुजट (मनुष्य, पशु). ३ मंदमति; जडबुद्धि. 'विश्वाचे माठ। त्याचे कपाळीं तें नाट।'-तुगा ३४६०. [माठणें] ०घोसाळें-न. घोसाळयाची एक जात. -कृषि ५९५. **माठणें**-अक्रि. १ (जखम, क्षत इ०) भरणें आणि बरें होणें. २ झिजणें; बोथटणें (धार, टोंक). ३ उग्रता कमी होणें. -सक्रि. टांकीनें सारखा व गुळगुळीत करणें; साफ करणें (गुंडे, चिरे). ४ हलके हलके ठोकून गुळगुळीत करणें (दागिने, गोठ, कडें, जोडवीं इ०). ५ (धातूच्या नव्या भांड्याचे) पोचे काढणें; साफ करणें. ६ (ल.) ठोकून नरम, वश करणें. **माठरणें**-अक्रि. १ जड, सुस्त, मद्र होणें. २ डागळणें; सुकणें; कोमेजणें; टवटवी नाहींशी होणें (वनस्पति इ०ची). ३ भरून येणें; बरी होणें (जखम); मठारणें. -सक्रि. १ घडणें; आकार, रूप देणें. २ (ल.) आपल्या इच्छेप्रमाणें घडविणें, वळविणें. ३ मठारणें या अर्थीहि योजितात. **माठलें**-न. १ (पळी, चमचा इ०कांचें)तोंड. २ समईचें टवळें. ३ ताक करावयाच्या रवीचा माथा, बोंड. ४ लहान मुलाचें चापट व पातळ करभूषण **माठवण**-न. १ जखम भरून येण्यासाठीं लावलेलें औषध; माठणारें मलम. २ मठारणारा; माठणारा व्रण. **माठं(ठा)ळणें**-सक्रि १ (हलकें ठोकून) नव्या भांड्याचे पोचे साफ करणें. २ भांडें घडणें, उतरणें. ३ एखादी वस्तु, भांडें यांवर हलका हात फिरविण्यानें साफ व गुळगुळीत करून त्यास आकार आणणें; हलके हाताच्या चोपानें सारखी करणें (जमीन इ०). ४ (ल) आज्ञाधारक करणें; आपल्या इच्छेप्रमाणें वळविणें. -अक्रि. १ बरी होणें; भरणें; मठारणें (जखम). २ मंद, जड होणें (बुद्धि, मन); मद्र होणें; जड, सुस्त, मांदा होणें (शरीर, मनुष्य). ३ वाढ खुंटणें; झकाकी, तेज, दम गमावणें (झाड, वनस्पति यांचें). **माठा-ठ्या**-वि. जड; ठोंब्या; जडबुद्धि; मंदमति. **माठी**-स्त्री. बायकांच्या हातांतील धातूची पोकळ बांगडी. **माठीव**-वि. टांकीनें सारखा व गुळगुळीत केलेला; उत्तम घडलेला (इमरतीचा दगड). **माठें**-न. (कु.) १ प्रेत जाळलेल्या जागेवरील बांधकाम (मशीद, थडगें, छत्री, वृंदावन इ०). २ दोन्ही टोकांस उघडी असलेली, पडदी नसलेली शेतांतील पडवी, सोपा इ०; दुपाखी ढेलज; पडसाळ.

**माड**—पु. (कु.) समईच्या चाड्याचा खालचा भाग (चाडें पितळी व खालीं लांकडी दांडा अशा).

**माड**—पु. नारळाचें झाड. म्ह० आडो माडो समुद्रासारखा वाढो (मुलाला न्हावूं घालतांना स्त्रिया म्हणतात). =माडाप्रमाणें उंच व समुद्राप्रमाणें विस्तार पावो या अर्थी. ०उतरणें, वहाणें-माडाची माडी काढणें व विकणें. सामाशब्द- ०पीर-पु. ताडी पिण्याचें व्यसन असणारा; नारळसंत. [ माड+फा. पीर ] ०बाग-पु. (हेट.) नारळीच्या झाडांचा बाग. **माडागूण, मांडागूळ-ळ**-नपु. (कों.) नारळी, ताड यांस येणारा शेवटचा सुयरा, कोंका, पोय. [ माड+अगूळ, अग्र ] **माडागोड**-पु (गो.) माडीपासून तयार केलेला गूळ.

**मांड**—पु. १ रचणें; व्यवस्थित ठेवणें (काम, कारखाना यांकरितां-हत्यारें, उपकरणें, साहित्य इ०) २ केलेली रचना; मांडणी. (क्रि० मांडणें). ३ देखावा; व्यवस्था 'दावूनिया माड। पुरे न करीती भांड!'-तुगा ३११५. ४ विस्तार; पसारा. ५ वैभव. 'काळीं संहारीना मांड त्याचा साग मी हरी।' -मोरा मायणें १.२५२. ६ (गो.) दुकान. ७ (कों. राजा. कु.) पिशाचादिकांस बलि देण्याचे वेळीं भगतानें देव-देवतांची स्थापना करण्याचा विधि. (क्रि० भरणें) ८ होळीच्या सणामध्यें ग्रामदेवतेस कौल लावणें. ८ ठेवलेलेपणा; मांडलेलेपणा; स्थिरावलेली स्थिति. (मांडणें या क्रियापदासह उपयोग करतात). ९ (संगीत) एक राग. ह्यांत षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण-संपूर्ण. वादी षड्ज, संवादी पंचम, गानसमय सार्वकालिक. १० (कों.) झोडलेल्या भाताची रास [ मांडणें ] ०काडप-(गो.) दुकान उघडणें. ०घालप-(गो.) दुकान स्थापन करणें. **मांडणावळ**-स्त्री. १ मांडणें, व्यवस्थित ठेवणें याबद्दल द्यावयाचें मोल, किंमत. २ मांडणी; मांडणूक. **मांडणी-मांडणूक**-स्त्री. १ मांडणें; मोकळेपणीं व व्यवस्थित रीतीनें पसरणें; थाटणें; लावणें; रचणें. 'जमीनीवर प्रथम टाहाळाची मांडणी करावी मग वर गवत घालावें.' २ व्यवस्थित रचना. 'तदन्याय वृक्षपाषाणीं। आणिली ज्यानें गंधर्वमांडणी।'-नव १९.४८. ३ सांगाडा; दुसती बांधणी; बंदिस्ती (इमारतीची). **मांडणें**-सक्रि. १ मोकळेपणीं व व्यवस्थितपणें पसरणें, ठेवणें, रचणें (काम, धंदा यांकरितां-साहित्य, सामान, जरूरीच्या गोष्टी). २ स्थापन करणें; उघडणें (दुकान, व्यापार) ३ लिहिणें; वहींत दाखल करणें (खर्चाच्या बाबी, टांचण). ४ तयार केलेल्या चिखलांत रोपापाठीमागून रोप याप्रमाणें लावणें; आवटणें (नाचणी, वरी इ०चीं रोपें-आवटणी करतांना). ५ प्रतिपादणें. 'मना सर्वथा मिथ्य मांडूं नकोरे।' -राम १९. ६ व्यापणें. 'जी भूतीं भूतळ मांडिलें।' -ज्ञा ११.२८६. ७ पाळणें. 'देह सांडावा ना मांडावा।' -एभा २०.१४९ ८ प्रवर्तणें; चालविणें; दाखविणें; प्रदर्शित करणें इ०. 'कज्जा मांडला, सोंवगिरी, मांडली, फजिती मांडली.' ९ कडाक्यानें व यथेच्छ चालू करणें. 'त्यानें गालीप्रदान मांडलें-लत्ताप्रहार मांडला-दंग

मांडले-चेष्टा मांडल्या.' -अक्रि. १ इच्छेप्रमाणें. वागण्यास संधि मिळणें; फावणें. 'अंधारी रात्र आली म्हणजे चोराचें मांडतें.' २ बनणें; तयार होणें; निघणें. 'बाजरीच्या कणसांत अझून दाणा मांडला नाहीं. ३ आरंभ होणें. 'जैसा प्रळयकाळ मांडला।'-ज्ञा १.१५८. [सं. मंड्=शोभविणें] **मांडपूस**-स्त्री मांडणें, नोंद करणें व पुसणें; लिहिणें व तपासणें. 'प्रत्येक वसुलाची लेखी पावती दप्तरांत मांडपूस होत आहे.'-के २०.५.३६. **मांडली**-स्त्री. मंडण, रचना. 'म्हणौनि निवृत्तीचि मांडली। सुनि प्रवृत्तितळीं।'-ज्ञा १८.७०४.

**मांड**—स्त्री. १ मांडीस होणारा रोग. यानें सर्व मांडी सुजून मांडीचें हाड कुजतें. २ योग्य बैठक (घोड्यावरची, लिहितांना घातलेली). (क्रि० जमणें; बसणें; साधणें). ३ स्वारांच्या टोळीचा हल्ला. (क्रि० करणें). ४ घोडेस्वारांची टोळी. 'दाटती मांड मांडिला.'-ऐपो २३२. [मांडी] ०**मांडणें-जमविणें**-घोड्यावर चांगलें बसतां येणें. 'जमवून मांड घोड्याला।'-संग्राम १२४. ०**गादी**-स्त्री. घोड्यावर बसणाऱ्याच्या मांड्या गच्च व सोईस्कर बसण्याकरितां खोगराच्या पुढील भागीं केलेली गादी. [मांडी+गादी] ०**चोळणा-चेपणें-चेपणी**-पुनस्त्री. मांडीचोळणा इ० पहा; लांडी विजार. ०**पत्र**-न. (मांडीवर घेऊन दत्तविधान करितात यावरून) दत्तकपत्र; दत्तक घेण्याविषयींचा लेख, करार. [मांडी+पत्र] ०**पुत्र**-पु दत्तक घेतलेला मुलगा. [मांडी+पुत्र] ०**मोड**-स्त्री. मांडीमोड पहा. ०**वर्त**-पु. घोड्याच्या मांडीवरील भोंवरा. -अश्वप १.१०१.

**मांड**—न. भाज्या, मीठ इ० ठेवण्याचें दांड्याचें लाकडी पडगें.

**मांड**—स्त्री एक शाक भाजी; माठ.

**मांडकी**—स्त्री. (कु) बेडकी. [सं. मंडूक]

**मांडगा**—पु. (कों) कळकाची एक जात; लाठीच्या उपयोगी बांबू; कळक; माणगा पहा.

**माडगें**—न. (निजाम) डाळ, तांदूळ एकत्र शिजवून केलेली खिचडी २ (माण) हुलग्याच्या पिठाचें पातळसर पिटलें, कढण. हें ज्वर आलेल्या माणसास देतात. यानें घाम येतो.

**मांडण**—स्त्री. (कासारी धंदा) एखाद्या पत्र्यास भोंक पाडतेवेळीं तो पत्रा ज्यावर ठेवतात तें साधन. [मांडणें]

**मांडलि(ळी)क**—पु मंडलावर राज्य करणारा राजा; सार्वभौमाच्या ताब्यांतला राजा; संस्थानिक. याच्या उलट सार्वभौम. [सं. मंडल]

**मांडव, मांडो**—पु. १ (लग्न, मुंज इ० शुभकार्याकरितां घातलेला) मंडप; आच्छादिलेली जागा; शमीआना. २ द्राक्षी इ० वेल चढून फैलावण्याकरितां केलेला कमानदार रस्ता. ३ देवास अर्पण केलेला इमला. ४ (खा.) झाल; ऐरणीदान करण्याचें वंशपात्र. [सं. मंडप] **म्ह**० चुटक्यांचे मांडव=पोकळ प्रतिष्ठेचें बोलणें. 'मियासाहेबानीं चुटक्याचे मांडव यथास्थित रचून...' -नि. ०**खंडणी-खणणी**-स्त्री. शूद्र लोकांत होणाऱ्या लग्न व इतर विशिष्ट धार्मिक प्रसंगीं जोशी, उपाध्याय यांचा दक्षिणेचा हक्क. ०**डाहाळे**-पुअव. मांडवावर पसरण्याचे, लावण्याचे वृक्षाचे डहाळे. -ऐरापु ६३. ०**देवता-प्रतिष्ठा-शोभा**-(प्र.) मंडपदेवता इ०पहा. ०**परतणी-णें**-स्त्रीन. लग्नसमाप्तीनंतर वधूपक्षानें वरपक्षास दिलेली मेजवानी, जेवणावळ. [मांडव+परतणी] ०**मेड-ढ**-स्त्री. मांडवाची पहिल्यानें पुरलेली, मुख्य मेढ; सामान्यत: मेढ. ०**मेड(ढ) रोवणें**-(ल.) मनापासून काम करावयास लागणें, आरंभिणें. **मांडवस, मांडव आवस**-स्त्री. १ फाल्गुन वद्य अमावास्या. या दिवशीं शेतकरी लोक सालदार ठेवतात. **मांडवी**-स्त्री १ देवावर टांगावयाची लांकडी जाळीदार चौकट; मंडपी; भाळी. २ (राजा.) देवळांतील मूर्ति जेथें स्थापन केलेली असते तो गाभारा. ३ लहान मांडव. 'हे कामाची मांडवी।' -ज्ञा १३.९९१. ४ बंदरांतील आयात निर्गत मालाकरितां केलेली वखार, कोठी, जकातघर. बाजार उभारण्यासाठीं जागा. -वसईची मोहीम. ५ (ना.) विड्याच्या पानांची एक जात. [मांडव]

**माडवप**—सक्रि. (गो.) तुडविणें.

**माड वावर**—न. मेणें वावर पहा.

**मांडस ढोनस**—न. (कु.) एक पक्वान्नविशेष.

**मांडळ**—स्त्री. ठोकणी, मुसळ, मोगर इ० कांच्या टोकाला घातलेली कडी, वसू, मायणी. [सं. मंडल] **मांडळी**-स्त्री.(खा.) गाडीच्या चाकाची धांव.

**माडा**—पु. (गो.) एक लहान माशाची जात.

**माडा**—पु मंदिर; प्रासाद. 'अंबिकाचिआं माडा जवळीं।' -शिशु ४४५. [माठ-मठ]

**माडा**—स्त्री. माता. 'माडांचीं सप्रेमळें चित्तें।' -दाव ३१९. [सं. माता; गु. माडी=आई]

**माडा**—स्त्री. लहान झाड; रोपडा; रोपा (उपटून दुसरीकडे लावतां येण्यासारखा). [मोड?] -वि. रब्बीच्या पिकाकरितां दमदार होण्यासाठीं तयार केलेली व खरीपाच्या पेरणीच्या वेळीं न पेरतां पड टाकलेली (जमीन); अशा जमीनींत पिकलेलें धान्य, दाणा, पीक. खाटा पहा.

**मांडा**—पु. गव्हाच्या पिठाचें केलेलें अतिशय पातळ पापुड्याचें एक पक्वान्न. [सं. मंडक; का. मंडिगे] **म्ह**० सुग्रण झाली म्हणून कांहीं हाताचे मांडे करीत नाहीं. (वाप्र.) **तोंडाचे मांडे**-पुअव. बोलमांडे; थापेबाजी. **मांडे करणारीचा शेंबूड काढला पाहिजे**-ज्याच्या कडून आपणांस काम करून

घ्यावयाचें आहे त्याची मनधरणी केली पाहिजे; त्यास खूष ठेवलें पाहिजे याअर्थी.

**मांडावळ**—स्त्री. मांडणी; मांडणूक पहा.

**माडी**—स्त्री. (खा. अशिष्ट) आई. माडा पहा. [सं. माता-माया-माडा; सिं. अमडी; गु. माडी]

**माडी, माडी पुणे(ने)व**—स्त्री. (व.) कोजागिरी; अश्विन शुद्ध पौर्णिमा.

**माडी**—स्त्री. माडाच्या पोईपासुन स्रवलेला रस; मादक रस. (ताडापासून ताडी याप्रमाणें नारळापासुन माडी काढतात).

**माडी**—स्त्री. वरचा मजला. 'माडया गोपुरें कवलारें।'

**माडी**—स्त्री. अळवाचें लांब मूळ; आखुड व वाटोळया मुळास मुडळी म्हणतात. मुडळी पहा. ०**अ(आ)ळू**—न. गोंवा-फोंडा प्रांतांतील वरील अळवाची जात.

**मांडी**—स्त्री. १ गुडघ्यापासुन कमरेपर्यंतचा पायाचा भाग; जांघ. २ बसण्याचा एक प्रकार; बैठक (घोडयावरची, लिहिणाराची इ०). ३ लगामाच्या बाहेरील बाजूच्या दोन कांबी, कडया. [मंडण] (वाप्र.)(**आपली)मांडी उघडतां आपणासच लाज वाटते**-स्वतःचीं दुष्कृत्यें उघड करताना स्वतःस लाज वाटते; स्वतःचीं व्यंगें उघडकीस आणण्याचें कर्म कठीण आहे ०**चें उसें करणें-वर मान ठेवणें**-दुसऱ्याच्या मांडीवर आपलें डोकें टेकणें; त्याच्या-वर बिनदिक्कत विश्वास ठेवणें; आपली मान दुसऱ्याच्या हातांत देणें. ०**ठोकणें**-बैठक मारणें. ०**ठो(टे)कून उभें राहणें**-लढ-ण्यास इ० सज्ज होऊन उभें राहणें. ०**ठो(टे)कून बसणें**-(गायन, लेखन इ०कांविषयीं) आपली उत्कंठा, तयारी दाख-विणें. ०**देणें**-मरणोन्मुख (वडील) मनुष्याच्या मानेखालीं मांडी ठेवणें. 'वृद्ध व्याकूळ होतां मांडी द्यायासि या समीप रहा।' -मोउद्योग १२.७०. ०**पालटणें**-संततीविषयीं नवऱ्याकडून निराश झालेल्या स्त्रीनें संततिसाठीं परपुरुषगमन करणें. ०**बांधणें**-निश्चय करणें. 'अधिकें जंवजंव औषधी। सेवायाचि मांडी बांधी।' -ज्ञा १८.१५५. ०**मोडणें**-१ लेखनव्यवसायास योग्य असें दृढ आसन घालणें. २ लिहिण्यासाठीं घातलेली मांडी बदलणें; विचलित करणें. 'पंचवीस बंद ते माडी न मोडतां लिहीत असत.' -कोरकि ६४. ०**वर घेणें देणें**-एखाद्याशीं बरोबरीनें वागणें. ०**वर घेणें-बसविणें**-दत्तक घेणें. ०**वर देणें**-दत्तक देणें. ०**वर मांडी टाकून-घालून बसणें**-निरुद्योगी, स्वस्थ बसणें. **मांडीस माडी टेकून बसणें**-१ एखाद्याशीं स्पर्धा करणें; टक्कर देणें. २ बरोबरी करणें. **मांडीखालचा**-वि. नेहमींचा बसायाचा; पूर्ण संवयीचा (घोडा). 'स्वाराच्या मांडीखालचा घोडा असावा.' सामाशब्द- ०**चेपणें, चेपणा**-नस्त्री. लग्न-समारंभांत सुनमुखाचे वेळीं वरमातेला वधूच्या आईनें द्यावयाचें लुगडें किंवा इतर वस्त्र. नवऱ्या मुलीस आपल्या माडीवर बस-वितांना वरमातेनें हें लुगडें आपल्या मांडीखालीं ठेवण्याची चाल आहे त्यावरून. [मांडी=चेपणें] ०**चोळणा**-पु निवळ मांडया झांकणारा चोळणा, विजार; मांडचोळणा पहा. ०**मोड**-स्त्री. लेखनाचा दृढ व्यासंग; मेहनत, कसालत; शीण; परिश्रम. [मांडी+मोडणें]

**माडु**—पु. (ना. व.) स्तन; थान.

**मांडुक**—पु. बेडुक. [सं. मण्डूक]

**मांडुकली**—स्त्री. (कों.) लहानसा मांडव; हलका व जुजबी मांडव. [मांडव]

**मांडुक्य**—न. अथर्व वेदांतील एका शाखेचें उपनिषद्. [सं.]

**मांडुल-लो**—न. (कु.) एक लाकडी पात्र.

**माडू-डु**—पु. हरिणाच्या दोन जोडलेल्या शिंगांना पोलादी पातीं बसविलेलें हत्यार. **म्ह**० सोयऱ्यांत लाडू, हत्यारांत माडू, भोजनांत लाडू.

**मा(मां)डू(डू)ळ**—न. १ सापाची एक जात. २ दोन डोकीं किंवा दोन तोंडें असलेला एक प्राणी; दुतोंडें.

**मांडे**—न. मसाला घालून केलेलें हुलग्याच्या पिठाचें काल-वण. माडगें.

**माडे**—न. खरीपाच्या वेळीं मोकळया टेवलेल्या जमीनींत रबीच्या वेळीं काढलेलें पीक. माडा पहा.

**मांडें**—न. मांडणी; विस्तार, उत्कर्ष होणें. 'वंशावरी वंशांचें माडें।' -ज्ञा १५.१२८.

**मांडेबांध**—पु प्रभाव; तेज. [प्रा.]

**मांडो**—पु. (गो.) किरिस्ताव लोकातील एक घरगुती समा-रंभ.

**माडोकी-ळी**—स्त्री. अळूची मुडळी; मुळी.

**मांडावा-वा**—पु. मांडणी; विस्तार. [मांडणें]

**मांडोस**—स्त्री. (व.) चैत्र शुद्ध प्रतिपदा (प्र) तत्पूर्वीचा दिवस म्हणजे फाल्गुन वद्य अमावास्या. मांडअवस पहा

**माडौचे**—सक्रि. (गो.) तुडविण.

**माडया**—पु अळवाची एक जात; अळवाची मुडळी.

**माढ(ढा)ण**—न. (कों.) मीठ, मसाला इ० ठेवण्याचें लांकडी पाळें; हें ताड, माड इ०च्या खोडाचें कोरून केलेलें असतें.

**माढा**—वि माडा पहा.

**माण**—स्त्री. १ (गुरांच्या) मानेस होणारा दाहः सुज; रोग. २ चिकण माती. ३ निकस, हलकी, भरभरीत माती ४ पाणी ठेवण्याचें रुंद तोंडाचें मडकें. ५ जात्याची वर्तुळाकार मढण. माईण, माइणी पहा. ६ उंसाच्या चरकाच्या तळाशीं रस सांठविण्याकरितां ठेवलेलें भांडें. 'जैसा गुळउसाचा घाणा। रसु जाये बाहेरी माणा।'

–एभा १५.१७. ७ मोठ्या जातीचा बांबू; याला ताज असें म्हणतात. ८ थर (खडकाचा, मातीचा). ९ (गुज.) जोंधळ्याचे कोवळे मोड खाल्ल्यामुळें गुरांना होणारा रोग. [मान] **माणगें**–न. १ मानेचा दाह. २ पडगें; पाळें. माढण पहा. ३ गुरांस होणारा एक रोग. **माण जमीन**–स्त्री. चिकण मातीची जमीन.

**माणकी**—स्त्री. (गो.) माशाची एक लहान जात.

**माणकी, माणकुली**—स्त्री. लहान माणीक. 'हिरकणी माणकुली।' –स्वादि ९.५.६७. [माणिक]

**माणकुला**—वि. (राजा.) लहान व सुंदर; लघ्वाकृति; चिमुकला. [माणिक]

**माणगा, माणगारा, माणा**—पु. (राजा.) लांब जातीचा चिवा; वांबू.

**माणवक**—न. एक समवृत्त. याच्या चरणांत अक्षरें आठ व भ, त, ल, ग हे गण असतात. [सं]

**माणा**—पु. १ माणगा पहा. २ एक वृक्ष.

**माणिव**—स्त्री. मृदुता; मऊपणा. 'ताठा सरला माणिव आली, सहज झाली लीनता।' –दत्तपदें ६८. [सं. मृदु]

**माणी**—स्त्री. मायणी; वसु; वर्तुलाकार मढण; काठीला खालीं बसविलेली शेंबी, कडें.

**माणी(णि)क(क्य)**— न. एक तांबडें रत्न; लाल नांवाचें रत्न; हें कुरुंदाचें असून हिऱ्याच्या खालोखाल कठिण असतें. यानें विद्युत जागृत होते. याच्या खाणी ब्रह्मदेशात आढळतात. कांहींचा रंग गुलाबी व काळसर अगर सफेत असतो. याच्या पोटजातीः–श्याम, तारा, लाल, माणकें, चुनी लालडी, लालडी (हीं लहान लालाचीं नावें), करिपोक, बंकाऊ, जर्दा, रोण (हीं कमी दर्जाचीं माणकें), सौगंधिक, नीलगंध, कटकारिक, बंधुजीवी, शिखंडिक, गौरिकाख्य, इंद्रगोपी, सीमंतक, कुसुम, गोक्षुर इ० [सं. माणिक्य] **म्ह०** कोळशांतलें माणिक. **माशानें माणिक गिळणें**–झालेला तोटा पुनः पूर्ण भरून येणें अशक्य असणें; दुसऱ्याच्या हातीं गेलेली वस्तु परत मिळणें अशक्य होणें याअर्थी उपयोग. सामाशब्द– ०**चौक**–पु. जेथें लवाजम्याचे लोक रांगेनें उभे राहतात, खेळ खेळतात असें मोठ्या लोकांच्या घरापुढील आवार घातलेलें मैदान. ०**चौकडी**–स्त्री. (राजा.) उत्सवप्रसंगीं बायकांनीं भिंतीवर काढलेल्या रेखाकित आकृतींपैकीं एक. [माणीक+चौकडी] ०**पैंजण**–न. (व.) गव्हाच्या रव्याचा, उकडीचा एक पदार्थ; फळ. ०**वात**–स्त्री. १ पुढें माणकासारखी गोळी व मागें बोटभर लांब अशी बारीक सुतासारखी केलेली कापसाची वात. २ हातानें पांच धाग्यांची मिळून वळलेली, दिव्यांत घालावयाची वात. ०**विंदान्या**–वि. (व.) फाजील नाजूक (माणूस). **माणिकुली**–स्त्री. लहान माणिक.

**माणूस**—पुस्त्रीन. १ मानव; मनुष्य; मानवी प्राणी. २ (कु.) रखेली; अंगवस्त्र. ३ मानव; मनुष्यजाति. ४ –पुस्त्री. रोजंदारीनें कामावर लावलेला मजूर; गडी. सामान्यतः श्रेष्ठ दर्जाच्या मनुष्याची कोमलता, नाजुकपणा यापासुन तों रानटीपणा, रांकटपणा, दांडगेपणा इ० अवस्था दाखविण्यासाठीं माणूस, शब्दास जोडून काणूस, ठेकस व टोमस हे तीन शब्द योजितात. उदा० माणूस काणूस, माणूस ठेकस, माणूस ठोमस इ०. (समासांत) रानमाणूस, जळमाणूस, बाईलमाणूस इ० [सं. मनुष्य; आर्मेंजि. मनुस; पोर्तु.जि. मनु, मनुश] **म्ह०** १ (व.) माणूस फिरलें तर फिरलें पण घराचे वासेहि फिरले=घरांतल्या मुख्य माणसाची नाराजी झाली ती झालीच. पण त्यामुळें घरांतील लहानमोठीं सर्वच माणसें विरुद्ध झालीं. २ (व.) माणसांतला, रांड्या बायकांतला देशपांड्या=पुरुष मंडळींत कांहींच चालत नाहीं पण बायकांत मात्र बढाई मारणारा. (वाप्र.) **माणसाकाणशीं**–मानवी प्राण्याकडून. **भरल्या माणसांतून उठविणें–काढणें–घालविणें**–समाजांतून बाहेर टाकणें. **माणसानें काय बोलावयाचें**–(बायकी) १ आतां कांहीं बोलावयाचें उरलेंच नाहीं या अर्थी उद्गार. २ आतां यापुढें शब्द करणें–काढणें व्यर्थ. **माणुसाचें काणूस होणें**–आजार, दुःख, काळजी यांमुळें मनुष्य किडकिडीत, कृश होणें; दरिद्री व दुःखी होणें. **माणूस काणूस–ओळखावें–जाणावें–पाहावें–ध्यानांत धरावें**–माणसामाणसातील भेद लक्षांत आणावा; कोण चांगला, कोण वाईट ओळखावा. **माणस(सा)ळणें, माणसावणें**–अक्रि. १ माणसाच्या संवयीचा होणें; क्रूरपणा टाकून गरीब होणें; (रानटी पशु). २ मनुष्य खाण्यास वखवखणें (मनुष्याच्या रक्ताची एकदां चव घेतलेला वाघ, लांडगा इ०) **माणसाचा अवतार–कांदा–लेंक**–पु. टोंब्या, दगड मनुष्य. सामाशब्द– ०**कंटाळ्या–गंधारा–गंध्या–घाण्या–घाण**–वि एकलकोंडा; मनुष्याच्या संगतीचा कंटाळा करणारा. [माणूस+कंटाळणें, गंध, घाण] ०**पण–पणा**–नपु. माणुसकी पहा. ०**बळ**–न. १ माणसांच्या संख्येचें बळ; संघशक्ति. 'हें काम एकट्याचें नव्हे. माणूसबळ पाहिजे' २ मनुष्यरूप शक्ति (सैन्य, नोकर इ०) विद्याबळ, द्रव्यबळ, पुण्यबळ याच्याहून भिन्न शक्ति. ०**मान्या**–वि. १ माणसें मारणारा; मानवहत्यारा; खुनी. २ (ल.) क्रूर; निर्दय. **माणसामाणसीं**–क्रिवि. १ आपल्या नोकरा–चाकरा मार्फत. २ मनुष्यांकडून; मानवी प्राण्यांकडून. **माणुसकी**–स्त्री. १ सुधारलेल्या मनुष्याचे गुण व भावना, चाली व रीती; सभ्यता; शिष्टता; सुजनता; थोरपणा; मनुष्यांतील सात्विक गुण. 'या सात्विक गुणांच्या समुच्चयास आपण तूर्त माणुसकी असें नांव देऊं.' –गीर ९२. ३ मानवी धर्माची जाणीव; मानुषी दयाधर्म; मनुष्यपण. ४ व्यवस्थित वर्तन; नियमितपणा व मनमिळाऊपणा.

**माणें**—न. (गो.) गुंगी. ०**पडप-लागप**—अक्रि. (गो.) गुंगी येणें.

**मा(व)णें**—अक्रि. राहणें; समावणें (भांडें, जागा इ० कांत—कांहीं वस्तु). 'घटाकार आकार मातींत माती। असे मातसे सर्वेहि ज्यांत माती।' [सं. मा=मापणें; हिं. माना]

**माण्या**—पु. माणगा; लहान जातीचा बांबू.

**मात**—पु. (कों.) चारा. 'वरच्या रानचा शिंगनी मात।' —मसाप ४.२६४.

**मात, मातु**—स्त्री. १ (बुद्धिबळक्रीडा) प्रतिपक्षीयाच्या राजास मोहऱ्याच्या माऱ्यांत बिनतोड धरणें; कोंडमारा करणें. 'दावूं हात करूं मात। मारूं लाथ काळासी।' —तुगा. २ (काव्य) मोठें काम; महत्कृत्य; मर्दुमकीचें काम; चमत्कार; अद्‌भुत कृत्य. 'ऐक बाई सांगतें मात त्याची।' ३ (काव्य) काम; कार्य; बाब; खबर; गोष्ट. (क्रि० उठणें; उडणें; उठवणें; उडवणें). 'कटकीची मात सांग जासुदा घरांत।' ४ थाट; वैभव; ऐश्वर्य; चकचकाट; झकझकाट; शानदार व दिव्य देखावा; समारंभ. 'गाण्याची-जेवणाची-प्रयोजनाची-लग्नाची-मात.' ५ प्राचुर्य; वैपुल्य; स्वस्ताई, सुलभता; 'धान्याची-साखरेची-जिनसांची-मात. ६ बोलणें; भाषण. 'त्यांची नायकावी मात।' —परमा २.१६. ७ शर्थ. 'जरीपटक्यानें केली मात।' —ऐपो १८५. ८ (तंजा.) प्रतिकार; विषावर उपाय. [सं. मात्रा; अर. मात्; ते. माट=शब्द] (वाप्र.) ०**करणें**—१ (बुद्धिबळक्रीडा.) प्रतिपक्षाच्या राजाला अडविणें. २ बुद्धीचें, कुशलतेचें कृत्य करून प्रतिपक्षाला जिंकणें. ३ अघटित, अप्रतिम, विचित्र, लोकोत्तर कृत्य करणें. ०**खाणें**—पराजित होणें.

**मातकदम**—क्रिवि. फार पूर्वीपासून [अर. मातकद्म=भूतकाल]

**मातकर**—वि. तापद; वाईट. 'विरह तुझा अत्यंत मातकर कंठिं प्राण उरले।' —देप २७. [मातणें]

**मातक्यान-नीं-नें**—क्रिवि. माकत्यान पहा.

**मातंग**—पु. १ हत्ती. 'मस्त चालती पुढें मातंग।' —ऐपो २१३. २ मांग. 'मोह मातंग आमुचें कुळीं।' —एरुस्व १७.३७.

**मातगा**—वि. १ सहज शेफारणारा; स्वतःचा उत्कर्ष होतांच पूर्वीचीं परिचित माणसें, वस्तु इ०कांचा तिरस्कार व अनादर करणारा. २ अहमन्य; गर्विष्ठ. ३ खरमस्त; तापट (घोडा) [सं. मद्]

**मातण-न**—स्त्री. सामान्यतः माचण पहा. ०**करणें**—(हेट. नाविक) शीड फिरविणें. ०**घेणें**—माचण घेणें पहा.

**मातणें**—अक्रि. १ शेफारणें; गर्वानें फुगणें. 'मर्दी शत्रुचमूला शौर्यमदें बहुत मातलीला जो।' —मोभीष्म ७.५. २ चांगलें चांगलें खायला घातल्यामुळें पुंड व अडिवाळ होणें; उन्मत्त होणें. ३ जोरानें फैलावणें (वनस्पति). ४ भरून वाहूं लागणें; ओथंबणें; भरून येणें. 'ब्रह्मानंदें क्रीडती साचार। प्रेमबळें मातोनिया।' [सं. मद्] म्ह० १ बोकड माते आणि आपल्या तोंडीं मुतें. २ (गो.) माजलेल्या हुंदराक हत्ती म्हणून जातां=उंदीर माजला तरी तो हत्ती होत नाहीं. **मातलेपण**—न. मस्तपणा. 'कैसें प्रतिवदनीं मातलेपण। आवेशाचें।' —ज्ञा ११.३४१. **माताइ**—स्त्री. (महानु.) मस्ती; मताचा आग्रह; उन्मत्तपणा; वेड. 'माताइ ते वादी दिग्गज सकळा। भूमंडळीचें।' —शिशु २५ [मत्ताई=माताई] **माताबळा-ळें**—वि. (महानु.) १ वेडा. 'काव्यें जाहलीं मातबळीं।' —शिशु ८५. २ मस्त; गुंग. 'प्रबंधें होती माताबळें। कविजनांचें।' —शिशु १५. [मत्त+आवलि]

**मातब(ब्ब)र**—वि. १ आदरार्ह; अब्रूदार; सन्मान्य; योग्य. २ थोर; श्रीमान; प्रतिष्ठित. 'पुढील स्वारीस जो कोणी सरदार मातबर येईल तो बंदोबस्त करील.' —इमं २६१. ३ मोठा; मोठाधोटा; स्थूल. ४ महत्त्वाचा; मौल्यवान. 'तहनाम्यासारखे मातबर कागदपत्र अर्थ लावण्याकरितां पुढें यावयाचे होते.' —सासं २.१९३. [अर. मुअतबर्] **मातब(ब्ब)री**—स्त्री. १ मान्यता; थोरवी; श्रेष्ठता. २ पत; प्रतिष्ठा. 'जें कर्तव्य तें सलाबतीनें मातबरीनें आपली इज्जत शह याजवरी पडोन नक्ष होय तें करावें.' —ख १.२४०. ३ महत्त्व; किंमत. 'परार्थबुद्धीला स्वार्थाची मातब्बरी काय होय?' —टि ४.३०२.

**मातम-मी**—नस्त्री. १ शोक; दुःख. 'पातशहानीं दोन दिवस बहुत मातम केलें.' —दिमरा २.८४. २ दुखवटा. 'सुल्तानखान जमातदार यास मातमीचें खलअत जाले.' —रा १.१८६. [फा. मातम्; अर. मअतम्] ०**पु(र्सि, र्सी)रशी**—स्त्री. दुखवटा; दुखवटयाचीं वस्त्रें; दुखवटयासंबंधीं विचारपूस. 'हमसिरा बेगमेस एक दुशाला पल्लेदार मातमपुर्सीचा.' —दिमरा [फा. मातम्पुर्सी]

**मातल**—न. १ बेत-बदली. २ उशीर. 'अमासाहेबांचें यावयास मातल जालें.' —इमं ६८. [अर मुअत्तल्]

**माता**—स्त्री. १ आई. समासांत मातृ असें रूप होतें उदा० मातृकुल, मातृगोत्र. २ देवाची शक्ति, त्याची पत्नी. ३ देवी (रोग). [सं. मातृ; इं. मातर्; ग्री. मेर; लॅ. मेतर; पोर्तु.जि. बाता, मींदाई (माझी आई).] ०**काढया**—पु. (व.) देवीडॉक्टर. ०**पितरें**—नअव. आईबाप समुच्चयानें. [सं. मातापितृ] ०**मह**—पु. आईचा बाप [सं.] ०**मही**—स्त्री. आईची आई. [सं.]

**मातायते**—वि. (महानु.) माजलेलें; मातलेलें. 'दैत्य रगडा मातायते पाउडा।' —गस्तो ८२.

**माती**—स्त्री. १ पृथ्वी; दगडावाचून पृथ्वीचा अंश; मृत्तिका, धूळ. २ (ल.) स्थूल शरीर. 'कीर्तनासी जाता तुझी जड झाली माती।' —तुगा २९८७. ३ (ल.) नाश; नासाडी; दुर्दशा. 'पोरानें संसाराची माती करून टाकली.' ४ अगदीं कांहीं नाहीं

याअर्थी. 'तुला काय कळतें माती ?' ५ निरुपयोगी; बिनकिंमतीचा पदार्थ. ६ (ल.) मृत शरीर. ७ निसर्गानें मेलेल्या जनावराचें मांस; मढें. ८ शाडू (मातीचा गणपति, चित्रें इ० कां करितां). [सं. मृत्तिका, मृद्=कुस्करणें; प्रा. मत्ति(ट्टि)आ; हिं. मट्टी-माटी] **म्ह०** १ अति तेथें माती=कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक झाल्यानें नुकसान होतें. २ जित्या रोटी आणि मेल्या माती. ३ दरीची माती दरींत आटते. (वाप्र.) **०आड करणें-घालणें-ठेवणें-टाकणें**-१ (शब्दशः व ल.) मातीखालीं ठेवणें; पुरणें; आच्छादणें; झाकणें (प्रेत, धन, ठेवा). २ विसरून जाणें; पुनःपुनः त्याच गोष्टीचा उल्लेख न करणें. **०(मातेरा)करणें**-(एखाद्या वस्तूची) नासाडी करणें; तिचा सुखावहपणा हिरावून घेणें. **०(मात)करणें**-(व.) प्रेत दहन करणें, मूठमाती देणें; पुरणें. **(अन्नात)०कालवणें**-एखाद्याच्या उपजीविकेचें साधन नाहींसें करणें; पोटावर पाय आणणें. **०खाणें**-पराभव पावणें. **०च्या मोलानें विकणें-देणें**-हलक्या दरानें, कमी किंमतीनें विकणें. 'पैशाची फार जरूरी होती, म्हणून मला आपलें सामान मातीच्या मोलानें विकावें लागलें.' **०जड होणें**-मरणोन्मुख मनुष्याचें शरीर जड होणें. **०टाकणें-घालणें-लोटणें**-बुजविणें; (कलह, अपराध इ० कांवर) पांघरूण घालणें; विसरण्याचा प्रयत्न करणें. 'ह्या वादावर आतां माती लोटली पाहिजे.' **मातीला देणें-जाणें-येणें**-(कर.) प्रेत पुरणें; मढें पुरणें; प्रेतयात्रेला जाणें. 'मातीला गेलों होतों-काल माती दिली-मातीला चला.' **(तोंडांत) ०पडणें**-प्राप्ती बुडणें. **(मातींत) ०मिसळणें**-प्रेत पुरणें; और्ध्वदेहिक, उत्तरक्रिया करणें. **०होणें**-१ नाश होणें. 'जें अनया कारण, त्याची पळांत हो माती।' -मोआदि ३३ ६०. २ खराबी होणें. 'यालागी श्रवणाची होय माती। परमार्थप्राप्ति त्यां कैची।' -भाराबाल ११.१३०. ३ बेकार होणें. सामाशब्द-(माती शब्द समासांत पूर्वपदीं आला असतां त्याचें मात असें रूप होतें) **०कट**-वि. माती असलेला (पदार्थ) **०कण**-न. माती मिसळल्यामुळें नासलेलें धान्य. [माती+कण] **मातकर**-पु. (व.) मातीच्या भिंती घालणारा; मातकाम करणारा. **मातकरी**-पु. (राजा.) शेतजमीन भाजण्यासाठीं पसरलेल्या राबावर माती घालण्याकरितां लावलेला मजूर; पैरगडी. [माती+करी] **०कापड**-न. १ (अग्निपुटें देण्याकरितां कुपीस्थ रसायनें इ०ची) ज्यांत भट्टी लावावयाची त्या भांड्यास मातीचा लेप दिलेल्या कापडाच्या पट्टीनें लेपटणें. २ असला लपेटा; आवरण. [माती+कापड] **०काम**-न. मातीचें काम; मडकीं घडणें, विटा घालणें, चित्रें करणें चिखलानें भिंत रचणें इ०काम. **०ख(खा)ण**-स्त्री. १ मातीची खाण. २ भाजावळीकरितां दाढीवर पसरण्यासाठीं दाढीच्या नजीकच्या जमीनींतील जी माती खणतात ती जागा. **०गाळणें**-न. चाळणीवजा चिकणमाती गाळण्याचें मडकें **मातट-ड-ळ, मातमळ**-वि. माती मिसळल्यामुळें खराब झालेला (गूळ, धान्य इ० पदार्थ); मातीमिश्रित. **०सामान**-न. मातीचीं चित्रें, भांडीं इ० जिनसा. **मातियेडे**-न. मातकाम करणारा. -शर. [प्रा.] **मातिरा**-पु. मातेरें; नाश. 'चरमतनू परमलाभ, न करि मातिरा।' -भज ५७. **मातीचा मैराळ**-वि. जंगी व स्थूल; गलेलठ्ठ (मनुष्य). **मातीचें अत्तर**-न. उत्तम मातीपासून तयार केलेलें अत्तर. **मातीचे कुल्ले**-पुअव. खरें प्रेम नसतां प्रेमाचा आणलेला नुसता आविर्भाव; दृढ बंधन, एकोपा नसल्यामुळें संकटाच्या वेळीं उपयोगी न पडणारे नातेवाईक, संबंधी; बळें लावलेलें नातें किंवा संबंध; उसनें प्रेम, अवसान. **म्ह०** मातीचे कुल्ले लावल्यानें लागत नाहींत. **मातीचें तेल**-न. खडकतेल; घासलेट. **मातीमीठ**-न. खारट मातीपासून तयार केलेलें मीठ. **मातीवडार**-पु. वडारांतील एक पोट जात.

**मातुल, मातु(तु)ळ**—पु. आईचा भाऊ; मामा. 'उभय कुळीं साक्ष। तूंचि माझा मातुळपक्ष।' -तुगा ७९८. [सं.]

**मातुलंगी-लिंग-लिंगी**—स्त्री. महाळुंग. 'मधुकाकडिआं मातुलंगी।' -दाव १३६. [सं.]

**मातु(तो)श्री**—स्त्री. आई; माता. [सं. मातृश्री, मातुःश्री]

**मातृ**—स्त्री. आई [सं.] सामाशब्द- **०कन्यापरंपरा**-स्त्री. माणसाचें नातें बापाकडून न गणतां आईकडून गणण्याची एक विशिष्ट पद्धति. [सं.] **०गमन**-न स्वमातेशीं अगम्य गमन. [सं.] **०गया**-स्त्री १ सिद्धपूर नांवाचें क्षेत्र. २ गयेस किंवा सिद्धपुरास केलेलें आईचें श्राद्ध. [सं.] **०गामी-गमनी**-वि. मातृगमन करणारा; मात्रागमनी. [सं.] **०गोत्र**-न. १ आईचें कुल, गोत्र. २ -वि. आईच्या कुलासंबंधीं. [सं.] **०घात**-पु. मातेची हत्या. [सं.] **०घातुक**-वि. मातृघात करणारा. **०द्रोह**-पु. आईशीं द्वेष. [सं.] **०द्रोही**-वि. मातेशीं द्वेष करणारा. [सं.] **०पद**-न आई, माता होणें. **०पक्ष**-पु. मातृकुल; मातृवंश. [सं.] **०पितृभक्त**-वि मातापितरांची शुश्रूषा करण्यांत तत्पर. [सं.] **०बंधु**-पु. आईकडचा भाऊ किंवा नातेवाईक [सं.] **०भूमि**-स्त्री. आपलेपणानें वागण्याचा आपला हक्क असलेली भूमि; जन्मभूमि; मायभूमि. [सं.] **०भोजन**-न मुंजीच्या दिवशीं बटूनें उपनयनांग वपनाच्यापूर्वी मातेसह भोजन करण्याचा समारंभ. यानंतर तो मातेसह एकत्र जेवत नाहीं. [सं.] **०मंडल**-न. दोन भुवया. [सं.] **०वध-हत्या**-पुस्त्री. मातृघात. [सं.] **०श्री**-स्त्री. आईस आदरार्थी म्हणतात. वडील व प्रौढ स्त्रीस योजावयाचा शब्द. बाई, ताई व इतर बाहत्या नांवाप्रमाणें मातृश्री व ह्याचे अपभ्रंश मातुश्री आणि मातोश्री ह्यांचा पुष्कळदां नपुंसकलिंगी अनेकवचनी प्रयोग करतात. उदा० मातोश्री आलीं आहेत. कांहीं प्रांतांत हे शब्द पुल्लिंगी

अनेकवचनीं योजतात. [ सं. ] **मातृ(त्रु)का**–स्त्री. १ वर्णमालेंतील एक वर्ण; अ पासुन ह पर्यंत अक्षरें. ' ओंकार मातृकांसकट । तोचि जाणावा कंबुकंठ । '–एरुस्व १.४२. २ आई अथवा दाई. ३ देवता. ह्या आठ देवता आहेत–ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी, चामुंडा किंवा कौबेरी, चर्चिका. लग्न इ० मंगल कृत्यांत ह्यांचें पूजन करितात. याहून भिन्नहि मातृका सांगितल्या आहेत. व त्यांची संख्या एके ठिकाणीं सोळा व दुसरे ठिकाणीं सात अशी आहे. ' पार्थु अधिष्ठात्री तेथिंची । मातृका गा । ' ज्ञा ६.१२७. ४ मूर्च्छना; सुर; स्वर. ५ ( नृत्य ) दोन करणांचा समुदाय. [ सं. ] ०**का( वर्ण )न्यास**–पु दक्षिणाचार पूजेसंबंधीं विधि; एक न्यासविधि. ह्यांत स्वरव्यंजनात्मक पन्नास वर्ण तोंडानें म्हणून शास्त्रविधीप्रमाणें कर्मकर्त्यानें किंवा उपाध्यायानें पूजावयाच्या मूर्तीच्या पन्नास अवयवांस हातानें स्पर्श करावयाचा असतो. ०**का पूजन**–स्वमाता इ० त्याचप्रमाणें गौरी इ० सोळा आणि ब्राह्मी इ० सात मिळून तेवीस देवतांचें मंगल कार्यांतील पूजन. गणतति, दुर्गा, वास्तोष्पति व क्षेत्रपाल यांचें पूजनहि मातृकापूजनाबरोबरच होतें. **मातृत्व**–न. मातेचा संबंध, स्थिति, स्वभाव, धर्म; आईपणा. [ सं. ] **मात्रागमन**–न. १ मातेशीं मैथुन. २ ( ल ) महापातकांपैकीं एक पातक. [ सं. मातृ+गमन ] **मात्रागमनी**–वि. १ मातृगमन केल्याचा दोष असलेला. २ ( ल. ) मादरचोद; लबाड ( मनुष्य ). [ सं. मातृ+गमनी ]

**मातें**—सना. (काव्य) मला; मजला. ' काय बोल गा माते । ' –मोकर्ण ११.६८. [ मी ]

**मातेर**—न ( कों. ) पू. ( जखमेंतील ).

**माते( त्ये )रा–रें, मातेराकोतेरा**—पुन. १ आंत माती, कचरा मिसळलेला पदार्थ ( धान्य, साखर इ० ). २ धान्य इ० कांतून वेंचून काढलेला कचरा. ३ ( ल. ) पूर्ण नाश. (क्रि० करणें). ' तेवीं पार्थ सैन्याचा केला मातेरा । '–जै ८८.३५ ४ खराबी; दुर्दशा; धूळधाण ( वस्तु, काम, अन्न इ०कांची). ( क्रि० करणें ). ह्या अर्थाकरितां माती, धूळ, पीठ चुराडा, राख इ० शब्द पहा. ५ अप्रतिष्ठा. ' तुका म्हणे चोरा होय भूषण मातेरा । '–तुगा ६२४. –वि. माती, कचरा आंत मिसळलेला ( दाणा, पीठ, साखर इ० ). [ माती ]

**मातोळी**—स्त्री. ( कु. ) शेणवी ब्राह्मणांतील कांहीं घराण्यांत दर वर्षी शूद्र स्त्रीला नारळ, तेल,फुलें देऊन भोजन घालण्याचा एक कुळाचार. [ माता ]

**मात्मसाद**—पु. महात्मा; साधु. ' त्रिदंडी संन्यासी जटिल गोसावी बैरागी मातमसाद असे पाखंडी आहेत. '–पेशवेकालीन महाराष्ट्र ४३२.

**मात्र**—न. १ दृश्य तात्विक द्रव्याचें प्राथमिक सुक्ष्म, अदृश्य चिन्ह. २ समुदाय; सगळी जात–वर्ग; साकल्य; वस्तुजात. ' मनुष्यमात्र पापी आहे. ' –क्रिवि. १ केवळ; फक्त; नुसता; च; बरीक. उदा० काडी–क्षण–वितस्ति–मात्र. ' भात मात्र खा, भाजीपाला, तुला वर्ज्य. ' २ यत्किंचित्; थोडेसें. ' या दवतींत मात्रसें पाणी घालून आण. ' [ सं. ]

**मात्र**—स्त्री. अक्षरांतील मात्रा मात्रा अर्थ १ पहा.

**मात्रा**—स्त्री. १ एकार, ओकार दाखविण्यासाठीं अक्षराच्या डोक्यावर दिलेली तिर्कस रेघ. जसें:–क वर एक मात्रा दिल्यानें के, का वर दिल्यानें को होतो. कै व कौ हीं द्विमात्रक अक्षरें आहेत. २प्रणवाचे तीन अवयव, भाग प्रत्येकी; अकार, उकार, मकार इ० ३ ऱ्हस्व स्वर अथवा कोणताहि वर्ण उच्चारण्यास लागणारा काल; वर्ण. ' मात्रांचिया त्रिपुटिया । ' –अमृ १.५८. ४ ( छंदःशास्त्र ) परिमाण; गणाक्षर; गायनांतील किंवा दुसरें कोणतेंहि स्वराचें कालमान. ५ इयत्ता; एक लहान परिमाण. ' मृदंगाचे आवाजापेक्षां विण्याचा सुर एक मात्रा अधिक आहे. ' ६ रसायण ( गोळीच्या, चूर्णाच्या रूपानें असलेलें ). ७ ( ल. ) रोगघ्न औषधी पदार्थ; औषध, औषधांचें मिश्रण प्रमाण (खनिज पदार्थाचें किंवा वनस्पतीचें केलेलें ). ' जेणें विठ्ठल मात्रा घ्यावी । तेणें पथ्य संभाळावी । ' ८ कालमर्यादा; चुटकी वाजविण्यास किंवा पापणीची उघडझांप होण्यास लागणारा काळ; सशक्त, निरोगी मनुष्याच्या नाडीच्या दोन ठोक्यांमधील काळ. ९ संपत्ति; जिनगी; द्रव्य; ऐवज; पैसा; माल. ' मात्रा आणावी मजपासीं । नाहीं तरिं मुकाल प्राणासीं । ' १० ( महानु. ) सामानसुमान; कपडालत्ता; वस्त्रपात्र. ' घ्या गा मात्रा प्रयानु कीजताये । ' ११ भोजनसामग्री; फराळाचें साहित्य; भिक्षेची झोळी. ' तें धन तेणें मात्रेमध्यें घातलें असे । ' –पंच १.२७. १२ ( महानु. ) आहार. ' मात्रेवर न राहे । ' १३ ( अध्यात्म ) वासनांचा विषय, इंद्रियविषय, वृत्तिविषय. १४ हिंमत; धैर्य. ' त्यांच्यापुढें जास्त बोलण्याची कुणाची मात्रा नव्हती. ' –इंप २४. [ सं. ] ( वाप्र. ) ०**चालू न देणें**–विरुद्ध पक्षाचे बेत हाणून पाडणें. ०**न चालणें**–इलाज न चालणें; सामर्थ्याची प्रौढी कुचकामाची ठरणें ( वैद्यानें रोग्याला दिलेली मात्रा लागू पडली नाहीं म्हणजे मात्रा चालली नाहीं असें म्हणतात यावरून ). ०**लागू पडणें**–इलाज यशस्वी होणें ०**वर असणें**–वर्चस्व असणें. सामाशब्द– ०**त्रय**–न. अकार, उकार, मकार ह्या प्रणवाच्या तीन मात्रा. ' अकार उकार मकार । मात्रात्रय हें । ' –विपू ४.७८. [ सं. ] ०**पद्धति**–स्त्री. ( गणित ) दशांशमापन पद्धति; ( इं. ) मेट्रिक सिस्टीम.

**मांत्रिक**—वि.१ मंत्रज्ञ; जादूगार. २मंत्रापासुन उत्पन्न होणारा; मंत्रानें उत्पन्न केलेला; मंत्रासंबधीं. उदा० मांत्रिक–आंबा–भात–

झाड-रुपया-घोडा-वस्तू इ० [सं.] ०आत्मा-पु. मंत्रशक्तीनें दुसरें शरीर, प्रेत इ० कांत प्रवेश करावयास लाविलेला आत्मा, जीव. (क्रि० घालणें). ०खेळ-पु. १ मंत्राचा खेळ. २ मंत्रशक्तीनें आंबा, झाड, रुपया इ०. वस्तू उत्पन्न करणें.

**मात्रे**—न. मातेरें पहा.

**मात्सर्य**—न. हेवा; दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणें. [सं.]

**मात्सो**—क्रिवि. थोडासा.

**माथं**—क्रिवि. (चि.) माझ्यासह.

**माथण-णी**—स्त्री. रुंद तोंडाचा मातीचा डेरा, घागर, रांजण (ताक घुसळण्याचा अथवा पाणी ठेवण्याचा). [सं. मंथ्=घुसळणें] **माथवीय**-न. डेऱ्यांतील पाणी. **माथुला, माथुली, माथुलें**-पुस्त्रीन. पाणी इ० भरावयाचें, डोक्यावर घेतां येण्याजोगें मडकें, डेरा. 'वेऊनियां मिठी। पडे मढिया माथुलें।' –तुगा ३५०१.

**माथण करणें**—क्रि. (कु.) एकाबाजूस असलेलें शीड गुंडाळून दुसऱ्या बाजूस ताणणें; माचण पहा

**माथ(थु)ला(ळा)वा**-पु. १ पळीचें टवळें, तोंड. २ घुसळावयाच्या रवीचा फुगीर भाग.

**माथवट-वटी**—नस्त्री. माथोट पहा.

**माथवणें**—न. चांभारांत लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं वधूकडील वऱ्हाडयांच्या डोक्याला खोबरें लावून त्याना घालण्यांत येणारें स्नान. [माथा]

**माथा-थें**—पुन. १ डोक्याचा अग्रभाग; टाळू २ कपाळ. 'अजायुद्ध होतें तेव्हां माथ्यासीं माथा आपटतो.' ३ डोकें, ४ घुसळावयाच्या रवीचा माथला; एखाद्या तसल्या वस्तूचें डोकें. ५ शिखर; टेंबा; शेंडा (पर्वत, झाड इ० चा). ६ लाक्षणिक अर्थोकरितां डोई पहा. **माथां**-क्रिवि (काव्य) डोक्यावर. 'धर्मप्रसाद माथां आंगीं भगवत्प्रसाद दृढ वर्म।' –मोकर्ण ११.९. [सं. मस्तक; प्रा. माथअ; पं. मथ्था; सिं. मथो; हिं. बं. माथा; गु. माथुं] म्ह० १ उरीं केंस माथा टक्कल. २ पोटांत जळे माथ्यांत कळे. (वाप्र.) ०तुकविणें-आनंदानें मस्तक डोलविणें. 'तियांचें भाऊ वाणिता। कवींसी माथा तुकविणें।' –शिशु ६००. **माथां मारणें**-एखाद्यावर सोंपविणें; विश्वासणें; हवालणें; लावणें; अंगावर टाकणें (काम, धंदा). **माथां वाहणें**-फुलें इ० डोक्यावर समर्पण करणें. 'वाटे इयुंनीं माथां धीर गुरु म्हणोनि वाहिला काय?।' –मोभीष्म ११.१२१. **(उजळता) माथा होणें**-आलेला अपवाद इ० दूर होणें. **माथीं बसणें**-एखाद्यावर लादलें जाणें. **माथ्यांत राख घालणें**-वैतागणें. **माथ्यार पदर गांड उक्ती**-(गो.) वरचा देखावा उत्तम राखणें पण आंत कांहींच अर्थ नसणें. **माथ्यावर चढविणें**-लडिवाळपणें वाटेल तसें वागू देणें; डोक्यावर घेणें. **माथ्यावरचा पदर टाकणें-उतरणें-पडणें**-वेश्या बनणें (बहुतेक सभ्य स्त्री डोकीवरून पदर घेते यावरून). **माथ्या वैयलयान हुवार वचप**-(गो.) डोकीवरून पाणी जाणें; गंगेंत घोडे न्हाणें; एखाद्या कामाची मेहनतीची शिकस्त होणें याअर्थी. सामाशब्द- **माथफळी**-स्त्री. गोसावी, बैरागी लोक कुबडीवजा टेकण्यासाठीं घेतात त्या साधनाची वरील आडवी फळी. **माथाकूट**-स्त्रीन. १ (मूर्खास शिकविणें, हटवादाशीं वाद करणें इ०) कंटाळा आणणारा, त्रासदायक व बिनफायदेशीर धंदा, काम. २ एखाद्या गोष्टी बद्दल चीड व शीण आणणारा हट्ट धरून बसणें; एकसारखी बडबड; त्रागयाची मागणी (वाक्यांत काम, धंदा, उद्योग इ० शब्दाबरोबर योजतात). ०फोड-स्त्री माथेफोड. ०रोग-पु. गुरांचा एकरोग. –शे ६.४८. ०शूळ-पु. १ भयंकर डोकेदुखी. २ एक सरळ वाढणारी वनस्पति. **माथाटी**-स्त्री. माथोटी पहा. **माथें**-न. शिर; मस्तक. 'संकटांत तीच म्हणोनी उंच करी माथें।' –विक ६. [सं. मस्तक] (वाप्र.) ०करणें-(कु.) (विधवांनीं) केशवपन करणें. ०पिकवणें-डोकें उठवणें; त्रास देणें. ०फिरणें-वेडा होणें; अतिशय रागावणें. 'माझें माथें फिरलें.' ०बोडविणें-हजामत करविणें.' सामाशब्द- **माथेकळी**-स्त्री. आंगरख्याची एक कळी, भाग. ०फळी-स्त्री. उंसाच्या चरकांतील नवरानवरीचे माथे जींत बसविलेले असतात ती आडवी फळी. ०फिरू-पु. संतापी; अविचारानें भलतेंच कृत्य करणारा; भ्रमिष्ट. ०फोड-स्त्री. माथाकूट पहा. –वि. कठिण व त्रासदायक; चीड व शीण आणणारें (काम). ०सूळ-पु. डोकेंदुखी. **माथो**-पु. (चि.) मस्तक; कपाळ; (सामा.) वरचा भाग. **माथोट, माथोटी**-नस्त्री. १ बैलाच्या शिंगाच्या मुळाशीं बांधलेली दोरी. २ अशी दोरी जेथें बांधतात तो बैलाच्या डोक्याचा भाग. ही दोरी बैलाला पकडण्याच्या उपयोगी पडते व हिला कासरा लावतात. ३ शिंगाभोंवतालचें गोंडे इ०ज्यास बांधलेले असतात तें बंधन. ४ डोंगराचा माथा. [माथा+अट] **माथ्या-थ्यो**-पु. १ रवी इ०चा माथा, बोंड. २ (चि.) रवी. **माथ्याचा**-वि. (गुज.) हेकेखोर; हट्टी.

**माथान**—क्रिवि. (कों. कुण.) माझ्याजवळ.

**माद**—पु मत्तपणा (गर्व, आनंद इ०कांचा). [सं. मद]. **मादक**-वि (शब्दशः व ल.) मत्त करणारा; कैफी; अमली (मद्य, औषध, संपत्ति, विद्या, शक्ति). ०पेय-न. मदिरा. ०रस-पु. कैफ आणणारा द्रव. **मादगा-गी**-वि. लवकर गर्वानें ताठणारा; सहज उद्धट व तोरेबाज होणारा; मातगा.

**मांद**—स्त्री. (कों.) १ मळणीच्या वेळीं खळयांत होणारी धान्याची रास. २ पाणी ठेवण्याचें रुंद तोंडाचें भांडें; मांदण पहा.

**मांदगी**—स्त्री. (बडोदें) आजार. [सं. मंद]

**मांदगी**—स्त्री. शीण; थकवा; सुस्ती; आजार. ( क्रि० येणें; होणें ). [ मंद ]

**मांदण**—नस्त्री. १ पाणी, उंसाचा रस, विस्तव इ० ठेवण्याचें रुंद तोंडाचें, सामान्यतः मातीचें भांडें. २ विस्तव ठेवण्याचें पात्र; शेगडी.

**मांदणें**— सक्रि. फांसणें; लेपणें; चोपडणें; माजण करणें. [ सं. मर्दन ]

**मादनें**—न. ( महानु. ) मर्दनयुक्त स्नान, आंघोळ. 'तै गोसावी मादनें वर्जिलें।' -भाए १३९.

**मादर**—स्त्री. आई. [ फा. मादर ] **मादरचोद-चोंद**-वि. एक बीभत्स शिवी; मात्रागमनी, नीच या अर्थी.

**मादरपाट**—पु. मांजरपाट पहा. माद्रीपोलम येथें तयार होणाऱ्या कापडाची एक जात. [ ता. मद्रपलम ]

**मादरवान, मादवान**—स्त्री. मोठी व उमदी घोडी. [ फा. मादवान ]

**मांदरी**—स्त्री. शिंदीची किंवा मोळाची चटई.

**मादव**—स्त्री. गाय, म्हैस इ०नीं कांस आंत ओढून घेणें व विण्याचें चिन्ह दाखविण्याचें थांबणें. ( क्रि० करणें ). [ मद=माज ]

**मा( मां )दवी**—स्त्री. वस्त्र; मदवी पहा.

**मांदस**—स्त्री. ( गो. ) सापळा. [ मांदूस=पेटी ]

**मां( मा )दळ-ळा**—पु. १ मोठा मृदंग. 'करूनिया टिरी आपुला मांदळ। वाजविती टाळ दगडाचे।' २ गाडीच्या चाकाचा तुंबा. [ सं. मंडल ] **मां( मा )दळी, मांदाळ**-स्त्री. १ डफ; डफाचें कडें. २ मंडळी; समुदाय. [ मंडल ] **मांदळमामा**-पु. दैवज्ञ जातींत लग्न, मुंज इ० कार्यांत करावयाचा एक समारंभ. लग्न, मुंज होण्यापूर्वी एका ढोलावर भाचा किंवा भाची यांना बसवून तें ढोल मामा वाजवितो. मामाच्या, भाच्याच्या किंवा भाचीच्या मस्तकावर एक उपरणें घालतात व त्याचाच शेवटीं मामाला अहेर करितात. सुवासिनी हातांत गाडगीं घेऊन वाजवीत मामाभाच्यांच्या भोंवतीं गाणें गात चार फेऱ्या घालतात. -बदलापूर २३२.

**मांदळवारें**—न. पराकाष्ठेचा शीण; शक्तिक्षीणता. ( क्रि० येणें; भरणें; लागणें ). [ मंद ]

**मांदा**—वि. सुस्त; जड; श्रान्त; आजारी. [सं. मंद; फा. मांदा]

**मादागी**—क्रिवि. ( राजा. ) ( प्र. ) मंदागीं पहा.

**मांदाडा**—पु. ( महानु. ) समूह. 'मळयानीळु मागाडा। दाखवी चुततरूचा मांदाडा।' -भाए ४२६. [ मंडल ]

**मांदाण**—नस्त्री. ( प्र. ) मांदण पहा.

**मांदाण्या**—पु. ( गुऱ्हाळघर ) एकवार चरकांतून काढलेली पेरीं ( चिपाड ) पुन्हां चरकास लावणारा. -कृषि ४७३. लेंड-कवळया पहा.

**मांदार**—पु. १ एक फुलझाड; रुइमांदार; रुई व यांत फुलाच्या व झाडाच्या रंगांत फरक आहे. हीं झाडें पांढरीं, भुरकट असून रानांत आपोआप उगवतात. फूल पांढरें. याचा कोळसा दारूच्या उपयोगी आहे. चीक उकळून त्याचा रांधा ( गटापर्चा ) तयार होतो. २ ( रुई शब्द जोडलेला किंवा न जोडलेला ) वृक्षविशेष. [ सं. मंदार ] ०**रुई**-स्त्री. पांढरा मांदार.

**मांदि-याळी-ळें**—स्त्रीन. मंडळ; गर्दी; समुदाय; टोळी. 'तैशी शिष्यांची मांदियाळी।' -एभा ५.१५५. [ मंडल ]

**मांदिरें, मांदेरी**—नस्त्री. ताक घुसळण्याच्या रवीस खांबास जोडण्याची दोरी; घुसळण्याची दोरी; मांजरी पहा. 'मग वासुकीचें करोनि मांदिरें।' -कथा २.५.९. [ सं. मंथन+दोर, माथा+दोर ]

**मादी, मादा, मादिका**—स्त्री. १ स्त्रीजाति; नराच्या उलट. २ नर-मादी या जोडीपैकीं एक अवयव. नरमादी पहा. ३ दोन अवयवांच्या, पदार्थांच्या दोन अवयवांपैकीं लहान अवयव; किंवा एकमेकींत अडकविण्याच्या दोन वस्तूंपैकीं जींत दुसरी वस्तु अड-कवितात अशी वस्तु. ४ ( उंसाचा चरक ) तीन लाटांच्या चरकां-तील बाजूच्या दोन लाटा प्रत्येकी; दोन लाटांच्या चरकांतील डावी लाट. [ फा. माद ] **मादीचा आंख**-पु. उंसाच्या चरकाच्या बाजूच्या वृत्तचिती बसण्यासाठीं त्याच्या मधोमध पाडलेल्या भोकांत बसविलेले खिळे. **मादीचें चाक**-उ. बाजूच्या वृत्तचिती आणि वरची फळी यांचे दरम्यान नराच्या चाकांच्या दात्यांत अडकावून बसविलेलें चाक.

**मांदी**—स्त्री. ( काव्य ) १ वलय; चक्र. २ ( ल. ) समुदाय; मंडळी; मंदियाळें; थाटी ( भक्त, शिष्य, मित्र इ०कांची ). 'तवं ते धांवली सेवकांची मांदी।' -शनि ३५९. ' [ सं. मंडल ]

**मा( मां )दुरी**—पु. १ चाबुकस्वार. २ तबेला टेवणारा. 'कां मांदुरी लोकांचा घोडा। गजपतिही मानी थोडा।' -ज्ञा १६.२२५. [ प्रा. ]

**मांदू( दु )स-सी-सें**—स्त्रीन. १ तिजोरी; संदूक; मोठी पेटी. 'पूर्वी भार्गवदत्त जें बहुबरें भारी घरीं मांदुसें।' -आसी ५. २ ( काव्य ) सामान्यतः पेटी. 'ज्ञानरत्नाची मांदुस।' -विपू १.६४. ३ -पु. पिंजरा. ४ ( चांभारी ) मांदें व एरंडया ठेवण्याचा लाकडी ठोकळा. [ सं. मंजूषा ]

**मांदें**—न. एकत्रपणा. [ मांदी ]

**मांदे**—पुअव. ( गो. ) कारिंदा फळाच्या तळलेल्या चकत्या.

**मांदें**—न. सुमर इ० प्राण्याची चरबी. हिचा औषधाकडे उपयोग करतात ( सामा. ) बकरें इ०कांची चरबी. [ सं. मेद ]

**मांदोडा( डी )-ळा**—पु. १ मांडव. 'किरीटी कामधेनूचा पाडा। वरी कल्पतरूचा आहे मांदोडा।' -ज्ञा ८.८. २ अनेक

फांद्यांचा समुदाय; झुंबाड. ' तरी ऊर्ध्वाहीकडे । शाखांचे मांदोडे ।' –ज्ञा १५.६०. ३ फळांचा घड. ४ समुदाय. [ मंडप ]

**मांद्य**—न. १ मंदपणा; चेंगटपणा; गतीची, क्रियेची शिथिलता. २ मंदाई; जाड्य; अशक्तता; थंडपणा ( शरीरप्रकृति, बुद्धि, मनोवृत्ति इ०कांचा ); मतिमंदपणा; विराग; सुप्ति. ३ मांदगी; मांदेपणा; सुस्ती. ४ मंदपणा; अंधुकता; सौम्यता; मृदुता ( दृष्टि, उष्णता, प्रकाश, आवाज, शुल्क यांची ). ( समासांत ) अग्निमांद्य इ० [ सं. ]

**माद्री, मादरी**—स्त्री. ( तंजा. ) प्रकार; तऱ्हा. [ सं. मात्र; ता. मादिरी ]

**माधव**—पु. १ विष्णु. २ वैशाखमास. ' मधुमाधव वसंत युक्तू । कृष्ण म्हणे तो मी ऋतू ।' –एभा १६ २२०. ३ वसंतऋतु. ४ ( मधूचे वंशज, संबंधी ) कृष्ण; सात्यकी. [ सं. ] ०लठ-पु. एक फुलझाड व त्याचें फूल. **माधवी**-स्त्री. वसंतकाळ. ' ना तरी उद्याना माधवी घडे ।' –ज्ञा १.४३. [ सं माधव ] **माधवी**-पु. नाटकांतील विदूषक; दशावताराच्या खेळांतील सोंगासारखें हास्यरसोत्पादक सोंग. २ –स्त्री. पांढरी व सुवासिक फुलें येणारा एक वेल; मधुमालती.

**माधवगिरी**—पु. ( कों. ) ( अप. ) मधुकरी.

**माधवी**—स्त्री. मधापासून गाळलेलें मद्य. गौडी, माधवी, पैष्टी हीं तीन प्रकारचीं मद्यें आहेत. [ सं. मधु=मध ]

**मांधा**—पु. समुदाय. ' त्वरें चालती धांवती लोक–मांधा ।' –मुरामायण अयोध्या ४४. [ मांदी ]

**माधु( धो )करी**—स्त्री. १ ब्राह्मणास भिक्षार्थ दिलेलें अन्न. २ –पु. मधुकर वृत्तीनें ( भुंगा जसा फुलांतून थोडा थोडा मध आणतो त्याप्रमाणें ) दारोदार भिक्षा मागून आणलेल्या अन्नावर उपजीविका करणारा; शिजल्या अन्नाची भिक्षा मागणारा. [ सं. मधुकर ]

**माधुर्य**—न. १ मधुरपणा; अत्यंत गोडी. २ मंजुलता; सौगंध्य; मनोरमता इ० ' श्राव्यत्वें तरी माधुर्य । पायीं घाली ।' –ज्ञा १६ ११८. ३ मृदुता; सौम्यता; सात्विकपणा ( स्वभावाचा, चालीरीतीचा ). [ सं. मधुर ] **माधुरी**–स्त्री. १ वाचा; वाणी. ' तैसी बोली साचारी । अवतरो माझी माधुरी ।' –ज्ञा १४.३१. २ मधुर ध्वनि; गोड आवाज. ' कटी क्षुद्र घंटिका शब्द करिताती माधुरी वो ।' –तुगा २९१.

**माध्यं( दि )जन**—पु. यजुर्वेदाच्या वाजसनेयी शाखेचा ब्राह्मण. मध्यंदिन पहा. [ सं. मध्यंदिन ] **शहु**० ( व. ) माध्यंजनाची बोडखी, ऋग्वेदाची पालखी.

**माध्यम**—न. द्वार; साधन; ( इं. ) मीडिअम्. ' परीक्षेचें माध्यम मातृभाषा हीच कबूल केली आहे. ' –केले १.५७. [ सं. मध्यम ] **माध्यमिक**–पु. आत्मा अणु नाहीं, महान् नाहीं, मध्यम परिमाणाचा आहे असें मत; या मताचे अनुयायी लोक. [ सं. मध्यम ]

**माध्यस्थ**—न. ( प्र. ) माध्यस्थ्य, मध्यस्थाचें काम. –वि. ( वाद इ०कांत ) मध्यस्थपणा करणारा. [ सं. ] **माध्यस्थ्य-स्थी-स्थगिरी**–नस्त्री. दोन पक्षांतील व्यवस्था, तडजोड; मध्यस्थी. [ सं. ]

**माध्यान - न्न - न्ह, माध्यान्हाचें**—मध्यान्ह इ० पहा. **माध्यान्ह**–स्त्री. दुपार; भर दोन प्रहर. ' माध्यान्हीं आला आदित्य ।' –एरुस्व ७.६४. [ सं. ] ०**मारणें**–( ना. ) पुख्खा झोडणें. **माध्यान्हीं येणें**–निश्चयास येणें. **माध्यान्हकाल**–पु. दुपार. ०**वृत्त**–न. खस्वस्तिक व ध्रुव यांमधून जाणारें याम्योत्तरवृत्त. [ सं. ] **माध्यान्हिक**–न. मध्यान्हसमयीं करावयाचें कृत्य, भोजन इ०

**माध्व**—पु. वैष्णव ब्राह्मणांतील एका पंथाची स्थापना करणाऱ्या मध्वाचार्याचा अनुयायी. [ सं. मध्व ]

**माध्वी**—स्त्री. १ मोहाच्या फुलाचें मद्य. २ (सामा.) मद्य.

**मान्, मती, मत्**—पुल्लीन. ( विशिष्ट विद्या, कला, भूषण, वस्तु, चिन्ह इ०ज्या जवळ आहे अशा अर्थीनामाला लागून त्याचें विशेषण बनविणारा संस्कृत प्रत्यय. वान्, हा हि असाच प्रत्यय आहे ). जसें–बुद्धिमा( वा )न, शक्तिमा( वा )न् इ० या प्रत्ययाचीं तिन्ही लिंगांचीं रूपें जरीं वर दिलीं आहेत तरी यांना विभक्ती प्रत्यय लागून तयार झालेलीं रूपें क्वचितच आढळतात. [ सं. मत् ]

**मान-ण**—स्त्री. १ चिकण माती. २ ( व. ) तांबूस रंगाची टणक जमीन. ३ ( बे. ) कोंकण व देश यांच्या सरहद्दीतील काळे कांटे. **मानट**–न. ( कों. ) नापीक जमीन; पीक चांगलें होत नसून गवत फार येतें अशी जमीन. **मानटी**–वि. ( कों. ) भिकार; भुक्कित ( जमीन, तिजवरील पीक ).

**मान**—स्त्री. १ ग्रीवा; गळ्याचा मागचा भाग. २ गळ्यास होणारा रोग. ३ ( अशुद्ध ) गळा. ' घास मानेंत अडकला. ' ४(नृत्य) नृत्यांतील मानेच्या चलनवलनाचे प्रकार (सम, नत, अंचित, कुंचित, रेचित, पार्श्वोन्मुख, निवृत्त, त्र्यस्र व उन्नत हे ते नऊ प्रकार होत). [ सं. मन्या; फ्रेंजि. मेन ] ( वाप्र. ) ०**अडकणें**–पेंचात, संकटांत सापडणें. ०**कंबर एक करप**–( गो. ) मान खालीं वांकवून कामास लागणें. ०**कांट्यावर नसणें**–( एखाद्यानें ) अति गर्विष्ठ, उद्दाम किंवा मगरूर असणें. ०**कापणें**–१ एखाद्याच्या उपजीविकेच्या साधनाचा नाश करणें; मुंडी मुरगाळणें. २ विश्वासघात करणें; फसविणें. ३ मोठी हानि करणें. ०**खालीं घालणें**–१ डोकें खालीं घालणें; नांगी पडणें. २(ल.)अपमान सहन करण्याचा प्रसंग येणें. ०**चोळणें**–( व. ) कांकूं करणें. ०**टाकणें-थकणें**; शक्तिहीन, निर्बल होणें. ०**टोकाविणें**–मानेनें खुणा करणें. ०**डोलवणें-हालविणें**–१ रुकार, पसंती, प्रशंसा करण्यासाठीं मान

हालविणें; पसंती दर्शविणें; वाहवा, कौतुक करणें. २ कबूल करण्यास भाग पाडणें. **०ताठ ठेवणें**-स्वाभिमान राखणें. **०तुकविणें**-वाहवा, कौतुक करणें. 'काय जिणें जर न घडे करणी तुकवी जियेस जग मान।' -विक ६५ **०धरणें**-सक्रि १ (ल.) ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं एखाद्यास अडविणें. २ -अक्रि. मानेस कांहीं विकृति झाल्यामुळें ती आखडणें, इकडे तिकडे वळवितां न येणें. **०(मुंडी) मुरगाळणें**-१ (एखाद्याचा) आशाभंग करणें; नाश करणें. २ पूर्णपणें लुटणें. **०मोडणें**-१ (राखून ठेवलेला पैसा इ०) नाइलाजास्तव किंवा नाखुषीनें खर्च करणें. 'पाचशें रुपयांची मान मोडली तेव्हां लग्न झालें.' २ थोडक्या खर्चासाठीं मोठ्या नाण्याला हात लावणें. 'चार पैशांकरितां रुपयाची मान मोडावी लागली.' **०वर करणें**-१ गरिबींतून वैभवास चढणें; दिमाख दाखविणें. २ दुखण्यांतून उठणें; डोकें वर करणें. **०वर न करणें**-लज्जेनें किंवा नम्रपणानें वागणें. **०वांकडी करणें**-१ संमति अथवा रुकार दाखविण्यासाठीं डोकें एके बाजूस वळविणें. २ असंमति दर्शविणें. **०वाकविणें**-कबूल करणें; मान्यता दाखविणें; अनुसरणें. 'ह्या परिस्थितीसच मान वांकविली पाहिजे.' **०सोडविणें**-एखाद्यास अडचणींतून, पेंचांतून मुक्त करणें. **(खालच्या) मानेनें चालणें-पाहणें**-१ नम्रतेनें, विनयानें, सलज्जतेनें चालणें. २ खालीं मान घालून, लाजेनें चालणें. **मानेवर सुरी ठेवणें**-एखाद्याला धमकी देणें, भिवविणें; नाश करावयास सिद्ध होणें. **मानेस-मानगुटीस बसणें**-१ गळीं लागणें; खपाटीस बसणें. २ (भूत, पिशाच्च वगैरेनीं) झपाटणें; पछाडणें. ३ गळ्यांत लादणें; डोईवर ओझें पडणें; अवश्य कर्तव्य असणें (करावयाचें काम) सामाशब्द- **०खुंट-खोडा**-नपु. ओढाळ जनावराची मान व पुढचा एक पाय यांस एके ठिकाणीं बांधलेली दोरी. [मान+खुंट] **०खुरी**-स्त्री. (नेमाड) गुरांचा एक रोग; तोंडखुरी पहा. -शे ११.३२. **०गु(गो)टी**-स्त्री. (तिरस्कारार्थी) मान; बोकांडी; अपकार, निग्रह इ० दाखविणाऱ्या क्रियापदाशींच फक्त जोडून योजतात. 'वाघानें मानगुटी फोडली-धरली-सोडली.' 'हा त्याचे मानगोटीस बसला.' **०पुळी**-स्त्री. (कों.) कांकर रोग. **०मोड**-स्त्री. १ मान दुखावणें. २ लिहिणें, शिवणें इ०कां करितां एकसारखी मान वांकवून करावयाचे परिश्रम, यातायात, दगदग. ३ अपमान; मानहानि; मानभंग. ४ उभी उतरण. [मान+मोडणें] **०मोडा**-पु. (गो.) माशाची एक लहान जात. **०मोडी**-स्त्री. १ अतिशय उभ्या चढणीची जागा. २ (नेमाड) गुरांचा एक रोग. -शे ११.३. ३ (व.) इन्फ्ल्युएन्झा रोग. १९१८ सालीं ही सांथ आली होती, त्यास मानमोडीचें साल म्हणतात. ४ -वि. अतिशय उभ्या चढाचा (रस्ता, डोंगर) **०मोडें**-न. (नुकताच संसार करूं लागणारा तरुण, गरिबींतून बाहेर निघालेला, दुखण्यांतून उठलेला मनुष्य, झपाट्यानें पक्व दशेस येणारी वनस्पति इ० कांची) नाशक, विघातक, विध्वंसक अशी स्थिति, अवस्था. 'या वांग्या कांहीं टवटवीत दिसूं लागल्या होत्या इतक्यांत काय मानमोडें आलें तें कळेना.' -शास्त्रीको. [मान+मोडणें] **०वळा-ळी**-पुस्त्री. मानेवरील आंखूड केसांची रेषा (प्रायः अनेकवचनी प्रयोग). [मान+ओळ] **मानेचा कळस किंवा कांटा**-पु डोकें. (क्रि० ढळणें; पडणें; खालीं येणें) मानेचा कळस म्हणजे पाठीच्या कण्याचें वरचें अग्र, मणका अशी प्रायः समजूत आहे. **मानेचा कांटा ढळणें**-अक्रि. मृत्यु, मूर्च्छा इ० समयीं मानेचें अवसान नाहींसें होऊन डोकें एका बाजूस वळणें, पडणें. **मानेचा खाखोटा**-पु गळ्याची घांटी; कंठमणि. **मानेची पन्हळी**-स्त्री. डोक्याच्या पाठीमागच्या बाजूस मानेवर असलेली पोकळी, खळगी.

**मान**--पु. १ आदर; मुरवत; पूज्यबुद्धि; सत्कार; गणना. 'एथ आलेआं तुमचा मानु किती। वाढीनिला।' -शिशु १८१. २ तोरा; दिमाख; स्वतःचा किंवा स्वतःसंबंधीं माणसें, वस्तु, देह इ०कांचा अभिमान; अहंता. 'जया पुरुषांचें कां मन। सांडोनि गेलें मोह मान।' -ज्ञा १५.२८५. ३ (औषधाचा) गुण; आराम. 'वैद्याच्या औषधानें मान वाटतो कां कांहीं?' ४ अधिकार; हक्क; इलाखा; सत्ता. 'लग्नामध्यें उपाध्यायाचा वस्त्र घेण्याचा मान आहे.' ५ कामगिरी; प्रतिष्ठा; अधिकार. 'नाहीं-होय म्हणण्याचा मान सासुबाईकडे आहे.' ६ परिमिति; परिमाण; इयत्ता; माप (पदार्थाची लांबीरुंदी, महत्त्व, संख्या याचें अथवा काल, देश, गुण याचें). 'मज अमेया मान।' -ज्ञा ९.१५९. ७ ज्याच्या योगानें एखादें परिमाण निश्चित करितात तें; वजन, लांबी, अवकाश, वेळ इ०कांचें कोणतेंहि माप. 'मास म्हणून कालाचें एक मान आहे.' ८ आधार; प्रमाण; गमक. ९ प्रमाण; तुल्यता; 'अव्हेरिलें वचणे मानें।' -ज्ञा १.९२. १० रीत; रिवाज; चाल. 'नाना क्षीरापति मान पद्धति।' -सप्र २०.३७. ११ -न. परिस्थिति 'पण तेंच आंटनीनें आपल्या करुणरसभरित भाषणास प्रारंभ करतांच सगळें मान एकदम फिरून गेलें. -नि. १२ वयोमर्यादा; जगण्याची सीमा. 'हल्लीं ५० किंवा ६० हेंच आयुष्याचें मान झालें.' -टि ४.१४०. १३ (महानु.) वृत्तांत. 'ऐसें मान आइकौनि।' -धवळेपू २३. १४ नेम; टीप; निश्चय (काल, स्थल, कर्ता, सुमार यासंबंधीं). 'पर्जन्य केव्हां कोठें किती काय कसा पडेल ह्याचें मान कोण्हाचें हातीं लागत नाहीं.' १५ युक्तता; वाजवीपणा; औचित्य; जरूरी. 'राजा दुष्ट झाला. आतां एथें राहण्याचें मान राहिलें नाहीं.' १६ मोठेपणाची, महत्त्वाची पदवी; उंची; सुमार; मजल; पायरी. 'त्या गृहस्थाचें अलीकडे मान चढलें आहे.' १७ दर; योग्यता; उच्चता; किंमत 'गाड्याचें, भाड्याचें, धान्याचें, गुळाचें मान चढलें-वाढलें-उतरलें-बसलें-फिरलें-

उलटलें-बदललें. ' [ सं. मा=मापणें ] म्ह० १ मानो हि महतां धनं। २ मानें न खाई पानें पडपडल्या खाई कांदे=कादे खाण्यांत आनंद पावण्याइतक्या नीच स्थितीस आलेल्या गर्विष्ठ माणसासंबंधीं योज तात. ३ मान जना, अपमान मना ( सांगावा ); मान सांगावा जना; अपमान सांगावा मना. ( वाप्र. ) **मानावर जाणें**-क्रि. ( खा. ) इष्ट देवतेचा नवस फेडणें. साधितशब्द- **मानाचा**-वि. मानाचा हक्क असणारा. जसें-मानाचा धनी-पाटील-देशमुख-देशपांड्या इ०. मानकरी पहा. **मानाचा तुकडा**-पु. क्षुद्र देणगी, पदवी. ' ते देतील तेवढाच भाकरीचा किंवा मानाचा तुकडा घेऊन...'-टि २.५४. **मानाचें पान**-न द्रव्यदृष्ट्या अल्प मोलाची परंतु जिच्या योगानें मान दिला जातो अशी कोणतीहि देणगी, सत्ता अथवा मालमत्तेची बाब. म्ह० मानाचें पान गोड. सामाशब्द- **०करी**-पु. १ ( अधिकार, नातें, गुण इ०कामुळें ) दरबार, सभा, लग्न, उत्सव, ग्रामसभा इ० ठिकाणीं विशिष्ट मान व नजराणा घेण्याचा हक्क असलेला मनुष्य; आदरणीय, माननीय मनुष्य. २ राजा-राणीचे आप्तेष्ट; यांस कांहीं नेमणूक असते. ( गो. ) मानकर. **०कीन-धनी**-पु. ( व घाटी. ) मानाचा मनुष्य. **०खंडना**-स्त्री. अनादर; अपमान; अवमान करणें. [ सं. मान+खंडना ] **०णूक**-स्त्री. १ नवस; देव, ईश्वर, पिशाच यांच्या पुढें घेतलेली शपथ. २ मानपान. [ मानणें ] **०धन**-न. मानरूपी धन. -वि. मान ( दिमाख, ताठा ) हेंच ज्याचें धन आहे असा; मानी. [ मान+धन ] **०नीय**-वि. पूज्य; मान्य; विश्वासार्ह; मान देण्यास, विश्वास ठेवण्यास, मान्य करण्यास योग्य. ( व. ) मानधारी. **०पट्टी**-स्त्री. प्रमाण मोजण्याची पट्टी; स्केलपट्टी. **०पत्र**-न. मान्यता करणारा लेख. [ सं. ] **०पान**-पु १ मानकऱ्याचे हक्क; लग्न, मुंज इ० प्रसंगीं मानकऱ्यास दिलेले मान व नजराणे; आदर-सत्कार. २ गांवच्या पिढीजाद अधिकाऱ्याचे हक्क. ३ एखाद्या कामाचे संबंधीं अधिकार व हक्क. [ मान+पान; मान द्वि. ] **०बरळे**-वि. (महानु.) गर्वानें ( वाटेल तें ) बरळणारे. ' तंव रतिरसिकां भणि तलें। आंवो आंवो मानबरळें।'-शिशु २१८. **०भंग**-पु. १ अनादरानें, अपमानानें वागविणें. २ अपमान; परिभव; मानहानि. [ सं. मान+भंग ] **०मरातब**-पु. आदरसत्कार. **०मर्यादा**-स्त्री. आदर; मान्यता; भीड; मुरवत. ( क्रि० ठेवणें; राखणें ). **०मान्यता**-स्त्री. १ ( पदवी, विद्या इ० असलेल्या मनुष्याचा ) वाजवी मानसन्मान, आदर उपचार करणें. ' त्या दरबारांत त्याची मानमान्यता मोठी आहे. ' २ सन्मान्यपणा; मान, वंदन करण्याची पात्रता. [ मान+मान्यता ] **०म्हातारी**-स्त्री. प्रौढ स्त्री; वागणुकीचें व गांभीर्याचें अनुकरण करणारी लहान मुलगी; लहानगी आजीबाई. [ महान्+म्हातारी ] **०वती**-स्त्री. १ स्त्री. २ ( नाट्य ) आपल्या प्रियकरावर रुसलेली कामिनी; मानिनी. -वि. मानवत म्हणून एक पेठ आहे. तेथें तयार झालेलें ( पागोटें इ० ). [ सं. ] **०वस्त्र**-न. सन्मानार्थ दिलेलें वस्त्र. ' वोपिलें पताका मानवस्त्रें ।'-दावि ४७४. **०वाईक**-वि. ( व. ) मान देण्यास योग्य; मानकरी. **०हानि**-स्त्री. अपमान, मानभंग. [ सं. मान+हानि ] **मानार्ह**-वि. मान देण्यास योग्य. [ सं. ] **मानणें**-सक्रि. १ आज्ञा पाळणें; पूज्य समजणें. २ विश्वास ठेवणें; भरंवसा धरणें; मान्य करणें; कबूल करणें; खरें, बरोबर आहे असें धरणें. ' तूं जरी हें ऐसें मानसी। तरी खेदु कां करिसी।'-ज्ञा २.१६२. ३ गृहीत धरणें; लेखणें; भावणें; गणणें. ' विष्णु व शिव निराळा असें मानीत नाहींत.' ४ किंमत बाळगणें; मोजणें; विचारणें; महत्त्वाचें गणणें. ' ज्याचा एकदां पराजय झाला त्यास कोण्ही मानीत नाहीं. ' ५ मानवणें; सुखावह होणें; आरोग्यकारक पथ्यकारक असणें ( हवा, पाणी, अन्न इ० ). ' येथील पाणी मला मानतें. ' ६ मर्जीस येणें; आवडणें; रुचणें. ' माझे मनास जें मानील तें करीन. ' ७ वाटणें; आवडणें. ' हा मन मानेल तेंच करील. ' ८ नवस करणें. [ सं. मन्=विचार करणें; प्रा. मण्ण; पं. मन्नणा; सिं. मनणु; गु. मानवुं; हिं. मानना ] म्ह० मानला तर देव नाहींतर धोंडा= मूर्तीपूजक लोक दगडाच्या इ० मूर्तींना देवाप्रमाणें भजतात. तदितर लोक मूर्तींना कांहींच मान देत नाहींत. यावरून मान हा दुसऱ्यांनीं करावा तेव्हांच होतो. नाहीं तर तो होत नाहीं. **मानवणें**-अक्रि. १ कबूली, परवानगी, रुकार ह्याकरिता मान हालविणें; पटणें; कबूल होणें. २ संतुष्ट होणें. ' म्हणौनि मानवले सारंगपाणी '-धवळेपू ४९. ३ अनुभवास येणें. ' ऐसें एकत्वें मानवे। '-ज्ञा ९.२४७. ४ मान देणें. ५ सोसणें ( हवा, पाणी ). **मानवली**-स्त्री. ( व. ) देवीच्या नवसाची सुवासिनी. **मानविणें**-सक्रि. मन वळविणें ( रुकार देण्यास, मान्य करण्यास, आवडण्यास ). ' लग्न करण्याविषयीं त्याचें मन मानवा. ' या अर्थी ह्या क्रियापदाचा बहुधा मन शब्दाशीं प्रयोग होतो. -अक्रि. रुचणें; आवडणें; मान्य होणें. ' आजची कथा आम्हास मानविली. ' [ मानणें ] **मानवणी, मानवीण**-स्त्री. १ ( लग्न, श्राद्ध इ०प्रसंगीं ) मृत सुवासिनी स्त्रीची प्रतिनिधीभूत मानलेली सुवासिनी. ' मानवणीच्या सुवासिनी किती आहेत ? '-ऐरापु ४४१. २ ( व. ) मृत सवतीच्या नावानें देव्हाऱ्यांत बसविलेली प्रतिमा, टाक. ३ एक क्षुद्र देवता. ' बाळा बगुळा मानविणी। '-दा ४.५.१६. [ मानणें=गृहीत धरणें ] **मानाविणें**-सक्रि. ( काव्य ) मान देणें; आदर करणें; सन्मान राखणें. ' मान्यवया जगा व्हावी द्रव्यमाया । नाहीं तें माझिया जिवा चाड । ' **मानि(नी)जणें**-१ पर्वा करणें. ' दुर्वार वाडवशिखेस न मानिजेलें। '-र ३९. २ मानिलें जाणें. ' मानीजेसी थोर थोरी नाहीं। ' तुगा १०८. **मानित**-वि. मान दिलेला; आदरिलेला; आज्ञा

पाळलेला; सन्मान केलेला. [ सं. ] **मानिनी**–स्त्री. ( नाट्य ) १ आपल्या प्रियकरावर रागावलेली, मानी स्त्री. मानवती पहा. 'ते साचचि धर्मोची मानिनी ।'–एभा १.२०९. २ स्त्री. [ सं. ] **मानिया**–पु. मानी पुरुष. 'कां मानिया निस्तेजा । निकृष्टास्तव ।' –ज्ञा १६.१७५. [ मान ] **मानी**–वि. १ गर्विष्ठ; ताठेबाज; चढेल. २ दुराग्रही; हट्टी. 'जो मानी म्हणतो यमपुरपथहित सामपथ नका माते ।'–मोभीष्म ७.४१. ३ तेजस्वी; उदार; थोर मनाचा. [ सं. ] **मानीव**–वि. मानलेला. **मानेच्छु, मानेपाशी**–वि. मान, आदर इ० इच्छिणारा; योग्य मानाविषयीं आग्रह धरणारा; मानासाठीं हपापलेला. [ सं. ] **मान्य**–वि. १ आदरार्ह; पूज्य; मानमान्यतेला, योग्यतेला योग्य. 'विद्या भोगसुकीर्तिदायक पहा ते मान्य मान्यासही ।' २ प्रशस्त; अभिमत; अनुमत; पसंत. 'शास्त्रीबुवांची ही स्पष्टोक्ति माधवरावांना मान्य झाली.' ३ तयार; कबूल; राजी. [ सं. ] **मान्य करणें**–कबूल करणें; न्याय्य, बरोबर, खरें मानणें. **( प्रश्न, सूचना ) मान्य होणें**–प्रश्न, सूचना त्यांस संस्थेच्या नियमांत अवश्य असलेलें बहुमत मिळणें. –सभा ७३. **मान्यपूजन**–न. मानास पात्र असलेल्यांचा सन्मान करणें. **मान्यता**–स्त्री. १ आज्ञा पाळणें. २ विश्वास ठेवणें. ३ मान; आदर; मुरवत. 'ज्यासि अग्रपूजेची मान्यता ।' –एभा १०.६१३. ४ भारदस्तपणा; पत; योग्यता ( मान, आदर, समाचार यांविषयींची ). ५ कबुली; अनुमति; संमति. [ सं. ]

**मान( इ )ई, मानया**—पु. मनुष्य; तरुण मुलगा; पुरुष. [ सं. मानव ]

**मानकुल**—न. ( महानु. ) माणिक. 'परि उद्दातया रंगाचे हीर । ते मानकुलांचि आति ।' –भाए ६४५.

**मानगी**—स्त्री. ( ना. ) शीण; थकवा. मांदगी पहा.

**मानगें**—न. ( गो. ) मगर.

**मानचुंग**—न एक रेशमाची जात. –मुंव्या ९७.

**मानत-ता**—स्त्री. देवादिकांस केलेला नवस; नवसाचा बळी. ( कु. ) मानतूक. 'पाटलानें पुत्राकरितां नबाबांस मानत केली होती, त्यास पुत्र झाला.'–रा ७.१३९. [ अर. मआनत ]

**मानभाव-वीण**—पुस्त्री. १ हिंदूंतील एक पंथ व त्यांपैकीं व्यक्ति. हा पंथ चक्रधरस्वामी यानें स्थापिला. हे भिक्षेवर निर्वाह करितात, काळीं किंवा भगवीं वस्त्रें नेसतात व श्रीकृष्णाची भक्ति करितात, महानुभाव पहा. 'मानभाव बाई । आम्हा भिक्षा वाढा कांहीं ।'–भज ४१. २ ( ल. ) मनांत कपट ठेवून बाहेरून गोड बोलणारा; लुच्चा. 'परंतु अशा निर्मल अंतःकरणाच्या पुरुषासहि चकविणारे मानभाव ह्या पृथ्वींत आहेत. –टि १.३८७. [ सं. महानुभाव ] **म्ह०** करणें कसाबाचें बोलणें मानभावाचें. **मानभावाची ऊ**–स्त्री. ( ऊ पकडली असतां मानभाव तिला मारीतहि नाहीं अथवा जाऊंहि देत नाहीं यावरून ) दुःखदायक, अवघड स्थितींत सांपडलेला मनुष्य. **मानभावाची बायको**–स्त्री. १ भिक्षा मागून स्वतःचा निर्वाह करणारी ( व ह्यामुळें आपल्या नवऱ्यास खर्चांत न आणणारी ) स्त्री. २ ( ल. ) बिनखर्ची उपयोगी पडणारा व नफा करून देणारा मनुष्य, पशु, पदार्थ इ० **मानभावी**–वि. मानभावांच्या पंथासंबंधीं. ( भाषण, आचार इ० ). **मानभावी कावा-मत**–पुन. मानभावी लोकांच्या सारखा कावेबाजपणा; कपटाचे डावपेंच.

**मानव**—पु. १ मनुष्य; मनुष्यजाति. याच्या जातींची ( योनींची ) संख्या चार लक्ष मानिली आहे. तीस लक्ष योनी पशुचिया घरीं । मानवाभितरीं चार लक्ष ।' 'लक्ष चत्वारी मानवी । योनी सप्तद्वीपा भुवी । १ ।'–हंको. २ मनुष्य. –न. क्षुद्र, पामर मनुष्य. 'मनीं मानव वेर्थ चिंता वाहातें ।'–राम १७. [ सं. ] **०लोक**–पु. मनुष्यलोक; पृथ्वी. [ सं. ] **०शास्त्र**–न. मनुष्याची उत्पत्ति व विकास यांचें भौतिकदृष्ट्या विवरण करणारें शास्त्र. [ सं. ] **मानवी**–स्त्री. १ मानुषी, स्त्री. –वि. मनुष्यानें केलेलें.

**मानवळण**—न. ( महानु. ) १ वेढा. 'उठवी मानवळणें । इंद्रियांचीं ।'–भाए १६१. २ किल्ल्यावरील पहारेकरी.

**मानवेल**—स्त्री. अतिशय चिवट अशा बांबूची एक जात. ही तिरकमठ्याच्या उपयोगी पडते.

**मानस**—स्त्री. ( कु. ) १ घूस पकडण्याचा लांकडी सापळा. २ ( गो. ) खाजणाच्या तोंडाचें लाकडी दार. यांतून भरतीचें नदीचें पाणी शेतांत घेतात. [ मांदूस ]

**मानस**—नपु. १ मन; चित्त; बुद्धीचें स्थान; बुद्धिशक्ति. २ अन्तःकरण; मनोविकाराचें स्थान. 'मानस माझें मोहिलें या देवें ।' ३ इच्छा; प्रवृत्ति. ४ हेतु; उद्देश. ५ ( कायदा ) ध्वनित, गर्भित मान्यता. ६ हिमालय पर्वतांतील मानससरोवर. 'न क्षोभे जेविं मानसीं हंस ।'–मोसभा १.९६. –वि. मनासंबंधीं; मनाचा. [ सं. ] **०पुत्र**–पु. १ शरीरापासून नसून केवळ इच्छामात्रेंकरून निर्माण केलेला पुत्र. २ ( ल. ) पुत्राप्रमाणें अत्यंत प्रिय मनुष्य. [ सं. ] **०पूजा**–स्त्री. १ गंधपुष्पादिक पदार्थ मनाचेच कल्पून भावनामय केलेली पूजा; मानसिक पूजा. 'मानसपूजा अगत्य व्हावी ।'–दा ४.५.३१ [ सं. ] **०शास्त्र**–न. मनाचें स्वरूप, त्याच्या प्रक्रिया इ० संबंधीं शास्त्र. [ सं. ] **०सरोवर**–न. हिमालयांतील एक प्रख्यात सरोवर. **०सृष्टि**–स्त्री. मनाची सृष्टि; काल्पनिक चित्रें; मनानें बनविलेल्या आणि मनांत असणाऱ्या आकृती व रूपें. [ सं. ] **मानसिक**–न. १ पराकाष्ठेचें अल्पत्व; निवळ कल्पना. 'मरु देशांत पाण्याचें मानसिक.' २ एखाद्या गोष्टीविषयीं होणारा संदेह. 'त्याचें येण्याचें असल्या पावसांत मानसिकच दिसतें नांहीं' –शाको. –वि. १ मनाचा; बुद्धीचा; मनांत असणारा;

मनसंबंधी. 'स्वप्न हा मानसिक प्रपंच होय.' २ काल्पनिक; अयुक्तिक. ३ संशयित; अनिश्चित; निवळ कल्पनीय. [सं.] ०जुलूम-पु. मनाविरुद्ध गोष्ट करण्यास भाग पाडणें. 'शारीरिक जुलमापेक्षां मानसिक जुलूम अतिशय भयंकर असतो.' -टि ३.१३९.

**मानसिक**—न. देव, भुतें यांना केलेला नवस. (क्रि० करणें)

**माना, मायना**—पु. १ आशय; अर्थ; अभिप्राय; धोरण. २ पत्रांतील आरंभीं लिहिण्याचे औपचारिक संप्रदाय; जसें--वेदशास्त्रसंपन्न, श्रीमंत राजश्री, राजश्रिया विराजित इ०. ३ पत्रादिकांतील मजकूर, हकीगत. ४ योग्यता; औचित्य; वाजवीपणा; अर्थ; उपयोग. 'आतां महागाई झाली एथें राहण्याचा माना राहिला नाहीं.' ५ गोष्ट. 'चोरांनीं घाला घालून हार घेऊन गेले...हे काय माना ते मना आणून तलास करून देवणें.' -भाअ १८३४. ६ अर्थ; हकीगत. 'हे मायना आहे, तूंच चोर आहेस.' ७ संधि; वेळ. 'या प्रसंगीं गनीम कापून काढावयाचा माना आहे.' -वसईची मोहीम. [अर. माना]

**मानाय**—पु. १ (कु. कों.) (वयांत आलेला) चाकर; मजूर; गडी. २ अंगानें मोटा, धिप्पाड मनुष्य. [सं. मानव] **म्ह०** (गो.) मानायांनीं शेतां आनी बटकींनीं घरां जातात=मजुरावर विश्वास टेवून घरें जातात आणि बटकीच्या संगतींत घरें बुडतात.

**मानिणें**—अक्रि. धांवत येणें. -शर. [प्रा.]

**मानी**—स्त्री. (कों.) १ जात्याच्या वरच्या तळीच्या भोकांत बसविलेली लोखंडी वाटोळी चकती; मायणी. २ (कों.) जातें इ०कांच्या वरच्या पेढीस पाटी बसविण्यासाठीं पाडलेली खाचणी. [मान]

**मानीसेरा**—पु. (बे.) एक प्रकारचें गवत.

**मानुख-ष-स**—पु. (महानु.) मनुष्य. 'ते कळियुगीं होउनि मानुख । सुलभु जाला ।' -ॠ ४१. [सं. मनुष्य]

**मानुभ(भा)व**—पु. महानुभाव. -वि. मोठे सामर्थ्यवान्. 'मानुभव पुण्यरासी। तेथें पवाडती।' -दा २०.२.१२. 'साधुसंत मानुभाव।' -दा ६.६.४७. [सं. महानुभ(भा)व]

**मानुष**—पु. नर; मनुष्य. [सं] **मानुषी**-स्त्री. नारी; मनुष्य स्त्री. [सं. मनुष्य] **मानुष-षी**-वि. मनुष्याचा; मनुष्यासंबंधीं; मानवी. **मानुष्य**-न. मनुष्यपणा; मनुष्यत्व; मनुष्याची अवस्था, स्थिति, धर्म. **मानुसवाणें**-न. मनुष्यासारखा भास होणें. 'तैसें असणें का नसणें । हें कांहिंच माणुसवाणें।' -अमृ ४.३७. [सं. मनुष्य+वत्; मानुस+वाणे]

**मानू**—न. माप. 'सोडितां क्षेमालिंगनू । नारदां होतुसे अगबोळाचें मानू ।' -शिशु ६३. [मान]

**मानें**—क्रिवि. समान; बरोबर. [मान]

**मानें-मुजाही(ई)म**—वि. प्रतिबंध, अडथळा करणारा. 'कोणेविशीं मानें-मुजाईम न होणें' -वाडमा १.६५. [अर. मानिअ]

**मानो**—पु. (कु.) प्रमाण; खात्री. 'तो परत येयतच हेचो मानो काय?' [मान=प्रमाण]

**मान्तूफ**—स्त्री. (गो.) पिशाचादिकांना (कोंबडें, बकरें इ० कांचा) बळी देण्याचें कबूल करून त्यांना स्थिराविणें, शांत करणें.

**मान्ना**—पु. (ख्रि.) एस्रायल लोक ४० वर्षें वनवासांत असतां, देवानें त्यांच्याकरितां आकाशांतून अद्भुत रीतीनें पाडिलेलें अन्न (हा मान्ना, शब्बाथ दिवस खेरीज करून दररोज खालीं पडत असे. त्याचा आकार धन्यासारखा असुन रंग पांढरा, व चव तेल व मध घातलेल्या पोळीसारखी होती). 'एस्राएल लोकांनीं त्या अन्नाचें नांव मान्ना ठेविलें.' -निर्ग १६.३१ [हिब्रू मान हू=हें काय?]

**मान्नें**—न. (कु. गो.) न्हाणीघर.

**मान्या-पया**—पु (राजा कों.) लहान जातीचा वांबू; माणगा.

**माप**—न. १ प्रमाणानें मोजून निश्चित करण्याचें साधन; (वजन, सांटा, लांबी, वेळ इ०) मोजण्याची, गणण्याची क्रिया. (क्रि० करणें; चालवणें; घेणें; मांडणें; लावणें.) 'आज भाताचें माप चाललें आहे.' २ गणना; गणनेनें निश्चित करणें. 'आंब्याचें माप झालें म्हणजे खुरद्याचें माप घे.' ३ (सामा) मापण्यानें निश्चित केलेलें मान, परिमाण. 'दहा खंडी माप भरलें; (सामा.) मापण्याचें साधन (वजन, सांटा, लांबी इ०चें) उदा० वजनी माप, कैली माप, धान्य माप, कापडाचें माप. इ०, मापण्याचें कोणतेंहि साधन. ४ मापलेला, परिमित भाग. 'त्या खांचरांत चार मापें आहेत.' ५ (खा.) बारा डोळे किंवा चार पायली. डोळा अर्थ १० पहा. [सं. मा=मोजणें] ०**देणें-घेणें**-मापून देणें, घेणें. ०**कुतऱ्यानें नेणें**-एखादी गोष्ट गतगोष्टींपैकीं एक होणें; एखाद्या गोष्टीची गतगोष्टींत गणना होणें. (**पदरीं**) ०**घालणें**-एखादी गोष्ट अमान्य करणारास ती अनेक प्रमाणांनीं खरी करून पटवून देणें. ०**लागणें-मापीं लागणें**-कमी कमी होणें. 'मापीं लागलें शरीर।' -दा ३.९.१. **(आपल्या) मापानें मोजणें**-आपल्या स्वतःच्या (प्रमाण असलेल्या) मापानें मोजणें. **माप आणि महापाप**-खोटें माप घालणें महापाप होय. सामाशब्द- ०**पट्टी**-ऐनजिनसी सारा घेतांना धान्य मापण्याबाबत शेतकऱ्यावर बसविलेला कर. ०**वरताळा-वर्ताळा**-पु. १ धान्याच्या साऱ्याच्या खंडीमागें सरकारानें हक्कानें मागितलेला वरतावळा. २ (कों.) कुळाकडून धान्य घेतांना माप घेण्यासाठीं हक्क म्हणून ठरीव खंडापेक्षा एकचौसष्टांश किंवा एकअष्टमांश जास्त घेतलेला माल, रकम.

**मापटें**—न. साठ्याचें माप; अर्धा शेर, एक अष्टमांश पायली; निठवें. **म्ह०** (व.) आपलं तें मापटं दुसऱ्याचं तें दीड पायली. **मापणें**—सक्रि. (वजन, साठपा, लांबी, वेळ यांच्या) मापानें निश्चित करणें; मोजणें; तोल करणें; मेज घेणें. [सं. मा; झें. मा; ग्री. मेचिओ; लॅ० मेतिओर] **मापन**—न. मापणें; मोजणें; माप घेणें. **मापाड्या, मापारी, मापेली**—वि. १ (सरकारी कोठ्या, बाजार माल यांतील) सरकारी धान्य मापणारा. २ (सामा.) मापणारा. 'आयुष्य मोजायाला बैसला मापारी। तूं करि व्यापारी संसाराच्या।' **मापारकी**—स्त्री. मापाऱ्याचा धंदा. **मापागी**—स्त्री. धान्य इ० मोजण्याचें फरा नांवाचें एक माप. **मापी**—वि. १ साठ्याच्या मापानें निश्चित केलेला. २ मापानें मोजण्यासारखें; साठ्याचें; वजनीच्या उलट. माप दाखविणाऱ्या शब्दांच्या पूर्वी हा शब्द जोडून येतो. जसें मापी खंडी-मण-शेर. **मापीव, मापित**—वि. मापलेला. ह्याच्या उलट तोलीव, मोजीव.

**मा(मो)प**—न. (गों.) उन्हांत वाळविलेली मोठी वीट; कच्ची वीट. –शामची आई. [मापणें]

**माप, मोप**—वि. रगड; पुष्कळ; उमाप. 'आज पाऊस माप पडला आहे.' [अमाप]

**माप**—पु लक्ष्मीपति; विष्णु [सं. मा+पति]

**मापल**—वि. (व.) मी आपलें; माझें. 'मापल्या पाटल्या ओय(ळ)खल्या.' [मीं आपल(लें) अप.]

**मापूल, मापलें**—न. (व.) बोळकें. 'मुलीकरितां मापलें आणा.' [माप]

**माफ**—वि. क्षमा केलेला; क्षांत; सोडलेला (अपराध, अपराधी, कर्ज, एखादें येणें). (क्रि० करणें; होणें). [अर. मुआफ्]

**माफी**—स्त्री. १ क्षमा; सुट. २ (माळवी) दानरूपानें दिलेली जमीन अगर पैसा. [अर. मुआफी] **०चिठ्ठी**—स्त्री. जकात माफ असल्याबद्दलचा दाखला, चिठ्ठी पत्र. [हिं.] **०जमीन**—स्त्री. साऱ्याची सुट मिळालेली जमीन. हिचे दोन प्रकार आहेत– एक अजी माफ आणि दुसरा अपूर्ण माफ. [हिं.] **०साल**—न. लागवडीस आणण्याच्या जमिनीवरील शेतसाऱ्याची सुट मिळालेलें वर्ष. 'माफीसाल गुदरल्यानंतर धारा पडेल.' [अर. मआफ+फा. साल] **माफीचा साक्षीदार**—पु. (कायदा) गुन्हा माफ करून इतर आरोपीविरुद्ध साक्षीदार केलेला आरोपी इसम.

**माफक, मवाफीक**—वि. १ अनुकूल; यथायोग्य. 'ताकीत असें त्या मवाफीक चालविजे.' –रा १५.१६७. २ बेताचा; मध्यम. 'माफक-मरातब नजराणा देऊन विनंती केली कीं.' –दिमरा १.७५. ३ जितक्यास तितकें; नेमस्त. 'नजरा माफक-मामूल गुजराणल्या.' –दिमरा २.९६. ४ सदृश; प्रमाणें. 'यांस जन्रेली तमामी फौजेची माफक-हुकूम-विलायत मुकर जाली आहे.' –पदमव ११५. [अर. मुआफिक्] **माफकत**—स्त्री. १ पसंति. २ सोय. –वि. १ पसंत. 'यांची अधर्माची वर्तणूक आमचे राजास माफकत पडत नाहीं.' –दिमरा १.२३६. २ माफक; योग्य. 'याकरितां मशारनिल्हेस यावयास माफगत होत नसे.' –ऐटि २.६५. [अर. मुवाफकत्]

**माफ(ब)जत**—स्त्री. १ दक्षता; बंदोबस्त. (क्रि० करणें). तृतीया विभक्तींत अथवा सप्तमी विभक्तीत ठेवणें, राखणें या क्रियापदांस जोडून उपयोग करतात. उदा० माबजतीनें अथवा माबजतींत ठेवणें; राखणें. '(डबीचें घडथाळ) माफजतीनें पाठवावें.' –ख ९.४४५१. २ जपणूक. 'दक्षिणावर्त शंख आज्ञा झाल्यास माफजतीनें पाठवून देणें.' –ख ४.१८३२. ३ (जिन्नस, प्राणी इ०कांची आस्थेनें किंवा हयगयीनें होणारी) व्यवस्था; स्थिति; अवस्था. 'ह्या घोडयाची माबजत चांगली आहे; त्याची माबजत नासली.' ४ संरक्षण. 'पांचशें लोक किल्ल्याचे माफजतीस व दोन तोफा आणिक पाठविल्या.' –दिमरा २.९५. [अर. मुहाफजत्]

**माफलात**—स्त्री. १ कार्य; काम. २ बजावणी. 'आज्ञेप्रमाणें माफलात करून...' –दिमरा १.६७. [अर. मुफअलत्]

**माफा**—पु. ज्यांत बसून स्त्रिया प्रवास करितात तो मेणा. [अर. महाफ]

**मामळभट-भट्ट**—पु. (श्रीकृष्णाच्या बाळपणीं एक राक्षस महाबळभटाचें सोंग घेऊन, कृष्णास मारण्यासाठीं गोकुळांत आला होता त्यावरून). १ नेभळा, बिन चापचोपीचा मनुष्य (विशेषतः मुलगा); पोकळ धोतर नेसणारा, बावळट मनुष्य. २ कपटवेषी विप्र. 'तेव्हां मामळभट्ट गर्जुनि तया शास्त्रार्थ सांगे विधी।' –आमहाबळ २२. ३ (ल.) दुसऱ्याची मालमत्ता उडविण्यांत उदार असलेला मनुष्य. **म्ह०** लोकाच्या गायी मामळभट दान देई. **मामळभटी-ट्टी**—स्त्री. ढोंगीपणा; बाह्यतः साधुत्वाचा डौल व मनांतून कपटी वर्तन –वि. बावळटासारखें.

**माम-मू**—पु. (बालभाषा) आईचा स्तन. –न. भोजन.

**मामंजी**—पु. मामाजी; सासरा; नवऱ्याचा बाप. [मामा]

**मामर्दा-र्दं-र्दे-र्धे**—स्त्रीन. मांवदें. 'मोठ्या थाटाचं मामर्दं केलं.' –शुक्रवारची कहाणी २७. [सं. मा वद]

**मामरमुंडा-ढा**—पु. हिजड्याचा नोकर. मुंडा पहा.

**मामल(लीय)त, मामला**—स्त्रीपु. १ सरकारी काम; सरकारी चाकरी (विशेषतः तहशीलची व अधिकाराची). २ तालुक्याच्या वसुलाचें काम. ३ हातीं घेतलेलें काम; जोखीम; महत्त्वाचें कार्य, गोष्ट. 'सोन्धेकरांचीही मामलीयत चुकवून बिदनूरकरांकडे जावें.' –पया ६९. ४ महत्त्व; वजन; योग्यता; गणना; (बिशाद, किंमत, पाड, कथा, लेख इ० शब्दांप्रमाणें योजितात.) ५ जाबसाल. [अर. मुआमलत; मुआमला] **मामलतदार, मामलेदार**—पु.

तालुक्यावर अंमल चालवून जमाबंदीचा वसूल घेणारा अधिकारी. [फा. मआमिल्तदार] ०दारी-स्त्री. मामलतदाराचे अधिकार, काम, हक्क इ० **मामला**-पु. १ मामलत. २ (ल.) काम; कृत्य. 'मामला कठिण दिसतो.' ३ बाब; बाजू. 'तव ते व्यापार बुडाले। मामले आंगीं सेकले।'-स्वादि २.२. १८. म्ह० धकाधकीचा मामला.

**मामलूत**—स्त्री. १ मायाळूपणानें (अपराध) माफ करणें; शिक्षा करण्याचें सामर्थ्य असून बाबापुता इ०आर्जव करणें. (क्रि० करणें). २ पर्वा; मुलाजा. 'पुन्हां अपराध केलास तर मामलत करणार नाहीं.' [काकलूत द्वि.] **मामुलती**-स्त्री. १ काकळूत; विनंति. (क्रि० करणें; दाखविणें). २ दयेनें दुर्लक्ष करणें; हेळसांड करणें.

**मामा**—पु. १ आईचा भाऊ. २ (आदरानें) बायकोचा बाप; सासरा. 'आणिक फिरून 'संभाळ मामा' बाजीबोवाला बोलला।' -ऐपो ७०. ३ कोणीहि पुरुष मनुष्य; गांवमामा. ४ (निंदार्थी) निरक्षर व कामांत अनिपुण मनुष्य. ५ (थट्टेनें) रात्रीं उड्या मारणारा उंदीर (रात्रीं उंदीर शब्दाचा उच्चार करणें अशुभ समजतात). ६ (अश्लील) लहान मुलाची बुल्ली. [सं. मामक; प्रा. मामा] म्ह० कामापुरता मामा. ०बनविणें-खुळ लावणें. चेष्टा करणें; फसविणें. **मामाजी**-पु. (आदरानें) नवऱ्याचा बाप, सासरा यांस म्हणतात. 'देवव्रत मामाजी प्रभु यांचें राज्य भारतापसदा।' -मोउद्योग ११.५९. **मामी(मि), मामी(मि)स**-स्त्री. (कों.) १ मामाची बायको; मातुलानी. २ बायकोची आई; सासू (मामानें भाच्यास मुलगी देण्याची कोठें कोठें चाल आहे त्यावरून). 'सुन म्हणे मामीस ऐका। लोणी कृष्णें लाविलें मुखा।' -ह ६.१३०. **मामे**-वि. मातुलकुलांतील भाऊ, बहीण यांच्या नात्याचा उल्लेख करतांना मामा या शब्दाचें होणारें रूप; सामाशब्द- ०बहीण-स्त्री. मामाची मुलगी. ०भाऊ-पु. मामाचा मुलगा. ०सासरा-पु. नवऱ्याचा किंवा बायकोचा मामा. ०सासू-स्त्री. मामेसासऱ्याची बायको; नवऱ्याची किंवा बायकोची मामी.

**मामीर**—अ. (गो.) मग; नंतर.

**मामुजी**—पु. (व.) उंदीर.

**मामुरी**—पु. आबादी; संपन्नता. 'रयतमामुरीवर नदर देऊन...'-इमं ७५. [फा. मअमूरी] **मा(महा)मूर**-वि. संपन्न; समृद्ध; आबाद. 'मुलुक मामूर होत नाहीं.' -रा१६.४४. [अर. मअमूर]

**मामूल**—पु. १ वहिवाट; साधारण रीत, चाल, दस्तुर. 'नजरा माफक-मामुल गुजराणल्या.' -दिमरा २.९६. २ उमेदवार; उत्तेजित. 'मोकदमांस कौलु-बोल देऊन मामूल करून लावणी उगवणी करणें.'-रा १५.३१.-वि. रूढ; सामान्य; नेहमीचा; प्राचीन; जुना. 'तेथें मामूल वहिवाट कशी आहे याची योग्य चौकशी करून ...'-टि १.२३८. [अर. मअमूल्] ०चाल-वहिवाट-स्त्री. पूर्वीपासून चालत आलेली पद्धत; चाल; रूढी. **मामुली**-वि. रोजच्या व्यवहारांतील; सामान्य; किरकोळ; जुजबी.

**माय**—स्त्री. १ आई. 'तुम्हींहि बळि बांधिला म्हणुनि आमुची माय जी.'-केका ८८. २ (कों.) सासू. [सं. मातृका; लॅ. मॅटर; इं. मदर; प्रा. माउआ; सिं. पं. हिं. माऊ(उ); ते. मम्मा; उर्दू अम्मा, मा; का. अव्वा] म्ह० १ माय मरो पण मावशी उरो. २ (व.) माय तशी बेटी गहूं तशी रोटी. (वाप्र.) ०मावशी नाहीं-मावशी पहात नाहीं-विषयवासना तृप्त करण्यासाठी अगम्यगमन सुद्धा वर्ज्य न करणाऱ्या मनुष्यासंबंधीं म्हणतात. **माय विणें**-१ आई प्रसूत होणें; मातेनें विशिष्ट गुणांनीं युक्त अशा पुत्रास जन्म देणें. २ (ल.) (एखादें काम करण्याविषयीं) छाती, धाडस, हिंमत होणें. 'मला शिवी देण्याला कोणाची माय व्याली आहे तें पाहतों.' सामाशब्द- ०आंग-न. १ शरीराचा अतिशय कोमल, नाजूक भाग. २ गुदभ्रंशांतील बाहेर आलेलें आतडें; गुदभ्रंश. ३ बाहेर आलेला गर्भाशय आणि गर्भाशयभ्रंश. ४ योनि; स्त्रियांच्या किंवा मादीच्या जननेंद्रियाच्या आंतील जननविषयक अंग, इंद्रिय. 'तिला बाळंत होतांना फार त्रास झाला व मायआंग बाहेर आलें.' [माय+अंग] ०आजा-पु. आईचा बाप; मातामह. ०आजी-स्त्री. आईची आई; मातामही. ०गोसावीण-स्त्री. राजरा किंवा राजेश्वरी देवीच्या कुलधर्मांत सवाष्ण म्हणून सांगितलेली विधवा. या कुलधर्मांत एक घरचें मेहूण, एक बाहेरचें मेहूण, एक ब्राह्मण, एक सुवासिनी, एक ब्रह्मचारी आणि एक विधवा अशीं साडेसात माणसें (ब्रह्मचारी अर्धा माणूस) भोजनास बोलावतात. विधवेला मायगोसावीण म्हणतात व देवी मानून तिचें पूजन करितात. हा कुलाचार पुष्कळ ब्राह्मण कुटुंबांत आहे. **माय(ये)चा पूत**-पु १ खऱ्या आईचा पुत्र; पराक्रमी, प्रतापवान, महत्कृत्य करणारा मनुष्य. 'असे परिणाम उत्पन्न करणारा कायदा कोणत्या मायेचा पूत निर्माण करण्यास तयार आहे...'-टि ४.९२. २ निंदा, उपहास इ० कर्तव्य असतांहि याचा उपयोग करितात. [माय=आई+पूत=पुत्र] **मायचि मी, मायचि मी चूत**-उद्गा. (कों.) (अश्लील) अपशब्द; एक शिवी. 'तुझ्या मायचि मी चूत साल्या.' ०झवो-उद्गा. (हेट.) एक शिवी; आईशीं वाईट कर्म करणारा या अर्थी. ०थळ-न. आईचें म्हणजे जन्माचें स्थळ; जन्मभूमि. असंतुष्ट पक्षानें आपल्या गांवांत किंवा भोंवरगांवीं झालेल्या निकालावर पूर्वग्रहदूषित नसलेल्या निःक्षपाती अशा परस्थळीं फिरून चौकशी व्हावी अशी विनंति करतांना योजलेला शब्द. उदा० 'हें मी मायथळ मानितों. दुसरें थळ मला द्या.' ०देश-पु. जन्मभूमि. ०पोट-न. अतिशय शांततेची व सुरक्षिततेची जागा; आसरा; थारा;

लपण्याची जागा; शरणस्थान. -वि. १ आश्रय देणारा; रक्षक; पालक (देव, राजा, धनी, लोक, राज्य, देश, गांव, ठिकाणा इ०). 'जें अचिंतां अनाथांचें मायपोट।' -ज्ञा ८.१९५. २ गरीब; निरुपद्रवी (गाय, घोडा, हत्ती इ०). ०बहीण-स्त्री. आदरानें कोणत्याहि स्त्रीविषयीं योजावयाचा शब्द; आईसारखी किंवा बहिणीसारखी मानिलेली स्त्री. 'मायबहिणी विठाबाई। लागला छंद तुझे पायीं।' [माय+बहीण] ०बहिण देणें-(व.) आई-बहिणीवरून शिव्या देणें. ०बाप-पुअव. आई व बाप; आईबापें. म्ह० (व.) माय बाप हेल्या लेकरं पाहिले कोल्ह्या=आईबाप सशक्त व मुलें किडकिडीत. ०भाषा-बोली-स्त्री. स्वतःची भाषा.

माव(उ)ली-स्त्री. १ आईस लडिवाळपणें संबोधण्याचा शब्द. २ (सामा.) आई किंवा आदरणीय, आवडतें वडील स्त्रीमाणूस. ०मावशी-स्त्री. १ मातेसमान किंवा प्रौढ स्त्री. २ मातृस्थानीय किंवा अनुल्लंघ्यवचन असलेली नातेवाईक स्त्री. (क्रि० ओळखणें; जाणणें; मानणें; पाहणें इ०) गोमांस व शिवस्व. हे शब्द पहा. [माय+मावशी] ०माहेर-न. १ आईचें घर; माहेर. २ आश्रय; थारा. ३ आश्रयदान; (क्रि० करणें). ०मूर्ति-वि. दिसण्यांत संभावित परंतु महा लुच्चा मनुष्य. ०(माये)राणी-स्त्री. १ स्त्रिया व खालच्या जातींतील लोक यांनीं पूज्य मानलेली पिशाच देवता; एक क्षुद्र देवता. 'जाखमाता मायराणी। बाळाबगुळा मानविणी।' -दा ४.५.१६. २ जलदेवता. 'जळींच्या मेसको मायेराणी।' -दा ३.२.२७. ३ (व.) एक देवी. हिची पूजा दिवाळींत होते. 'आमच्या घरीं मायराणीचा कुळाचार आहे.' ४ (निंदेनें) करंजी नावाचें पक्वान्न. म्ह० अडक्याची मायराणी सापिक्याचा शेंदूर. मायराणीचे दिवे-पुअव. आंत तेल घालून व वात लावून मायराणीस समर्पण केलेले कणकेचे लहान लहान दिवे. बायकांचा हा आषाढांतील एक कुळाचार आहे, या दिव्यासारखे कणकेचे दिवे करून बायका खातात म्हणून-मायराणीचे दिवे खाल्ले फिरफिरून घरास येते-असें एखाद्या धीट, लचाळ व त्रासदायक स्त्रीसंबंधीं रागानें म्हणतात. ०वणी-स्त्री. १ कुलीन स्त्री. २ गर्भार स्त्री. 'मायवणीं घाल्या धाय। गर्भे आंवतणें न पाहे।' -तुगा २३४८. [प्रा.] ०वतन-न. महारांस आई किंवा पालक यांच्या ठिकाणीं असलेल्या गांवच्या सर्व दुसऱ्या जाती; या जातीपैकीं एक व्यक्ति. ०वाण-न (व.) नवऱ्या मुलाच्या आईला द्यावयाचं वाण. 'मायवाणासाठीं लुगडें द्यायला हवें.'

**मायणी-नी**—स्त्री. मुसळ, ठोकणें, जात्याचें पाळें, जात्याचा आंतील खुंटा इ० कांना बसविलेलें लोखंडी कडें.

**मायतें**—न. (कर.) दोन प्रहरचें जेवण. 'मायतें झाल्याबरोबरच मी इकडे आलों.'

**मायतो**—पु. (गो.) अर्धा दिवस.

शको. ६. १०

**मायदळ**—पु. मृदंग. मांदळ पहा. [प्रा.]

**मायंदळ-ळा, मायं(दा)धाल**—वि. पुष्कळ; भरपूर; ढीग; मोप; मस्त. 'समागमें ते स्वार पायदळ, अती मायंदळ,' -देप (कटिबंध पृ. १७४). [(अशिष्ट) महान्+दळ]

**मायना**—पु. १ भावार्थ, अभिप्राय; आशय. २ पत्रांतील आरंभीं लिहिण्याचे औपचारिक संप्रदाय. माना अर्थ २ पहा. ३ दर्जा. 'आपण महाराज छत्रपती यांचे सेनापती. आणि श्रीमन्त हे पन्त प्रधान; उभयतांचा बरोबरीचा मायना.' -हब ४९. [अर. मअना]

**मायना, माना**—पु. (कों.) फायदा; नफा.

**मायपत्री**—स्त्री. खोटी, नकली जायपत्री.

**मायफळ**—न. एक औषधी फळ; माजूफळ. हें सुपारीपेक्षां बारीक असतें. यास कोणी तुरटें असेंहि म्हणतात. हें विशेषतः लहान मुलांच्या आजारावर फार उपयोगी पडतें. [सं. मायाफल; हिं. माजूफल]

**माय(ये)वणी**—स्त्री. कुलीन स्त्री. 'कीं मायेवणी पापियें।' -माज्ञा १६.१४४. (पाठ). [सं. महावर्णिनी]

**माया**—स्त्री. १ सृष्टि निर्माण करण्यास साधनीभूत अशी ईश्वरशक्ति. 'इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयते'=इंद्र आपल्या मायेनें अनेक रूपें धारण करतो' -ऋग्वे ६.४७.१८. -गीर २२१. २ सृष्टिप्रपंच; नामरूपात्मक जगत्; जग हें अमूर्त, नित्य, अद्वितीय अशा ब्रह्मतत्त्वापासून उत्पन्न झालें असतां तें द्रव्यमय व भिन्नस्थिति आहे अशी त्याच्या स्वरूपाची ऐंद्रजालिकता. पुराणांत मायेवर चेतनधर्मारोप करून तिला स्त्री व ब्रह्म्याची सहधर्मचारिणी आणि चुकीनें सृष्टीची रचना व विस्तार मानिलें आहे. ३ कपट; कृत्रिम गारुड; ऐंद्रजाल; मोह घालणारी ईश्वराची शक्ति. 'हे आदिपुरुषाची माया।' -ज्ञा १.२०३. ४ अवस्तूच्या ठायीं वस्तुत्वबुद्धि; मिथ्या कल्पना; अवस्तूच्या ठिकाणीं वस्तुत्वाचा भास; खोटा भ्रम. 'पैल जळ हे माया।' -ज्ञा १३.१०३०. 'तैसी हे जाण माया।' -ज्ञा २.१४०. ५ नाशवंत रूप. 'म्हणून विकारी किंवा नाशवंत नामरूपासच माया ही संज्ञा देऊन...' -गीर २१७. ६ अविद्या; अज्ञान. 'तैसा विश्वस्वप्नेंसी माया। नीद सांडूनि धनंजया।' -ज्ञा १८.४०५. ७ स्नेह; प्रेम; ममता. 'तेंवि करिल काय माय मायेतें?' -मोअनुशासन ४.३५. ८ दया; करुणा; अनुकंपा. ९ भांग. [सं.] म्ह० माया वेडी गु फेडी=काम कितीहि किळसवाणें, नीच असो, तें करण्यास माया प्रवृत्त करते. (वाप्र.) ०निवारणें-मायेचें पटल घालविणें, दूर करणें. 'कृपादृष्टीनें पाहसी जया। तयाची माया निवारिसी।' ०सांखळणें-अति प्रेम करणें; अपुर्वाई करणें. मायेक गेल, सेवेक

**चुकलें**-(गो.) माया करायला दुसरीकडे गेलें पण त्यामुळें कर्तव्य चुकल्यें. **मायेचें तोंड खालीं-निराळें**-माया, ममता ही वरपांगी, दिखाऊ नसून, ती प्रकट होण्यापेक्षां अप्रकट रहाण्यांतच विशेष आहे; ममता नम्र असते. **मायेंत अटकणें-घोंटाळणें**-पडणें-फसणें; **मायेनें गुंतणें-गोवणें-गुंडाळणें**-प्रपंचाच्या फेऱ्यांत सापडणें; प्रवृत्तिमार्ग चालविणें. **मायेन मगाळणें**-(कु.) द्रव, पाझर फुटणें. सामाशब्द-०**चक्र**-न. मायेप्रमाणें मानलेलें पांचभौतिक जग. 'जय जय मायाचक्रचालका।' [सं. माया+चक्र] ०**जाल(ळ), मायापाश**-नपु. १ जग हें पांचभौतिक असुन ब्रह्माहून भिन्न आहे असा विश्वास उत्पन्न करणारें, बुद्धि व इंद्रियें यांवर टाकलेलें मायेचें जाळें. २ मोह. [सं.] ०**तीत**-वि. मायाशक्तीच्या पलीकडे गेलेला (सत्पुरुष, ईश्वर). [सं. माया+अतीत] ०**पटल-पडळ**-न. मायेचें घुंगट, आच्छादन; जग हें वस्तुतः ब्रह्मच असतांना त्यास भिन्न सत्ता आहे असें भासविणारा मायेनें जगास दिलेला आकार व छटा. [सं. माया+पटल] ०**पुर**-न. (ल.) शरीर. ०**ब्रह्म**-न मायावेष्टित ब्रह्म. [सं. माया+ब्रह्म] ०**भान**-न. मायेचा भ्रम, झापड. 'निरोपिलें ब्रह्मज्ञान। जेणें तुटे मायाभान।' -दा ७.१.६१. [सं.] ०**ममता**-स्त्री. दया; माया; स्नेह; प्रीति. ०**मय**-वि. मायारूप; मायेनें कल्पित. 'मायामय जग सारें। अवघें दोन दिवसांचें वारें।' [सं.] ०**मयविकार**-पुअव. प्रापंचिक बदल; रूपांतरें; घडामोड व स्थित्यंतरें होणारा प्रपंच. 'नव्हते मायामय विकार। तेथें झाला स्फुरणगजर।' ०**रूपी**-वि. १ मायिक; फसवणारें रूप, मुद्रा, आकार असलेला. २ कृत्रिम; बाहेरून सुरेख पण आंतून नीच, वाईट; आंत एक बाहेर एक अशा स्वभावाचा (मनुष्य, सचेतन पदार्थ). [सं.] ०**लाघव**-न. जगत् हें ब्रह्मविस्तार नव्हे तर द्रव्यात्मक सृष्टि आहे अशी मनुष्याची वंचना करण्यांत दिसुन येणारें मायेचें कौशल्य; अवस्तूच्या ठिकाणीं वस्तुत्वबुद्धि उत्पन्न करणारें मायेचें कौशल्य. [सं.] **मायालुळू**-वि. १ ममताळू; प्रेमळ. २ (ल.) जादुगार. [सं.] ०**वंत**-वि. मायामय. ०**वाद**-पु. सर्व बाह्य जग असत्, मायारूप असुन या जगाच्या बुडाशीं असणारें ब्रह्मतत्त्व तेवढेंच सत् आहे असें प्रतिपादणारें मत. मायावादाचा पुरस्कार मुख्यत्वें अद्वैतमतवाद्यांनीं केलेला आहे [सं.] ०**वान्-वंत**-वि. मायिक (जगत, सर्व दृश्य विषय.) [सं.] **मायावी**-वि. १ मांत्रिक; गारुडी. २ मायेचा नियंता (जगांत दिसणाऱ्या त्याच्या अद्‌भुत कौशलावरून ईश्वरास म्हणतात). ३ खोटा; वरपंगी; कपटी; लबाड (भाषण, वर्तन, मनुष्य). 'हे अविद्या तरी मायावी।'-अमृ ६.४३. [सं. माया+विन्(प्रत्यय)] ०**वेष**-पु. मायिक देह. 'कीं लेउनि मायावेषींचें लेणें।'-ऋ ५. **मायाळी**-स्त्री. प्रेमळ स्त्री. 'तंव कोणी मायाळी रुदंतीसी।'-दावि ११५. **मायि(यी)क**-वि. १ ऐंद्रजालिक; मायेनें रचिलेला. २ जगत् हें वस्तुतः अमूर्त आणि ब्रह्मस्वरूप असतां तें पांचभौतिक व सृष्ट आहे असें भासवून वंचना करणारा (जग, जडसृष्टि). ३ खोटा; लटका; असत्य; पोकळ. जसें- मायिक कारभार-धंदा-सुख-दुःख-संपत्ति-दरिद्र-बोलणें-रडणें-करणें. 'आणिक नलगे मायिक पदार्थ।'-तुगा १०७०. ४ माया करणारा. 'यापरी महीतें मायिक। कोणी नसे मजलागी।'-नव २४ १६६. [सं. माया+इक (प्रत्यय)] **मायिकवृत्ति**-स्त्री. वंचितवृत्ति, स्थिति; जडाच्या ठिकाणीं भासणारें सत्यत्व, सृष्टिभिन्नता, ब्रह्म व माया यांच्या ऐक्यत्वाविषयीं भ्रम. 'मायिकवृत्तींचा झणी धरिसी संग। इंद्रियाचा पांग सांडी रया।' [स.] **मायेक**-वि मायावी, खोटें. -शर. [मायिक] **मायेचा अवतार, मायाऽवतार**-पु. परमेश्वराचा मायिक अवतार (ईश्वराचे सर्व अवतार. कारण आत्मज्ञान नसलेल्या व मूढ अशा माणसास मात्र हे अवतार खरे भासतात). **मायेचा गोंधळ**-पु प्रपंच; संसार. **मायेचा पदर**-पु. प्रेमाचें बंधन बाळगणारा मनुष्य (पुत्र, भाऊ, बांधव, आई, बाप इ०). **मायेचा पदार्थ-मनुष्य-माणूस**-पु. स्नेह, प्रीति असलेला मनुष्य.

**माया**—स्त्री. १ पुंजी; ऐवज; मालमत्ता; पैसा; डबोलें. 'त्याच्या जवळ बरीच माया आहे.' २ वस्त्र इ० शिवतांना दोरा निसटूं नये म्हणुन शिवणीच्या बाहेर सोडलेला वस्त्रादिकांचा भाग; कोरी सोडलेली जागा, समास (माचा विणतांना त्याच्या गाताचा, एका रेषेंत खिळे ठोकतांना लाकडाच्या फळीचा सोडलेला भाग इ०). 'हा बरू केवळ कांड्याबरोबर कापूं नको, थोडी माया राख.'

**मायोर**—न. (खि.) माहेर घर.

**मार**—पु. मदन. 'मानी अहंकृति शिवे असि मार-माते।' -वामन, रुक्मिणीविलास २. [सं. मृ=मरणें]

**मार**—पु. १ ठोक; चोप; ताडण. (क्रि० देणें). 'देते झाले वीर सुभद्राकृष्णाकुमार मारा ज्या।'-मोभीष्म ७.३८. २ बंदूक, तोफ इ० कांच्या गोळ्यांचा प्रक्षेप, हल्ला; भडिमार. 'त्याच्या गुलालाचा मार। आमच्या वेण्या झाल्या लाल।'-मसाप २.३०. ३ (ल.) हल्ला; गर्दी; कहर. 'ते तसें बोलतात, हे असें बोलतात. एकूण मला दोहोंकडुन मार.' ४ प्राण हरण करणें. 'तरी मारें उणें काळकूट।'-ज्ञा १७.१३९. ५ निग्रह करणें. 'मनाचा हन मारु।'-ज्ञा ६.२८९. ६ विपुलता; कडेलोट; रेलचेल. 'सालमजकुरीं अंब्यांचा मार झाला आहे.' ७ एखाद्या गोष्टीचा धबडगा, भारी प्रमाण. 'त्या विहिरीवर सगळे गांवाचा आठ दिवस मार पडतांच आटली.' ८ क्रियेचा झपाटा, अतिरेक, निष्काळजीपणा दाखविणाऱ्या भाषणसंप्रदायांत प्रकर्षार्थी व पादपूरणार्थी,

योजतात. उदा० 'मार पगडी फेंकून, मार डौलानें चालतो.' ९ न्यूनाधिक असणारें जमीनीचें माप. जसें- विठलपंती-रायरी-सुल्तानी-मार. [ मारणें ] (वाप्र.) ०देणें-१ जिकणें. २ एखा-यास चोपणें, ठोकणें. ०पडणें-मारा पडणें; हल्ला होणें. 'बहु कोस मागें सारिला मार पडली हुजरातिला।'-ऐपो २८३. ०बसणें-माराला पात्र, विषय होणें; मार मिळणें. ०मारणें-देणें-निश्चयानें व नेटानें हल्ला करणें (अभ्यास, काम इ०कांवर). **मार मार, मारे मारे करणें-फिरणें-हिंडणें-करीत फिरणें**-आपलें दुःख सांगत फिरणें. ०कूट-स्त्री. मारणें व धब-कणें; बुकलणें व कुटणें. [ मारणें+कुटणें ] ०कूट-झोड-पीट, **माराकुटी करणें**-क्रि. बेदम ठोकणें, मारणें; पिटणें. [ मारणें+कुटणें ] ०खाऊ-वि. नेहमीं मार खाणारा. ०गिरी-स्त्री. १ तोफांच्या किंवा बंदुकीच्या गोळयांचा हल्ला; मारा; भडिमार. २ लक्ष्य वेधण्याचें कौशल्य. ३ नेमक्या ठिकाणीं गोळा इ० जा-ण्याजोगी किल्ला इ० कांवर केलेली सोय. 'या किल्ल्याची चहूंकडून मारगिरी साधली.' ४ माराचा प्रयोग; मारा. [ मार+फा. गरी ] ०झोड-स्त्री. मारणें; झोडणें; कुदलणें. [मारणें+झोडणें] ०पकड-स्त्री. लाठी खेळण्याच्या प्रकारांपैकीं स्वतःचें संरक्षण करावयाचा प्रकार.-के ३६.११.३५. ०पीट-स्त्री. सडकणें व दांडकणें; मार-ठोक; मारहाण. [ मारणें+पिटणें ] ०वण-स्त्री. (एखाद्याकडून) मारविण्याची क्रिया. 'जेथें नसे मारण। जेथें नसे मारवण।' -यथादी २.५७६. [ मारवणें ] ०हाण, **माराहाण**-स्त्री. हाणणें व ठोकणें; मारणें व सडकणें मार, जखम इ० **मारकट-कणा, मारका**-वि. १ (कों.) हुंदाडण्यास, लाथा झाडण्यास संवक-लेला. २ मारण्याची संवय, खोड असलेला. [ मारणें ] **मारकों (खुं)डा**-वि. (व. ना.) मारका, अंगावर धांवून येणारा (बैल इ०). **मारका**-पु. दबडगा व ओझें; जीव घेणारा, लोळंवणारा, जमिनदोस्त करणारा (विशेषतः कामाचा) दबडगा. (क्रि० लावणें; पडणें; बसणें; असणें). [ मार ] **मारखा**-वि. (राजा.) मारका; हुंदाडण्याची व लाथा झाडण्याची संवय असलेला.

**मारई**—स्त्री, मोठी शिंप. हिच्यांतील माशास मारवी म्हण-तात. मारवी पहा.

**मारक**—पु. १ साथीचा रोग; मरी; सांथ. २ मारेकरी; यम. 'झालों धन्य त्रिजगीं, भास पळ प्राकृतांस मारकसा।' -मोभीष्म १०.१०३. -वि. १ मारणारें; नाश करणारें. २ (ल.) प्रतिकारक. भंजक; दोषापहारक (औषध इ०). 'कोकमसाल घृताचें मारक आहे.'

**मारका**—पु. पिशाचांचा एक प्रकार; (कु. कशेळी) सर्व भुतांचा राजा. [ मारणें ]

**मारका-खा**—पु. (ना.) भयंकर मारामारी; युद्ध, मुकाबला.

**मारग**—पु. १ (काव्य) रस्ता; मार्ग. 'पाहा त्या मारगें। कोण येतो आमच्या लागें।' २ (माण.) रानांत जाऊन तेथें स्वयंपाक करून देवीस नैवेद्य समर्पण करणें व या रीतीनें देवीचा नवस फेडणें. [ सं. मार्ग; प्रा. मग्गो ] ०मळणें-एखाद्या देवतेला जाऊन आल्यावर पुन्हां त्याच मार्गावर जाऊन स्वयंपाक करून कुलदेवतेस नैवेद्य दाखवून सवाष्ण व ब्राह्मण जेऊं घालणें.

**मारगुंडया**—पु. एक वनस्पति.

**मारजांभळ**—न. एक इमारतीच्या उपयोगी लाकडाचें झाड.

**मारंडी**—स्त्री. (राजा.) क्रुद्ध झालेल्या देवतेच्या रोषामुळें (खेडयांत, कुटुंबांत इ०) होणारा म्हणून साथीचा मानलेला क्लेशदायक आजार. [ मारणें ]

**मारण**—न. १ मारणें; वध; हिंसा. २ शत्रूच्या नाशार्थ योजिलेला मंत्र, जादू इ०. 'जारण मारण.' [ सं. ]

**मारणी**—स्त्री. (काव्य.) १ प्रहार; मार. २ हल्ला; चाल. 'अनेक शस्त्रांची मारणी। चुकवूं जाणे साधक।' ३ वेग. ४ (बंदूक, तोफा, रोंखून उडविण्याकरितां किल्ल्याच्या तटबंदींत राखलेलें) तिरकस उतरते भोंक. जंगी पहा. [मारणें]

**मारणें**—सक्रि. १ ठार करणें; जीव घेणें. व्युत्पत्तिदृष्टया, 'मृ' ह्या धातूस अनुसरून जरी हा अर्थ प्राथमिक आहे तथापि तो मारणें ह्या क्रियापदाच्या ऊन प्रत्ययान्त रूपाशीं टाकणें हें क्रिया-पद योजलें असतां, अथवा मारणें क्रियापद कांहीं विशिष्ट क्रिया-विशेषणांशीं किंवा क्रियाविशेषण असलेल्या जीव ह्या शब्दाशीं योजिलें असतां मात्र होतो. उदा० मारून टाकणें; ठार मारणें; अगदीं मारणें; निःशेष मारणें=जिवानृशीं-जिवानें-जिवें-मारणें. २ ताडन करणें; ठोकणें; पिटणें; हाणणें (कोणत्याहि साधनानें). ३ जिंकणें; पराभव करणें. ४ (पारा, वंग इ० कांच्या) तीव्रतेचा नाश करणें. ५ हल्ला करणें (घर, गांव, प्रवाशी इ० कांवर). ६ लुबाडणें; अंगावर तुटून पडून (ठार मारून, ठोकून, जुलूम करून) हिरावणें; हिसकावून घेणें. 'सोनें-खजाना-हुंडी-मारली' ७ काबीज करणें; वश करणें; दमन करणें(मनोविकार, इच्छा,वासना). ८ ठोकणें (खिळे, खुंटया, मेखा). ९ लावणें; बसविणें; न हालेसा करणें (कुलपें, वांसे, बिडया, कोणतीहि वस्तु इ० जलद घट्ट बसणें असा अर्थ असतां योजतात). १० (सोनारी धंदा) कोणत्याहि जिनसाला पैलू पाडणें किंवा विशिष्ट आकार देणें, टसा उठवणें वगैरे उदा० वटंगावर बिल्वर मारणें. ११ संभाळणें; निभावणें; निभावून नेणें; पार पाडणें. 'ही एवढी आणीबाणीची वेळ मारून न्या म्हणजे झालें.' १२ लिहिणें. 'पत्रकावर शेरा मारला पाहिजे.' १३ करणें ह्या क्रियापदाच्या विस्तृत अर्थी(जोर, जलदी, झटपट, चटपट इ० क्रिया दाखविणें असतां) उपयोग करितात. उदा० एवढें काम मारतों आणि येतों.' करणें याच्या अनेक अर्थी योजलेल्या

मारणें क्रियापदाचे कांहीं अर्थः-उडविणें (बंदूक); लढणें (लढाई); लगावणें (तरवार, चाबूक, छडी); फेकणें; झुगारणें (अस्त्र); घालणें (घाला); आरंभणें (धांव, नृत्य, ताण, जोर, दम, यत्न); ठोकणें (तंबू); फकूदिशीं आंत टाकणें, फेकणें (तोंडांत-मिष्टान्न, घांस, बकाणा); गट्ट करणें, खाणें (पैसा, माल); चलाखीनें व हुशारीनें मिळविणें, कमावणें (धंद्यांतील नफा); उदा० त्या व्यापारांत म्यां दोनशें रुपये मारले; कर्कशपणें व मोठ्यानें उच्चारणें (आरड, हाक, आरोळी, कुकारा); झपाट्यानें, उत्सुकतेनें करणें (मौज, कौतुक, ख्याल, बाष्कळ गोष्टी); -'चल लौकर हात मार, फडशा करून टाक.' याप्रमाणें जोरानें, झटकन् केलेलें कृत्य दाखविण्याकरितां योजलेल्या 'मारणें' क्रियापदाचीं उदाहरणें असंख्य आहेत. यावरून जोर, दम, चलाखी, उचल ह्या अर्थाच्या द्योतक अशा घालणें, टाकणें, लावणें, पाडणें, हाणणें, ठोकणें इ० अर्थाच्या क्रियापदांच्या वर्गांतीलच मारणें हें क्रियापद असल्याचें दिसून येतें. १४-अक्रि. लागणें; परिणाम होणें. 'ह्या तळ्याची ओल त्याच्या ओटीवर मारती.' 'काय शस्त्रांची झळक, चकाकी मारती' १५ शरीरांत एकदम उत्पन्न होणें, उठणें. (चमक, धमक, लचक, शूल, कळ, उसण इ०); 'शीर-डोई-डोसकें-मस्तक-मारतें.' [सं. मृ=मरणें; फ्रेंजि. मर; पोर्तु. जि. मारार] म्ह० १ मारशील (जाळशील) तर पुढें जाशील=जर तूं मला मारशील तर तूं पुढें जाशील (तुला पुढें काय होईल तें समजेल). मारण्याचा धाक घालणारास ताकीद देतांना म्हणतात. २ मारावा हत्ती लुटावा भंडार. (वाप्र.) **छटा, छाया मारणें**-सारखेपणाची लकेर असणें. 'तुमच्या बोलण्यांत तीर्थरूपांच्या बोलण्याची छाया मारती.' **झोप मारणें, डुकल्या मारणें**-निद्राग्रस्त होणें; पेंगणें. **वास-घाण-मारणें**-(एखाद्या वस्तूचा) वास, रंग, रुचि, छटा, लकेर, झांक असणें. **मजा मारणें**-चैन करणें; मौज करणें.

**मार(रं)द, मारांद्री**—स्त्री. खारवटांत उगवणारी एक कांटेरी वनस्पति.

**मारंदा**—पु. नारळ, ताडाचें फळ इ०कांत येणारा आळंब्या सारखा अकालपिंड; कोंवळा मोड.

**मारपाचो**—पु. (गो.) चौकोनी दगड. **मारपी**-पु. (कु.) खाणींतून चिरे काढणारा मनुष्य.

**मारफत-ती**—स्त्री. (विशेषतः देण्याघेण्याच्या व्यवहारांत) एखाद्या मनुष्याची गुजारत; विद्यमानता; मुखत्यारी; ओळख. 'जें कांहीं घ्यायाचें, द्यावयाचें असेल तें हरीपंताचे मारफतीनें घे-दे.' -क्रिवि. संबंधानें; निसबतीनें; कडून; तर्फेनें. 'मी त्याचें मारफतीनें आलों=मी त्याजकडून (त्याच्या नांवानें-वतीनें, त्याजकडून अखत्यारी घेऊन) आलों.' [अर. मुआरफत]

**मारबत-द**—स्त्री. १ (व. ना) धिंड; मिरवणूक. २ पोळ्याच्या दुसऱ्या दिवशीं गांवांतील इडापिडा, रोगराई बाहेर नेऊन घालविण्या साठीं सोंगें वगैरे काढून मिरवणूक काढतात ती; बरसातींत रोगराई उत्पन्न करणारी मारबत नांवाची देवता; हिच्या प्रीत्यर्थ वरील मिरवणूक काढतात त्यावेळीं गांवाबाहेर जाळण्यांत येणारी बांबू व कागद यांची केलेली अक्राळविक्राळ, प्रचंड स्त्रीरूपी प्रतिमा. **०खेदणें**-(ना.) (एखाद्यास) हांकून लावणें; (एखाद्याची) हुर्यो उडविणें.

**मारवा**—पु. (संगीत) एक राग. ह्यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर असतात. जाति षाडव-षाडव. वादी ऋषभ. संवादी धैवत. गानसमय दिवसाचा चवथा प्रहर. [हिं.] **०थाट**-पु. (संगीत) एक थाट ह्याचे शुद्ध षड्ज, कोमल ऋषभ, शुद्ध गांधार, तीव्र मध्यम, शुद्ध पंचम, शुद्ध धैवत व शुद्ध निषाद असे सात स्वर असतात.

**मारवाडी**—पु. मारवाड देशांतील व्यापारधंदा करणारी एक जात व तींतील व्यक्ति. -वि. १ मारवाड देशासंबंधीं. २ तद्देशीय (व्यापार करणारे लोक). ३ (ल.) धूर्त; शठ; कृपण; कावेबाज; व्यवहारदक्ष. [सं. मरु] म्ह० मारवाडी मित्र नाहीं पायखाना पवित्र नाहीं. **०पणा**-पु. कंजूषपणा;

**मारवी**—स्त्री. मोठ्या जातीचा शिंपमासा. याच्या शिंपेला मारई म्हणतात. मारई पहा.

**मारवेल-ळ**—पुस्त्री. १ प्रायः समुद्रकिनाऱ्यावर उगविणारा वेल. २ एक प्रकारचें हरळीसारखें गवत; हें गुरांना चांगलें मानवतें 'कन्हवेलु मारवेलु गोंडाळी।'-गीता २.५२८६.

**मारा**—पु. १ (किल्ला इ० कांवर केलेला हल्ला; तोफांच्या गोळ्यांचा वर्षाव; मार. 'किल्ल्याच्या पूर्व बाजूनेंच मारा केल्यामुळें यश आलें.' २ तोफांची रांग. ३ नेमक्या ठिकाणीं गोळा लागू होण्याजोगें संधान. 'त्या मोरच्यानें मारा चांगला साधला.' 'त्या किल्ल्यास दोन मारे आहेत. तिसरेकडून कोठून' गोळा लागू व्हावयाचा नाहीं.' ३ तोफेचा, बंदुकीचा, आटोका, पोंच; टप्पा. ४ एखाद्या साथीच्या रोगानें, महापुरानें घेतलेला बळी. 'महामारीनें त्या गांवाचे दोन मारे घेतले.' 'ही नदी प्रतिवर्षी एक मारा घेते.' ५ भडिमार; मार; माराचा विषय होणें; मार बसणें. माझा चहूंकडून मारा होतो.' ६ (किंवा मार) चंगळ, विपुलता (बऱ्या किंवा वाईट गोष्टीची). ७ बुद्धिबळादि खेळांत एका किंवा अनेक घरांवर चालू शकणारी मोहऱ्याची मारक शक्ति. ८ वेढा; लोंढा; जोर; सपाटा. 'पंधरा खेडीं पुराच्या माऱ्यांत सापडलीं.-के २६.७.३०. **माऱ्याचे आंत येणें**-माराच्या टप्प्यांत येणें. **माराकुटी**-स्त्री. १ मारकूट; मारपीट. २ (सोंगट्यांचा खेळ) मारामारी (यांत कोणत्याहि खेळाडूनें दुसऱ्या कोणाचींहि नरद मारावयाची असते). **मारांडी**-स्त्री. (कु.) कुचंबणा. **मारामार-री**-स्त्री. १ परस्पर लढणें; मारणें; युद्ध; लढाई. २

(ल.) अतिशय श्रम. (उपजीविकेचीं साधनें इ० मिळविण्याकरितां केलेले). 'दिवसभर मारामार करावी तेव्हां कोठें दोन आणे हातीं येणार.' ३ (अशिष्ट) पराकाष्ठेचा झपाटा व गडबड; गर्दी (रोजच्या कामाची). ४ पराकाष्ठेची विपुलता (पदार्थाची.) 'कामाची–गाण्याची–धावण्याची – प्रयोजनाची – मारामार.' ५ पंचाईत, अडचण. ६ (कायदा) दोन किंवा अधिक इसमांनीं सार्वजनिक जागीं केलेली झुंज. [मारणें द्वि.] ०पडणें–होणें–पंचाईत पडणें. पंचाईत होणें; अडचण पडणें. 'गोऱ्यांना तेथें धान्य–पाणी मिळण्याची मारामार पडली.' –के १७.४.३०. **माराहाण**–स्त्री. मारहाण. **मारिजेसिल**–क्रि. मारला जाशील. **मारू**–वि. १ मारणारा. २ मोहक; नखरेबाज; चित्ताकर्षक; मनोहर (डोळे, अलंकार इ०). ३ भेदक; बोंचणारें; परुष (भाषण). ४ (गो.) लबाड. **मारून**–क्रिवि. आवेश, पूर्णपणा, विपुलता इ० दाखविणारें वाक्यालंकारभूत क्रियाविशेषण. 'मारून तेल लाव आणि वळकट चोळ.' 'आज मारून हजारों रुपये धर्म केला.' **मारून उरता न ठेवणें**–बेदम मारणें; मरेमरे तों मार देणें. 'त्याला मारून उरता ठेवला नाहीं.' **मारून पीठ–पिठार करणें**–(एखाद्यास) ठेचणें; बदडणें; बेफाम मारणें. **मारून भूस भरणें**–अगदीं बेदम मार देणें, मरेमरे तों ठोकणें. ०**मारून–मारतां मोत भरणें**–मारून नरम आणणें, बेशुद्ध करणें; बेदम मारणें. **मारून येवप**–(गो.) मिरगी, झिट येणें. **मारून कुटून–धमकून–मुटकून**–क्रिवि. नाना प्रकारच्या युक्त्या व प्रयत्न करून; जबरदस्तीनें; जुलमानें; पुष्कळ श्रमानें; मोठ्या कष्टानें; वारंवार प्रयत्न केल्यावर. (क्रि० अळेबळे साधणें, करणें). 'एकदां मारून कुटून घर बांधलेसें केलें.' [मारणें+कुटणें; मारणें+मुटकणें] **मारे**–क्रिवि. (वाक्यालंकारार्थी किंवा पादपूर्णार्थक शब्द) आवेशानें. मार अर्थ ८ पहा. 'मारे मुसळाखालीं एकेकाची टाळकीं फोडून टाकीन.' –नामना ८६. **मारेकरी**–पु. एखाद्याच्या सांगीवरून दग्यानें एखाद्यास ठार मारणारा; वेतन घेऊन मनुष्यवधाचें काम करणारा. [मारणें+करी]

**मारांक**—पुन. (महानु.) शस्त्र; बाण. 'कंदर्पाचेया मारांका। गोसावीणि ते।' –भाए ४२१.

**मारा घेणें**—क्रि. फरेमरें या खेळांत आपलें फरें झाल्यावर विरुद्ध पक्षाचा खडा उचलून घेणें.

**माराणु**—पु. १ लक्ष्मीपति विष्णु. २ कृष्ण. ३ राम. [मा= लक्ष्मी+राणा]

**मारि–री**—स्त्री. मरी; महामारी. 'मारी–लक्षहि न तदिषुहुनि अधिक प्राणिजात सारील।' –मोभीष्म १०.१६. [सं. मृ= मारणें]

**मारि(र)ता**—वि. मारणारा. [मारणें] **म्ह०** १ मारत्याचा हात धरवेल पण बोलत्याचें तोंड धरवत नाहीं; किंवा मारत्याचे हात धरवतात, पण बोलणाराचें तोंड धरवत नाहीं. २ मारत्याच्या मागें पळत्या पुढें. **मारता पीर**–वि. १ वस्ताद; जबरदस्त. उतारा; वरकडी. 'त्याचा मारता पीर मी आहें. मजपुढें येऊं द्या.' 'हें औषध पित्ताचा मारता पीर आहे.' २ तडखपणानें मारणारा इसम. [मारणें+फा. पीर] **मारती**–स्त्री. १लढाऊ फौज. 'मारती तीस हजार।' –ऐपो २३२. २ (पत्त्यांचा खेळ) आपणांजवळ ज्या रंगाचें पान नाहीं व जी आपण हुकुमानें मारतों अशी बाजू; कटाप. **मारपेंच**–पु. डावपेंच; कावेदावे; छक्केपंजे; युक्तिप्रयुक्ति.

**मारुत**—पु. १ वायु; वारा; हवा. २ ज्यावेळीं प्राणवायु आंतून निघून गगनाला मिळतो त्या स्थितींतील कुंडलिनीचें नांव. 'ते वेळीं कुंडलिनी हे भाष जाये। मग मारुत ऐसें नाम होये।' –ज्ञा ६.३०१. [सं.] **मारुति–ती**–पु. १ वायुपुत्र; हनुमान्. २ क्वचित् भीमालाहि म्हणतात. 'शिकवी मारुतिला भगदत्त हृदयांत बाण शिरकविला।' –मोभीष्म ५.४८. **मारुतीचें (ची) शेंपूट** नस्त्री. (सीताशुद्धीसाठीं लंकेंत गेलेल्या मारुतीच्या शेंपटाला राक्षसांनीं चिंध्या बांधल्या पण तें इतकें लांबलें कीं संपेचना. यावरून (ल.) लांबत जाणारें काम; लांबट गोष्ट; पाल्हाळ. ०**लांबणें**–अक्रि. अशा रीतीनें काम लांबविलें जाणें.

**मारूज**—पु. अर्ज. 'हुजूर मारूज पोंहचविला.' –वाडमा१. ६६. –वि. प्रविष्ट; श्रुत. 'खावंदास अर्ज मारूज करून पाहीन.' –रा ५.७३. [अर. मअरूझ] ०**मी(मे)दारद**–पु.अर्ज, विनंति करतो या अर्थाचा फार्शी अर्ज, पत्रें इ०कांतील मायना. [फा. मअरूझ मिदारद्=मी अर्ज करतों]

**मारूमिती**—स्त्री. एका महिन्याच्या पौर्णिमेपासुन दुसऱ्या महिन्याच्या पौर्णिमेपर्यंत महिना मोजण्याची उत्तरहिंदुस्थानांतील रीति व या पद्धतीनें केलेलें मारवाड्यांचे हिशेब.

**मारोंब**—स्त्री. (गो.) तुमान.

**मार्क**—पु. गुण; परीक्षेमध्यें प्रश्नाच्या उत्तरास मिळालेले गुणांक.स्त्री. –स्त्री. चिन्ह; खूण. [इं.]

**मार्कंडेय**—पु. १ एक ऋषि; मार्कंडेयपुराणाचा कर्ता. २ (मार्कंडेय हा चिरंजीव आहे या समजुतीवरून ल.). अतिशय म्हातारा मनुष्य. [सं. मार्कंडेय] **मार्कंडेयाचें आयुष्य**–न. दीर्घायुष्य.

**मार्ग**—पु. १ रस्ता; पथ; वाट. २ पंथ; संप्रदाय. ३ (ल.) रीति; पद्धति; मोड; सरणी; धाटी, वहिवाट; चाल; परिपाठ. 'गुरुजन देती वरासि कन्या, या। मार्गासि लंघितां मी प्रभुजी होईन पात्र अन्याया।' –मोआदि ८.३४. ४ मोक्ष, स्वर्ग अथवा एखादा सुखप्रद लोक गांठण्याचा रस्ता. कर्ममार्ग, उपासनामार्ग

व ज्ञानमार्ग असे हे तीन मार्ग आहेत. कांहीं लोक यांतच सिद्धांत मार्ग, योगमार्ग व वैराग्यमार्ग यांचा समावेश करतात. ५ (संगीत) ताल देण्याची एक पद्धति. ध्रुव, चित्र, वार्तिक व दक्षिण असे हे चार मार्ग आहेत. [सं. मृग्=शोध करणें] (वाप्र.) **०धरणें**–१ निघणें; आपल्या मार्गाला लागणें. २ रस्ता रोखणें; रस्त्याला उपद्रव देणें; वाट मारीत बसणें. **०फुटणें**–१ रस्ता, वाट आढळणें. 'खुंटली समीराची गति । मार्ग न फुटे चालावया।' २ एका वाटेस दुसरा फाटा फुटणें. **०मळणें**–१ मारग मळणें पहा. २ बागेंत भोजन करण्याकरितां व मौजा मारण्याकरितां जाणें; वन-भोजनासाठीं सहल करणें. **मार्गावर येणें**–सुधारणें. **मार्गी लागणें**–१ (आपल्या उद्दिष्ट प्रवासाचा) मार्ग धरणें; निघणें. २ मरणाच्या पंथांत असणें. ३ (एखादें कार्य करण्याच्या किंवा तें कसें करावें हें समजण्याच्या) पंथास लागणें. ४ आरंभिलें जाणें; सुरू होणें (काम, गोष्ट). सामाशब्द– **०क्रमण**–न. रस्ता, वाट चालणें [सं.] **०गीत**–न. (संगीत) गांधर्वगीताचा एक प्रकार. [सं.] **०घ्न**–वि. (काव्य) रस्तेलुटारू; वाटमाऱ्या. 'दुबेळघातक मार्गघ्न।' [सं. मार्ग+हन्] **०ताल**–पु. (संगीत) प्राचीन तालाचा प्रकार. हे प्रचारांतून नष्ट होऊन अनेक शतकें झालीं आहेत. [सं.] **०त्रय**–न. तीन मार्ग. मार्ग अर्थ ४ पहा. [सं.] **०दर्शक**–वि. वाटाड्या; रस्ता दाखविणारा. **०पालीबंधन**–न. १ दर्भ किंवा मोळ यांचा दोर वळून तो गावाबाहेर पूर्वेदिशेकडे दोन झाडांस किंवा खांबांस दोहीकडे बांधून त्याखालून गावकऱ्यानीं गांवांत प्रवेश करण्याचा विधि. २ मोळाचा दोर करून एका टोकास हीनवर्णीय व दुसऱ्या टोकास श्रेष्ठवर्णीय यांनीं धरून ताणून ओढावयाचा विधि; मांगोळी. [सं.] **०प्रतीक्षा**–स्त्री. एखाद्याची वाट पाहणें. [सं.] **०भेद**–पु. १ मार्गाची भिन्नता; रस्त्याचा पालट. २ मार्गाच्या भिन्नतेमुळें किंवा पालटामुळें होणारी चूक. ३ पद्धतीचा भेद. 'हल्लीं या बाबतींत जो कांहीं मतभेद दृष्टीस पडतो तो मार्गभेदामुळें झाला आहे.'–टि १.४९९. **०रूढी**–स्त्री. (महानु.) पंथांतील प्रचलित वर्तन. 'प्रमाणपुरुष तयांची मार्गरूढी।' **०संगीत**–न. १ जें भरताला ब्रह्मदेवानें शिकविल्या-वर त्यानें अप्सरा व गंधर्व यांच्या कडून शंकरापुढें गावविलें तें संगीत. त्याच्या नियमांत बदल व्हावयाचा नसतो. दुसरें देशी संगीत. २ प्रचारांतून नष्ट झालेलें संगीत. [सं.] **०स्थ**–वि. यात्रे-करू; प्रवासी; मुशाफर. 'मार्गस्थ देवदर्शनासी आले।'–सप्र ८.२१. **मार्गाची**–वि. सरळ; न्यायाची. 'ही मार्गाचीच गोष्ट होती.' **मार्गाटन**–न. वाट, मार्ग, रस्ता चालणें. [सं. मार्ग+अटन] **मार्गामार्ग**–पु. सरळ मार्ग व आडमार्ग; योग्य-अयोग्य मार्ग. 'कां जे मार्गामार्ग देखावे।'–ज्ञा ८.२३९. [सं.] **मार्गीक्रमण**–न. (ज्योतिष) नक्षत्रांच्या क्रमानें अंतर्ग्रहाचें पूर्वेस जाणें. [सं.] **मार्गीचलन**–न. (ज्योतिष) ग्रहाचें नक्षत्रक्रमानें पश्चिमेकडून पूर्वेकडे गमन. [सं.]

**मार्गण**—पु. शर; बाण. 'मग असंख्य सोडोनि मार्गण।' –जै २०.११७. [सं. मृग्]

**मार्गशिर**—पु. मार्गशीर्ष महिना. [सं. मार्गशीर्ष] **मार्ग-शिरी–शीर्षा–शीर्षी**–वि. मार्गशीर्ष महिन्यासंबंधीं. **मार्ग-शीर्ष–शीर, मार्गेश्व(स)र**–पु. चैत्रादि महिन्यांतील नववा महिना.

**मार्च**—पु. १ इंग्रजी वर्षाचा तिसरा महिना. २ सैन्याचें कूच. [इं.]

**मार्जन**—न. १ सिंचन; शिंपडणें. २ दर्भाग्रानीं अथवा विशिष्ट मंत्र म्हणून उजव्या हाताच्या बोटांच्या अग्रांनीं हृदय व शीर यांवर पाणी शिंपडणें. ३ स्नानानें, धुण्यानें, पुसण्यानें, सुवासिक उटण्यानें इ० शरीर स्वच्छ करणें. ४ (सामा.) धुणें; घांसणें; स्वच्छ करणें. ५ सडा; संमार्जन. 'केशर कस्तूरीचीं मार्जनें।' –वेसीस्व ८.८८. ६ (महानु.) मुखमार्जन; तोंड धुणें. [सं. मृज्=पवित्र करणें] **मार्जनी**–स्त्री. १ केरसुणी; झाडणी; कुंचली; झाडण्याचें, पुसण्याचें कोणतेंहि साधन. २ (संगीत) तेराव्या श्रुतीचें नांव. [सं.]

**मार्जा(र्जे)र**—पुन. गावांतील किंवा रानांतील मांजर. 'सुगंध-मृगें आणि मार्जरें।'–दा ४.५.२८. [सं. मार्ज्=ध्वनि करणें]

**मार्तंड**—पु. (कवि.) १ सूर्य. 'सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा। उडी घालितो संकटीं स्वामी तैसा।'–राम ३७. २ खंडेराव किंवा खंडोबा. 'पाहोनि मार्तंडा जेजुरवासी।'–दावि १७६. [सं.]

**मार्तु(र्तू)ल**— पु. (कर) डिसपीस; चावी; (इं.) स्क्रूड्रायव्हर.

**मार्त्तिक**—वि. मातीचा; मृत्तिकामय. [सं. मृत्तिका]

**मार्दव**—न. १ मृदुपणा. २ सौम्यता, कोमलता; शांति. [सं.]

**मार्फत**—स्त्री मारफत पहा.

**मार्मिक**—वि. १ रहस्य, मर्म जाणणारा; अंतर्गत खुब्या, भावार्थ भेदणारा. २ भेदक; वेधक; बारीक; खोल; सूक्ष्म (तर्क, अनुमान, कल्पना). ३ भेदणारें; टोंचणारें; खोंचणारें; दंशक (भाषण). [सं.]

**मार्बोत**—पु. (व.) पोळ्याच्या सणांतील दुसरा दिवस. मारबत पहा.

**मार्सो**—स्त्री. (गो.) लीख; ऊ.

**माल**—पु. मल्ल. 'माल मर्दूनि मालखडा।'–एभा ३१. ३४१. [सं. मल्ल] **०खडा**–पु. अजिंक्य मल्ल. 'चाणूर मुष्टिका दीधला विडा। युद्ध करावया मालखडा।'–कथा ४.६.३८.

**मालखंड**–पु. (महानु.) युद्धभूमि; कुस्तीची जागा. ' गिरी गजरगडा मालखडा प्रवेशे । '–गस्तो. ' मालखंडां जें केलें क्षात्र।' –एभा ३१.३८१. **मालगंठी**–स्त्री. (महानु.) मल्ल बांधतात त्याप्रमाणें कास बांधण्याचा प्रकार; विशिष्ट प्रकारें गांठ देऊन वस्त्र नेसण्याची पद्धत. ' तो पीतांबरू असे वेढिला । मालगंठी । '–दाव २२४. [सं. मल्ल+ग्रंथि] **०जेठी**–पु. मल्ल. **मालातिणें, मालाथ(थि)णें**–सक्रि. १ (महानु.) मल्लविद्येनें वेढणें; मोहित करणें. ' येणें, अहंकारें मालाथिल । '–ज्ञाप्र ६.३२. २ निस्तेज होणें, करणें. ३ निःशेष होणें. ' भीतरीं मालाथिलें । साभिळासे ।' –कालिका २६.४०. ४ आश्रय, आंगीकार करणें. ' तैसा प्रकृति हे आसुर । एकली नोहे गोचर । जवं एकाधें शरीर । माल्हातीना । ' –ज्ञा १६.२७७. [प्रा.]

**माल**—पु. परिणाम; शेवट. [अर. मआल्] **मालअन्देशी**–स्त्री. परिणामाचा अगोदर विचार करणें. 'मालअन्देसी.'–पेअ ६०. [अर. मआल्=परिणाम]

**माल**—पु. १ मत्ता; वित्त; द्रव्य; संपत्ति. २ जिन्नस; सौदा; विक्रीचा पदार्थ; जिन्नसपात्रस. ३ किंमतीची वस्तु. ' हा आठा रुपयांचा माल आहे. ' ४ (कायदा) प्रत्येक जातीची जंगम जिंदगी. ५ जमाबंदी. ' मालाचें (रेव्हेन्यूचें) काम. '–निजामविजय १४.१२.३१. [अर. माल्] (वाप्र.) **०खाणें**–(व.) मेवा, मिठाई इ० गोड पदार्थ खाणें. **माल केमाल, मालचा माल**–वाढ, सुधारणा होणाऱ्या किंवा घट, अपकार होणाऱ्या कामीं लावल्यावरहि ज्याच्यामध्यें बरावाईट असा काहींच बदल होत नाहीं असा पदार्थ (पैसा, माल इ०). **०वथरणें**–(व.) पीक चांगलें येणें; **मालावरचा नाग**–वि. १ पैशाचा उपयोग न करतां त्याचें केवळ रक्षण करणारा (कृपण मनुष्य). २ श्रमाशिवाय आयती संपत्ति ज्यास मिळालेली आहे असा (इसम). सामाशब्द– **०अस्बाब**–पु. चीजवस्त वगैरे संपत्ति. **०कटनी–काटणी–काटी**–स्त्री. १ शेताच्या कापणीसाठीं सरकारची परवानगी मिळण्याबद्दल दिलेली रक्कम; फी. २ पिकाची कापणी. **०काळी**–स्त्री. (व ना.) शेतजमीनीचा सरकारसारा. ' वऱ्हाडची मालकाळी किती ? ' **०खरा**–वि. पूर्ण किंमतीचा (चेंचलेलें किंवा विरूप झालेलें असलें तरी जें चांगल्या धातूचें असतें असें नाणें इ०). [माल+खरा] **०खाना**–पु. कोठी. **०चाटी–चाटया**–पु. शाळेंतील उपगुरु. [माल+चाटया] **०जामिनकी**–स्त्री. मालजामिनाचा अधिकार, काम. **०जामीन**–पु. मालाचा, पैशाचा जामीन; अमूक रक्कम अमुकवेळीं देईन अशी हमी घेणारा. –रा१६.५०. याच्या उलट हाजीर जामीन. **०टाल**–पु. चोज वस्त; माल आणि इतर सामान. [माल द्वि] **०दार**–वि. (व.) श्रीमंत. ' गावांत मालदार लोक आहेत. ' **०धनी**–पु मालाचा, जिन्नसाचा धनी. **०पिसा**–वि. मालाचा नाश झाल्यानें किंवा तो नष्ट होण्याच्या भीतीनें वेड लागलेला. **०पिसें**–न. मालाच्या नाशामुळें किंवा नाशाच्या भयामुळें लागलेलें वेड. **०बंदी**–वि. १ ऐवजदार; किंमतवान; मोलवान. २ घणसर द्रव्याचा· भक्कम (बांधणी, मांडणूक). **०बिसात**–स्त्री. मालमत्ता. **०मत्ता**–स्त्री. (व्यापक.) सर्व धनदौलत, जिंदगी, इस्टेट; रोकड, माल, चीजवस्त इ० सामान. [अर. माल+मताअ] **०मवेशा–शी**–स्त्री. चीजवस्त; गुरेंढोरें; मालमत्ता. [अर. मवेशी] **०मसाला**–पु. (व्यापक,) १ मिश्रणाचीं द्रव्यें. २ इमारती इ० कामासाठीं लागणारें दगड, विटा, चुना, लाकूडफाटा इ० सामान. ३ उपयुक्त वस्तु, सामग्री. [माल+मसाला] **०मस्त**–वि. संपत्तीनें चढलेला; धनगर्वित; धनोन्मत्त. [अर. माल्+फा. मस्त=मत्त] **०मालिक**–पु. धनी. ' तरी मालमालिक व्हा त्याचे । '–दावि ८. **०मालीयत**–स्त्री. मालमत्ता. ' संस्थानामध्यें मालमालीयत व स्वभाव...' –वाडबाबा १.१३४. **०मिल(ळ)कत**–स्त्री. माल व चीजवस्त; जंगम व स्थावर मालमत्ता. [अर.] **०मुद्दल**–न. झालेल्या खर्चाच्या किंवा आगाऊ दिलेल्या पैशाच्या बरोबरीचा जिन्नस. उदा० माझें मालमुद्दल उभें राहिलें–आलें–हातास लागलें. –क्रिवि. १ बरोबर किंमतीला (क्रि० विकणें; विकत घेणें; करणें इ०). २ मूळ किंमतीला. **०मोल**–वि. योग्य किंमत दिलेला; त्याच्या किंमतीला घेतलेला, विकलेला, मांडलेला. –क्रिवि. योग्य किंमत देऊन. (क्रि० विकत घेणें; विकणें; मांडणें; गहाण ठेवणें इ०). **०मोल किंमत**–स्त्री. योग्य किंमत. **०वाडी**–पु. (कों.) कुलवाडी; कूळ; शेतकरी. ' गावांतल्या समद्या कुलवाडी मालवाड्याशीं काय हाय ? जो तो कसा तरी उपाश्यानें दीस लोटतोय. '–चैत्रावळ–महाराष्ट्र शारदा, जून १९३५. **०शिकाऱ्या**–वि. (व.) उत्तम पदार्थावर हात मारावयास संवकलेला. **०साईर**–न. मालावरील जकात. ' कसवो कसवो कराहरा मालसाईर सुधी तुमपर राखो. ' –वाडबाबा१.२१. **०हराऊ**–वि. तोटा, नुकसान, खराबी करणारा. (प्राणी, वस्तु, काम याची). **माल(ली)क**–वि. १ धनी; स्वामी. २ अधिपति; शास्ता; अधिकारी. ३ हक्कदार; जो एखादें काम पाहतो किंवा ज्याचें तें काम आहे असा मनुष्य. ' माझा बाप जामीन राहिला आहे तो त्या गोष्टीचा मालक त्यास काय तें विचारा. ' ४ (बायकी) पति; नवरा. ५ (कायदा) एखाद्या कंपनीचा, मंडळाचा गुमास्ता; मॅनेजिंग एजंट. ६ (पुरतु) टोळीचा नायक. ७ शेतकरी. ८ जमीनदार. [अर. मालिक; मालक] **मालकी**–स्त्री. धनीपणा; स्वामित्व. सत्ता. [मालक] **मालकीयत**–स्त्री. स्वामित्व. ' मालकीयत व खाविन्दी. '–दिमरा १.२०७. [हिं.] **माल गुजा(झा)र**–पु. १ जमीन खंडानें

देणारा, जमीनदार. २ सरकारचा वसूल जमा करून देणारा. ३ (व.) पाटील. [ फा. माल्गुझार ] ०गुजा(झा)री-स्त्री. १ सरकारसारा देणें. २मालगुजाऱ्याचा हक्क. **माल(लि)म**-पु. गलबताचा हिशेब व व्यवस्था पाहणारा अधिकारी; नाखवा. **मालत, मालयत, मालियत, मालीयत मालिस्त**-स्त्री. जिंदगी; उत्पन्न; वसूल; मालमत्ता. 'त्यांची मालयत फारच गेली.' -ख ११.५९५५. 'मांणसास न मारावें, मालत घेऊन सोडून द्यावें.' -भाकै २६. [ अर. मालीयत ] **माली**-वि. वसुलासंबंधीं. 'माली व मुल्की.' -वाडसमा ३.२४. [ फा. माली ] **माली मामला**-पु. १ (जकात) किंमतवान माल; जो विकला असतां पैसा उत्पन्न होईल असा माल; सर्व खर्च सोसण्याजोगा माल. २ जकातीचें काम. **मालीव**-वि. (कों.) कांहीं किंमतीचा; विकला असतां कांहीं किंमत येणारा (मौल्यवान जिन्नस). [ माल ] **मालोमाल**-वि. किंमतीच्या योग्यतेचा; दिलेल्या पैशाइतक्या किंमतीचा. (विकत घेतलेला जिन्नस). (क्रि० विकणें इ०). [ माल द्वि. ]

**मालकई, मालकै**—स्त्री. (महानु.) गोष्ट. 'न पातां आपुलें बळ। मियां मालकै केली नवल।' -शिशु ७२६.

**मालकंस**—पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, कोमल गांधार, कोमल मध्यम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. जाति औडुव-औडुव. वादी मध्यम. संवादी षड्ज. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर. [ सं. मालकोश ]

**मालकांगु(गो)णी**—स्त्री. कांगोणीची एक जात; एक वनस्पती व तिचें बीज. [ सं. कुंगुनी; हिं. मालकांगनी; गुज. मालकांगणी; कों. पिंगवी ]

**मालकी**—स्त्री. (कों.) गलबताच्या पटाणावरील तीन-चार फळयांच्या रांगा.

**मालकुडई**—स्त्री. तांदुळाची एक जात.

**मालखडी**—स्त्री. माल नांवाच्या मातीची खडूची एक जात. हिनें लिहावयाच्या पाटया इ० घासतात. **मालणें**-मालमातीनें पाटी इ० घासणें.

**मालगण**—पु. (व.) माळयांचा रहाळ. 'मालगणांत जा.'

**मालगा**—पु. द्राक्षाची एक जात. ह्यास सफेत विलायती असेंहि म्हणतात. याचें बीं अमेरिकेहून हिंदुस्थानांत आणविलें. -कृषि ५१३.

**मालगोंडा**—पु वरीची एक जात. हिचें कणीस मोठें असून तांबूस असतें. -कृषि २९२.

**मालगोवा**—पु. म्हैसुरकडील आंब्याची जात. -कृषि ६८१.

**मालजा**—स्त्री. (माळवी) व्यवस्था; दुरुस्ती. 'गोविंदराव डॉक्टरचे हातून मालजा बरोबर होत नाहीं.' -विक्षिप्त ३.१३२.

**मालजादी**—स्त्री. वेश्या; रांड; कसबीण; वेश्याकन्या. [ फा. माल्झादा=रंडीपुत्र ]

**मालटी**—स्त्री. (हेट. गो. कु.) एक प्रकारचें मातीचें लहान भांडें; परळ. [ माती ]

**मालण-न**—स्त्री. अतिशय सुंदर स्त्री. 'मालणी कैक प्राशिती विषाचा प्याला।' -अफला ५३. [ सं. मालिनी ]

**मालणें**—अक्रि. मालवणें; विझविला जाणें (दिवा). [सं. म्लै]

**मालती**—स्त्री. (कों.) गाडग्यावर (सुगडावर) ठेवण्याची मोठी मातीची पणती.

**मालती**—स्त्री. १ बाजरीच्या आकाराचा गव्हला; खिरींत घालण्यासाठीं गव्हाच्या सपीठाचा फुलासारखा केलेला एक पदार्थ. 'ते वोटवे सरवळे अणि मालत्यांला।' -सारुह ६.७७. २ एक सुवासिक फुलझाड. लावल्यापासून दोन-अडीच वर्षांनीं यास फुलें येतात. फुलें बारीक व जरा वाकडीं असतात. यांचा बहर उन्हाळयांत असतो. फुलांस मधुर वास येतो. ३ एक वृत्त. याच्या चरणांत अक्षरें १२ व न, ज, ज, र हे गण असतात. [ सं. ]

**मालदा घुंगरु**—पु. रेशमाची एक जात. -मुंव्या ९७.

**मालदांडी**—स्त्री. जोंधळयाची एक हलकी जात. याचें धाट लांबलचक असून कणीस लहान असतें.

**मालदी**—पु. चुर्म्याचे लाडू. -पाक ५८.

**मालप(पु)वा, मालपु(पो)हा-बा**—पु पीठ भिजवून तें चांगलें फुगल्यावर कढईत तूप टाकून त्यावर तें ओतून दोन्ही बाजू तांबूस रंगाच्या झाल्यावर साखरेच्या पाकांत टाकून केलेलें एक प्रकारचें मसालेदार व हलकें घिरडयासारखें पक्वान्न. [ हिं. ]

**मालमी**—स्त्री. (नाविक) मराठयांच्या आरमारावरील दिशा दाखविणारें होकायंत्र. **मालीम**-पु. १ गलबतावरील मुख्य अधिकारी; नाखवा; सुकाणू धरणारा. कप्तान. [ अर. मुअल्लिम् ]

**मालव**—पु. १ (संगीत) एक राग; यास मारवा असेंहि म्हणतात. मारवा पहा. २ माळवा प्रांत. [सं.] ०देश-पु. माळवा प्रांत. यांत इंदूर, उज्जनी इ० शहरें येतात.

**माल(ल्ह)वणें**—अक्रि. १ जाणें; विझणें (दिवा). २ (ल.) संपणें; खालावणें; नाहींसें होणें (आजार, देवीच्या पुटकुळया, भरभराट इ०). [सं. म्लै] **माल्हवण**-न. फुंकर; विझविणें. **माल(ल्ह)विणें**-सक्रि. १ विझविणें; फुंकणें (दिवा). २ नाहींसा करणें (वंश, कुल).

**मालवी**—पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण-संपूर्ण. वादी ऋषभ, संवादी पंचम. गानसमय सायंकाळ [ सं. ]

**मालश्री**—पु. ( संगीत ) एक राग. यांत षड्ज, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, पंचम, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति औडुव-औडुव. वादी षड्ज. संवादी पंचम. गानसमय दिवसाचा चवथा प्रहर. [ सं. ]

**माला-ळू**—पुस्त्री. एक प्रकारची माती. मालखडी पहा.

**माला**—स्त्री. १ फुलांची माळ; कुसुममालिका. २ मणी ओंवलेली दोरी; हार; स्मरणी. ३ ओळ; पंक्ति. [ सं. ] ०दंड-पु. पुष्पहार. ' कंठीं रुळताति अलौकिक। माळादंड।'-ज्ञा ११. २२०. [ सं. माला+दंड ]

**मालिगौरा**—पु. ( संगीत ) एक राग. यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण-संपूर्ण. वादी ऋषभ, संवादी धैवत. गानसमय सायंकाल. [ सं. ]

**मालिनी**—स्त्री. १ स्त्रियांची एक जाति; स्त्रियांच्या पद्मिनी, चित्रिणी इ० चार स्थूल वर्गांपैकीं एक वर्ग. चतुर्विधाजाति पहा. २ एक गणवृत्त. याच्या चरणांत अक्षरें १५ आणि न, न, म, य, य हे गण असतात. [ सं. ] ०वसंत-पु. एक औषधी मात्रा, रसायण. यास सुवर्णमालिनी असेंहि म्हणतात. [ सं. ]

**मालिन्य**—न. मळकेपणा; मलिनपणा; घामटपणा. [ सं. मलिन ]

**मालिस्त**—स्त्री. ( डांगदेश ) माळ जमीन; एक वर्ष पडीत टाकून दुसऱ्या वर्षी लागवडीस आणलेली जमीन.

**मालिस्त**—न. १ कुटणें; ठेचणें. २ तयार माल. ३ चंदी.

**मालीं**—स्त्री ( कु. ) पाच नांवाची वनस्पति.

**माली, महाला-ली-ल्या**—पु. न्हावी; न्हाव्याची जात. ' नखें चोखाळाया माल्या बोलाविती। ' -वसा ८.

**माली(ले)तुळस**—स्त्री. एक वनस्पति. रानतुळस व ही एकच.

**मालीमर्दन**—न. ( महानु. ) तैलादि द्रव्यें शरीरास लावून केलेलें मर्दन; मालीश. ' माली-मर्दनां दीधली राया मुरारी। ' -धवळेपू ६८.१. [ मल्लमर्दन ]

**माली(लि)श-स, मालिस्त**—स्त्री. १ खरारा; घोड्याची चाकरी. २ अंग रगडणें, चोळणें; चंपी.

**मालुंड, मालुण**—पुन. सापाची एक जात; दुतोंडें. मह्यां डुळ, मांडूळ, पहा.

**मालू(लु)म**—वि. ज्ञात; माहीत; ठाऊक. ' मालूम करणें. ' -रा १५.३१. [ अर. मअलूम् ] **मालू(लु)म(मा)त-माती**-स्त्री. १ घडलेल्या गोष्टींतील सर्व मुद्दे, कलमें; यच्चयावत् परिस्थिति ( एखाद्या कृत्याची ); कच्ची हकीगत. २ माहिती. ' माझी मालुमात हि लिहिणें. ' -पेद २१.५५. माहितीचा कागद. ३ पत्रांतील मजकूर. -पया १८०. ४ ( भाषण, लेख इ० काचा ) खोटेपणा. ' या पत्रांत जें लिहिलें आहे ही सर्व मालुमत आहे, हा मजकूर खरा नव्हे. ' ५ मालूम केलेली, सांगितलेली सर्व हकीगत; अर्ज. -वि. खोटा; बनावट ( दस्त ऐवज ). ' बहुत बारकाईनें ( चवकशी ) करून मालुमातील असतील, निकामी तीं दूर करावीं. ' -वाडमा २.४४. **मालूम दानद, मालूम मीदानद**-स्त्री. ( विशेषतः सरकारी पत्रांतील ) 'कळवितों, निवेदन करतों, माहीत करतों अशा अर्थाचा शब्दसमूह. [ फा. मआलूम मिदानद् ]

**मालें**—न. दंडाच्या फेडीकरितां, तुरुंगांत पडलेल्या नातेवाइकाच्या सुटकेकरितां किंवा जप्त झालेली जमीन, वतन पुनः मिळण्याकरितां गळ्यांत नांगर अडकवून दारोदार भिक्षा मागून द्रव्य मिळवणें. (क्रि० मागणें). ' काष्ठाचा नांगर गळयांत। खांडश्मश्रु वाढले बहुत। ब्राह्मण आला मालें मागत। करा साहित्य म्हणतसे। ' ०करी-पु. मालें मागत फिरणारा मनुष्य.

**मालें-ळू**—न. १ एक प्रकारचा मऊ दगड, खडी. मालखडी पहा. २ ( माल्याचे गोळे केलेले असतात यावरून ) कणीक, लोणी, खवा इ० कांचा गोळा; पुरणाची पोळी लाटावयाच्या पूर्वी आंत पुरण भरण्याकरितां टक्ळ्याच्या आकाराचा केलेला कणकेचा गोळा; उंडा. ३ गुळाची ढेप. ४ राव; काकवी. ' अहो गूळासाखरे मालेयाचे। हे बांधे तरी एकाचि रसाचे। ' -ज्ञा १०.३३. ५ ( गो. ) गांधीलमाशी, मधमाशी इ० कांचें घर; पोळें.

**मालोणी-नी**—वि. ( ना. व. ) बेचव; मचूळ ( पाणी ).

**माल्य**—न. १ फूल. २ हार; माळ; पुष्पमाला. [ सं. ] ०ग्रथन-न. चौसष्ट कलांपैकीं एक कला; हार गुंफण्याची, माला करण्याची कला. चौसष्ट कला पहा. [ सं. माल्य+ग्रथन ]

**माल्हातणें**—क्रि. १ अंगीकार, आश्रय करणें; जवळ करणें. माल्हाती दाढर्यें। आलस्याचें। ' -ज्ञा १४.१७९. २ आहारीं जाणें; प्रभाव पडणें. ' ऐसें माल्हातिजे मोहें। ' -ज्ञा १४.२५३. [ सं. मल्ल्=युक्त होणें; जवळ असणें ]

**माव**—स्त्री. १ कपट; कृत्रिमता; लबाडी. २ गारुड; गौडबंगाल; माया. 'विश्वकर्मा येऊनि सत्वर। मावेंचें रचिलें वैकुंठपुर।' ३ खोटेपणा; पोकळपणा; मायिकपणा. ' बाह्यभक्ति मावेचि करी। ' -एभा २.४९०. ४ भ्रम. ५ ( गो ) जखम बरी झाल्यानंतर राहणारा वण, चिन्ह. 'माव आसा'=कुऱ्हाडीचा घाव आहे. [ सं. माया ] म्ह० मावेचें मंथन थुंकयाचें काजळ. ०कर-री-वि. मायावी; कपट करणारा. 'तैसा आतापी मावकर। ऋषीस दावी बहुआदर।' -रावि १३.१४५. ०खोर-वि. कपटी. ' जात फिरंग्याची मावखोर। ' -गापो ८५. ०भक्ति-स्त्री. खोटी भक्ति. ' मावभक्ति ते नसावी किंचित। ' -दावि ३२१. **मावा**-पु. चित्ताकर्षकता; मोहिनी. -शर. [ सं. माया ] **माविक मावित्र, मावी**-वि. मायावी; भ्रामक; लाघवी. ' परि तो मावियांचा राउ। ' -शिशु

३९४. **मावेचा**-वि. १ खोटा; कपटाचा; लबाडीचा. २ अवास्तव; पोकळ; ढोंगीपणाचा. ३ खोटें; ऐंद्रजालिक; मायावी. **मावेचा मृग**-पु. ( मारीच राक्षसानें मृगाचें रूप धारण केलें होतें यावरून ल. ) दिसण्यांत मोहक, मनोहर परंतु आंत पोकळ अशी वस्तु. **मावेचें मंथन**-न. वन्हाडगोष्टी; लग्नगोष्टी; चांभार फट; नसती उठाठेव.

**माव**—स्त्री. ( गो. ) कोणत्याहि फळाचा दळदार भाग. [ माया ]

**माव-वो**—पु ( गो. कु. ) सासरा. [ मामा ] **मावडां**-स्त्री. ( कु. ) सासुरवाड. [ मामाचा वाडा (घर) ]

**मावडा**—पु. फिकट निळा रंग. **मावडी सुरळी**-न. ( विणकाम ) फणीच्या एका घरांत काळा धागा व एका घरांत मावडा असें उभार व आडवण सर्व काळें, किनार कोणत्याहि प्रकारची, अशा प्रकारचें लुगडें.

**मावडी**—स्त्री. काइलींतील उसाचा रस ढवळण्याचा लांकडी पळा.

**मावंडोळ**—पु. ( गो. ) आग्या घणस; घोणस. [ मांडूळ ]

**मावणें**—अक्रि. सांठणें ( भांडयांत, जागेंत ). माणें पहा. ' आनंद तीचा हृदयीं न माये। ' [ सं. मा=मोजणें ]

**मावंदें-धें**—न. काशीयात्रा करून घरीं आल्यावर गंगापूजन, देवास नैवेद्य समर्पण व ब्राह्मणभोजन इ० करावयाचा विधि. समारंभ. मांउदें पहा. [ सं. मा+वद ]

**मावरुख**—पु. एक वृक्ष.

**मावली**—पु. ( कों. ) कोळिष्टकें करणारा, तंतूंचें जाळें पसरणारा कोळी.

**माव(उ)ली**—स्त्री. १ आई किंवा आईप्रमाणें मानिलेल्या वृद्ध बाईस आदरानें म्हणतात; गरीब, प्रेमळ, धर्मशील स्त्री; माउली पहा. ' मुखीं प्रगट होय जी करि सुखी जना मावली। ' –केका ७३. २ ( लडिवाळपणें ) आईस म्हणतात. ' बुझावीतां माउली काय बोले। अम्ही देवासी नाहिं पूजियेले। ' –ध्रुवचरित्र ११. ( नवनीत पृ. ४११ ). ३ ( –अव. ) जलदेवता. [ सं. मा ]

**मावशी-सी**—स्त्री. १ आईची बहीण. २ ( अश्लील ) लहान मुलींचें जननेंद्रिय. ३ पूतनाराक्षसी. [ सं. मातृष्वसृका; प्रा. माउसिआ; हिं. मौसी; कांहीं भाषांत मासी ] **मावस**-वि मावशीकडील आपल्या नात्याचीं माणसें ( बहीणभाऊ इ० ). यांच्या नांवापूर्वी लावावयाचा शब्द. ०**बहीण**-स्त्री मावशीची मुलगी. ०**भाऊ**-पु. मावशीचा मुलगा. **मावसा**-पु. मावशीचा नवरा.

**मांवसाळें**—न. मिरवणूक ( नवरदेव, मुंजा मुलगा, देव इ० कांची ). ( क्रि० काढणें; निघणें ). [ माणूस ]

**मावळ**—न. महाराष्ट्राच्या पश्चिमेकडील हद्दीचा व सह्याद्रीच्या पूर्वेकडचा प्रदेश. मुन्हापासुन आरंभ होऊन हा पूर्वेकडे चाळीस पन्नास मैलांपर्यंत पसरला आहे. [ मावळणें ] **चोवीस मावळें**-न.अव. जुन्नरपासुन चाकणपर्यंत घांटावरील बारा मावळें–१ शिवनेरी, २ जुन्नर, ३ भिमनेर, ४ घोडनेर, ५ भिननेर, ६ भामनेर, ७ जामनेर, ८ पिंपळनेर, ९ पारनेर, १० सिन्नर, ११ संगमनेर, १२ अकोळनेर व पुण्यापासुन शिरवळपर्यंत कोकणांतील मावळें:–१अंदर मावळ, २नाणे मावळ, ३ पवन मावळ, ४ घोटणमावळ, ५ पौडमावळ, ६ मोसे मावळ, ७ मुठे मावळ, ८ गुंजण मावळ, ९ वेळवंड मावळ, १० भोरखोरें, ११ शिवतर खोरें, १२ हिरडस मावळ इ०. [सं. म्लै ] **मावळा**-पु. मावळ प्रदेशातील इसम. **मावळी**-वि. मावळ प्रांतासंबंधीं; मावळांतील ( वस्तु, माल ).

**मावळण**—पु ( राजा. ) पश्चिमेकडील वारा.

**मावळंग-गा-लिंगा**—स्त्री. १ महाळुंगाचें झाड व त्याचें फळ. महाळुंगें पहा. [ सं. मातुलुंग ]

**मावळण**—स्त्री. १ आत; आत्या; बापाची बहीण. २ (कों.) मामी. [ सं. मातुलानी ] **मावळा**-पु. मामा; आईचा भाऊ. [ सं. मातुल=मामा; प्रा. माउओ=मावळा ]

**मावळणें**—अक्रि. १ अस्तास जाणें ( सूर्य, चंद्र, आकाशस्थ तारे ). २ ( ल. ) ओसरणें; नाहींसा होणें; मरणें; अदृश्य होणें ( देवी, खरूज, पुटकुळया, फोड ). ३ पाकळया मिटणें (सायंकाळीं फुलाच्या ). ४ ( ल. ) बुडणें; नाहींसें होणें; मालवणें. ( कीर्ति, वैभव, थोरवी, जीव ). [ सं. म्लै ] **मावळत**-क्रिवि. पश्चिमेकडे. ' तूं मावळत तोंड करून बैस. ' **मावळत-ती**-स्त्री. मावळण्याची जागा; पश्चिम दिशा. **मावळती बाजू**-स्त्री. ( माण. ) पश्चिम. **मावळों सरणें**-क्रि. मावळावयास आणें. मावळणें. ' कां मावळों सरला दिवो। ' –अमृ ७.१८९.

**मावा**—पु. आटवून घट्ट केलेलें दूध; खवा.

**मावा**—पु पिकावरील जंतु प्रत्येकी. हे संघ करून राहतात. बहुतेक पिकांवर मावा पडतो. हे पानांतील रस शोषून घेतात.–वि. पिवळसर हिरव्या रंगाचा.

**माविजा**—क्रिवि. ऐवजीं; बदली. ' वकलातीचे माविजा तालुका यावा. ' –रा ५.१९५. [अर. मुआवझा=बदली भरपाई]

**माश**—न. चरित. [ फा. ]

**माशि(शी)क**—न. मासिक पहा.

**माशावळण**—न. माशांच्या थव्याची चळवळ व क्षुब्धता. मासेवळण पहा.

**माशी**—स्त्री. १ मक्षिका. एक घरांत आढळणारा सपक्ष जीव, कीटक. २ नेम धरण्यास उपयोगी असें बंदुकीच्या तोंडावरच

माशीसारखें चिन्ह; मासकी; मखी. [सं. मक्षिका; प्रा. मक्खिआ; पं. मक्खी; सिं. मखी; हिं. गुज. माखी; हिं. मछिआ; बं. माछी; फ्रेंजि. मैंखी] **म्ह०** (व.) माशी पादली =माशी शिंकणें या अर्थी. (वाप्र.) **माशा उडवणें**–स्वस्थ बसणें. **माशा खाणें-गिळणें**–१ मूर्ख, गोंधळलेला, बावरा झालेला दिसणें. २ गमणें; रेंगाळणें; चाचपडणें. **माशा मारणें-मारीत बसणें**–निरुद्योगी बसणें. **माशी लागणें**–१ दागिना इ०च्या वरील मुलामा, पातळ पत्रा झिजून आंतील लाख दिसूं लागणें. २ एखादें काम चालू असतां तें मध्येंच थांबणें; अडणें. 'पण कुठें माशी लागली ?'–नाकु ३.७७. ३ मळमळूं लागून वांति होणें. **०शिंकणें**–(हानि किंवा अनर्थकारक गोष्ट घडून येण्यास क्षुल्लक कारण दाखविणाऱ्या माणसाच्या उपहासार्थ योजतात) हरकत येणें; अडथळा येणें (माशी शिंकणें ही गोष्ट अशक्य तेव्हां असेंच असंभवनीय कारण सांगून कार्य बंद टेवणारास उद्देशून उपयोग). (**नाका-तोंडावरची**) **माशी न हालणें**–गरीब स्वभावामुळें कांहीं न बोलणें. **माशीला माशी**–(नक्कल करितांना मूळच्या लेखांत शाईवर माशी बसून डाग पडला असल्यास नक्कलेंतहि तसाच डाग दाखविणें यावरून ल.) हुबेहुब, बिनचुक पण अर्थ न समजतां नक्कल करणें. **माशी हागणें**–क्रि. जनावराच्या अंगांतील व्रणांवर कीड होण्याचीं चिन्हें दिसणें. **गुळावरल्या माशा किंवा साखरेवरले मुंगळे**–जोंपर्यंत गोडी (उत्कर्षाचे दिवस) आहे तोंपर्यंत मित्र म्हणविणारे लोक. **माशांचा वाघ**–पु. माशा पकडणारा कीटक, कोळी.

**माशी**—वि. मासा नामक वजनासंबंधीं. समासांत संख्यावाचकांसह योजतात. जसें–एकमाशी–दुमाशी–तिमाशी-चौमाशी.

**माशी, माशीचें झाड**—स्त्रीन. एक झुडुप. याच्या पानाचा पलिस्तर मारण्यांत उपयोग करितात. याला अतिशय लहान, माशीसारखें फूल येतें.

**माशू(षू)क**—स्त्री. १ प्रिय; प्यारी; रमणी. २ रंडी; रखेली. –वि. प्रिय; कमनीय; रमणीय; सुंदर. 'माशूक मऊ मुखचंद्र सुकुमार पुष्पाहून अरवा।'–प्रला २३० [अर. मअशूक] **माशुकडा**–वि. सुंदर.

**माष**—पु. १ उडीद. २ (जवाहिरी धंदा) पांच, आठ किंवा दहा रतींचें वजन. [सं.] **०तैल**–न. एक औषधी तेल. पिंपळमूळ, चित्रकमूळ, पिंपळी, रास्ना, कोष्ट, सुंठ, सैंधव यांचा कल्क व उडदाचा काढा ह्यांमध्यें हें तेल सिद्ध करितात. हें अर्धांगवायूचा नाश करितें.–योर १.७६७. **०पर्णी**–स्त्री. मुसाकानी. **माषान्न**–न. उडीदाचे शिजविलेले पदार्थ. मांसान्न पहा. [सं. माष+अन्न]

**मास**—न. अनेक माशांचा समुदाय. –स्त्री. (राजा.) माशांचा थवा. [माशी] **मासकी**–स्त्री. (राजा. वा.) १ बंदुकीच्या टोंकावर नेम मारावयासाठीं असलेलें चिन्ह, खूण. २ (बे.) माशी. **मासूक**–न. (राजा.) माशी; मक्षिका. **मासूकमारा**–वि. (राजा.) माशी मरेल इतकें अतिशय जालिम. (तंबाकू, तपकीर, भांग इ०); चेटक्या किंवा अत्यंत दुष्ट व मारक दृष्टीचा (मनुष्य).

**मास**—पु. मध्य; मधील भाग. **मासावरील**–वि. (गो.) होडीच्या मध्यावरील, मधील (वल्हेकरी).

**मास**—पु महिना. बारा महिने पहा. [सं.] (वाप्र.) **मासपक्ष लागला-लोटला-सरला**–एक महिना किंवा सहा आटवडे लागले, लोटले इ०. **मासपक्षाच्या आंत**–महिनापंधरा दिवसांच्या आंत. सामाशब्द–**०दान**-न. दर महिन्यास द्यावयाचें दान. **०न्हाण-न्हाण-म्हाणें-वंदण**–न. विवाहसंस्कारास एक महिना ज्या दिवशीं पुरा होतो त्या दिवशीं वधूवरांस एकत्र स्नान घालण्याचा समारंभ; आठनहाण पहा. [सं. मास+स्नान] **०पक्ष**–पु. महिना-पंधरा दिवस. [सं. मास+पक्ष] **०वडा**–पु. (कों.) ग्रामदेवतेसंबंधीं केलें जाणारें मासकृत्य. **मासांत**–पुन. महिन्याचा अंत; चांद्रमासाचे त्रयोदशीपासून प्रतीपदेपर्यंतचे दिवस; तुटके दिवस. [सं. मास+अंत] **मासिक**–न. १ महिन्याचें वेतन. २ प्रतिमासीं निघणारें पुस्तक. ३ वर्षसमाप्तीपर्यंत, दर महिन्यास मृतमनुष्याचें करावयाचें श्राद्ध. –वि. महिन्यासंबंधीं; महिन्याचा; दर महिन्याचें. [सं.]

**मां(मा)स**—न. शरीरांतील सप्त धातूंपैकीं एक. [सं. मांस; फ्रेंजि. मस; पोर्तुजि. मास] (वाप्र.) **०कसणें**–चांगलें खालीं वर करून मांस भाजणें. सामशब्द–**०आंटी**–स्त्री. वाहेर दिसण्यांत मोटी पण दूध थोडें अशी गाय, म्हैस यांची ओटी, कास. **०कंड-कण-गंड**–न. (निंदार्थी) मांस; विदारलेलें, छिन्नभिन्न होऊन इकडे तिकडे पडलेलें मांस; घायांतून, जखमेंतून लोंबणारें मांस किंवा आंतड्याचा लोंबणारा भाग. नासणारें, वाईट, मुरदाड मांस. [मास+व्रण] **०कण**–न (कों.) शिजविण्याकरितां केलेले मांसाचे तुकडे. **०कार**–पु. (गो.) मांस विकणारा. **०कूट**–न. (गो.) मांसाचा तुकडा. **०कोथ**–पु. मांसार्बुद; चरणारा व्रण. **०भरू**–वि. दळदार; गरभरू (फळ); चांगली भरलेली (करंजी, पुरणपोळी). **०भक्षक**–वि. मांसाहारी. [सं.] **०मच्छर**–न. मांस वगैरे. **मा(मां)सल**–वि. १ मासाळ; मासानें पूर्ण असें. २ (ल.) मासभरू; पुष्ट. **मासवा**–पु. (व.) मांसाचा किंवा झाडाच्या सालीचा अनुक्रमें माणसाच्या किंवा झाडाच्या जखमेवर वाढणारा भाग. **मासव्रण**–पु. मासांतील व्रण. [सं.] **मांसाळ, मासाळ-ळा**–वि. (प्र.) मांसल; पुष्कळ मांस असलेला. 'एकें पीनावयव मांसाळें।'–ज्ञा ११.१३९. **मांसागळा**–वि. धष्टपुष्ट; मांसल. 'धष्ट पुष्ट मांसागळा।'–आमुदि २.३१. **मासार्बुद**–पु. कर्कट रोग. –राको

२६८. **मांसाहारी**-वि. मांसावर निर्वाह करणारा. **मासु(सो)रडा-डें**-पुन. ( निंदार्थी ) मासकंड पहा. **मासोंडणें**-अक्रि. (व ) अंगावर मांस वाढणें; लठ्ठ होणें. 'म्हैस मासोंडली.' **मासोळ**-वि. ( गो. ) मांसयुक्त.

**मासडभात**—न. एक प्रकारचें भात. याचा तांदूळ तांबडा व हलक्या प्रतीचा असतो.

**मासला**—पु. १ नमुना; वानगी. २ डौल; आकार; घडण; घाट; तऱ्हा; फर्मा; त्रिता. 'हे दोन्ही धोतरजोडे एका मासल्याचे आहेत.' ३ रुचि; अनुभव. 'याचे गाण्याचा मासला पाहिला.' ४ उदाहरण. 'उत्तम गुणांचा हा एक मासला आहे.' [ अर. मसल ] **मासलेदार-वाईक**-वि १ चांगल्या जातीचा; सुरेख; डौलदार, उत्तम घाटाचा, तोंडीचा; नमुनेदार; तऱ्हेदार. २ विचित्र.

**मासा**—पु. १ मीन; मत्स्य. सपृष्ठवंश प्राण्यांपैकीं अगदीं खालच्या जातींतील प्राणी. हा नेहमीं पाण्यामध्यें राहतो. श्वासोच्छ्वासाकरितां कल्ले असणें हें याचें मुख्य लक्षण आहे माशांचा उपयोग खाण्याकडे, तेल व औषधी द्रव्यें काढण्याकडे करितात. २ (सोनारी) माशाच्या आकाराचा सोन्याचा दागिना, पानडी. याच्या तोंडाजवळ वरील बाजूस एक टीक व खालच्या बाजूस एक टीक बसविलेली असुन फासा लाविलेला असतो. ३ एक मुलींचा खेळ. [ सं. मत्स्य; प्रा. मच्छ; सिं. मच्छू; हिं. म( मा )छ; बं. माछ; युरोपियनजि. मचो; आर्मेनियनजि. मथसब; पोर्तु.जि. माशे ] **म्ह०** १ जळांत राहून माशाशीं वैर. २ माशाच्या पोरास पोहावयास शिकवावयास नको. **माशांचें जाळें**-न.-१ मासे पकडण्याचें जाळें. २ ( ल. ) झिरझिरीत व विरळ विणीचें कापड. **माशांचें विष**-न. विषारी मासे चावल्यानें होणारी दाह, सूज व ज्वर हीं लक्षणें. **माशानें गिळलेलें माणिक**-न. (ल.) एखाद्यानें गिळंकृत केलेली व पुन: परत न मिळणारी वस्तु; कधीं न भरून येणारी हानि. **मास( से )बाळी**-स्त्री. माशाच्या आकाराचें स्त्रियांचें एक कर्णभूषण. [ मासा+बाळी ] **मासळी**-स्त्री. १ विक्रीकरितां इ० मांडलेल्या किंवा राशिरूपानें असणाऱ्या माशांचा ढीग. २ लहान मासा. **मासामासा**-पु. एक मुलांचा खेळ. **मासेगाळणा-गाळणें**-वि. ( विणकाम ) अतिशय विरळ विणीचा ( ज्यांतून मासा गळेल असा ) कपडा. **मासेवळण**-न. १ बावरलेल्या माशांच्या थव्याचें एकदम मागें फिरणें. २ ( जोराचा पाऊस, गढूळ पाणी इ० कारणानें होणारी ) माशांची त्रेधा, व्यग्रता, धांदल. ३ ( ल. ) ( सामा ) त्रेधा होऊन लगबगीनें मागें फिरणें व पळणें; गाळण; गडबड. 'वाघ पाहतां गायींचें मासेवळण झालें.' ४ ( समुदायाचा, व्यक्तीचा ) मोठा क्षोभ. **मासोळी**-स्त्री. १ लहान मासा. मासळी अर्थ २ पहा २ माशाच्या आकाराचा पायाच्या बोटांत घालावयाचा स्त्रियांचा एक चांदीचा दागिना. ( कु. ) मासो. ३ अतिशय मांसल कांस ( गाय, म्हैस यांची ). **मासोळी कोथिंबिरी**-स्त्री. एक अलंकारविशेष. 'खूंटा टोप असे विशाळ झुबका मासोळि कोथिंबिरी।'-अकक २, अनंत कृत सीतास्वयंवर ४३. **मासोळीबाळी**-स्त्री. मासबाळी पहा.

**मासा**—पु. १ आठ गुंजांचें वजन. २ (व्यापारी, सांकेतिक) चार आणे.

**मां(मा )सान्न**—न. माषान्न; उडदाचे पदार्थ. पूर्वी श्राद्धांत मांसान्न वाढीत असत परंतु पुढें याचा निषेध करून त्या ऐवजीं माष घेऊं लागले. यावरून माषान्नापासून मांसान्न हा शब्द अपभ्रंश व अर्थविपर्यय होऊन उत्पन्न झाला असावा.

**मासी-सीं**—सना. ( महानु. ) मजसीं; माझ्याशीं. 'माझेनि आंगलगें मासी। वैर चाळीति अहर्निशीं।'-ऋ ५५.

**मास्तर**—पु. शिक्षक; विद्यागुरु. [ इं. मास्टर ]

**माह**—पु. महिना; मास. 'यांचें देणें चालतें माहापासोन मागील गेला महिना देखील धरिलें असें.'-रा ६ १९८. [ फा. माह् ] **०ब-माह**-क्रिवि. महिन्याच्या महिन्यास. [ फा. ] **०वार, माहे(ह)वारी**-नस्त्री. १ मासिक पगार, भत्ता, नेमणूक. ( क्रि० बांधणें; बांधून देणें; ठरविणें ); घडलेल्या गोष्टींचें त्या त्या महिन्याचें ठेवलेलें टिपण. -क्रिवि. महिनेवार ( पैसे देणें, हिशेब चुकता करणें इ० ). **माहान**-वि. महिन्याचा. 'सबब रोजमरा एक माहान.'-वाडबाबा १.२७.

**माहतानी**—क्रिवि. ताब्यांत; सत्तेखालीं. [ अर. मा-तह्तानी ]

**माहदत-असारी**—वि. स्नेहांकित. [ फा. मवद्दत्-आसार् ]

**माहनमूळ**—न. एक प्रकारचें लोणच्यांत घालावयाचें मूळ. माइनमूळ पहा.

**माहवल-मक्सूद**—स्त्री. विनंति [ फा. मुहव्वालि मक्सूद् ]

**माहवल-मराम**—स्त्री. विनंति. [ फा. मुहव्वलि मराम् ]

**माहसरा**—पु. वेढा. 'माहसऱ्या अलीकडे तर्फैनच्या कसुरामुळें.'-थोमारो १.२२३. [ अर. महसूर=वेष्टित ]

**माहा**—वि. महान्; मोठें. 'कीर्तनें माहादोष जाती।'-दा ४.२.२७. महत् पहा. [ सं. महान् ]

**माहाग, माहागणें, माहागाई, माहागिरी, माहात, माहार, माहाल**— महाग, महागणें इ० पहा.

**माहात्म-त्म्य**—न. १ महिमा; मोठेपणा; थोरवी; प्रभाव; तेज. 'निज-पद-विभवाचें काय माहात्म्य आहे।'-नरहरि गंगारत्नमाला (नवनीत पृ. ४२६). २ शौर्याचें, अद्भुत कृत्याचें वर्णन; दंतकथा, वीरचरित्र. ३ चैत्रादि महिन्यांत करावयाचीं पुण्यकर्मे व त्यापासून मिळणारें पुण्य यांचें वर्णन ज्यांत आहे असे

बारा महिन्यांतील प्रत्येक महिन्यासंबंधीं वर्णनपर ग्रंथ. उदा० वैशाखमाहात्म्य, ज्येष्ठमाहात्म्य इ०. ४ पुराण; वर्णनपरग्रंथ. उदा० देवीमाहात्म्य; तापीमाहात्म्य. [सं.]

**माहालदार**—पु. न्हावी. 'हाडपे चोर माहालदार।'–दावि ६९. [महाली]

**माहावाक्य**—न. तत्त्वमसि हें वाक्य.(प्र.) महावाक्य पहा. 'माहावाक्य उपदेश भला।' –दा५.६.११. प्रज्ञानं ब्रह्म हें ऋग्वेदांतील, अहं ब्रह्मास्मि हें यजुर्वेदांतील, तत्त्वमसि हें सामवेदीय व अयमात्मा ब्रह्म हें अथर्ववेदीय अशीं चार महावाक्यें आहेत. [सं. महावाक्य]

**माहि-ही**—स्त्री. छत्र; उंच छत्री. –शर. 'माहि मेघडंब्रे सूर्यापानें।'–दा ४.५.२०. –पु. मत्स्य वगैरे सन्मानदर्शक चिन्ह; मकरध्वज. 'माहि मोर्तबे तगटी ढाला।'–रूप्र२१.४३. **०दार**-वि. १ माशाचें चिन्ह असलेलें निशाण धारण करणारा; मकरध्वजी. २ छत्रधर. [फा.] **०म(मु)रातब**-पु. १ मत्स्य व सोन्याचे दोन गोल मिळून होणारें व हत्तीवरून मिरवावयाचें बहुमानाचें चिन्ह. हा मान फक्त राजांना व मातबर सरदारांना मिळालेला असतो. २ मोगल बादशहाकडून महादजी शिंद्यांनीं पेशव्यांसाठीं आणिलेलीं सन्मानचिन्हें दोन मुखवटे व दोन अब्दागिऱ्या मिळून मिरवावयाचें एक राजचिन्ह. [फा. माही मरातिब] **माही(हि) मोर्तब**-न. अलंकार; सरंजाम. 'सरज्या तोरड माहीमोर्तब शिवाजीला।' –ऐपो २२. [फा.]

**माहिती**—स्त्री. परिचय;ज्ञान;दखलगिरी; माहितगारी. [अर. माहीयत्] **माहितगार**-वि. १ परिचित; माहिती असलेला. २ वाकबगार. [फा.] **माहितगा(गि)री**-स्त्री. माहिती. **माहीत**-स्त्री. परिचय; परिज्ञान (विद्या, गोष्टी, स्थळें यांचें). 'या प्रांतांतील काटक वगैरे माहीत यांस वाटेची व मुक्कामाची माहीत पुसत होते.' –ख ११.५७१२. –वि. १ ज्ञात; परिचित. २ जाणता; माहितगार. 'श्रीमन्त गैर–माहित व नानाप्रमाणें दुसरा कार्भारी कुणी माहीत नाहीं.' –ख १०.५५५०.

**माहिरू**—वि. कपाळावर तिकोनि पट्टा असलेला (घोडा). –अश्वप १.१०४.

**माहिष**—न. म्हशीपासून मिळणारी कोणतीहि वस्तु (दूध, लोणी, शेण इ०). [सं.]

**माही**—पुस्त्री. (बायकी) माघ महिना. –वि. माघ महिन्यांतील. [सं. माघ]

**माही(हि)ना, माहाना**—पु. मासिक पगार. –क्रिवि. दरमहा. [फा. माहाना; माहीना]

**माहुटी, माहुटीचें पान**—स्त्रीन. घराच्या छपराच्या शेवटास बसविलेली लांकडाची आडवी फळी; छप्पराच्या पागोळीच्या खालीं वाशाला मारलेली आडवी फळी.

**माहुर**—वि. मधुर; गोड. [मधुर]

**माहुरा**—पु. (ना.) सराव; संवय; राबता.

**माहुरा-री**—वि. माहूर देशासंबंधीं; (म्हैस इ०).

**माहु(व्ह)रें**—नअव. नदी इ०तील धरून आणलेले, विक्रीस मांडलेले मासे.

**माहुली**—स्त्री. एक झाड. याचीं पानें बरींच मोठीं असून त्यांच्या पत्रावळी करितात.

**माहुळुंग-गी**—(प्र.) महाळुंग, महाळुंगी पहा.

**माहूत-द**—पु. हत्ती हांकणारा, राखणारा; महात. [सं. महामात्र]

**माहे**—पु. महिना. हा शब्द फक्त कागदोपत्रीं महिन्याच्या नांवामागें जोडतात. उदा० माहे मोहरम; माहे चैत्र. [फा. माह्] **०गुदस्त**-पु. गेला महिना. [फा. माह्+गुदश्त] **०गुदस्त-स्तां**-क्रिवि. गेल्या महिन्यांत. [फा. माह्गुझश्ता] **०दरमाहे**-क्रिवि महिन्याच्या महिन्यास; माह-ब-माह.

**माहे**—क्रिवि. मध्यें. 'गवतमी प्रवेशली जळमाहे।' [सं. मध्य]

**माहेर, माहेरघर**—न. १ लग्न झालेल्या मुलीच्या आईबापांचें घर; तिच्या सासरहून भिन्न असें आप्तस्वकीयांचें घर. २ (ल.) आसरा; विश्रांतिस्थान; सुखाच्या आश्रयाची जागा. 'साधुसंतांचें माहेर। बाप रखुमादेवीवर।' ३ उत्पत्तिस्थान; जन्मस्थान. 'ना तरी सकळ धर्मांचें माहेर।' –ज्ञा १.३१. ४ मायबाप. 'जरी माहेरें श्रीमंतें होतीं। तुम्हा ऐसीं।' –ज्ञा ९.३. [सं. मातृगृह; प्रा. माइघ(ह)र; गुज. माहीरुं] **म्ह०** माहेराची पेज सर्वांगास तेज (घरच्या साध्या अन्नाची बरोबरी वशासहि येत नाहीं या अर्थी). **माहियेरें**-वि. मायेचें; माहरच. –शर. **०पण**-न. माहेरीं राहणें. **०वाट**-स्त्री. १ स्त्रियांच्या केसांचा उजवीकडे काढलेला भांग; डावीकडच्या भांगाला सासुरवाट म्हणतात. २ माहेरघर. **०वाशीण-वासी, माहेरकरीण**-स्त्री. लग्नानंतर आपल्या माहेरीं रहावयास आलेली मुलगी; माहेरीं आलेली स्त्री. **०वाशीण मुरडणें**-माहेरीं आलेली मुलगी परत सासरीं जातांना तिला मुरड घातलेली करंजी खावयास घालणें (म्हणजे ती मुलगी सासरहून माहेरीं लौकर परत येते अशी समजूत आहे). **०वास**-पु. लग्नानंतर मुलीचें माहेरीं राहणें.

**माहेवणी**—स्त्री. १ गरोदर स्त्री. 'माहेवणी प्रयत्नेसीं। चुकवीजे सेजे जैसी।' –ज्ञा १८.८६६. २ रजस्वला स्त्री. 'कीं माहेवणी पापियें। उघडी केली विपायें।' –ज्ञा १६.१४४. [सं. मास; म. माह]

**माहेश्वरधूप**—पु. सरक्या, मोराचीं पिसें, रिंगणीचीं फळें, शिलारस, दालचिनी, जटामांसी, मांजराची विष्टा, नखला, वेखंड,

केस, सापाची कात, हस्तिदंत, शिंग, हिंग, व मिरीं या सर्व वस्तू समभाग घेऊन त्यांची केलेली धुरी. स्कंदोन्माद, पिशाच्च, राक्षस व देवग्रह यांचे आवेश व तज्जन्य ज्वर यांचा नाश करण्यास ही धुरी उत्तम आहे. -योर १.३५८. [सं.]

**माहो**—पु. माघ मास. 'माहो शुद्ध दशमी पाहुनी गुरुवार। केला अंगीकार तुका म्हणे।' -तुगा ४८६. [सं. माघ] **म्ह०** माहो आणि हिंवाचा लाहो.

**माहोरा**—पु. (व.) संवय; अभ्यास; माहुरा पहा.

**माळ**—स्त्री. १ फुलांचा हार; माला. २ फुलांतील पाकळ्यांचा घेर, दलपंक्ति. संख्यावाचकासह समासांत योजतात. उदा० एक माळ, दुमाळ, तिमाळ इ०. ३ रत्नें, मणी यांची माला; हार; स्मरणी. ४ (ल.) सर; हार; माला. ५ (सामा.) वस्तूंची परंपरा, साखळी (रहाटगाडग्यांतील लोटयांची, वस्तु हातोहात देण्याकरितां मजुरांची, मनुष्यांची, हरिदासांची, आळीपाळीनें काम चालविण्याकरितां याज्ञिकांची इ०). (क्रि० लावणें; लागणें). परंपरा. 'म्हणोनि वैष्णव कुळमाळ। वंदिली सकळ ग्रंथार्थी।' -एभा १.१३८. ६ विहीर इ०कांतील पाणी वर आणण्याकरितां खापेकडांचे दोन बाजूस वळलेली, लोटे बांधलेली रहाटगाडग्याची दोरी. ७ (ल) नवरात्रांतील प्रत्येक दिवस (कारण नवरात्रांत प्रत्येक दिवशीं नवीन फुलांची माळ बांधावी लागते.) 'आजची कितवी माळ आहे?' ८ (विणकाम) गती देण्याकरितां रहाटाला व कांडी भरण्याच्या चातीला जोडणारा सुताचा पट्टा, सुतळी. ९ दोराची शिडी. 'दिल्लीचा किल्ला अपेशी, पांच सात रोजांत हल्ला करून माळा लावून हस्तगत केला.' -भाव ९१. [सं. माला] (वाप्र.) **०आंखडणें**-(कों.) रहाटगाडग्यास एक दांडकें लावून त्यावर माळ अडकवून ठेवणें (रहाट चालविण्याची आवश्यकता नसतांना माळ पाण्यांत राहून कुजूं नये म्हणून). **०गौळ्याची**-(ढोबर म्हैस खेळ) मेलेल्या (बाद झालेल्या) दोन दोन गड्यांनीं एकमेकांचा हात धरून बाकीच्यांस शिवावयास जाणें. **०घालणें**-१ लग्नांत वरल्याची खूण म्हणून वराच्या गळयांत वधूनें व वधूच्या गळयांत वरानें माळ टाकणें. 'लग्नार्थी हिंडतां भूमंडळ। त्यासीं राजकन्या घाली माळ।' २ पंढरीचा वारकरी होणें; दर शुद्ध एकादशीस पंढरीची वारी करणें (पंढरीचे वारकरी संप्रदायास अनुसरून वारी स्वीकारल्यावर गळयांत तुळशीच्या मण्यांची माळ घालतात. यावरून). **संसाराची-कामाची)-माळ घालणें-पडणें**-संसाराची, कामाची व्यवस्था एखाद्याच्या गळयांत टाकणें, पडणें. एखादें काम एखाद्याकडे सर्वथैव सोंपविलें जाणें. 'मराठी काव्याचें काम करणारा दुसरा कोणी पुरुष तयार असता, तर त्यांनीं त्याची माळ आनंदानें त्याच्या गळयांत घातली असती.' **०घेवन-बसप**-(गो.) एकसारखी वाट पाहणें; धोसरा काढणें. **एका माळेचे मणी**-पुअव. (एका माळेंतले सगळे मणी सारखे असतात. यावरून ल.) एकासारखे एक (वाईट) लोक. सामाशब्द- **०काठी**-स्त्री. रहाटगाडग्याची माळ इकडे तिकडे सरूं नये विवक्षित जागेंतून जावी म्हणून विहिरींत आडवा बसविलेला लाकडाचा दांडा. **०खंड**-न. (कों.) १ रहाटगाडग्याच्या भोंवतालची कांहींशी मोटी माळ. २ जुन्या झालेल्या माळेंतून खापेकडे काढून टाकल्यावर तिच्या राहिलेल्या दोऱ्या; तुकडे. यांचा दोऱ्यांप्रमाणें उपयोग करितात. [माळ+खंड] **माळका**-स्त्री. १ माळ; ओळ; रांग; परंपरा (वस्तु, सजीव प्राणी यांची). (क्रि० लावणें; लागणें). २ (कुणबाऊ) गप्पागोष्टी. [सं. मालिका] **माळणें**-सक्रि. १ डोक्यांत फुलें, फुलांची माळ घालणें. 'गौरकांति तारुण्यभार। माळिले सुगंधपुष्पाचे हार।' -सिसं ४७.१५८. २ माळेंत ओंवणें (फुलें); माळ गुंफणें. **माळप**-सक्रि. (गो.) डोक्यांत घालणें (फुलें). **माळाकार**-पु. माळी; माळा करणारा. 'माळाकार तरूंचें घेतो फळ पुष्प जेवि तेंवि नृपा।' -मोसभा ४.२४. [सं. मालाकार] **माळादंड**-पु. फुलांचा हार. 'कंठीं रुळताति अलौकिक। माळादंड।' -ज्ञा ११.२२०. **माळिका-घटी**-स्त्री. रहाटगाडगें; घटीयंत्र. 'संसारकूपाचां पोटीं। कर्मे माळिका घटीं।' -ऋ ३०.

**माळ**—पु. १ खडकाळ किंवा नापीक असा भूमीचा उंच व विस्तृत प्रदेश; मैदान; डोंगरमाथा; सपाटी; पठार. 'गोंवऱ्या आणाया जावें माळावरी।' -रामदासी २.१३८. २ घराचे वरचा लहान मजला. याची जमीन (तक्तपोशी) कड्यांच्या ऐवजी बांबूचे तुकडे आडवे बसवून त्यांची केलेली असते म्हणून हा माडीहून भिन्न आहे; माळा. -वि. ओसाड प्रदेश. [सं. मालम् = पठार] (वाप्र.) **माळावरचा धोंडा, माळधोंडा**-पु. १ एकदां झालेला व्यवहार परत फिरणार नाहीं अशा अर्थाचा भाषणसंप्रदाय. खरेदी करणाराच्या स्वाधीन पशु, जिन्नस इ० करतांना विकणारा इसम हा शब्द योजतो. खारीमाती पहा. २ टोणपा; मठ्ठ मनुष्य. **माळावरची माती**-(ल.) वाटेल त्यानें वाटेल तसा उपयोग करावा अशी वस्तु. **म्ह०** माळावरची माती कोणींहि उचलावी. सामाशब्द- **०जमीन-रान**-स्त्रीन. खडकाळ, नापीक असा उंचवटयावरील जमिनीचा विस्तृत भाग; मैदान; सपाटी; रान. २ (जमाबदीसंबंधीं) डोंगराच्या चढणीवरील भुकिस्त पण लागवडीची जमीन. [माळ+जमीन] **०ढोंक**-पु. एका जातीचा पक्षी. **०धोंडी**-स्त्री. माळावरील दगड. **०पटणी**-स्त्री. भाताची एक जात. **०भूमि-भोंई**-स्त्री. डोंगराळ भाग. **०मुरु(र)ड-मुरडाण**-पुन. माळ व त्यांतील ओढयाच्या वळणाखालील वाकडीतिकडी जमीन. 'काळीनें झोका दिल्हा पण माळ मुरड बरें पिकलें.' [माळ+मुरडणें] **०रान**-न. माळजमीन. [माळ+रान]

०वट-वद्-वि. १ माळजमीन फार असलेला (देश, प्रांत). २ माळ किंवा माळजमीन यांच्या सारखा-संबंधीं (भूमि, जमीन). [माळ+वट] ०शिकारी-ऱ्या-वि. (हरिण, ससे, कोल्हे इ०. कांची) माळावर शिकार करणारा. ०शिकारी हरिण-न. माळावर ज्याची शिकार करतात असें हरिण; हरणाची एक जात. [माळ+शिकारी+हरिण] ०शेण-न. माळावरचें शेण; रानगोवरी; रानशेणी.

**माळ**—पु. (बागलाणी) बोगदा.

**माळगी**—स्त्री. (व.) कोनाडा. हा शब्द लिंगायत वाणी लोकांत वापरतात.

**माळंवचा**—पु. शेतांत पाखरें राखण्यासाठीं केलेला माळा. माळोंचा.

**माळवान्**—स्त्री. (हेट. नाविक) पश्चिम दिशा; बाहेरची बाजू. [मावळत]

**माळवी, माळवाई**—वि. माळवा प्रांतांतील. [सं. मालव] **माळवी गोखरू**-पु न. एक वनस्पति.

**माळवें**—न. बागाईती जिन्नस; मळ्यांत उत्पन्न केलेला भाजी पाला. [मळा]

**माळसात**—स्त्री. १ भाजीपाला विकण्याची शहरांतील जागा; मंडई. २ (बाजारांतील, शहरांतील) माळ्यांची आळी ३ माळ्यांची जात.

**माळहट**—पु. भाजीबाजार; मंडई. [माळी+हाट=बाजार]

**माळा**—पु. १ घराच्या तुळयांवर लाकडी कडया आडव्या पसरून केलेली जागा; मजला; छपराखालीं काढलेली टेंगणी, बसकट माडी. २ शेत राखणाऱ्या मनुष्यास बसण्याकरितां शेतांत केलेली उंच माचोळी; शेतांतील पांखरें हाकण्याचें ठिकाण. ३ टेहळणीची माचोळी; शिकारीकरितां झाडावर केलेली जागा. ही झाडाच्या १२-१३ हात उंचीवर खाटलें बांधून करतात. माळयावर कोण आहे हें जनावरास दिसूं नये म्हणून झाडाच्या डाहाळया तोडून त्या माळयाच्या चौफेर व खालील बाजूस लावतात. ३ पहाड; पायाड (घर बांधावयाच्या वेळचा) [मच्] **माळवद**-न. १ घराच्या तुळवंटावर कळकाच्या कांबी आडव्या बसवून त्यांवर माती पसरून केलेली सपाट जमीन; धाबें. 'भिंती माळवदें पडती।'-दा ३.७.१४. २ पोटमाळा; छप्पर. **माळवदी**-वि. १ असली छावणी असलेलें (घर). २ पोटमाळा असलेलें (घर.) [माळा+वत] **माळोत्रें**-न. (कों.) माळयावर जाण्याचें दार. **माळोद**-न. माळवद पहा.

**माळी**—स्त्री. १ खाण 'उपनिषदर्थाची माळी-। माजीं खांडिली।'-ज्ञा १८.३५. २डोंगर पठारावरील लागवडीची जमीन; पठार. ३ माळा; वरचा मजला; माळयावरची खोली; माडी. ४ झाडाची आडवी फांदी. 'आड फुटती माळिया।'-ज्ञा१५.१५०. **माळिवरा**-पु. माडी. 'ओवरा ओसरी माळिवरा।'-वसा १४.

**माळी**—पु. फुलारी; माळाकार; बागाइत्या; बागवान. २ माळी जातींतील एक व्यक्ति; खंडानें अगर अर्धलीनें शेती करणारा शेतकरी. [सं. माली] **म्ह**० माळयाची मका आणि कोल्ह्यांचें भांडण (दोघांपैकीं एकाचाहि संबंध नसणाऱ्या मालाविषयीं दोन पक्षांचें भांडण या अर्थी योजतात). **माळगंड**-पु. (निंदार्थी) माळी. **माळव(वा)डा, माळेआळी**-पु.स्त्री. माळयांची वस्ती असलेला पुरा, मोहला, वाडा (गांवांतील, शहरांतील). [माळी+वाडा] **माळीण**-स्त्री. १ माळी जातीची स्त्री. २ नाकांत उद्भवणारी दुःखदायक पुटकुळी. फुलांचा वास घेतल्यानें ही जाते. ०म्हेतर-पु. (व्यापक) माळी किंवा त्याच्या वर्गांतील इतर लोक. **माळेवोळ**-स्त्री. भाजी विकणाऱ्या माळयांचा बाजार. 'मोतियांची गोणी माळेवोळीं नेली।'-तुगा ३०६८.

**माळीक**—वि. (बे.) सारखा.

**माळुंग-गी**—स्त्रीन. महाळुंग पहा. [सं. मातुलुंग]

**माळुंड**—न. (गो.) दुतोंडें; मांडूळ.

**माळुंड महिना**—पु. (गों.) पौष महिना.

**माळूं**—पु. मृदंगाच्या तोंडावरचें कातडयाचें कडें किंवा वादी.

**माळोंचा**—पु. १ शेतांतील पिकावरील पक्षी हांकलण्यासाठीं शेतामध्यें केलेला माळा. २ जिन्नस, धान्याचीं पोतीं ठेवण्याकरितां खोलीच्या कोंपऱ्यांत केलेली माचोळी. ३ घराच्या वरचा मांळा. ४ (व.) टेंगणा माळा. [माळा]

**माळोमाळ**—क्रिवि. रानोमाळ; दशदिशा 'भयाभीत गज अश्व शूर शत्रुसैन्य माळोमाळीं।'-ऐपो २६८. [माळ]

**मालोवाळीं**—क्रिवि. चोहोंकडून. 'एवं माळोवाळीं उत्तरोत्तरु।'-ज्ञा १५.१९८.

**माळ्या**—स्त्री. राव; काकवी.

**माक्षिक**—न. १ एक विशिष्ट खनिज पदार्थ. याचे सुवर्ण व रौप्य माक्षिक असे दोन भेद आहेत. अशक्त माणसास शक्ति वाढण्यासाठीं हें देतात. [सं.]

**माक्षिक**—न. मध. -वि. मधमाशा किंवा माशांसंबंधीं. [सं. मक्षिका]

**मिआ-आं**—सना. मीं; म्या. प्रथमपुरुषवाचक मी या सर्वनामाचें तृतीयेच्या एकवचनाचें जुनें रूप. 'तेआं साष्टांगीं नमस्कारु केला मिआं।'-दाव ४. [मी]

**मिआना**—स्त्री. एक गुन्हेगाराची जात. ही चालण्यांत मोठी चपल आहे. हे लोक रात्रींतून ४० ते ६० मैल चाल करून चोरी करून उजाडण्यापर्वी घरीं येतात. -गुजा ८२.

**मिख**—न. मिष; सोंग; बतावणी; वेषांतर 'ना तें सांवळें आकाश पाल्हलें। लोहांचेनि मिखें।' –शिशु १०२०. [सं. मिष]

**मिचकट**—वि. घाणेरडें; शिडबिडीत (भांडें इ०). **मिचकटणें**–अक्रि. (भांडें, हात इ०) खराब होणें; वाईट होणें; बरबटणें; लिडबिडणें.

**मिचकट**—वि. काळाकभिन्न; काळा कुळकुळीत (काळा या रंगाचा अतिरेक दर्शविण्यासाठीं काळा या शब्दास जोडून योजतात). [सं. मषी; म. मस]

**मिचकणें, मिचकाव(कवि)णें**—सक्रि. १ (डोळे, तोंड इ०) त्वरेनें मिटणें आणि उघडणें; (डोळ्यांची) उघडझांप करणें; एखाद्याला एखादी खूण करण्याकरतां डोळे झांकून उघडणें: नेत्रसंकेत करणें. २ अतिश्रमामुळें, दुःखामुळें डोळ्यांची एकसारखी उघडझाप करणें. 'कासावीस गरुड होत। नेत्र मिचकावून मुख पसरित।' –ह ३१.११७. [सं. श्मीलनम्] **मिचकावणी**–स्त्री. डोळे मिचकावण्याची क्रिया; निमिषोन्मेषण. **मिचका**–वि. मिचमिचीत डोळ्याचा (मनुष्य); एकसारखी उघडझांप होणारा (डोळा). **मिचक्या-मिचमिच्या**–वि. डोळे मिचकावण्याची संवय असलेला; डोळे मिचकावणारा.

**मिचकूट**—न. (गो. ख्रिस्ती) लोणचें.

**मिचकूट, मिचकुटणें**—मिचकट, मिचकटणें पहा.

**मिचमिच**—स्त्री. १ जलद खातांना होणारा आवाज; मिटकी; जबडयाची त्वरित उघडझाक (क्रि० करणें; वाजणें). २ डोळ्यांची उघडझाप. [ध्व.] **म्ह०** खाणें थोडें आणि मिचमिच बहुत. **मिचमिच-मिचां**–क्रिवि. १ मिटक्या मारून; खातांना तोंडाच आवाज करून. २ उघडझांकीनें; मिचकावून. (डोळे इ०). **मिचमिचीत**–वि. १ बिलबिलीत; बेचव; चांगल्या तऱ्हेनें न शिजविलेलें (अन्न). २ मिचका (डोळा); मिचक्या डोळ्याचा (माणूस).

**मिजरफी, मिजराफ**—स्त्री. तंतुवांद्य वाजविण्याकरितां बोटांत घालावयाची एक प्रकारची तारेची आंगठी; नखी. [फा.]

**मिजागरे-री**—नस्त्री. बिजागरी-रें पहा.

**मिजाज-स**–स्त्री. दिमाख; ताठा; ऐट; डौल; अभिमान; २ तब्येत; प्रकृति. ३ बुद्धि. 'तस्मात् याची मिजाज कायम नाहीं.' –ख ८.३९१५. [अर. मिझाज्] **म्ह०** मिजाज-स बादशहाची आणि अवलाद भडभुंजाची. (वाप्र.) **०जाणें**–इतराजी होणें. **०ठेवणें-राखणें**–तब्येत सांभाळणें. **मिजाशींत येणें-चढणें**–गर्वानें फुगणें; डौलांत असणें. सामाशब्द– **०खुशी**–स्त्री. खुशाली. **०खोर-दार, मिजाजी-शी-सी**–वि. १ मिजाशीनें वागणारा; चढेलपणानें किंवा प्रतिष्ठितपणानें वागणारा; गर्विष्ठ. २नाजुक प्रकृतीचा; तब्यती; लहरी. ३ डामडौलाचें; थाटमाटाचें. **०मान्दगी**–स्त्री. प्रकृतीचें अस्वास्थ्य. 'राजाची व रघोत्तमराव यांचेही मिजाजमान्दगीकरितां राहिले.' –रा ५ १५७. **मिजाण**–स्त्री. १ तब्यत; प्रकृति. २ चोखंदळपणा; लहर. [फा.]

**मिजात-द, मिजाती-दी**—मिजाज, मिजाजी पहा.

**मिजान**—स्त्री. १ तुला; प्रमाण. २ (व.) एकंदर बेरीज; एकूण बेरीज. [अर. मीझान्]

**मिज्रीकम, मिद्रीकांव**—स्त्री.(गो.) सब्जा; एक वनस्पति.

**मिटका**—पु. ओठांची मिटलेली स्थिति; (डोळे, फुलें, कागद, पानें इ० ची) चिकटलेली, मिटलेली, दाबून बसलेली स्थिति; चिकटणें. (क्रि० बसणें; पडणें). २ मिठी. (क्रि० मारणें). 'कमरेस मिटका मारला.' [मिटणें] **मिटकावणें**–सक्रि. १ घट्ट बंद करणें; दाबून धरणें (डोळे इ०). २ कान टवकारणें, उभारणें. **मिटकी**–स्त्री. एकमेकांस चिकटलेले ओंठ उघडतांना होणारा आवाज; पदार्थ खातांना होणारा मिट्ट मिट्ट असा आवाज. **मिटक्या मारणें**–प्रेमानें गोडी चाखणें. 'तो नित्य तृप्त भगवान् विदुरगृहीं भोजनांत दे मिटक्या।' –भोउद्योग ७.७६. २ (ल) आशा धरून बसणें; जिभल्या चाटणें **मिटमिट**–स्त्री. मिटकी; खातांना तोंडाचा होणारा आवाज. **मिटमिट-मिटां**–क्रिवि. १ मटमटां; मिटक्या मारून. २ मिचकावीत; उघडझाप करीत. **मिटमिटीत**–वि. १ नीरस; बेचव; कवकवीत (भाषण, खाद्य, काम इ०). २ क्षुल्लक; अत्यल्प; तुटपुंजें (देणगी, खर्च). **मिटमिट्या**–वि. कृपण; कवडीचुंबक. [ध्व.] **म्ह०** मिटमिट्या शेंबूडचाट्या.

**मिटणें**—सक्रि. १ (ओंठ, हाताची मूठ, पापण्या, दाराचीं झडपें, फुलाच्या पाकळ्या इ०) बंद होणें; एकत्र होणें. २ (ल.) बंद करणें; शेवटास नेणें; संपविणें; संपणें. (भांडण, तंटा). ३ पुसून टाकणें; घालविणें. ४ –अक्रि. (रोग किंवा आजारीपणा) संपणें; नाहींसें होणें.

**मिटान**—वि. (व.) मेणचट; ओशट; तेलकट.

**मिटुका**—पु. नांगराचें रुमणें धरण्याकरितां त्यास बसविलेला लांकडी दांडा.

**मिटें**—न. (गो.) गोडें पाणी. [मिष्ट]

**मिट्टी**—स्त्री. (विटीदांडूचा खेळ) डाव्या किंवा उजव्या मुठीवरून विटी उडवून दांडूनें तिला ठोला मारण्याची क्रिया; मुंड (क्रि० मारणें). [सं. मुष्टि]

**मिठ**—न. (कों.) मीठ पहा. **०पाणा**–पु. मिठाणा; भाजलेले वाल इ० कडधान्यें यांची मीठ घालून शिजविलेली उसळ. **०वणी**–न. मिठाचें पाणी. –स्त्री. (राजा.) स्वयंपाकाला लागणारी मीठ ठेवण्याची परडी, पाळें. [मीठ+पाणी] **मिठागर**–न. मीठ तयार करण्याची जागा; मिठाचें शेत [मीठ+आगर] **मिठागरी,**

**मिठागीर**—मीठ बनविण्याचा धंदा करणारी आगरी जात; या जातींतील व्यक्ति. **मिठागरीण**—स्त्री. मिठागरी जातीची स्त्री. **मिठाणा**—पु. खारवून शिजविलेलें कडधान्य. –पु. खारी डाळ. **मिठाणें**—न. मीठ ठेवण्याचें मातीचें भांडें, परळ. **मिठाभोवो**—न. (गो.) १ मिठाचें पक्वान्न. २ (ल.) निरुपयोगी वस्तु.

**मिठण, मिठाण**—न. गर्दी; एकत्र जमणें; अनेक माणसांचा समुदाय; विकार गर्दी. (क्रि० घालणें; पडणें; होणें) [मिटणें]

**मिठा, मिठडा**—वि. गोड; मिष्ट; रुचकर; मिठास. [सं. मिष्ट; प्रा. मिट्ठ] **मिठाई**—स्त्री. खाजा, पेढे, बर्फी इ० साखरमिश्रित गोड पदार्थ. [हिं.] **मिठा ठक**—वि. गोडगोड बोलून फसविणारा. ०**बार**—पु. पहिला बार, बहर; पहिलें पीक. ह्याच्या उलट खट्टाबार ०**लिंबु**—न. साखरलिंबू. **मिठांश-शु**—पु मिष्टांश; गोडी. 'हें न निवडे मिठांशु । अमृतीं जेवी।' –अमृ ५ ७. **मिठास**—स्त्री. स्वादिष्टपणा; माधुरी; मिष्टता; गोडी. **मिठा(ठ्ठा)स, मिठ्ठा**—वि. गोड. **मिठाक्षर**—न गोड शब्द. **मिठी**—स्त्री. १ (गोड पदार्थ फार खाल्ल्यानें उत्पन्न झालेली) अरुचि; वीट; तिटकारा, शिसारी. (क्रि० बसणें). २ आवड; छंद; उत्कट इच्छा. [सं. मिष्ट] ०**पडणें**—गोडी लागणें; ऐक्य पावणें. **मिठेचावल**—पु. (व.) गूळ व गरम मसाला घालून केलेला भात; गूळभात. [हिं.]

**मिठी**—स्त्री. १ दृढालिंगन; पकड. (क्रि० बसणें) २ ऐक्य; लीनता; लय. 'ते उभय बोधांची मिठी। अक्षरु पुरुषु।' ज्ञा १५.५१४. ३ संकोच; बंदी. 'कानाची नुपडी निमटली मिठी।' –एभा १५ १४. ४ आंठी. 'भ्रुकुटीस घालून मिठी।' –दा ३. १०१८. ५ (अव.) पाड; झडप; उंड्यावर उडया. 'यंदा आंब्यावर मिठ्या पडल्या.' ०**देणें**—बंद होणें; मिटणें. 'चंद्रोदयीं कमळवनें। मिठी देती।' –ज्ञा १८.७३५. ०**मारणें**—आलिंगन देणें; हातांनीं एकमेकांस बळकट धरणें ०**सात्रकी**—स्त्री. घोड्याची एक चाल 'मिठी सात्रकीची मर्यादा अशी आहे कीं घोड्याचे पुढले पाय सात्रक आणि मागचे दुडकीचे रहावे.' –अश्वप १.१९४.

**मिठ्या**—पु. मुठया. मिटुका पहा.

**मिडकणें**—अक्रि. आशाळभूत होणें; धांधावणें; जीव टाकणें; भुणभुण लावणें; तळतळणें. 'अन्नासाठीं मिडकलीं। झडा टाकिलीं।' –दा ३.५.७. [ते.]

**मिडगण, मिडोगण-णी**—स्त्री. स्तुति. 'काश्मीरीं न करावी। मिडगणें जें।' –ज्ञा १३.३१९.

**मिडगणें**—न. फराळ; उपहार.

**मिडमिडा**—वि. मिणमिणा; अंधुकपणें जळणारा (दिवा). [ध्व.]

**मिडवा मिरवणें-दाखविणें**—मिरवा मिरवणें पहा.

**मिडी**—स्त्री. (बे.) वांगी, पडवळ, दोडका, वाळूक इ० चें कोवळें फळ. [का.]

**मिण(न)धा**—वि. १ मिंधा पहा. 'मिणधा त्यापाशीं वेद वादु।' –एभा १३.४६५. २ कपटी. [मिंधा]

**मिणमिण**—स्त्री. हलक्या किंवा खोल आवाजाचें भाषण; कुरबुर; कुरकुर. (क्रि० लावणें; करणें). [ध्व.] **मिणमिणा**—क्रिवि. मंदपणें; अंधुकपणें. म्ह० मिणमिण दिवा कृपणाची सेवा. **मिणमिणणें**—अक्रि. १ मंद जळणें; अंधुकपणानें जळणें. २ (ल.) हलक्या आवाजानें किंवा खोल स्वरानें, रडकें रडकें, स्तिमितपणानें बोलणें **मिणमिणा-ण्या**—वि. १मंद; क्षीण; अंधुक; बारीक ज्योतीचा (प्रकाश). २ हळु बोलणारा, बारीक आवाजाचा. ३ सुस्त; मंद; रेंगाळणारा; मेंगलगाड्या. ४ (ल.) मनात कुढणारा; आंतल्या आंत जळफळणारा. **मिणमिणीत**—वि. मंदपणें जळणारा; अंधुकपणें प्रकाशणारा.

**मित**—वि. १ मोजलेला; मोजका. २ (ल) मध्यम; माफक; योग्य प्रमाणांत असलेला; जितक्यास तितका; थोडका. [सं. मा= मोजणें] सामाशब्द– ०**पान**—न. प्रमाणशीर दारू पिणें; मोजकें पिणें. ०**भाषण**—न. स्वल्प किंवा मोजक्या शब्दांत बोलणें. ०**भाषी**—वि. मोजकें बोलणारा; वायफळ बडबड न करणारा. ०**व्यय**—पु. मोजका खर्च; काटकसर. ०**व्ययी**—वि. काटकसरीनें खर्च करणारा. **मिताक्षरा**—स्त्री. याज्ञवल्क्य स्मृतीवर विज्ञानेश्वरानें लिहिलेली टीका. **मिताक्षरी**—स्त्री. एक सांकेतिक भाषा. हींत अ, आ या स्वरांच्या बाराखडीच्या जागीं ककाची, खच्या जागीं गची, घच्या जागीं डची बाराखडी व च वर्गाच्या ठिकाणीं ट वर्ग, त वर्गाच्या ठिकाणीं प वर्ग व य र ल व ळ यांच्या जागीं श ष स ह क्ष या बाराखड्या परस्पर व्यत्यासानें होतात. **मितला**—वि. परिमित; थोडें; अल्प, मोजकें; माफक. 'मितलां बोलीं बोलिजे। अर्थप्रमेय न सोडिजे।' –स्वादि १.५.९२.

**मिति-ती**—स्त्री. १ माप; परिमाण; वजनमाप; संख्या; गणती; गणना. २ परिमितपणा; माफकपणा; प्रमाण; ठराविक रक्कम; प्रमाणशीर गोष्ट; निश्चित संख्या. 'त्याचे पातकासी नाहीं कीं हो मिती।' ३ तिथि; दिवस (चांद्रमासाप्रमाणें). ४ काळ; मर्यादा. 'यज्ञारंभ उद्यां, सहा दिवस या कर्मा मिती तोंवरी।' –आय १६. ५ कर्जाऊ रकमेवरील व्याज. 'शेंकडा चार आणे आम्हास मिति पडती.' –क्रिवि. हल्लू. –शर. [सं.]

**मित्र**—पु. १ स्नेही; दोस्त; सखा. २ सुर्य. 'उठिं लवकरिं वनमाळी उदयाचळीं मित्र आला।' –घनश्यामाची भूपाळी. –वि. मित्रत्वाचा; दोस्तीचा; सलोख्याचा; स्नेहाचा. (समासांत) मित्रलाभ, मित्रवत्सल, मित्रयुद्ध इ० [सं.] ०**तोडणें**, **मैत्री**

तोडणें–स्नेह, मित्रत्व सोडणें ०तनया–स्त्री. १ यमुना. २ सावित्री. ०त्व–न. प्रेम; स्नेह; मैत्री. ०द्रोह–पु मित्राशीं केलेला द्वेष; मित्राशीं बाळगलेला वैरभाव. ०पत्र, मित्रातपत्र–न अबदागीर; सूर्यपान. 'झळकती चामरें मित्रातपत्रें।' –राधि २६.५५. [ मित्र+पत्र; मित्र+आतप+त्र ] ०भाव–पु. मित्रत्व; मैत्री; सख्य. ०वार–वासर–पु. रविवार; आदितवार मित्राचार–पु. स्नेह; मैत्री. 'तुम्हासि करावया मित्राचार।' –भारा किष्किंधा २.६. [ मित्र+आचार ]

मिथः—क्रिवि. आपसांत; परस्पर; एकमेकांत. [सं.] मिथणें–अक्रि. १ एकमत करणें; संगनमत करणें. २ एकत्र मिळणें; जुळणें

मिथुन—न. १ जोडी. २ युग्म; जोडपें; स्त्री आणि पुरुष. ३ समागम; स्त्रीपुरुषांचा संग. ४ एकी. ५ बारा राशींतील तिसरी रास. हींत मृग नक्षत्राचे दोन चरण, आर्द्रा पूर्णनक्षत्र आणि पुनर्वसु नक्षत्राचे तीन चरण यांचा समावेश होतो. [ सं. ]

मिथ्या–थ्य—वि.क्रिवि. खोटें; असार; नश्वर; अवास्तविक –न. खोटी माया. 'मना सर्वथा मिथ्य मांडूं नकोरे।' –राम १९ [सं. ] मिथ्यात्मा–पु. देह. मिथ्यादृष्टि–स्त्री. मिथ्या ज्ञान; नास्तिकता. मिथ्यापवाद–अभिशाप–आरोप–पु. निष्कारण देण्यांत येणारें दूषण; खोटा आरोप, आळ. मिथ्या वग्रह, मिथ्यात्वग्रह–पु खोटें मानणें [ सं. ]

मिंधा—वि. १ ओशाळा; दबेल; उपकारामुळें दाबला किंवा बांधला गेलेला. २ लज्जित; लाजलेला. ३ पूर्वीच्या बाळंतपणानंतर विटाळशी न होतां पुनः गर्भार राहून झालेलें ( मूल ); अशा तऱ्हेची गर्भवती ( स्त्री ). उदा० मिंधी गर्भार; मिंधी बाळंतीण. मिंध्या मुलांना विजेपासून भीति असते अशी समजूत आहे. उदा० 'बाण कैसा लागला सतेज। जैसी मिंध्यावरि पडे वीज।' मिंधे राहणें–असणें–विटाळशी न होतां गर्भार राहणें–असणें. मिंधें होणें–ओशाळा होणें; उपकारबद्ध होणें.

मिनणें—एकत्र होणें. मीनणें पहा.

मिन( न्न )त, मिंनत, मिनतमाना, मिनतवारी, मिनत्वारी, मिंनती—स्त्रीपु स्त्री. विनंति; अर्ज; मनधरणी; विनवणी; आर्जव. 'जाबतेखानानीं मिन्नत करावयास वकील पाठविला आहे.' –दिमरा १.२७. [ अर. मिन्नत=कृपा, उपकार ] मिनतीनें, मिनतवारीनें, मिनतवार, मिनतीवार–क्रिवि. काकुळतीस येऊन केलेल्या विनंतीनें; मनांत नसतां केवळ अजिजीस व भिडेस बळी पडून, मेहेरबानी म्हणून.

मिनमेख—क्रिवि. ( कागदोपत्रीं ) बिनशर्ते; अटीशिवाय; मर्यादा न घालतां; पूर्णपणें; सर्वस्वी ( हुकूमनामा, फैसला, जाब इ० ).

मिनहु–हू. मिन्हू—क्रिवि. वर सांगितलेल्या महिन्याचा; त्याच महिन्याचा; चालू महिन्याचा. 'नववे जमादिलावरचीं पत्रें बेबिसावें मिन्हूस सादर झालीं' –पया २१०. [ अर. मिन्हुव ]

मिना—क्रिवि. वजा; हिशेब करतांना कमी केलेला. 'शंभर रुपये देणें त्यांत तेतीस मिना घातले.' [ अर. ]

मिना—पु. कांचेचा मुलामा; चांदीच्या दागिन्यावर बसविण्यांत येणाऱ्या हिरव्या दगडाचा पातळ रांधा. [ फा. मीना ] ०कार–गार, मिनेगार–मिनेकार–पु. मिन्याचें काम करणारा. –वि. मिना केलेलें. 'पांच मण्याचा द्राक्षघडवजा सोन्याचे सुतांत बांधीव दाडी मिनेगार बाबत जवाब पोलादजंग पैकीं' –वाडसमा २.७५. [ फा. मीनाकार ] ०कारी, मिनेकारी, मिनेगारी–स्त्री. मिन्याचें काम. [ फा. मिनाकारी ] मिनेदार–वि. मिन्याचें काम ज्यावर केलें आहे असा; नक्षीदार 'गोठ हातसर, जवे खिजमतया मिनेदार करीं चुडे।' –प्रला ११८.

मिनि( नी )ट—न. १ तासाचा साठावा भाग; क्षण. २ टिपण; टांचण; लेख. 'केकावलीवर रावबहादुरांनीं जें मिनिट लिहिलें आहे त्याच्या शेवटच्या वाक्यांत गुणसर्वस्व दाखल केलें.' –नि ७९४. ३ ( डिग्रीचा अंशाचा ) साठावा भाग. ४ दाव्याचा, खटल्याचा निकाल. [ इं. ]

मिनिस्टर—पु. दिवाण. [ इं. ]

मिनी—स्त्री. ( कों. ) स्त्रीचा स्तन; मिमी.

मिन्कबल—क्रिवि. पूर्वी. [ फा. ]

मिन्जुमला—क्रिवि. एकंदरीनें. [ फा. ]

मिन्वाद– क्रिवि. यापुढें. [ फा. ]

मिंबर—न. व्यासपीठ. 'मशिदीच्या मिंबरचा दगड बसविण्याचा समारंभ सातारा येथें झाला.' [ अर. ]

मिया–यां—सना. म्यां; मीं, मिआं पहा. –क्रिवि. माझ्याकडून. 'स्वामी जें पाप प्रमादा। तंव जोडिलें मिया।' –ऋ ५३.

मिया—पु. मुसलमान गृहस्थ. [हिं.] म्ह० मिया मूठभर दाढी हातभर. ०मल्लार पु. ( संगीत ) एक राग यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. अवरोहांत धैवत वर्ज्य. जाति संपूर्ण–षाडव. वादी मध्यम; संवादी षड्ज; गानसमय मध्यरात्र. ०सारंग–पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद, हे स्वर लागतात. जाति षाडव–षाडव, वादी ऋषभ, संवादि पंचम. गानसमय मध्यान्ह.

मियाद—स्त्री मुदत. [ अर. मीआद=वायद्याचें स्थळ अगर वेळ ] मियादी–वि. मुदतीची; कांहीं शर्तीवर दिलेली.

मिरका धनगर—पु. फक्त शेळ्यामेंढ्यांचा कळप बाळगणारा धनगर. याच्या उलट खिल्लारी धनगर=गुरें–ढोरें, शेळ्यामेंढ्या बाळगणारा गुराखी.

मिरकूट—न. एक क्षुद्र जंतु; डांस; मच्छर.

**मिरग**—पु. (कु.) मृगनक्षत्राचे दिवस [मृग अप.] **मिरग्या**-पु. (व.) मृगनक्षत्रांत उत्पन्न होणारा सपक्ष किडा; मृगकिडा.

**मिरगिटाण**—स्त्री. तेल, तूप इ० स्निग्ध पदार्थ जळल्या-करपल्यामुळें सुटणारी घाण.

**मिरगी, मिर्गी, मिरघी**—स्त्री. १ फेंपरें; अपस्मार; घुरें. २ घेरी; भोंवळ; झीट. [ हिं. उरिया-मेरिआ ] **०वर येणें**-क्रुद्ध होणें; रागांत येणें; संतापणें.

**मिरची**—स्त्री. एक झाड व त्याचें फळ. हें झाड कमरेइतकें उंच होतें. मिरची हिंदुस्थानांत सर्वत्र होते. हिच्या जातीः- लवंगी, भोपळी, बुटकी, बुगडी, भाजीची, धारवाडी, पांढरी इ०. २ एक मुलींचा खेळ. [ सं. मरिच ] (वाप्र.)( **अंगाला, नाकाला** ) **मिरच्या लागणें-झोंबणें**-चडफडाट होणें; चरफडणें **मिरबोंडी-मिरची**-स्त्री. लहान हिरवी मिरची; कोंवळी मिरची. **मिरशांग, मिरशेंग**-स्त्री. (गो. कु.) मिरची; (राजा.) मिरसांग.

**मिरजाई**—स्त्री. गुन्हेगार जातींत स्त्रिया चोळीवरून घालतात तो आंगरखा. -गुजा ११५.

**मिरजी**—वि. मिरजेचा; मिरज येथील (रुपया, तंबाखू इ०).

**मिरजोळी**—स्त्री. एक औषधी वेली; ही वृक्षाच्या ढोलींत उगवते; हिचीं पानें मोठीं व मिरवेलीच्या पानासारखीं असुन त्यांना उग्र वास येतो. पानांचा रस नाकांत घातला असतां शिंका फार येतात.

**मिरधा, मिर्धा, मिरध्या**—पु. १ खेडेगांवचा एक अधिकारी; चौगुला. २ दहा शिपायांचा नाईक; भालेकरांचा नाईक; जासुदांचा नाईक; मरचोपदार. 'राजश्री प्रधान याजकडे तुलाराम मिरधे याजबरोबर पत्र पाठवून.'-शारो ८. ३ (व) गोंड लोकांतील धार्मिक कृत्यें करणारा मुख्य; धर्माधिकारी ( यावरून लक्षणेनें ) प्रमुख मनुष्य; पुढारी. [ फा. मीर्देह् ]

**मिरपु(मु)टणें**—उक्रि. १ वाढ खुंटणें; खुरटणें. २ थांबविले जाणें; भग्नोत्साह होणें; खुंटणें; रुसणें.

**मिरमिटा**—पु. १ शोपा आंबा. २ शोप्या आंब्याचा वास. -वि. शोपा (वास); बडीशोपेसारखा वास असलेला [ मिरमिर ? ]

**मिरमिर**—स्त्री. तिखट पदार्थ खाल्ल्यानें जिभेस उत्पन्न झालेली जळजळ; चुरचुर. [ध्व.] **मिरमिरणें**-अक्रि. १ तिखट लागणें; झोंबणें; मिरमिर टणें ( अक्कलकारा, पिंपळी, इ० पदार्थ खाल्ल्यानें ) चुरचुरणें. २ मिरमिरयुक्त होणें ( तोंड, जीभ इ० ). **मिरमिराट**-पु मोठी मिरमिर; जळजळ. **मिरमुटणें**-अक्रि. मिरपुटणें पहा.

**मिरमिरी**—स्त्री. (कों.) तिरिमिरी.

**मिरमीट**—न. डोळ्यांत शिरून झोंबणारा लहान कीटक; चिलट. [ मिरी ]

**मिरमुटला**—पु. लहान, खोडकर मुलगा.

**मिरवण-वणी, मिरवणूक**—स्त्री. थाटानें पुष्कळशा जमावानें सावकाश जाणें; छबीना; दिंडी; वरात; स्वारी. ( क्रि० निघणें). 'झाली संभ्रमे मिरवण।'-वेसीस्व ७.१०६. [ का. मेरवणगे, मिरवणें; का. म्यरोण; द्राविडी. मेर; अर. मीर, अमीर, मिहीर] **मिरवणी**-स्त्री. १ अलंकार; सुशोभित करण्याची वस्तु. 'पै जळशयनाचिया अवगणिया। कां मत्स्यकूर्म इया मिरवणिया।'-ज्ञा ११. ८४. २ प्रसिद्धि. 'सिंधु आणि गंगेचि मिळणी। स्त्रीपुरुष नामाची मिरवणी।'-अमृ १.५४. **मिरवणें**-अक्रि. १ वाद्यादिसहित शहरांतून समारंभपूर्वक सावकाश जाणें; भपका दाखवीत जाणें. २ छानछोकीनें फिरणें; डौलानें जाणें. ३ (ल.) धिंड काढली जाणें. ४ शोभणें. 'तेंचि कृष्णाचें श्रीमुख। नित्य निर्दोष मिरवत।' -एरुस्व १.५४. ५ बोलणें. ६ क्रीडा करणें; खेळणें. ७ डौल दाखविणें; डौलानें फिरणें. **मिरवा मिरवणें**-डौलानें दिमाख दाखवीत हिंडणें. **मिरविणें**-सक्रि. मिरवणूक काढणें; थाटानें फिरवीत नेणें. **( प्रतिष्ठा-डौल-तेज-विद्या-गुण-ज्ञान-शहाणपण ) मिरविणें**- प्रतिष्ठा डौल इ०चें निरर्थक प्रदर्शन मांडणें; पोकळ देखावा दाखविणें; खोटा आविर्भाव करणें.

**मिरामल्लार**—पु (संगीत) एक राग. यांत षड्ज, तीव्र, ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण-संपूर्ण. वादी मध्यम, संवादी षड्ज, गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर. वरील स्वरांशिवाय गांधार, धैवत व निषाद हे तीव्र स्वरहि लावण्याचा गायकांचा परिपाठ दृष्टीस पडतो.

**मिराशी**—पु. मुसलमानांतील एक अस्पृश्य जात. -के १७. ४.३६.

**मिरास**—स्त्रीन. १ वडिलोपार्जित वतन; दायभाग; वंशपरंपरा संपत्ति; स्थावर मालमत्ता ( विशेषतः शेत जमीन इ० ); वतनदारी. 'निपुत्रिकांचें मिरास तें दिवाणाचें'-रा ८४९. २ जमिनीवरील कर. [ अर. मीरास् ] **०पुरणें**- गाठोडें पुरणें; महत्त्वाची गोष्ट एखाद्या ठिकाणीं ठेवलेली असणें. **०जमीन**-स्त्री. वतनदारीची जमीन; वडिलोपार्जित जमीन. 'जमीनसारा थकला तरी तीन वर्षांनंतर मिरासदार परागंदा झाल्याशिवाय मिरास जमीन खालसा करण्याचा सरकारला हक्क नव्हता.'-गांगा १२. **०झाडा**-पु. मिराशीची आणि मिरासदारीची कलमबंदी. **०दार, मिरास्दार, मिराशी-सी**-पु. १ मिराशीचा उपभोग घेणारा; वतनदार; थळकरी; सरकारसारा नियमानें भरून आपलें स्वामित्व कायम ठेवणारा शेतमालक. 'वडगांवीची मोकदमीस कोण्ही मिरास्दार

नाहीं '-ग १७.३२. २ महार; महारकीचें वंशपरंपरा वतन भोगणारा महार. मिराशीचे चार प्रकार-१ वतनदार, २ मिरासदार, ३ उपरी, ४ ओवांडकरू. [फा. मीरामीदार] ०पट्टी-टी-स्त्री. मिरास जमिनीवरील कर; कायम लावणीचे जमिनीवरील कर. 'मिरासपटी तिसरे सालीं घ्यावी.'-वाडमम ४.६७ ०पत्र-न. मिराशीच्या हक्काचा लेख.

**मिरी**—पु. १ पहिल्यानें खेळण्याची पाळी असलेला गडी. २ खेळतांना उताणी पडलेली कवडी. [फा मीर] ०तल्फ-पु. गंजिफांतील राजेरी देणी; राजा खालीं टाकणें, उतरणें [फा. मीर+तल्फ]

**मिरी**—स्त्री निरी. चुणी (धोतर ८० ची).

**मिरी**—स्त्री. (एकवचन मिरू, मिरें) १ मिऱ्यांचा वेल. २ एका झाडाचें नांव. -न मिऱ्याचा दाणा. मिरीं तिखट असून मसाल्यांत घालतात. [सं. मरिच; हिं. मिरच; बं. मरिच; गु. मरी; का. मेणसु; ते. मरिया, मिरयन्; ता. मिलगु] म्ह० मिरीं नासलीं तरी जोंधळ्याच्या भावानें जात नाहींत. (मिरें शब्दाचें समासांत पूर्वपदीं मिर असें रूप होतें). **मिरकाढा**-पु मिऱ्यांचा काढा. [मिरें+काढा] **मिरकूट**-न. मिऱ्यांची पूड; मिरपूड. [मिरें+कूट] **मिरगुंड-डें**-न. चटणी; मिरपूड. ०गोंड-न. १ मिरवेलीस आलेला मिऱ्यांचा घड; झुबका. २ मिरबोंड; मिरघाटा. -स्त्री. लहान हिरवी मिरची; कोंवळी मिरची. ०घाटा-पु. उडदाचें किंवा इतर डाळीचें पीठ लावून तळलेले मिरें. ०पूड-पूट-स्त्री. १ मिऱ्यांची पूड. २ (कु.) मिरच्यांची पूड, तिखट, म्ह० अन्नमत्रीं जेवणें आणि मिरपूड मागणें. ०बोंड-न मिरघाटा पहा. ०वणी-न मिऱ्याचा काढा. [मिरें+पाणी] ०वेल-स्त्री. मिऱ्यांची वेल. ही पानवेलीसारखी असते. या वेलीला मिऱ्याच्या फळांचे घोस येतात. यांची लागवड मलबार व कोंकण प्रांतीं होते. मिरवेलीस ज्या शेंगा येतात त्यांस गजपिंपळी म्हणतात व मुळास चवक म्हणतात. चवक पहा. या वेली ४०-४० वर्षे जगतात ०मारा-ऱ्या-वि. मिऱ्याप्रमाणें तिखट, कडक, झोंबणारा, जळजळ उत्पन्न करणारी लागट (भाषण अगर इसम.) मिरू, मिरें-न. मिरी पहा. (मिरें मिरू यांचें अव.)

**मिऱ्या**—पु. एक कीटक. मिरमीट पहा.

**मिलक**—स्त्री. जिंदगी; मालमत्ता; मिळकत. [अर. मिल्क्]

**मिलताऊ**—वि दुसऱ्याच्या मताशीं आपलें मत सहज मिळवून घेणारा. 'प्रधान पंताचे मिलताउ. ते कां येतील -पेद ६.६२. [मिळणें]

**मिलांड**—न. बीड. -शर.

**मिलाप-फ**—पु. स्त्री. १ ऐक्य; मिश्रण; मिळणें; जुळणें; मेळ. २ भेट; संयोग; एकत्र येणें. [हिं.] **मिलाफी-पी**-वि. सलगीचा; सोबतीचा; संगतीचा; जुळता; जुळणारा; मिळता; जमणारा.

**मिलांव**—न. पोलाद.

**मिलाव, मिलेर**—पु. (गो.) पैसे ठेवण्याकरतां भोंक असलेला मातीचा गड्डू.

**मिलिंद**—पु. भुंगा; भ्रमर. [सं.] **मिलिंद्यमान**-वि. आसक्त; लीन. [सं.]

**मिल्हा**—पु. १ बगळ्याच्या जातीचा एक पक्षी. २ (ल.) साधुत्वाचें ढोंग करणारा मनुष्य

**मिशन**—न. १ कोणत्याहि धर्माचा अगर संप्रदायाचा प्रसार करणारी संस्था. २ धार्मिक अगर राजकीय प्रचार. [इं.] **मिशनरी**-पु. प्रचारक; पाद्री; ख्रिस्ती धर्मप्रचारक.

**मिशि-शी-सि**—स्त्री. दंतमंजन; मस; राखुंडी. [बं.]

**मिशी**—स्त्री. १ पुरुषांच्या वरच्या ओठावर व नाकाच्या खालील जागेंत येणारे केंस. २ मांजर, वाघ, झुरळ इ०च्या तोंडावरील लांब केंस. [सं. श्मश्रु; प्रा. मूस; का. मोशि] (वाप्र.) ०उतरून देणें-एखाद्या गोष्टीची निश्चिती सांगतांना म्हणतात. ०(मिशा) खालीं होणें-उतरणें-खालावणें-मानखंडना होणें; फजिती होणें; नक्षा उतरणें. (एखाद्या पातकाच्या प्रायश्चित्तार्थ क्षौर (मिशा भादरणें) करतात त्यावरून). **मिशा किंवा मिशी भादरणें**-फजिती करणें, बेअब्रू करणें; अपमान करणें. (**मिशा-मिशी**)**वर ताव देणें; मिशी मिशा पाजविणें, मिशांना पीळ भरणें**-सूड घेण्याच्या विचाराचें निदर्शक म्हणून मिशांवरून हात फिरविणें; तिरस्कारानें, रागानें मिशा वळविणें. **मिशा पिळणें; मिशांस पीळ भरणें**-गर्व वाहणें, ऐट मिरविणें; धमक दाखविणें. 'च्यारि दिवस ते मिशांसि पिळितील।'-मोउद्योग ४.९८. **मिशांना-मिशांवर तूप लावणें, मिशीवर-मिशांवर शीत ठेवणें**-श्रीमंती दाखविणें; पोकळ, बाह्यात्कारी श्रीमंतीचा आविर्भाव करणें; डामडौल करणें. **मिशावर खेळप**-(गो) एखाद्यास न भिणें. **मिशाळ-ळा**-वि. मोठ्या मिशा असलेला.

**मिशी**—स्त्री वेश्याव्यवसायाच्या सुरवातीस करावयाचा समारंभ. ०लावणें-(व.) वेश्याव्यवसायास आरंभ करणें; धंद्याची सुरवात; वेश्येनें प्रथमच एखाद्याशीं केलेल्या समागमाच्या वेळचा थाटाचा समारंभ.

**मिश्र**—पु. एक देश व त्यांतील एक ब्राह्मणांची उपजात.

**मिश्र, मिश्रित**—वि. मिसळलेला; एकत्र झालेला; मिळविलेला. [सं. मिश्र=मिसळणें] ०अपूर्णांक-पु अव अपूर्णांकांचा एक प्रकार; अधिक चिन्हानें जोडलेले अपूर्णांक. ०गणित-न. सुवर्णगणित. याचे दोन भेद आहेत मध्यमिश्रगणित व व्युत्क्रममिश्र गणित. ०गति-स्त्री. (ज्योतिष) दोन किंवा अधिक

प्रेरणांच्या योगानें उत्पन्न होणारी गति. ०**जाति**-स्त्री. (ताल) पहिला विभाग नियमानें सात मात्रांचा असणारा, दक्षिणेकडील एक ताल-प्रकार. ०**धातु**-पु. दोन किंवा अधिक धातूंचें मिश्रण करून नवीन बनविलेला धातु उदा० पितळ. ०**व्यवहार**-पु. मिश्र गणिताचे नियम ०**मिश्रण**-न. १ मिसळ, भेसळ; मिश्र झालेला पदार्थ. २ बेरीज. ३ (रसा.) संयोगी नसतां मिसळून झालेला पदार्थ. **मिश्रणीय**-वि. मिश्रण करण्यास योग्य; मिसळण्यासारखें.

**मिश्री**—स्त्री. खडीसाखर; मिसर देशांतील साखर. 'श्री हरिनामें अमृत फिकें मग कोण मिश्री।' -अमृत १०९. [अर. मिस्री] **सफेत मिश्री**-स्त्री. एक औषधी मूळ. **सालंमिश्री**-स्त्री. एक औषधी वनस्पति.

**मिष-स**—न १ निमित्त; ढोंग; बतावणी; सोंग. २ फसवणूक; फसवेगिरी; लबाडी. [सं] **मिषांतर**-न. दुसरें निमित्त; निराळी बतावणी. 'वर्षे तेथ मिषांतर। चातकु कीं।' -ज्ञा १८.१३७७. **मिषा**-वि. ढोंगी; बतावणी करणारा; खोटें कारण दाखविणारा; सबबी सांगणारा.

**मिष्ट**—वि. गोड; चवदार; स्वादिष्ट; रुचकर; लज्जतदार.[सं.] ०**भाषणी**-वि. गोड बोलणारा; गोडबोल्या. **म्ह**० मिष्ट भाषणी आणि लिंगदर्शनी. **मिष्टाई**-स्त्री. १ गोडी; माधुरी. २ रुचकरपणा; स्वादिष्टता; लज्जतदारपणा. **मिष्टान्न**-न. पक्वान्न; गोडधोड; सुग्रास अन्न; रुचकर अन्न.

**मिस, मिसक, मिसकट-टें**—न. १ निमित्त. २ रूप; आकार. 'पैं अष्टधा भिन्न ऐसें। जें दाखविलें प्रकृतिमिसें।' -ज्ञा १५.४८८. ०**करा-खोर**-वि. ढोंगी; बतावणी करणारा; तोतया.

**मिसकीन-ल**-वि. १ गरीब; अशक्त. २ निरुपद्रवी; शांत (गाय, म्हैस). ३ (ल.) बाहेरून दिसण्यांत गरीब पण आंतून लबाड. [अर. मिस्कीन् = गरीब] ०**बगला-मात्रागमनी-मादरचोद-मारवाडी**-वि. बाहेरून सौम्य, गरीब परंतु आंतून हरामखोर; मुद्रा बावळी परंतु पक्का लबाड असा (इसम).

**मिसकूट**—क्रिवि. काळा याचें आधिक्य दाखविणारा शब्द. उदा० काळा मिसकूट. मसकूट पहा.

**मिसमिशी(सी)त**—वि. मऊ; नरम (माणूस इ०); विसविशीत; चिवट; मजबूत नसलेलें; घट्ट वीण नसलेलें (वस्त्र).

**मिसर**—पु. ईजिप्त देश. **मिसरी-मिश्री**-वि. मिसर देशांतील (स्त्री, खडीसाखर).

**मिसरूड, मिसरू**—स्त्री. नुकत्याच फुटलेल्या मिशा. बारीक, नवीन मिशा; (निंदार्थी) मिशा [सं. श्मश्रु]

**मिसल**—स्त्री. हुकूम; व्यवस्था; दर्जाप्रमाणें कोणी कोणत्या ठिकाणीं बसावयाचें ही व्यवस्था; दर्जेबन्दी, प्रकार; अनुक्रम; समाजांतील योग्य जागा. 'निमंत्रित मंडळी दरबारास आल्यावर त्यांस दर्जाप्रमाणें मिसलवार बसविणें' -ऐरा ७. २ प्रकरण; (व.) वकिलाचें दाव्यासंबंधींचें टिपण, टांचण. 'त्या दाव्याची मिसल काढून दे पाहूं' [अर. मिसाल्] **मिसलदारी, मिसलदारी**-स्त्री. योग्यतेनुरूप व्यवस्था; दर्जेबन्दी. 'कोरबंदीनें उभे मानकरी थटून मिसलदारींत।' -प्रला २२६. **मिसलबंदी, मिसळबंदी**-स्त्री. कामाची वांटणी आणि व्यवस्था; दर्जेबंदी. ०**बाजू**-स्त्री. ठराविक जागा; योग्य जागा; नियोजित स्थान. (क्रि० धरण; संभाळणें; राखणें; टाकणें; सोडणें; सुटणें).

**मिसळ-ळा**—स्त्री पु. १ मिश्रण; मिसळलेली स्थिति; भेळ. २ एकत्र मिसळलेला समूह. ३ मंडळी; संघ. ४ सख्य; मैत्री. [सं. मिश्रण] **मिसळ**-वि. मिसळलेला; एकत्र झालेला. [सं. मिश्रित] **मिसळण**-स्त्री. मिसळलेली स्थिति; मिश्रपणा. -न. १ मिश्रण करण्याकरतां मिसळलेली वस्तु; मिश्रणांतील निरनिराळे पदार्थ. २ मिश्रण; भेसळ. ३ फोडणींत घालण्यासाठीं एकत्र केलेले धने, मोहऱ्या, कारळे इ० पदार्थ. ०**काढणें**-कारळे, मोहऱ्या, हळद, मेथ्या, हिंग इत्यादि जिन्नस वेगवेगळे काढून ठेवणें. [मिसळणें] **मिसळणी**-स्त्री. मिसळणें; एकत्र करणें. **मिसळणें**-न. मिसळण; धने, मोहऱ्या, कारळे, मेथ्या इ० चें फोडणींत घालण्याचें मिश्रण. **मिसळणें**-अक्रि. मिश्रण होणें; एकत्र होणें.-सक्रि १ एकत्र करणें. २ (ल. काम किंवा लढाई) जोरानें करणें; त्वेषानें करणें. **मिसळवणी**-न. कोंकणसारांत मिसळून वाढविलेलें ताक. [मिसळ+पाणी]

**मिसाल**—स्त्री. हुकुमनामा; आज्ञापत्र. 'तालीक लिहून घेऊन असल मिसाल परतून दीजे.' -रा १५.१३६. [अर. मिसाल्]

**मिसूर, मिसू**—न. स्त्री. मिशी; (अव.) मिशा.

**मिस्कीन-ल**—वि. मिसकीन पहा

**मिस्तरी, मिस्त्री**—पु. रेषालेखनपटु; मुकादम; कुशल कारागीर (विशेषतः सुतार). [फा. मिस्तरी]

**मिस्तीस**—स्त्री एक मिश्र पोर्तुगीज जात.

**मिस्सी**—स्त्री. दंतमंजन; दांतवण; राखुंडी; हिरडा, मायफळ, लोहचूर्ण इ० चें दांताला लावण्याचें व दात काळे करण्याचें चूर्ण. [सं. मषी] ०**लावणें**-१ दांतांना मिस्सी लावून वेश्येच्या धंद्याला प्रथम सुरवात करणें. हा विधि नायकिणीकडून करवितात. २ शेसविधि करणें; एखाद्या स्त्रीला वेश्येच्या धंद्याची दीक्षा देणें.

**मिहिर**— पु. सूर्य. 'धरिसि अरितिमिरहर मिहिरसम शूला।' निमा १.१२. [सं. मित्र]

**मिळकत, मिळख(ग)त**—स्त्री. प्राप्ति; नियमित मिळणारें द्रव्य. २ फायदा; नफा. ३ मालमत्ता; जिंदगी. [मिळणें; अर मिल्कत्]

**मिळण**—न आमटी, भाजी इत्यादि मिळून येण्याकरितां त्यांस लावावयाचें पीठ. [सं. मेलन] **मिळण-णी**-नस्त्री. १

एकत्र होणें; मिलाफ; संबंध; मिश्रण; एकी. २ संगम. ' सागर-सरिता जीवन एक । परी मिळणीं भजन दिसे अधिक । ' -एभा १.९५. ३ संसर्ग; भेट; स्पर्श; संयोग; संबंध; मेळ. ' सत्संगसूर्याचे मिळणीं निर्विकल्पकमळणी । विकासे । ' -एभा २६.४३८. ३ एकरूपता. ' कृष्णमिळणीं मिळाल्या । त्याही न फिरती । ' -तुगा १२८. ४ मीलन; एकत्र जुळणें, जमणें. ' तेही तेही ठाईं मिळणी । समयो सांजवेळुकां रजनी । ' -ज्ञा १७.२९५. **मिळणीं मिळणें**-भेटणें; एकत्र येणें; संयोग-संगम होणें. **मिळणीं मिळणींत-मिळणीस असणें-चालणें-मिळणें**-एखाद्याच्या तंत्रानें चालणें, मिळून जाणें; कह्यांत, ताबेदारींत असणें. **मिळणीस मिळणें**-संगम होणें; एखाद्याशीं मिळून जाणें. **मिळणी होणें**-भेटणें. **मिळणें**-अक्रि. १ (द्रव्य, लाभ, नोकरी, पदवी इ०) प्राप्त होणें; हस्तगत होणें. २ एकत्रित होणें; मिसळणें. ३ एकरूप होणें; एकत्रित, एकजीव होणें; एकमत होणें. ४ जुळणें; अनुरूप किंवा अनुकूल होणें; बरोबरीचें होणें; एखाद्याप्रमाणें-सारखें असणें. ५ एखाद्याच्या बाजूचा होणें; एखाद्या विशिष्ट पक्षाचा, मताचा, धोरणाचा होणें. ' पार्थासीं नमुनियां अजा मिळ र ।' -मोभीष्म १२.५२. ६ भेटणें; भिडणें; टेंकणें; गांठ पडणें; संयुक्त होणें; समोरासमोर येणें. ७ सांपडणें; आढळणें; दृष्टोत्पत्तीस येणें; दिसणें; पाहिलें जाणें. ८ पकडींत येणें; धरू येणें; हातांत येणें. ' हा खिळा अवघड ठिकाणीं बसला, त्यास धरायला मिळत नाहीं. ' ९ शक्य होणें; शक्य असणें. ' हें कुलूप भलत्याला उघडायला मिळणार नाहीं. ' १० (गो.) रतिभावनेनें अंगीकार करणें. ११ गुरफटला जाणें; अडकणें. ' मिळेना कदा कल्पनेचेन मेळीं । ' -राम ५४. १२ नफा; फायदा होणें; उत्पन्न होणें. [सं. मिल्=भेटणें] **म्ह०** मिळत नाहीं भीक तर वैद्यकी शीक. **मिळून मिसळून वागणें**-मित्रत्वाच्या, घरोब्याच्या, समतेच्या नात्यानें वागणें. **मिळता**-वि. जुळता; मिळणारा. **मिळता काळ**-पु भरभराटीचा काळ; प्राप्तीची वेळ; मिळण्याचा काल. **मिळताऊ**-वि. १ बरोबरीच्या लोकांशीं लवकर मिसळून जाणारा; दुसऱ्यांशीं आपलें पटवून घेणारा. २ जिंकणारा, मिळविणारा. **मिळताव**-पु १ प्राप्ति; मिळकत; फायदा. २ सामील होणें. **मिळती वस्त**-स्त्री. मिळवितां येण्यासारखी वस्तु; ज्याची नुकसानभरपाई करतां येईल असा माल ' पोर मिळवतीवस्त आहे. परंतु आईबाप मिळवतीवस्त नाहींत. ' [मिळणें+वस्तु]

**मिळमिळ(ळा)ळ**—स्त्री. (स्निग्ध पदार्थाच्या संयोगानें आलेला) बुळबुळीतपणा; मिळमिळाट -क्रिवि. (राजा.) गुळमुळ; आवाज न करतां (रडणें). **मिळमिळाट**-पु. अतिशय बुळबुळीतपणा. **मिळमिळीत**-वि. १ (कों.) बुळबुळीत व तेलकट दिसणारें, असणारें. २ बेचव; नीरस; मळमळीत (भाषण इ०).

**मिळवण**—न. १ आमटी इ० दाट होण्यासाठीं तीस लावावयाचें पीठ. मिळण पहा. २ गुरांना खावयास घालण्याचें आंबोण. ३ मिश्रण. **मिळवणी**-स्त्री. १ बेरीज; एकाच जातीच्या अनेक रकमा एके ठिकाणीं आणण्याची कृति. २ बेरीज करावयाच्या रकमा; दुसऱ्यांत मिळविलेला पदार्थ ३ अनेक संख्या एकत्र करून आलेलें फल; बेरीज; एकूण संख्या. ४ जमवणी; जुळणी; सफाईची जोडणी **मिळवणी वजाबाकी**-स्त्री. बेरीज आणि वजाबाकी.

**मिळाऊ**—वि. १ मिळविणारा; कमाई करणारा. २ जिंकणारा. ३ जुळणारा [मिळणें] **मिळून**-क्रिवि. १ सहित; सोबतीनें; सह; एकत्र. २ एकंदरींत; एकूण. ३ जुळून.

**मिळवणी**—न. १ मिश्रण करतांना घातलेलें पाणी. २ पाणी घालून केलेलें मिश्रण. [मिळणें+पाणी]

**मिळव(वि)णें**—सक्रि. १ प्राप्त करून घेणें; संपादणें. २ मिसळणें; एकांत दुसरें घालणें; मिश्रण करणें. ३ संचय करणें; एकत्र आणणें, करणें; बेरीज करणें. ४ जुळण्यास, भेटण्यास, मिळण्यास लावणें; ताळा घेणें; जमवून पाहणें. ५ गांठणें; जिंकून घेणें; पाडाव करणें. ' लगट करुनि फौजांनीं मिळविले । ' -ऐपो २०९. ६ जिंकणें; मन वळविणें; सरशी करणें; वश करणें. ७ कृतकृत्य होणें. ' ही मागासलेली ईश्वरी विद्या चांगली नांवारूपाला आली कीं मिळविली. ' -सु ११. [मिळणें] **मिळवून पाहणें**-तुलना करणें; ताळा जमविणें.

**मिळी**—स्त्री. (कर.) उंच गळयाचा चंबू.

**मी**—सना. बोलणारा स्वतः [सं. अस्मत्] **म्ह०** मी हांसतो लोकाला शेंबूड माझ्या नाकाला. (वाप्र.) **मी म्हणणें**-जोरांत असणें; स्वतःचा प्रभाव दाखविणें. ' त्या वेळीं मी कसचा घराबाहेर पडतों. तेव्हां पाऊस मी म्हणत होता. ' **मीमी म्हणणें-बोलणें**-स्वतःच्या कर्तृत्वाची बढाई मारणें; ऐट मिरविणें; गर्व वाहणें; अहंपणा दाखविणें. ' जितां बोलती सर्वही जीव मी मी । ' -राम १५. ' भिव्याशीं सामना करावयास कोणीहि पुढें जाईनात, मी मी म्हणणारे सारे पहिलवान कचरू लागले. ' **मीचें घर खालीं असणें**-गर्वाचें, मीपणाचें घर खालीं असणें. **मीतूं**-अ. द्वैतभाव; दुजाभाव; आपुलकीचा अभाव. ' नाहीं तें नांदविलें जेणें । मी तूं जगीं । ' -ज्ञा १५.२८०. **मीतूं करणें-मीतूंवर येणें**-हमरीतुमरी करणें; भांडणावर येणें. **मीपण-पणा**-नपु. १ अहंता; गर्व; मगरूरी. २ ब्रह्मापासुन मी निराळा असल्याची जाणीव; अहंपणा.

**मींजुम्ला**—पु. समुदाय. [फा.]

**मीट**—स्त्री. मिटलेली स्थिति; डोळयांतून पू आल्यामुळें, चिपडामुळें डोळयांची चिकटून राहिलेली स्थिति; झांकलेली स्थिति. [मिटणें]

**मीटफळयो**—स्त्रीअव. (गो.) आटयापाटयांचा खेळ.

**मीटर**—पु (पाणी, वीज, लांबी इ०) मोजण्याचें यंत्रः मापनयंत्र. [इं.]

**मीटिमीटि**—क्रि. (महानु) टकमकां पाहणें. 'मीटिमींटि स्वर्गदेवा। पाताळीं पीयूषाचा ठेवा।'–ऋ ८१. [ध्व.]

**मीठ**—पु (ढोरांचा धंदा) एक जातीचा निवडुंगावर वाढणारा वेल. यानें चामड्यावरील केस जातात.

**मीठ**—न. १ लवण; क्षार. मीठ ही पांढऱ्या रंगाची खारट वस्तु असून मनुष्यमात्राम अत्यंत आवश्यक अशी आहे. बरेंचसें मीठ समुद्राच्या पाण्यापासून करतात. मिठाच्या कांहीं खाणीहि आहेत. २ (व.र. आटयापाटया) लोण. (क्रि० आणणें). [सं. मिष्ट=रुचकर] (वाप्र.) ०**घालणें**–१ पिठांत मीठ घालणें; चव आणणें; गोडी आणणें; पुष्कळशा मोटया साठयांत थोडीशी भर घालणें; पुष्कळ असुन आणखी थोडीशी अपेक्षा असेल अशा ठिकाणीं जरूर ती भर घालणें. २ महत्त्व देणें; पर्वा करणें, ठेवणें; भीक घालणें. 'ते दुबळया भटभिक्षुकांना मीठ घालतील कीं काय!'–नि १०६८. ०**मोठें खारट असणें**–कडक किंवा करडा धनी असणें; मालक मोठा कटोर असणें. ०**तोडणें**–मीठ कमी करणें; खावयास कमी घालणें. 'मुलास मुलगी मोठी झाली तर तिचें मीठ तोडणें.' ०**देणें**–चामडें वटीण करण्याकरितां त्यास मीठ लावणें. **(अंगास)मीठ मोहऱ्या लागणें**–रागावणें; क्रुद्ध होणें; संतप्त होणें. सामाशब्द- ०**कणी**–स्त्री. लांबून घरी आल्यानंतर दृष्ट काढण्याचें मीठ; मिठानें काढलेली दृष्ट. ०**बंदर**–न. मीठ उतरण्याचें बंदर. ०**भाकर-भात**–स्त्रीपु. गरीबीचें जेवण (विशेषतः यजमान आपण दिलेल्या जेवणासंबंधी विनयानें असें म्हणतो). ०**मसाला**–पु. मीठ व मसाल्याचे सर्व जिन्नस; पदार्थास चव आणणारे पदार्थ ०**मोहऱ्या**–स्त्रीअव. दृष्ट काढण्याचें साहित्य. ०**मोहऱ्या ओवाळणें**–दृष्ट काढणें. ०**लोणारी**–पु. मीठ बनविण्याचा धंदा करणारी एक जात व त्या जातीचा मनुष्य. **मीठारंग**–पु मोत्याचा पिवळट गुलाबी रंग.

**मीण**—पु. (गो.) जार.

**मीत्री**—स्त्री (प्र.) मैत्री; सख्य. 'पराव्यासीं करी मीत्री।' –दा २.१.१४. [सं. मैत्रि]

**मीन**—पु १ मासा; मत्स्य २ मेषादि राशींपैकीं बारावी रास. या राशींत पूर्वाभाद्रपदा नक्षत्राचा एक चरण व उत्तराभाद्रपदा आणि रेवती या नक्षत्रांचा समावेश होतो. [सं. मी=मारणें] ०**केतन**–पु माशाचें चित्र असलेलें निशाण ज्याचें आहे असा मदन; कामदेव. [सं.]

**मी(मि)नणें**—अक्रि. एकत्र होणें. 'मीनती दांदिया पासीं। राउळीचे यां।'–शिशु ५०५. २ प्राप्त होणें. मिळणें. 'कां वृक्षाची साउली। वाटे जातां मीनली।'–ज्ञा १३.५९४. ३ भेटणें; गांठ पडणें. 'तैसें संत माहेर माझें। तुम्हीं मिनलिया मी लाडैजे।' –ज्ञा १५.५९७. [मिळणें]

**मीना**—पु. मिना पहा १ निळा रंग. २ दातावरील लुकण. ३ नीलमणी. ४ स्वर्ग. [फा.] ०**बाजार**–पु वस्तूंचें प्रदर्शन.

**मीमांसा**—स्त्री. १ षड्दर्शनांपैकीं पांचवें दर्शन; याचे दोन भाग आहेत-पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा किंवा वेदांत. पहिल्यामध्यें कर्मकांड व दुसऱ्यांत ज्ञानकांड विवेचिलें आहे. २ चर्चापूर्वक जाणण्याची इच्छा; खोल विचार; चिकित्सा. [सं. मान्=चौकशी करणें] **मीमांसक**–पु. कर्मकांडवादी जैमिनीचे अनुयायी. **मीमांसक मार्ग**–पु. कर्मकांड. 'ह्या प्राचीन कर्मकांडास पुढें मीमांसकमार्ग असें नांव मिळालें.'–गीर २८८.

**मीर**—पु. (व.) रुई, कपाशी मोजण्याचा काटा.

**मीर**—पु. १ (गंजिफा) दशावतारी गंजिफांतील प्रत्येक बाजूचा, रंगाचा राजा. २ उमराव; अमीर; सरदार; राजा. [फा. मीर; अर. अमीर] ०**अद्ल**–पु. न्यायाधीश. [फा. मीर–इ–अद्ल] ०**ज्या**–पु. (माण.) सर्व मेंढक्यांचा पुढारी. ०**पीर**–पु. थोर, अनुभविक, स्वतंत्र अधिकारी; बडा मनुष्य 'सारांश फौजेंत ताळ नाहीं. सारेच मीरपीर आहेत.'–ख ५.२३८०. [फा.] ०**शिकार**–शिकारीवरील अधिकारी. 'मीर शिकार पाखरें धरून आणावयास पाठविले असेत.'–व्रप ११८. [फा. मीर–इ–शिकार]

**मीर शेंग**—स्त्री. मिरची.

**मीलन**—न. १ मिश्रण; मिसळण; एकांत एक मिसळणें. २ भेट; भेटाभेट. ३ एकत्र जमणें; एकत्र येणें; मिळणी; संबद्ध होणें. ४ एकत्र मिसळन जाणें; मिळून जाणें; ऐक्य; एकी. ५ उघडझांक. ६ खग्रास ग्रहण. [सं. मील्=मिटणें, झांकणें, मिचकावणें] **मीलनोन्मीलन**–न. उघडझांप; मिटणें आणि उघडणें. 'दैविसी दिडी पाहतां सानी। तऱ्ही मीलनोन्मीलनीं।' –ज्ञा १७.५. **मीलित**–वि. १ मिश्रित. मिसळलेला; एकत्र केलेला. २ भेटलेला. ३ एकत्र जमलेला, मिळालेला. ४ विशिष्ट बाजूस मिळवून घेतलेला; वळविलेला. [सं.]

**मीस**—न. मिष पहा.

**मीळ**—स्त्री. १ (अशिष्ट) प्राप्ती; नफा; फायदा; मिळकत. २ मिळणी. [मिळणें] ०**जोड**–स्त्री. लाभ; तडजोड. 'सारांश मीळजोड स्वामींच्या आशीर्वादें होईल.'–पया १०.

**मुआझिन**—पु. प्रार्थनेस बोलाविणारा. [फा.]

**मुकटा**—पु. सोंवळयांत नेसावयाचें रेशमी किंवा तागी वस्त्र. [का. मुट्टु=शिवणें ?]

**मुकटी**—स्त्री. (गो.) बंदुकीचें तोंड.

**मुकण-णा**—नपु. १ निःसत्व व हलका असलेला कडधान्याचा दाणा; अशा दाण्याची रास. २ (क्व) शिजविल्यानंतर किंवा भिजविल्यानंतर टणक राहिलेला दाणा. चाड; -वि. उदास; उदासीन वृत्तीचा [मुका+दाणा] **०हत्ती**-पु. १ बिन सुळयाचा हत्ती; दंतहीन हत्ती. २ (ल.) टेंगू व ढेरपोटया इसम. **मुकणीतूर**-स्त्री किडकी तूर; रोगट दाणा असल्यामुळें नासून जिची चांगली डाळ होत नाहीं अशी तूर

**मुकणें**—सक्रि. गमावणें; न मिळणें; अंतरणें; हानि पावणें. 'तरि देतों शाप तुला, विजय न घडतां हितास मुकतास।' -मोभीष्म १.८९. [सं. मुच्=सोडणें]

**मुकं(कुं)दणें**—अक्रि. (ना.) १ गुदमरणें. २ आंबणें.

**मुकदम, मुकद्दम, मुकादम, मोकदम**—पु. १ पुढारी; म्होरक्या; मजुरांवर देखरेख करणारा. २ गांवपाटील; गांवकऱ्यांचा मुख्य; वतनदार. ३ देशमुखाच्या खालच्या हुद्याचा गांवकामगार. [अर. मुकद्दम] **मुकद्दमी**-स्त्री. मुकादमाचे हक्क किंवा हुद्दा.

**मुकद(द्द)मा. मोकदमा**—पु. १ काम; प्रकरण; बाब. २ खटला (दिवाणी किंवा फौजदारी). (ना.)मुकरदमा. 'नवाब गुरगुटे यांचा मोकदमा फैसल करून...' -ख ११९४. [अर. मुकद्मा]

**मुकदम**—पु. (निंदार्थी) मुका मनुष्य. [मुका]

**मुकद्दर**—वि. नियुक्त; नियोजित; कायम केलेला; नामजाद. 'आबाजीकृष्ण या कामावर मुकद्दर असोन...' -रा ५. १९७. [अर. मुकद्दर्=ईश्वरनियोजित]

**मुकय्यद**—वि. कायम; पक्का. 'या कामावर मुकय्यद राहून...' -पया ४६६. [अर. मुकय्यद्]

**मुकरणें**—न. वाचाळता; बडबड. 'जाती प्राणें प्रमाणें करिति मुकरणें पै न वेतील नाणें।' -अकक २, सुदामचरित्र ७०. [मुखर]

**मुकरर, मुकर्र, मक्रर**—वि. १ निश्चित; नेमलेला; ठरविलेला; २ नक्की; नियोजित. -क्रिवि. खात्रीनें; निश्चयानें; पुन्हां पुन्हां. 'मुक्रर ल्याहावें याची हाजत नाहीं.' -पया ४७६. [अर. मुकर्रर्]

**मुकलस्त**—वि. (व.) मनमानेइतका; मुबलक; वाटेल तितका. [सं. मुक्त?] **मुकलस्ती**-स्त्री. (व.) १ मुबलकता. २ मोकळीक; स्वैर वर्तन.

**मुकशी**—स्त्री. (राजा.) टोंक; अग्र; अखेरचा भाग; तीक्ष्ण अग्रभाग. [सं. मुख]

**मुकसणी**—स्त्री. (गो.) संपादणी.

**मुकसी**—वि. सोनेरी बुटीदार; सोनेरी बुट्या किंवा ठिपके असलेलें. 'चिरे मुकसी.' -वाडसमा १.१९. मुकेस-सी पहा.

**मुकसुचें**—अक्रि. (गो.) लांच घेणें; खाणें. [मुखशुद्धि]

**मुक(कु)लित**—वि. १ स्पष्ट. २ संक्षिप्त. 'हे सांख्यस्थिति मुकुलित। सांगीतली तुज एथ।' -माज्ञा २.२३. [सं. मुकलित]

**मुका**—पु चुंबन. (क्रि० घेणें). [ध्व मुख]

**मुका**—वि. १ बोलतां येत नसलेला; न बोलणारा; वाचा नसलेला. २ रागानें किंवा हिरवटपणानें बोलत नाहीं असा; स्तब्ध. ३ शांत बसलेला. ४ तोंड नसलेलें (गळूं, फोड) डोकें किंवा तोंड नसलेला (नारू). ५ न वाजणारा; अगदीं कोंवळा; आंत गर नसून पाणी भरलेला (नारळ). ६ चाड; न भिजलें जाणारें; मोड न येणारें (कडधान्य). ७ न उमललेली; न फुललेली (कळी) ८ आवाज न करतां चालणारें (रहाटगाडगें, चरक, यंत्र इ०) [सं. मूक; का मुग्गु, मुद्दु] **म्ह०** मुक्याचे मनीं मंगळवार (मंगळवारीं कोणताहि बेत करूं नये अशी समजूत आहे त्यावरून). (वाप्र.) **०मुलगा होणें**-प्रथम न्हाण येणें. **०राहाणें**-(बागलाणी) गप्प बसणें. **मुकावणें**-मुके होणें; स्तब्ध बसणें. 'मुकावल्या वेदश्रुती।' -परमा १ १८. सामाशब्द- **०गोवर**-पु. ज्यांत अंगावर पुटकुळया पुरळ येत नाहीं असा गोवर. **०दंद**-पु. मुका दावा पहा. **०दाचा**-पु गुप्त द्वेष; डूक. **०नारळ**-पु. कोंवळा असल्यामुळें न वाजणारा नारळ. **०मार-मारा**-पु. १ वैरामुळें किंवा दुष्टपणानें जादूटोण्याच्या योगानें किंवा शापांनीं केलेला गुप्त नाश हानि. २ पुराव्याला कांहीं खुणा वगैरे राहाणार नाहींत असा दिलेला अंगावर मार. **०मेंद-म्हसोबा, मुकी मण्यार**-पुस्त्री. (निंदार्थी) हिरवट, तिरसट मनुष्य. **मुकी अर्जी**-स्त्री. एखाद्याची नालस्ती करण्यासाठीं बिनसहीचा किंवा खोटया सहीनें केलेला अर्ज. **मुकी कमान**-स्त्री. चपटी कमान. **मुकी वस्तु, मुकें जनावर**-स्त्रीन. गाय म्हैस इ० जनावरें. 'मुकी वस्तु निघातें मारी।' -दा २.१.६६. **मुकें गळूं**-न. तोंड न पडलेलें गळूं. **०गाळ**-न. एक मुलींचा खेळ. **०दंद**-मुका दावा पहा. **०फळ-फूल-पान**-न. कोंवळें किंवा पक्व न झालेलें फळ; न उमललेलें, कळीच्या स्थितींत असलेलें फूल, पान. **०फुल**-न. एक मुलींचा खेळ. **०भिजाणे**-पुअव. भिजलेले परंतु मोड न फुटलेले दाणे (हरभरा, पावटा इ०चे) **मुकाणा**-पु. मुकणा पहा.

**मुकाट्यां, मुकाट्यानें-नीं**—क्रिवि. गपचीप; न बोलतां; स्तब्धपणें; शांतपणें.

**मुकादम-मी**—मुकदम-मी पहा.

**मुकाब(बि)ला, मोकाबला**—पु १ पडताळा; मासला. २ तुलना; शर्यत. (क्रि०करणें). ३ गांठ; लढाई; विरोध; झुंज; तोंड देणें. 'त्यांचा यांचा मुकाबला होऊन लढाई सुरू झाली।' -भाब ७९. [अर.] **मुकाबिले, मुकाबील**-क्रिवि. समोर. 'पुन्हां नबाब बहादराचे मुकाबिले उभे न रहात.' -रा १९.

**मुका(क्का)म**—पु. १ थोडा काल राहण्याची, उतरण्याची, तळ देण्याची जागा; आश्रयस्थान; आसरा; विश्रांति घेण्याचें ठिकाण. २ रहाणें; अवस्थान; तळ देणें; एखाद्या ठिकाणीं थोडा वेळ थांबणें. ३ वास्तव्याचें ठिकाण; वस्ती; बिऱ्हाड; राहण्याचें गांव. उदा० (पत्रांतून) मु. पुणें, मुंबई इ० ४ (ल.) कुंठितावस्था; विश्रांति; टप्पा; पायरी; मध्यंतरींचें थांबणें. [अर. मुकाम्] **मुकामात, मुक्कामात**—स्त्री. वस्ती; राहणूक. 'शहरच्या पूर्वेस चारा आहे तेथेंच मुकामात करावी.' —रा १.१५६. [अर. मुकामत्]

**मुकासा, मुकासाई**—पु. मोकासा, मोकाशी पहा.

**मुकुट**—पु. किरीट; टोप; राजाचें, देवाचें शिरोभूषण; शिरताज. [सं.] **०मणि**—पु. १ मुकुटांतील रत्न. २ (ल.) नायक; पुढारी; नेता; अग्रगण्य; अग्रेसर; मुख्य इसम **मुकुटाभरण** न राज्याभिषेक.

**मुकुर**—पु. आरसा; दर्पण. [सं.]

**मुकुल**—पुन. १ मोठा कळा; कळी (उमलणारी). २ कमळ. ३ घोडयाच्या कपाळावर जाईच्या कळीप्रमाणें असलेला भोंवरा. —अश्वप १.८५. [सं.] **०दृष्टि**—स्त्री. (नृत्य) पापण्या स्फुरण पावण्यास लावणें. अशा दृष्टीचा अभिनय, झोंप, स्वप्न व सुख दर्शित करतो. **मुकुलित**—वि. १ पूर्ण न उमललेलें (फूल); अर्धवट मिटलेले (डोळे). २ (ल.) संक्षिप्त; थोडक्यांत. **मुकुळणें**—अक्रि. बंद ठेवणें; करणें; आवरून घेणें. 'परि तो रसातिशयो मुकुळी। मग ग्रंथार्थदीपु उजळी।' —ज्ञा ५.१४२. [सं. मुकुलित]

**मुकेस**—पु. सोन्या-चांदीची बारीक तार; सोनेरी-रुपेरी वखें इ० चा चुरा. **मुकेस-सी**—वि. जरतारी; भर्जरी; सोनेरी बुट्टयांचें. 'तिवट चुनडी समेत बतनाव तुरा मुकेसी.' —वाडसमा १.११९. [अर. मुकय्यस्]

**मुक्कर**—क्रिवि. खचित; खरोखर; निश्चयानें; न चुकतां; खास. [अर. मुकर्रर]

**मुक्की**—स्त्री. बुक्की; मुष्टियुद्ध. [सं. मुष्टि]

**मुक्त**—स्त्री. १ मुक्ति; मोक्ष. २ मृत्यु. (क्रि० पावणें). 'मुक्त पावले साहेबनाना कशा केल्या देवा तडातोडी।' —ऐपो १३२. —वि. १ मोकळा; सुटलेला; सोडून दिलेला. २ परब्रह्मांत मिळून गेलेला; मोक्षाप्रत गेलेला; प्रपंचादि बंधनापासुन सुटलेला. ३ फेंकलेलें; सोडलेलें (अस्त्र इ०). [सं. मुच्=सोडणें] **०कैवल्य**—न. ज्ञानाची ऐक्यस्थिति. 'किंबहुना ऐसैसें। मुक्तकैवल्य सुदिवसें।' —ज्ञा १६.१३. **०क्रिया**—स्त्री. वेदाच्या आधाराशिवाय केलेली गोष्ट; धर्मबाह्य वर्तन; स्वैराचार. 'मुक्तक्रिया प्रतिपादी। तो येक पढतमुर्खे।' —दा २.१०.४. **०छंद**—पु. ताल खेरीज छंदाच्या इतर नियमांनीं बद्ध नसलेला छंद. **०द्वार**—न. १ जाण्यायेण्यास प्रतिबंध नसलेलें दार; हवें त्यानें जावें यावें असें ठिकाण. २ कोणासहि जेथें जेवणास प्रतिबंध नाहीं असा भोजनसमारंभ. **०मार्ग**—पु. वेदबाह्य मार्ग; स्वैर वागणुकीचा मार्ग. **०मुद्रा**—स्त्री. १ सर्वत्र चालणारें नाणें; अप्रतिहत मुद्रा. २ मोत्यांची आंगठी; मोत्यांच्या आंगठीचा ठसा, शिक्का. 'आतां गीतार्थाची मुक्तमुदी। लावी म झिये वाग्वृद्धी।' —ज्ञा १८.२७. मुक्ता+मुद्रा] **०स्वर**—पु. (संगीत) सुटा स्व पहा.

**मुक्त**—न. मोतीं. [सं. मुक्ता; प्रा. मुत्त] **०लग**—पु. मोत्यांचा सर. —वि. मोतीं लाविलेला; मोत्यांनीं गुंफलेला. 'शुभ्र वस्त्र मुक्तलग कांचोळी।' —ह २३.२६. [मुक्ता+लग्न] **मुक्ता**—स्त्रीन. मोतीं. [सं.] **०गर्भ**—पु. मोत्यांतील मध्यवर्ती पदार्थ; ज्याच्या भोंवतीं मौक्तिक रसाचे थर बसुन मोती तयार होतें तो पदार्थ. **०जाल**—न. १ मोत्यांची जाळी; डोक्यांत घालण्याचा स्त्रियांचा एक दागिना; बिंदी. २ मोत्यांचा झुबका. **०फळ-ल**—न. १ मोतीं २ मोत्यासारखें सुंदर अक्षर. ३ सीताफळ. ४ (ल.) मूर्खासारखे बोललेले उद्गार; हास्यास्पद भाषण. **०फळी**—स्त्री. नाकांतील मोत्यांचा दागिना; नथ; 'मुगबट. नासिकीं मिरवे मुक्ताफळी।' —कथा २.११.९५.

**मुक्तसर**—पु. हक्कदार किंवा कामदार नव्हे अशा वतनदारांची पदवी. मक्तसर पहा.

**मुक्ता**—क्रिवि. तोंडीं.

**मुक्ता**—वि. पुष्कळ.

**मुक्ताभरण**—न. एक विधि, संस्कार; (प्र.) अमुक्ताभरण पहा.

**मुक्ति**—स्त्री. १ मोक्ष; जीव आपल्या मूळच्या परमात्म स्वरूपास पावून त्या जिवाची जन्ममरणापासून सुटका होणें. मुक्ति चार प्रकारच्या आहेत. —सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता. २ मुक्त स्थिति; मोकळीक; स्वातंत्र्य; सुटवणूक; मोकळें सोडणें. ३ (ल.) मृत्यु. 'मुक्तीनें वोढिलें काळाचें घर।' —ऐपो ३३१. [सं. मुच्=सोडणें] **०पद**—न. मुक्तीचें स्थान; विदेही स्थिति. (क्रि० मिळणें; प्राप्त होणें). **०मार्ग**—पु. मुक्ति मिळविण्याचा मार्ग; मोक्ष मिळविण्याचें साधन.

**मुक्ती, मुक्तीकल**—स्त्री. (वे.) ज्यामध्यें रहाटाच्या खांबण्या उभ्या बसवितात ते विहिरीजवळचे दगड प्रत्येकी. [का]

**मुक्त्यार-री**—मुखत्यार, मुखत्यारी इ० पहा.

**मुक्बरा, मुकरबा**—पु समाधिमंदिर; थडगें. [अर. मुक्बरा]

**मुक्रर**—अ. मुकरर पहा. **मुक्करा**—पु. ठराविक रक्कम; सारा. 'बाकी आबाद देह मुक्करा रु. १८०.' —रा १५.९३. [अर. मुकर्रेरा]

**मुक्की**—स्त्री. (गो.) काजूच्या खेळांतील एक विशिष्ट संज्ञा. मुकर, कायम केलेला नियम, अट.

**मुकस, मुकस**—न. (अशिष्ट) तोंड; मुख. 'पुढें यांच्या मुक्सांतून वाक्स काय निघतात...' –विक्षिप्त १.६३ [सं. मुख] **मुकसांतून वाकसं काढणें-निघणें**–बोलणें; शब्द काढणें.

**मुकसी**—पु. घोडयाचा रंग; पांढऱ्यांत काळे ठिपके असलेला रंग; अशा रंगाचा घोडा चांगला समजतात –अश्वप १.३१.

**मुकसूद**—न. विनंति; अर्ज. मक्सुद पहा. [अर. मक्सूद]

**मुख**—न. १ तोंड; ओठ, दातांचीं मुळें, दांत, जीभ, टाळा, गाल व गळा या सात अंगांच्या समुदायास मुख म्हणतात.–योर २.४४८. २ पक्ष्याची चोंच. ३ चेहरा; मुद्रा; तोंडवळा. ४ (ल.) द्वार; वाट; मार्ग; एखाद्या इमारतीचें द्वार. ५ एखाद्या कामाची सुरुवात. इतर लाक्षणिक अर्थ तोंड या शब्दांत पहा. ६ साधन; करण; उपाय; हत्यार. 'ज्ञानाग्नीचेनि मुखें। जेणें जाळिलीं कर्मे अशेखें।' –ज्ञा ४.१०५. ७ (सामासिक शब्दांत) अग्रभाग; मूळचा भाग; मूळवस्तु; मुख्य मनुष्य; पुढारी; अग्रेसर. ८ नदी समुद्राला मिळते तो भाग, स्थल. ९ (सोनारी धंदा) पोचे काढण्यासाठीं लोखंडी पहारेचें टोंक वळवून त्याच्या शेवटीं मुखाकृति केलेला भाग. १० गणितश्रेढीतील पहिली संख्या. ११ चतुष्कोणाच्या पायाच्या विरुद्ध बाजू. [सं.; फ्रेजि. पोर्तु. जि. मुई] **म्ह०** (सं.) मुखमस्तीति वक्तव्यम्। (तोंड आहे म्हणून वाटेल तें बोलावें) सामाशब्द– **०कमल-चंद्र**–न.पु. (काव्य) कमलाप्रमाणें किंवा चंद्राप्रमाणें सुंदर असलेलें तोंड. **०चर्या, मुखावरची चर्या, मुखकळा**–स्त्री. तोंडावरील ओज, तेज. **०चालन**–न. (गायन) रागोचित गमक व अलंकार यांचा यथोक्त प्रयोग करून गायन करणें. **०छिद्र**–न. ज्वालामुखीचें तोंड; हें कढईसारखें असतें. **०जड**–वि. निबोल्या; कमी बोलणारा. 'बोलोंचि नेणे मुखजड। तो येक मूर्ख।' –दा २.१.४९. **०जबानी**–स्त्री. तोंडी हकीकत. **०जबानीनें**–क्रिवि. तोंडीं; तोंडानें बोलून. [सं. मुख+फा. जबान्=वाचा] **०टी**–स्त्री. मुख; तोंड. 'पाहिली ब्रह्मयाची मुखटी'। –कथा ७.११.५५. **०टोप**–पु. (काव्य) शिरस्त्राणाचा तोंडाकडील भाग. **मुखंड**–वि. मुख्य; पुढारी; प्रमुख; नायक; म्होरक्या. **मुखडा**–पु. चेहरा; तोंडावळा. 'मुखडा पाह्या उभी राहत धाउनिया।' –सला २५. [हिं.] **मुखदाक्षिण्य**–न. १ भाषणशैली; वक्तृत्व; वाक्पाटव; शब्दचातुर्य. २ मुखसंकोच; एखाद्याच्या आदरार्थ किंवा भावनाविष्काराकरितां बोलण्यास घातलेला आळा. **०दुर्बल-ळ**–वि. वेळेवर विशेष बोलतां येत नसलेला; बोलण्याचा कंटाळा असलेला; मितभाषी; बोलण्यास भित्रा. **०दूषिका**–स्त्री. अव. मुरूम; तारुण्यामुळें तोंडावर उठणाऱ्या पुटकुळ्या. **०पट्टा**–पु. १ घोडयाच्या तोंडावरील पांढरा पट्टा. २ घोडा जिन घालून बसण्याकरतां सज्ज केला असतां त्याच्या तोंडावर येणारा चामडयाचा पट्टा; म्होरकीचा भाग. **०परीक्षा**–स्त्री. (वैद्यक) तोंडात उत्पन्न होणाऱ्या चवीवरून करावयाची त्रिदोषपरीक्षा. वातदोषानें तोंड गुळमट होतें, पित्तानें तिखट किंवा कडू होतें आणि कफदोषानें आंबट, मधुर असें होतें. –योर १.२५. **०पाक**–पु तोंड उतणें; या रोगानें तोंडांत, गालफडांत, जिभेवर लहान लहान फोड येतात व ते फुटून त्यांच्या योगानें पिवळे अथवा पांढरे चट्टे पडतात. –गृहवैद्य ४१. **०पाठ**–वि. तोंडपाठ; मुखोद्गत. **०पृष्ठ**–न पुस्तकाचें पहिलें पान; पुस्तकाचें अगदीं बाहेरील पान; (याच्यावर पुस्तकाचें नांव इ० छापलेलें असतें). (इं.) कव्हर **०प्रिय**–वि. १ शरीरपोषक नसतां फक्त जिभेला गोड लागणारा (पदार्थ). २ साधें व पोषक असें तोंडास वीट न आणणारें; चवदार लागणारें (अन्न.) **०भंजन**–न. एखाद्याचा नक्षा उतरणें; लाजविणें; रग जिरविणें; खोड मोडणें; घाबरविणें. [सं. भञ्ज्=मोडणें] **०माधुर्य**–न. ज्यामध्यें फार बडबडण्याची व पुष्कळ खाण्याची इच्छा उत्पन्न होते असा एक वातविकार. **०मार्जन**–न. १ तोंड धुणें. २ (ल.) रागावलेल्या माणसाची गोड व प्रेमाच्या शब्दांनीं केलेली मनधरणी. ३ एखाद्याची त्याच्या तोंडावर खरडपट्टी काढणें; शिवीगाळ. ४ मुखमाधुर्य. **०र**–वि. १ बोलका; बडबडया; तोंडाळ; फटकळ. २ आवाज काढणारा; सनाद; वाजणारा. ३ पुढारी; म्होरक्या. 'मुखरस्तत्रहन्यते' [सं.] **मुखरत्व**–न. बडबड; वाचाळता. **०रंग**–पु. मुखराग पहा. **०रण, मुखरीण-रणी**–वि. मुख्य; प्रमुख; पुढारी. 'हरें तोषें केलें मुखरण तुला कीं रणतरी।' –वामन, विराट ७.१६१. **०रस**–पु. १ लाळ; थुंकी. २ (ल. निंदार्थी) अनिष्ट भाषण; दुर्भाषण. (क्रि० पाघळणें, गळणें). **०रा**–पु (ना.) नथ सर्ज्याची. **०राग**–पु १ तोंडावरील तेज; तजेला; कांति. २ (नृत्य) निरनिराळ्या भावांच्या वेळीं दाखविलें जाणारें तोंडावरील तेज. हे चार प्रकारचें असतें–स्वाभाविक, प्रसभ, रक्त व श्याम. **०रोग**–पु. १ तोंडास होणारा रोग. २ चेहऱ्यासंबंधीं रोग. मुखरोग एकंदर ६७ आहेत. **म्ह०** आंब्याला आला पाड कावळयांला आला मुखरोग. **०रोगी**–वि. १ मुखरोगानें पछाडलेला; मुखरोग झालेला. २ (ल.) दुर्मुखलेला; खिन्नवदन; खाणें पिणें व मंडळींत बसणें नाकारणारा, नावडणारा. **०वट-वटा-वटी, मुखोटा**–पु. १ तोंडवळा; चेहरा; तोंड. 'इच्छा इच्छुनी पाहती मुखवट।' –दावि ८. २ चांदी, सोनें इ०ची देवाच्या मूर्तीवर लावण्याकरतां केलेली फक्त तोंडाचीच प्रतिमा; (व.) मुखवट. पौराणिक नाटकांतील गणपती, रावण, नारसिंह इत्यादींचीं सोंगें बनविण्याकरितां त्यांच्या चेहऱ्यांच्या कागदाचा लगदा वगैरेच्या आकृती करीत त्या. ३ बुरखा; सोंग. ४ छातीपासून वरील शरीराचा भाग. ५ कागदावर काढलेलें तोंडाचें चित्र. ६ तोंडाची ढब; चेहरेपट्टी. **०वटी**–स्त्री. तोंडांत

मावण्याइतकें प्रमाण. ०वस्त्र–न. १ देवाची पूजा, नैवेद्य वगैरे झाल्यावर देव वामकुक्षि करतात तेव्हां त्यांच्या मूर्तीच्या तोंडावर घालतात तें वस्त्र. २ तोंड पुसण्याचें वस्त्र. ३ ग्रंथ किंवा पोथी बांधून ठेवण्याचें वस्त्र. ४ मलपृष्ठ; ग्रंथाच्या बाहेरील पान; (इं) कव्हर. ५ कागदाच्या पुडक्यांतील अगदीं वरचें पान. ०वाद्य–न. १ तोंडानें वाजविण्याचें वाद्य. २ (ल.) बोंब; शंख. ०वास–वासन–पु. १ तोंडाला सुवास देणारा पदार्थ. (पान सुपारी इ०) २ चुकीनें मुखवस्त्राबद्दल उपयोग करतात. ०विलास–पु. एक पक्वान्न. ०वैवर्ण्य–न. लज्जा, भीति आश्चर्य इ० मुळें चेहऱ्याला आलेली विरूपता; चेहऱ्यातील बदल. ०व्रण–पु. तोंडावर उठलेला व्रण; तोंडावर झालेली जखम. ०शुद्धि–स्त्री. जेवणानंतर तोंडाचा ओशटपणा जाण्याकरितां खावयाचे सुपारी, विडा इ० पदार्थ; सुपारी इ० खाणें. ०श्री–स्त्री. मुखचर्या; तोंडावरील तेज. ०संकोच–पु. १ एखाद्याच्या समोर भीतीमुळें अगर आदरामुळें बोलावयास वाटणारा संकोच; दबकलेपणा. २ आदरामुळें किंवा मोठेपणामुळें येणारा लाजाळूपणा. ३ वचकामुळें आलेली शालीनता. ०सूद, मुकशूत–द–स्त्री. (कों.) मुखशुद्धि पहा. ०सेक–पु. चूळ भरून टाकलेलें पाणी; गुळणा. 'असें असेल तर तो अभिषेक नव्हे. मुखसेक आहे.' –भासाच्या प्रतिभा नाटकाचा मराठी अनुवाद ०स्तंभ–पु. १ न बोलतां स्तब्ध बसणें २ ज्यामध्यें वाचा बंद होते असा एक रोग. –वि. घुम्या; न बोलणारा. म्ह० खावयास अगडबंब म्हणावयास मुखस्तंभ. मुखिया–पु. पुढारी; म्होरक्या. मुखरी. मुखो–स्त्री. (राजा.) मडकें कापड इ०ला पडलेलें बारीक भोंक, छिद्र. मुखीं–क्रिवि. (काव्य) तोंडपाठ; तोंडी. मुखें, मुखेंकरून–क्रिवि. एखाद्याच्या योगानें; रूपानें; द्वारें. उदा०त्यागमुखें, अन्वयमुखें, व्यतिरेकमुखें इ० मुखोद्गत–वि. तोंडपाठ; तोंडी. [मुख+उद्गत]

**मुखई**—वि. १ मोखा बंदरांतून आलेला (माल, जिन्नस.) २ निस्तेज, दुधासारख्या पांढऱ्या रंगाचें (मोतीं) मोखाबंदरांतून आलेले किंवा तेथें सांपडलेलें (मोती). [मोखा=एक बंदर]

**मुखत्यार, मुख्त्यार, मुख्तार**—पु. १ राजाच्या हाताखालील अधिकारावरील अंमलदार; सर्वाधिकारी. २ वंशपरंपरेनें चालत आलेला अधिकारी; पिढीजाद अधिकारी; नियोजित मुनीम; वतनदारांनीं वतनदारीचीं कामें चालविण्याकरितां नेमलेला मनुष्य. –वि. संपूर्ण अधिकार दिलेला; नियोजित; अधिकृत (प्रतिनिधि) स्वतंत्रपणें वागण्यास मोकळीक असलेला. [अर. मुख्तार] ०नामा–पत्र–पुन. अधिकारपत्र; ज्या लेखानें एखादा मनुष्य स्वतःच्या ऐवजीं व स्वतःच्या तर्फे काम करण्याचा दुसऱ्याला अधिकार देतो तो लेख; वकीलपत्र. [मुखत्यार+नामा; फा. मुखत्यार+सं. पत्र] मुखत्यारी, मुख्तारी–स्त्री. अख्त्यार; अधिकार; स्वतंत्रता; दुसऱ्यानें दिलेला अधिकार; वकीलीचा अधिकार. 'याप्रमाणे मुख्त्यारीचें अहकाम आणून दिलें. –चिरा २४. [फा. मुख्तारी]

**मुखबीर**—पु. हेर; गुप्तपणें बातमी काढणारा, पुरविणारा मनुष्य. 'प्रसिद्ध मुखबीर दुर्गाप्रसाद हा खबर चांगली देतो म्हणजे चुगलखोरपणा उत्तम करतो.' –विक्षिप्त ३.६५ [सं. मुखवीर हिं.]

**मुखलासी**—स्त्री. (कों.) मखलाशी; खुबी; हातचलाखी; युक्ति.

**मुखशाळा**—स्त्री. १ स्वयंपाक घर. –आडिवऱ्याची महाकाळी १०. २ (कु.) देवळांत स्त्रियांना बसण्यासाठीं केलेली विशिष्ट जागा. [मुख+शाळा]

**मुखळ**—न. मुसळ (उखळ शब्दाच्या जोडीस वर्णसादृश्यामुळें म्हणतात).

**मुखा**—पु. हातोड्याचें पसरट तोंड (याच्या उलट बाजूस पिसा म्हणतात). मुखाची खरवाई–स्त्री. चांदीचीं भांडीं घडवितांना उपयोगांत आणावयाची, टोकास गोल असलेली खरवई. मुख अर्थ ८ पहा.

**मुखालीफ**—पु. वैरी; शत्रु. 'समुद्रांतील टोपीवाले तुम्हांसीं मुखालीफ होऊन आम्हांसी स्नेह करावयास येतील.' –ऐटि२.७४. [अर. मुखालिफ्] मुखलिफत–स्त्री. वैर; दावा. [अर. मुखाल्फत्]

**मुखिक**—पु. (महानु.) उंदीर. 'ऐसा उगवल्या खुडिती ठावो। बिषय मुखिक।' –ज्ञाप्र २४३. [सं. मूषक]

**मुखी**—स्त्री. (ना.) नखी पहा.

**मुख्तसर**—वि. संक्षिप्त; थोडक्यांत. [अर. मुख्तसर्]

**मुख्य**—वि. प्रमुख; श्रेष्ठ; प्रधान; अग्रेसर. [सं.] ०अहंकार–पु. ज्ञानापूर्वीचा अहंकार. ०उपासना–स्त्री. निर्गुणोपासना; जींत ध्येय, ध्याता, ध्यान ही त्रिपुटी नाहीं अशी भक्ति; ब्रह्मोपासना. ०चैतन्य–न. सत्यचैतन्यांतील अविनाशी चैतन्य; परब्रह्म. ०देव–पु. परब्रह्म. ०धुर–पु सेनापति; सेनानी. 'हातीं लागल्या मुख्य धुर। सहजचि सांपडला परिवार।' –ह ६.९७. [सं. धुर्=जोखड] ०ब्रह्म–न. चौदा ब्रह्मांतील अनिर्वाच्य ब्रह्म. ०भक्त–पु. (आर्त, जिज्ञासु, अथार्थी यापैकीं नव्हे असा) ज्ञानी भक्त. ०भक्ति–स्त्री. जीमध्यें ध्येय, धाता, ध्यान अशी त्रिपुटी नाहीं अशी निर्गुण भक्ति; अद्वैतभक्ति. ०वृत्त–न. (ज्यो.) अनेक महावृत्तें लंबरूपानें ज्याला छेदणारीं अशीं कल्पिलेलीं असतात तें महावृत्त (छेदक वृत्तांना लंबवृत्तें म्हणतात). –क्रिवि. मुख्यत्वेंकरून; प्रामुख्यानें; प्रधानत्वें; प्राधान्यें करून. ०स्वर–पु. अ पासून लृ पर्यंत दहा स्वर. मुख्यात्मा–पु. कूटस्थ ब्रह्म; प्रत्यगात्मा.

**मुखण**—स्त्री. (मुंबई) सुंदर स्त्री; मुख्य राणी. मुखरण पहा.

**मुखलीस**—वि. प्रामाणिक. [ फा. ]

**मुगट**—वि. पेवांत पुष्कळ दिवस राहिल्यामुळें मुगासारखा उग्र व सयेणारें ( धान्य ).

**मुगटा**—पु मुकटा पहा.

**मुगडा**—पु ( राजा. ) केसांचा झुबका; झुंबडा; केरसुणीचा बुडखा.

**मुगडी**—स्त्री. बुगडी; कानांत घालण्याचा बायकांचा दागिना. [ सं. मुकुट-मुगुट-मुगटी-मुगडी ]

**मुगण**—न मुगाण पहा.

**मुंगणा-णी**—पुस्त्री ( ना. व ) शेवगा.

**मुगत**—न. मोतीं. 'मुगतांमाणीकांचे दांडे गोमेद पद्मराग माणिकें उधांती।' -धवळेउ ५४. [ सं. मुक्ता ]

**मुगद**—पु. ( बे. ) भाताची एक जात.

**मुगदमी, मुगदुमी, मुगदुमी साखर**—स्त्री. हलक्या प्रकारची पिठी साखर. [ मगदुमी ]

**मुगदल**—पु. ( प्र. ) मुद्गल पहा.

**मुगदळ**—स्त्री. मूग पेरण्यास योग्य असलेली जमीन. [मूग+दळें ] -न. १ मूग भाजून त्यांचें केलेलें पीठ. २ अशा पिठाचे लाडू. [ मूग+दळणें ] **मुगवण-न**-न. मुगाचें भूस; मुगाचा कोंडा; मुगाचें गुळी. **मुगवा**-पु. १ बायकांचें एक प्रकारचें, मुगा एवढया चौकटी असलेलें वस्त्र; लुगडयाचा एक वाण, प्रकार. २ दुध्या भोपळा. -वि. मुगाएवढया चौकटी असलेलें ( लुगडें ).

**मुगदाण**—न. ( बे. ) वेसण; बैल, रेडा इ० पशूंच्या नाकांत घातलेली दोरी. [ का मूग=नाक+दावणी=दावें; सं मुख+दामन्=दावें ]

**मुगदुरी**—स्त्री ( बे. ) पोह्यांच्या कण्या समुच्चयानें.

**मुंगफल्ली**—स्त्री. ( ना. ) भुईमूग

**मुंगरचें**—क्रि. ( गो. ) शिरकणें; शिरणें.

**मुगवत**—न ( कों. ) १ कौलारू छपराची, खपरेलाची पानपट्टी. २ चौथऱ्याचा पाटथरा. [ मुखवत् ]

**मुंगस, मुंगसवेल**—पु. मुंगूस, मुंगूसवेल पहा.

**मुंगसें**—न. ( व. ) बैलाच्या तोंडाला बांधावयाची मुसकी. मुसकी पहा. [ मुख ]

**मुगळ**—स्त्री. भातांत उगवणाऱ्या एक प्रकारच्या गवताचें बीं.

**मुगळ**—पु. शाकारलेल्या छपराचें आढें.

**मुंगळा-ळी**—पुस्त्री. डोंगळा; मोठी मुंगी. ०**लागणें**-उतावीळ होणें; चेव येणें; अतिशय घाई करणें. **साखरेवरले मुंगळे**-पुअव. गुळावरल्या माशा: जोंपर्यंत उत्कर्षाचे दिवस आहेत तोंपर्यंत मित्र म्हणविणारे लोक, स्नेही.

**मुगा**—पु. लुगडयांतील एक प्रकार, वाण. मुगवा पहा. ०**घेवडा**-पु. एका जातीचा घेवडा. ०**भोंपळा**-पु. दुध्या भोंपळा.

**मुंगा**—पु. १ घोडयाला होणारा एक रोग. २ घोडयाचा वरचा ओंठ, नाकाचा शेंडा; घोडयाला आवरून धरण्यासाठीं त्याचा वरचा ओठ दाबून धरणें, पिरगळणें. ( क्रि० दाबणें; पिळणें; घालणें; धरणें ). 'मागुती सरसावोनि धांविन्नला हरीनें रगडून मुंगा पिळला।' -हर १४.६४. ३ मुंगा पिळण्याकरितां घेतलेली दोरी किंवा इतर साधन. ४ गर्विष्ठपणाच्या चेष्टा; रग; उद्धटपणाची वागणूक; गर्व; खुमखुमी. ( क्रि० करणें; लावणें; चालवणें; जिरवणें; मोडणें ). 'सहजांत जिरविती सर्व तयाचा मुंगा।' -ऐपो ४२४. ५ चेव: उत्कट इच्छा; कांहीं एका कामासाठीं असलेली उत्सुकता. ( क्रि० आणणें ). ६ मुंगळा; काळी किंवा तांबडी मोठी मुंगी; डोंगळा. ७ ( नाशिक ) नागपंचमीच्या दिवशीं स्त्रिया फेर धरून गाणीं गातात तो प्रकार. ( क्रि० घालणें ). ८ बैलगाडीच्या मागील बाजूस सामान पडूं नये म्हणून दोन्ही बाखडांना मिळून बांधलेला दोरी विणून केलेला कटडा. [ मुंगी ]

**मुंगा**—पु. प्रवाल; पोंवळें. [ हिं. ]

**मुगाण**—न. जोंधळा किंवा बाजरी यांमध्यें पेरलेलें मूग किंवा अशा तऱ्हेचें दुसरें धान्य. मोघड, मोघण पहा. [ मूग+दाणा ]

**मुगाणा**—पु. १ मुकाणा; चाड; मोड न आलेला दाणा; न भिजलेला किंवा शिजलेला दाणा. २ (गो.) अर्धवट कोंब आलेलें भात. [ मुकाणा ]

**मुगाणा**—पु. ( राजा ). भरडलेले मूग; मुगाचा डोळ. [ मुग+दाणा ]

**मुगारा**—पु. नुकता फुटलेला कोंब. ( क्रि० येणें; निघणें; फुटणें )

**मुंगारा**—पु. खरीपांत होणारी जोंधळयाची एक जात. -कृषि २६५.

**मु(मुं)गारी**—स्त्री. ( सोलापुरी ) खरीपाचें पीक; पावसाळी पीक. याच्या उलट हिंगारी, अगर रब्बीचें पीक. [ का. ]

**मुगाळ**—स्त्री. १ गवताचा किंवा झाडाचा कोवळा अंकुर; फूट. ( क्रि० येणें; फुटणें; निघणें; होणें ). २ मुलांच्या अंगावरील लव.

**मुगी**—स्त्री. १ मुगाची एक बारीक जात. २ लुगडें, खण इ० वरील मुगाएवढी चौकट. -वि. अशा चौकटींनीं युक्त असें ( लुगडें, खण, इ० [ मूग ]

**मुंगी**—स्त्री. १ एक बारीक कीटक; पिपीलिका; गोड पदार्थ फार आवडणारा एक लहान प्राणी. 'गुरुचरणीं पार्थ जडे जैसी मधुशर्करारसीं मुंगी।' -मोकर्ण ४३.५०. मुंग्यांचे प्रकारः-काडमुंगी, गांडमोडी, घाणेरी, ढुंगणमोडी, दांत्या, धांवरी, वळविंच(ज),

१२.२.१०३. २ प्रभाव; धैर्य; सामर्थ्य; बल. 'समई यावा चुको नये।'–दा २.२.३१. ३ ओघ; प्रवाह. 'तंववरी नदानदींचीं नांवें। तंवचि पूर्वपश्चिमेचे यावे। जंव न येती आघवे। समुद्रामाजीं।' –ज्ञा ९.४६२. ४ आवेग; आवेश; फेरा; संचार; प्रवेश; तडाखा; कचका. 'कृष्णासी म्हणे राहे साहे। माझा यावा आला पाहें।' –एरुस्व १२.८९. ५ स्वारी. 'आला कर्नाटकी यावा।'–राम दासी २.१८७. ६ महत्त्व; सामर्थ्य; श्रेष्ठता. 'मत्पुत्र इंद्रासम ज्यास यावा।'–वामन विराट ८.२९. [ येणें ] **यावांका**–पु (महानु.) धैर्य; पुरुषार्थ. 'ऋषीशृंगु तपाचा यावांका।'–भाए ४६०.

**याहा( ही )स**—सना. (चतुर्थी विभक्ति) (व.) यांना; ह्यांस. [ हे ]

**याज्ञसेनी**—विना. द्रौपदी; यज्ञामध्यें उत्पन्न झालेली स्त्री. **याज्ञिक**–न. १ यज्ञयाग; सामान्यतः यज्ञसमारंभ. २ लग्न, मुंज यांतील उपाध्यिक. –पु. १ यज्ञ करणारा; अग्निहोत्री; यज्ञ करणारा पूर्वमीमांसक. 'परिजे नुसधी हिंसा। तेथ उगवैल काय अहिंसा। परीनवल बापा धिवसा। या याज्ञिकांचा।'–ज्ञा १३.२२३. २ लग्न, मुंज इ० धर्मकृत्यें चालविण्याचें अनुष्ठान जाणणारा ब्राह्मण. [ यज्ञ ] **याज्ञिकी**–स्त्री. याज्ञिकांचें काम; लग्न, मुंज इ० धर्मकृत्यें चालविण्याचें काम व तत्संबंधीं मंत्रमंत्र वगैरे. –वि. याज्ञिकासंबंधीं; याज्ञिकाचा. [ सं. ]

**यिव, यीव**—स्त्री. बकऱ्याच्या मानेचें मांस; मानेंतील मांसाचा तुकडा. [ यिव=मान सं. ग्रीवा ? ] ०**कुकडी**–स्त्री. मानेंतील आणि ढुंगणांतील मांसाचे तुकडे. (एखादा बकरा अगर मेंढा कापला असतां महाराचा या दोन भागांतील मांसावर हक्क असे ) [ यिव=मान+ कुकडी=ढुंगण, मागचा भाग; अवशिष्ट भाग ]

**यींदा**—पु. (माण.) नांगरास हाळीस बसण्याकरितां पाडलेलें भोंक; कुऱ्हाड, कुदळ, इ०ना दांडा बसविण्याकरितां असलेलें भोंक; नेढें.

**यीस्तारी**—स्त्री. पत्रावळ. इस्तारी पहा. [ सं. वि+स्तृ ]

**युक्त**—वि. १ जोडलेला; मिळवलेला; मिसळलेला; जुळविलेला. २ सहित; संपन्न. (समासांत) चिंतायुक्त; शोकयुक्त; संशययुक्त; खेदयुक्त; हर्षयुक्त; कामयुक्त; जलयुक्त; शर्करायुक्त इ०. ३ तत्पर; तयार; (अभ्यासांत अगर कामधंद्यांत) गुंतलेला; गढून गेलेला; सदोदित लक्ष देत असलेला. 'पार्थहितीं मुरारि युक्त सदा।' –मोकर्ण २३.२५. ४ योगांत निमग्न झालेला; योगाभ्यासी. ५ योग्य; रास्त; बरोबर; उचित; शोभेसा; जुळणारा. [ सं. युज्= जोडणें ] **युक्ताथिला**–वि. आस्तिक्य भावना असलेला –हंको [ युक्त+आथिला ] **युक्तायुक्त**–वि. योग्य आणि अयोग्य; बरें आणि वाईट; साजेसा व न शोभणारा. [ सं. युक्त+अयुक्त ] **युक्ताहार**–पु. बेताचें अगर पचेल तेवढें खाणें; मिताहार; योग्य रीतीचें पथ्यकर आणि मित भोजन. [ युक्त+आहार ] **युक्ताहारी**–वि. बेताचें खाणारा; योग्य अन्न योग्य प्रमाणांत घेणारा.

**युक्ति, युक्त**—स्त्री. १ शक्कल; खुबीदार कल्पना; शोधकबुद्धि. २ कसब; खुबी; कल्पना; कौशल्य (शक्तीच्या विरुद्ध). ३ (एखाद्या यंत्रांतील) कळ; मख्खी; किल्ली; मखलाशी. ४ उचितपणा; योग्यपणा; औचित्य; विवेक; प्रमाण; नियमितपणा. 'तरि तत्सत्तेविषयीं उपमन्यो कोणती असे युक्ति।'–मोअनु ३.३१. ५ ऐक्य; मिश्रण; मिळणी; एकत्रीकरण; एकी. ६ निष्काम कर्मे करण्याची हातोटी. 'जो युक्तिपंथें पार्था। चढे मोक्षपर्वता। तो महा सुखाचा निमथा। वहिला पावे।'–ज्ञा ५.३२. [ सं. युक्ति ] (वाप्र.) **युक्तीच्या पोटीं**–क्रिवि. युक्तीनें; मुत्सद्देगिरीनें; कौशल्यानें. **युक्तीस येणें**–मनास पसंत पडणें; योग्य, युक्त वाटणें, दिसणें. 'बहु बोलणें तयांचें धर्माच्या येइनाचि युक्तिस तें।'–मोशांति ३.८४. **युक्तीयुक्तीनें करणें-घेणें**–त्वरा अथवा दांडगाई न करतां सोईनें करणें. सामाशब्द– ०**कौशल्य**– न. उपाययोजनेंतील कौशल्य; तोड काढण्यांतील प्रावीण्य. ०**घोष**– पु. बंधरूपी मंत्रघोष. 'तेथ संयमाग्नीचीं कुंडें। इंद्रियद्रव्याचेनि पवाडें। यजिती उदंडें। युक्तिघोषें।' –ज्ञा ८.५०. ०**त्रय**–न. (योगशास्त्र) वज्रासन, जालंदर आणि उड्डियान असे तीन बंध. –ज्ञा ४.१२७. ०**प्रयुक्ति**–स्त्री. नानाप्रकारच्या युक्त्या; बरेवाईट उपाय. [ सं. ] **युक्तिप्रयुक्तीनें**–क्रिवि. बऱ्यावाईट उपायांनीं; कोणत्याहि मार्गानें; कांहींहि करून; या नाहीं त्या उपायानें. ०**बाज-मान-वंत-वान**–वि. युक्त्या जाणणारा; युक्त्या लढविणारा; हुषार; सुपीक डोक्याचा; शोधक; निरनिराळे उपाय योजणारा. ०**वता**–क्रिवि. कौशल्यानें; युक्तीनें; खुबीनें; हुषारीनें; लबाडीनें. [ युक्ति+वत्, वाट ] ०**वाद**–पु. युक्तीनें केलेला वाद (तर्कशास्त्रास अनुसरून नव्हे पण सामान्य व्यवहारास पटेल असा) ०**सार**–वि. बरोबर; योग्य; रास्त; पटण्यासारखें; औचित्याला धरून असलेलें. **युक्त्या**–वि. कसबी; हुशार; युक्तिबाज; सुपीक डोक्याचा; चलाख; निरनिराळे बेत, मसलती, उपाय योजणारा. –क्रिवि. युक्तीनें; कौशल्यानें; लबाडीनें; हुशारीनें.

**युग**—न. १ कृत, त्रेता, द्वापार आणि कलि असे जे विश्वाचे कालमापक चार मोठाले विभाग त्यांपैकीं प्रत्येक. २ मोठा कालविभाग; वरील चारी कालविभाग मिळून होणारा काल; चारी युगांचा काल. ३ जोडी; दोन वस्तू; युग्म; द्वय. उदा० कर्णयुग; वस्त्रयुग इ० ४ जोखड; जूं; धुरा. –वि. चार संख्या (युगें चार मानिलीं त्यावरून) 'नाराच सहस्र युग।'–मोकर्ण ४३.७७. ०**धर्म**– पु. १ कालमाहात्म्य; त्या कालांतील लोकांची प्रवृत्ति. कलानुरूप योग्य वर्तन. ०**पत्**–क्रिवि. एकत्र; एकदम; एकाच वेळीं. 'घट

आणि घटाभाव हे एका अधिकरणीं युगपत् संभवत नाहींत.' ०माहात्म्य-न. युगाचा मोठेपणा; युगाचें महत्त्व; युगाचें वैशिष्ट्य; काळाचा गुण, प्रभाव. **युगांत**-पु १ युगाचा शेवट. २ प्रलयकाळ; चारी युगांनंतर येणारा प्रलयकाल. 'जैसा सिंहाचिया हांका। युगांतु होय मदमुखा।' -ज्ञा २.२१५. [युग+अंत] **युगादि**-पु. युगाचा प्रारंभ, सुरवात [युग+आदि] **युगानुयुग**-क्रिवि. कित्येक युगेपर्यंत. [युग+अनुयुग] **युगुल, युगल, युगूळ**-न (काव्य) जोडी; द्वय; दोन वस्तू. [सं. युगुल]

**युगूत, युगत**—स्त्री. युक्ति; खुबी. [युक्ति अप.]

**युग्म**—न. १ द्वय; जोडी. २ जोडपें; मिथुन; मेहूण. ३ वाक्यरचनेनें व अर्थानें एकत्र जोडल्यामुळें दोन्ही मिळून अर्थ पूर्ण होणारें श्लोकद्वय. ४ (गणित) प्रमाणांत असलेल्या दोन संख्या (यांतील पहिलीस अग्रसर व दुसरीस उपाग्रसर म्हणतात). -छअं१०४. [सं. युज्=संयोग करणें, जोडणें] ०भोजन-न. देवतातुष्ट्यर्थ मेहुणांना, जोडप्यांना घातलेलें जेवण.

**युत**—वि. जोडलेला; संबद्ध; युक्त; एकत्र झालेला, असलेला; [सं. यु=जोडणें] **युति**-स्त्री. १ (ज्योतिष) चलग्रहांचें एका दक्षिणोत्तर रेषेंत जवळ जवळ येणें. २ मिलाफ; जोड; एकत्र येणें. ३ (गणित) बेरीज. [सं. यु=जोडणें]

**युधिष्ठिर**—पु विना. १ पांडवांतील सर्वांत मोठा; धर्म. २ (यौगिक) सामान्यतः निधडया छातीचा, युद्धांत स्थिर असणारा मनुष्य.

**युद्ध, युद्धय**—न. १ लढाई; रणकंदन. २ भांडण; मारामारी; झुंज; दोन व्यक्तींचा, पक्षांचा झगडा, लढा, सामना. समासांत कुक्कुटयुद्ध (कोंबडयांची झुंज); मेषयुद्ध (मेंढयांची साठमारी); गजयुद्ध; मल्लयुद्ध (मल्लांची झोंबी, कुस्ती); तलातलयुद्ध (हातांनीं केलेली मारामारी); गदायुद्ध; मुष्टियुद्ध इ० [सं. युद्ध, युध्=लढणें] (वाप्र.) **युद्धास तोंड लागणें**-युद्ध सुरू होणें. कलहास, मारामारीस, वादास वगैरे आरंभ होणें. सामाशब्द- ०कंडू-स्त्री. लढाईची खाज; लढण्याची, भांडण्याची तीव्र, उत्कट इच्छा; मारामारीची खुमखुमी. [सं.] ०कंदन-न. लढाईतील कत्तल; प्राणांतिक लढाई. 'युद्धकंदन मग करूं।' -रावि १५.७५. [युद्ध+कंदन;] ०करी-पु. योद्धा; लढणारा. **युद्धकर्ज**-न. युद्धाच्या खर्चासाठीं काढलेलें कर्ज. ०फळी-स्त्री. (काव्य) सैन्याची रांग; लढाईस उभें असलेलें सैन्य; सैन्याची मांडणी, रचना. ०मद-पु. लढण्याचा आवेश, स्फुरण. [सं.] ०वीर-पु. शूर पुरुष; योद्धा. [सं.] **युद्धांगण**-न. १ रणमैदान; रणभूमि. २ फड; हौदा; कुस्तीची किंवा झुंजेची जागा. [युद्ध+अंगण]

**युनानी**—वि. मुसलमानी वैद्यकासंबंधीं; यवनी. [फा.]

**युनिव्हर्सिटी**—स्त्री. विश्वविद्यालय. [इं.]

**युयु, यू, यूयू**—उद्गा. कुत्र्याला बोलावितांना उच्चारण्याचा शब्द. याच्या उलट म्हणजे त्याला एखाद्याच्या मागें लावण्यासाठीं किंवा भुंकण्यासाठीं छू छू शब्द उच्चारतात.

**युरेजन-जिअन-शिअन**—वि. हिंदी स्त्री व युरोपियन पुरुष यांच्या संबंधापासून झालेला (मनुष्य). [इं.]

**युवक**—पु. तरुण. **युवकसंघ**-पु तरुणांचा संघ; तरुणांची संस्था. (इं.) यूथलीग.

**युवति-ती**—स्त्री. तरुण स्त्री; सोळा ते तीस वर्षांपर्यंत वयाची स्त्री. [सं.]

**युवन**—न. १ यौवन; तारुण्य. 'जो कैवल्यकुसुमाचा आमोदु। नातरि ब्रह्मविद्येचा युवनमदु।' -भाए ३७. २ स्तन. 'सदैव युवन पाजिती। दुद मरिये।' -ख्रिपु २.२.१५४. [सं. यौवन; हिं जोबन]

**युवराज-जा**—पु. १ गादीचा वारस; ज्येष्ठ राजपुत्र. २ राजानें राज्यकारभार चालविण्यास मदतीस घेतलेला व त्याच्या नंतर गादीवर बसणारा राजपुत्र किंवा दुसरा एखादा इसम. [सं. युवराजा] **युवराज्य**-न. गादीवर बसण्याला नियुक्त मनुष्याचें कर्तव्य किंवा जागा, हुद्दा, पदवी; युवराज हें पद. [सं. यौवराज्य]

**युवा**—पु. १ तरुण पुरुष; तारुण्यावस्थेंत प्रवेश करणारा मनुष्य (सोळा ते चाळीस वर्षांपर्यंतच्या पुरुषालाहि युवा म्हणतात). २ साठ संवत्सरांतील नववा संवत्सर. [सं.]

**युष्मत्**—सना. तूं; तुम्ही. (समासांत) युष्मद्गृह, युष्मद्देश; युष्मत्पुत्र इ० [सं.] **युष्मादिक**-सना. तुम्हीं; आपण (उपरोधिकपणानें किंवा विनोदानें उपयोग). क्रियापदाचें रूप तृतीयपुरुषाचें असतें. 'आतां शौर्याच्या गोष्टी सांगतां पण त्या दिवशीं चोर आले तेव्हां युष्मादिकच पळाले.' [सं. युष्मत्+आदि+क]

**युक्षदंड**—पु. (अप.) इक्षुदंड; ऊंस. [सं. इक्षुदंड]

**यूका**—स्त्री. ऊ. [सं.]

**यूथ**—पु. कळप; तांडा; समूह; समुदाय (विशेषतः पशु किंवा पक्षी यांचा). [सं.]

**यूनान**—विना. यवनदेश. ग्रीस देश. अयोनिया. [इं.]

**यूनिट**—पु. १ एक; एकांक; एकम्. २ व्यक्ति; व्यष्टि; एकबीज. ३ मूलमान; मूलपरिमाण; मापनपरिमाण. [इं.]

**यूप**—पु. खांब; स्तंभ; यज्ञस्तंभ. [सं.]

**यू(यु)रोपियन**—वि. यूरोप खंडांतील; यूरोप खंडासंबंधी; [इं.]

**ये**—सना. या; ह्या. 'ऐशीं शरीरें नेणों किती। म्यां निर्माण केलीं ये क्षितीं।' -एभा ७.२४५.

**ये**—उद्गा. सलगीचें संबोधन. [सं. ए]

**येइतलग**—क्रिवि. येईपर्यंत. 'लेकीन...मोहिवास येइतलग त्यास...करावें.' –पेद ३.५.

**येउ(ऊ)तें**—वि. १ येवढें. 'ऐसें अर्जुना येउतें सर्वेश्वरें। पाहोनि बोलिलें आदरें।' –ज्ञा १०.५३. २ येवढेमें. 'तिया झाडां येउतें जयां गाहती। ते कल्पवृक्ष।' –ज्ञा ९.३७५. –क्रिवि. येथें. [सं. यावत्]

**येऊनजाऊन**—क्रिवि. १ प्रसंगानें; कायमचें नव्हे; मधून मधून यावें जावें अशा प्रकारें. 'मी येथें नेहमीं राहणार नाहीं, येऊन जाऊन असेन.' २ सरतेशेवटीं; बाकी; शेवटचें कृत्य, उपाय साधन म्हणून. 'वरकड सारी दौलत संपली आता येऊनजाऊन वतन राहिलें.' ३ फार तर. 'तूं येऊनजाउन मारशील, आणखी काय करणार आहेस?' ४ नेहमीं; सतत. 'येऊनजाऊन हाच धंदा.' [येणें+जाणें]

**येऊल**—पु. (कों. गो.) १ मुंग्यांची एक जात. २ तरस.

**येक**—वि. १ एक; सामाशब्द व साधित शब्द एक शब्दामध्यें पहा. (समासांत). येकंदर, येकलकाजा, येकलकोट, येकलकोंडा, येकवट, येकवटणें, येकवत, येकवळा, येकसुरा, येकाड, येकांड्या, येकांत्रा, येकांत्रा आड, येकांत्राड, येकामी, येकारणें, येकुगात, येकूण, येकोपा, येकोबा, येकोशास, येकोशी, येकोस इ०. २ कित्येक. 'साधूनि मारिती । येकाचीं सर्वस्वें हरिती। येकालागी उभारिती।' [सं. एक] सामाशब्द- ०इसा–वि. (कों.) वीस. **येकंकार**–पु. अष्टाकार. 'अवघा येकंकार करिती।' –दा ११.१.३२ ०जथ–पु. एकत्रित जमाव. 'तीन हजार येकजथ आहे.' –पेद २०.१७६. ०जरा–ऱ्हा–अ. बिलकुल; थोडें सुद्धां. [अर.] ०जहती–स्त्री. स्नेह; मैत्री. 'हमेशा मकातीब पाठवून दोस्ती येकजहती दीन–ब–दीन जादा होय.' –रा १०.३१२. [फा.] ०जिनसी–वि. एकाच प्रकारचें; अमिश्र. 'येकजिनसी स्वतंत्र।' –दा २०.२.३. **येकटका**–वि. एकटा. 'गेला हरि येकटका यास्तव घेवूनि आपणहि ये कटका।' –मोकृष्ण ५३.१५. ०ठोक–वि. सर्व एकासारखें एक. 'राजमित्रादि येकठोक।' –दावि ३९०. ०तार–वि एकरूप. 'येकतार रामेसी।' –दावि ७१. ०तुके–वि. सारखें; समान. 'ऐसें येकतुकें पांचभौतिक।' –ज्ञा ७.२५. **येकंदरें**–वि. एकाकार; एकाग्र. –शर. [प्रा.] ०दाणें–न. एकदाणी. 'तें येक दाणें मिरवे गळांचें।' –सारुह ६.३४. ०दुमाल–क्रिवि. एकामागें एक उभे राहून. 'घोडेस्वारांनीं येकदुमाल होउनु।' –मसं ९. ०देसी–वि. १ एकपक्षी; सर्वत्र लागू न होणारें. 'परि तों आहे येकदेसी। दृष्टांत न घडे वस्तुसी।' –दा २०.१०.६. २ एकमार्गी; अल्पज्ञ. 'विरक्तें येकदेसी नसावें।' –दा २.९.२९. [सं. एक+देश] ०बगी–वि. एक प्रकारचें. 'परि तें एकबगी थोडें।' –ज्ञा ११.४०४. [एक+बग] ०बेग–अ. एकदम; ताबडतोब. [फा.] ०मुख–शअ. समोर. 'व्यासासि केलें येकमुख।' –एभा १.१५१. (पाठभेद) [प्रा.] ०मोहरें–विवि. १ एकत्र. २ एका बाजूस तोंडें असलेलें; सामोरें. [प्रा.] **येकल**–वि. एकटा. 'तरी आम्ही भेटविला दमयंती नळ। तेथें हंसचि होता येकल।' –कथा १.८.१०. **येकलहरा**–वि. जो चावला असतां एकाच लहरीनें मृत्यु येतो असा (सर्प) 'बलावा गारोडी भुजग डसवा येकलहरा।' –मध्व ५८१. ०वंकी–स्त्री. तादात्म्य. –हंको. [प्रा. एक+अंक] ०वगी–अ. एका प्रकारानें. [सं.] ०वट–पु. एका ठिकाणीं जमणें; एकत्रता. 'सकळांचा जाहला येकवट।' –कथा९.५.८. ०वटणें–सक्रि. गोळा करणें. 'रत्नें साधाया कारणें। मृतिका लागे येकवटणें।' –दा ७.३.२. ०वळा–क्रिवि. एकत्र; एकाग्र. 'वृत्ती करणें येकवळा।' –ज्ञा १८.६३७. [एक+ओळ] ०सर–वि. एकजात; व्रह्म [प्रा.] ०सरणें–सक्रि. एक मार्गी होणें; अनुसरणें. –हंको. [प्रा.] ०सरां–रा–अ. एकदम. 'तुटे संशयाचें मूळ। येकसरां।' –दा १.१.२८. ०सरें–क्रिवि. ताबडतोब; एकदम. ०सार–न. एकच तत्त्व. –हंको. ०सुदी–स्त्री. सुधेपणा; सरळपणास 'सदरहू कलमांचा लिहिल्याप्रमाणें फडशा न केल्यास तुमचें येकसुदीस चांगलें नाहीं म्हणोन –वाडदुबा ५.१६६. **येकाखडी**–स्त्री. उजळणी; ओ ना मा नंतर शिकवावयाची अ आ इ ई इ० स्वरादि अक्षरें. 'ऐसा महाक्लेशेसि त्यास शिकवी। ओनामा आणि येकाखडी।' –स्वादि ४.४.४५. **येकाग्र**–वि. एकाग्र. 'श्रोती करावें श्रवण। येकाग्र होऊनि।' –दा ३.६.१. **येकाढ्यता**–स्त्री. १ एकदेशीपणा. 'तै गातयाचेनि पांगें। येकाढ्यता नोहे।' –ज्ञा १८.१७३६. २ अपूर्णता. –शर. **येकांत**–पु. एकांतांत भाषण वगैरे करणें. 'परांगनेसीं येकांत।' –दा २.१.२९. **येकांतर**–वि. एका दिवसाआड. [प्रा.] **येकाधा**–वि. एखादा. 'चुकोनि येकाधा जाये।' –गीता २.२३३१. **येकायतनु**–न. एकायतन; एक अधिष्ठान; ब्रह्म. [सं.] **येकाये**–वि. एकटा; निःसंग. –क्रिवि. अकस्मात्. [प्रा.] **येकावळी**–स्त्री. एक पदरी मोत्याचा हार; एकेरी हार. 'चतुर्भुज माळा रुळे येकावळी।' –तुगा ८. **येकाहारी**–वि. एकपंक्तीचा. 'आहाति जे ब्रह्माच्या येकाहारी।' –ज्ञा १७.३३४. **येकु**–वि. एक. 'भजाया जनीं पाहतां राम येकु।' –राम १३१. **येकुणा**–वि. दीड दुमता. –शर. **येकेताळीस**–वि. एकेचाळीस. 'वर्त्या येकेताळीस कमाना।' –दावि ५०४. **येकोदर**–वि. सख्खा; एकोदर. 'त्यांचे बंधु येकोदर दत्तात्रेय।' –रामदासी २. १६९. **येकोपजीवी**–वि. एकच आश्रय असलेला. 'तेथ दैवा गुणां येकोपजीवी।' –ज्ञा १६.६७. [सं. एकोपजीवी]

**येकसुई**—स्त्री. स्नेह. 'तर्फैन येख्लास व येकसुईची तरक्की रोज-ब-रोज ज्यादा होत असावी.' -रा १९.१०५. [फा. यक्सू]

**येखंड, येंग, येंगटणें, येंगाडणें, येंघणें, येच, येचणें, येज, येंट-ठ, येंटाळणें, येंटाळा-ळी-ळें**—वेखंड, वेंग इ० पहा.

**येखलास, येखलासनामा, येखलासी**—इखलास इ०. पहा.

**येखलास, येख्लास**—पु. मनाची शुद्धता; अंत:शुद्धि; स्नेह. 'मुख्य येख्लास वाढावा.' -ख ८७५. [अर. इखलास]

**येखादा**—वि. एखादा; क्वचित. 'येखादा राहिला स्वरबिंदु।' -कथा १.१.७२. [एक+अर्धा]

**येंग**—पु. (व.) चढ; चढाव. [येंगण=चढाव]

**येगानगत**—स्त्री. यगानगत पहा. ऐक्य; मैत्री. 'दोन्ही कडून दोस्ती व येगानगत रोज-ब-रोज वृद्धींत असावी.' -दिमरा १.४५. [फा.]

**येंचू**—पु. (कु.) विंचू.

**येजमान**—पु. आश्रयदाता; मालक. यजमान पहा. [सं. यजमान अप]

**येजा**—स्त्री. १ त्रासाचें व श्रमाचें येणें आणि जाणें; येरझार. २ पुन: पुन: येणें व जाणें. (क्रि० करणें; लावणें; मांडणें). [येणें+जाणें]

**येजित, येजित जाणें, येजित पत्र**—(अशिष्ट) अजित, अजित जाणें इ० पहा. **येजित खत**-न. अजित पत्र. 'त्यांचे साक्षीनें येजित खत लिहून दिल्हें.' -वाडबाबा २.९.

**येटकें**—न. जोत जुंपण्याचें सामान, पटे, कांसरे, वाला इ० यटक पहा.

**येटाण, ये(प)टाळ, येठ**—न. (कों.) वेटाळ, वेठ, वेठण इ० पहा.

**येड, येडका, येडवळ, येढोळ, येढोळां**—एड, एडका इ० पहा.

**ये(वे)ड**—स्त्री. घोड्यास इशारा करणें. 'तुजला मारिन मी, करिन येड।' -ऐपो १२६. **येड करणें**-घोड्यास इशारा करणें, प्रेरणा करणें. **०वेणें**-(व.) लगामाच्या इशाऱ्यानें घोड्यास मागें परतविणें.

**येंड**—न. (कों. हेट.) मासे धरण्याचें एक प्रकारचें जाळें.

**येडगा**—पु. (कों.) धनगराचा उपाध्याय.

**येडताक**—पु. विसंवाद.

**येडपट**—वि. वेडपट. [का. यडपट]

**येंडी**—स्त्री. (कु.) तडीस दोघांनीं पागण्याचें जाळें. येंड पहा

**येंडी**—स्त्री. (व.) एरंडी. **येंडीचें तेल**-न. (व) एरंडेल.

**येडीकुंटी**—स्त्री. आऊत.

**येडुळ बेडूळ**—वि. (व.) ओबडधोबड.

**येडें**—न. लिंगाइतांनीं आपल्या जंगमास (गुरूस) पाठविलेलें अन्नाचें ताट.

**येणगर**—न. जोंधळयाची एक जात.

**येणी**—स्त्री. गंजिफाच्या खेळांतील राजाचा वजीर असणाऱ्याकडून पान येण्याचा हक्क. [येणें]

**येणें**—न. एखाद्याकडून यावयाचा असलेला पैसा, यावयाची रक्कम, उगवावयाचें कर्ज.

**येणें**—अक्रि. १ आगमन करणें; आलेला असणें; दाखल असणें. २ विद्यमान झालेला असणें; प्राप्त होणें. ३ एखाद्याजवळ, कडे ओढवणें; समीप जाणें. ४ एखाद्याला माहीत असणें, एखाद्याकडून करण्याजोगें असणें; अवगत होणें; जाणणें. 'याला लिहिणें येतें पण पढणें येत नाहीं.' ५ उद्भवणें; उत्पन्न होणें (राग, लोभ, विषयवासना, दया इ०.) ६ बितणें; प्राप्त होणें. ७ उत्पन्न होणें; उद्भवणें (फुलें, फळें, पानें इ०). ८ भरणें; मिळून होणें, बरोबर असणें. 'ही अंगठी तोळाभर वजन येईल.' 'तो गांव एथून चार कोस येईल.' ९ उतरणें; योग्य आकारांत, स्थितींत दिसणें. 'हें पागोटें चांगलें आलें नाहीं, आणखी बांध.' १० होणें; एखाद्या स्थितीला, अवस्थेला प्राप्त झालेला किंवा पोंचलेला असणें. 'घर अगदीं मोडकळीस आलें आहे.' ११ संभाव्य, जरूर, उपयोगी, योग्य, उचित होणें. 'ते धनी पडले त्यासीं उत्तर करतां येत नाहीं. प्रसंग पाहून बोलावयास येईल.' १२ अवलंबणें (मार्ग इ०). 'वडील वर्तत आले त्याप्रमाणें आम्ही करीत आलों.' १३ पासुन निघणें, उत्पन्न होणें, तयार होणें. (दुधापासुन लोणी इ०). १४ प्रवासादिसमयीं जाण्याकरितां निरोप घेतांना 'जाणें, ह्या अर्थी येणें ह्या शब्दाचा उपयोग करितात. कारण ह्या प्रसंगीं जाणें शब्दाचा उपयोग अशुभ मानतात. 'आतां आम्हीं येतों कृपा असो द्यावी।' 'येतों वसा, प्रसन्न प्रभु तुम्हां, हो।' -मोवन १३.२. [सं. यान = गमन करणें] **म्ह०** (दुखणें) येतें हत्तीच्या पायानें, जातें मुंगीच्या पायानें. (वाप्र) **येणें जाणें**-न. १ येणें व जाणें म्हणजे भेटीला जाणें किंवा येणें; राबता, दळण वळण. 'श्रीमंताकडे त्यांचें येणेंजाणें आहे.' २ येणें व देणें अस लेला पैसा; उकळण्याचें कर्ज व फेडावयाचें कर्ज; देण्याघेण्याचा व्यवहार. 'तुम्ही जा म्हणून सांगतां पण लोकांकडे आमचें येणेंजाणें आहे त्याची काय वाट?' **येता**-वि. येणारा. 'येती यासी पुसे' -नामना २. **येताजाता**-पु. उतारू; मार्गस्थ; प्रवासी. 'मार्गावरचा आंबा हा येत्याजात्याचा.' **येतांजातां**-क्रिवि. नेहमीं; एकसारखें; सतत. 'सदा

येतां जातां भ्रमत उठतां कार्य करतां।' 'तो येतां जातां बाय कोस शिव्या येतो.' [येणें+जाणें] **येता पाय**-पु. प्राप्तीचा किंवा अनुकूल काळ. **येतापाया**-पु. चलती; भरभराट. [येणें+पाया] **येतेकरी**-पु. १ येणारा. २ शास्त्र, कला इ० त्वरित संपादन करणारा मनुष्य. **येतें द्वार**-न. येण्याचा रस्ता. 'येतें द्वार बुजवावें।'-एरुस्व १८४७. **आल्या-(वर्षास-महिन्यास-दिवसास-वारास)**-वर्षे, महिना इ० येतें तसें म्हणजे सतत, नियमितपणें.

**येणेंकडून, येणेंकरून**—क्रिवि. यामुळें; याकारणानें.

**येणें नावें**—क्रिवि. यामुळें.

**येणेंप्रमाणें**—क्रिवि. ह्या प्रमाणें; एणेंप्रमाणें.

**येतपर्यंत, येतपावेतों**—एतपर्यंत इ० पहा.

**येतुकी-का**—वि. इतका. 'चमू समुद्राची येतुकीं।' -मुआदि ४४.६२.

**येतुला**—वि. इतका; एवढा. 'तरी तिहीं येतुला अवसरीं।' -ज्ञा १.८७. -क्रिवि. येथें. [प्रा.] **येतुला(ले)वरी**-क्रिवि. इतकें; येथपर्यंत. 'देवा हें येतुलेवरी। बोलावें नलगे अवधारीं। -ज्ञा २.३०. [प्रा.]

**येत्न**—पु. यत्न; प्रयत्न. 'देहे रक्षणाकारणें येत्न केला।' -राम २६.

**येथ**—क्रिवि. येथें. 'श्रोते पुसती कोण ग्रंथ। काय बोलिलें जी येथ।'-दा १.१.१. [सं. अत्र] **येथचा, येथपर्यंत, येथपावेतों, येथवर, येथील, येथून, येथें, येथोन येघवां, येथच्**-एथचा, एथपर्यंत इ० पहा.

**येथा**—स्त्री. (व) (अप.) व्यथा; रोग. 'त्याला पोटाची येथा असल्यास मी दवाई देतों.' [सं. व्यथा]

**येथें**—क्रिवि. या ठिकाणीं [सं. अत्र; प्रा. एत्थ] (वाप्र.) **येथेंच घोडें पेंड खातें**-मुख्य अडचण ती येथेंच आहे; मर्मस्थान तें हेंच; छिद्र, कमीपणा, लबाडी जी आहे ती येथेंच आहे.

**येदलोक**—क्रिवि. (व.) इतका वेळ. [सं. यावत्काल]

**येद(ध)वां**—क्रिवि. एव्हां, या वेळीं. [सं. यावत्वा]

**येदाळा, येधोळ**—क्रिवि. एवढावेळ; अपेक्षेपेक्षां जास्ती वेळ. **येदूळ**-क्रिवि (कु.) बऱ्याच वेळापासून. [सं. इयत् वेला; बाढूळ]

**येदो**—वि. (कु.) एवढा. [सं. यावत्]

**येधाळा**—क्रिवि. (ना.) या वेळीं. [सं. यावत् वेला]

**येधोळ**—क्रिवि. (व.) आतांपर्यंत. [सं. यावत् वेला]

**येन**—स्त्री. (व.) वीण; जननाचा मोसम; विण्याचा काळ. [वीण]

**येबिन**—पु. पौत्र; नातू 'आपाजी बिन भगवंतराव येबिन कृष्णाजी कदम पाटील,'-समा २.३१७. [फा.]

**येम**—पु. (अप.) यम. 'जया नावडे नाम त्या येम जाची।' -राम १०१. [सं. यम]

**येमाई देवी**—स्त्री. एक क्षुद्र देवता. 'यमाई देवी म्हणे जी गुरुछत्र छाई।'-सप्र ५.१४. [यमाई]

**येयां**—सना. याला. 'किती मोडा केला येयां देतां। माझेनि लोभें।'-शिशु २१२. **येयांचिआं**-सना. यांच्या. 'तेंह वेळीं ते नायका। भणें येयांचिआं कवतिकां।'-शिशु २२४.

**येर-रू, येरी-रें**—सना. (व्यु) दुसरा; तो एक; उल्लेख केलेला मनुष्य; अन्य; इतर. 'सीता म्हणे लक्ष्मणा धाव। येरू म्हणे राक्षसी माव।' २ हा; जवळचा. पूर्ववाक्यांत ज्याचा नामनिर्देश केला असतो त्याचा पुनः उल्लेख कर्तव्य असतां ह्या सर्वनामाचा प्रयोग करितात; तो; हा. 'तैसाचि देखे येरें। निनादें अति गहिरें।'-ज्ञा १.१४६. [सं. अपर, अवर. सं. अन्यतर-अण्णयर-यर=येरू] सामाशब्द- ०**घर**-न. ब्रह्मस्वरूप. ०**जावाई**-पु जावयाच्या भावास तुच्छतेनें म्हणतात. ०**येर**-वि. परस्पर; एकमेक. 'काय किजत असे येरयेरीं।'-ज्ञा १.८७. ०**येरां**-क्रिवि. १ एकमेकाशीं; त्यांच्यामध्यें; परस्पर. 'येरयेरां भेटी युद्धाच्या प्रसंगीं।' २ सतत; नेहमीं. ०**वार्डा-ळो**-क्रिवि. (व.) लौकर; वाजवीपेक्षां अगोदर [येर+वेळ] ०**वाळीं**-क्रिवि. योग्यकाळीं; सुवेळीं; लवकर; जें काम रात्रीं करण्यास त्रास पडतो तें दिवसा उरकून घेण्याबद्दल सांगावयाचें असल्यास उपयोग. 'येरवाळी गाईस चारा घाल.' **येरीकड**-क्रिवि. दुसरीकडे; इकडे. 'राम उभे लग्नासी। येरीकडे जानकी।'-वेसीस्व १०.७४. 'येरीकडे नृपति धाडुनि राजहंसा।'-र ३०. **येरीमोहर**-वि. उलटें; शेंडा खालीं व बुडखा वर असें; भलतीकडे तोंड असलेलें. 'उपडिलें कवतिकें। झाड येरी मोहरा ठाके।'-ज्ञा १५.४१. [येर=दुसरा+मोहरा=तोंड]

**येरजा(झा)र, येरधार**—स्त्री. कंटाळवाणी व निष्फळ जाये; खेप; हेलपाटा. 'त्याची सरली येरजार। झाला सफळ व्यापार।' [येरे+जारे] **येरझाऱ्या**-स्त्रीअव. खेपा. 'कर्मे करितांना फलाशाहि सोडलेली असल्यामुळें स्वर्गाच्या येरजाऱ्या न घडतां...'-गी २९२.

**येरंड, येरंडमूळ, येरंडी-ड, येरंडेल, यरंड्यासाप, येरमीठ, येरवां, येरवीं, येरशेर, यऱ्हवीं, येलकी, येलची, येलदोडा, येलाची, येवढा, येवढाव(वे)ळ, येवींच, येवींतवीं, येव्हां, येव्हांयेव्हां, येव्हांशीं, येळकोट, येळा**—एरंड एरंडमूळ इ० पहा.

**येरदेर**—पु. (गो.) वारस.

**येरली**—स्त्री. १ (कु.) एका माशाचें नांव. २ धान्याची वांगी.

**येरवण**—स्त्री. (हेट.) बांबूची विणलेली मोठी दुरडी.

**येरवां**—क्रिवि. परवां, तेरवां.

**येरवान**—न. (कु.) लग्नांत वधूवरांकडून परस्परांस येणारा शिधा.

**येर(-ह-वी)व्हीं**—अ. विचाराअंतीं; नाहीं तर. 'तरीच खंडेल चिंतारोग। येऱ्हवीं अनर्थ रोकडा।' -मुवन १.८२.

**येरांस**—पु. (गो.) नातेवाईक मनुष्याची इस्टेट मिळणें; इतरांश; वारसा. [येर+अंश]

**येरिका**—स्त्री. लव्हाळा; लव्हाळयाची एक जात. 'समुद्रलाटांचे कल्लोळ। तेणें लोहचूर्ण सकळ। प्रभासे लागूनि प्रबळ। उठिले तत्काळ येरिकारूपें।' -एभा १.३८२.

**येरी-ऱ्ही**—अ (ना.) एरवींच; उगांच.

**येरुळ्या**—स्त्रीअव (व.) चारा एवढीं एक प्रकारचीं आंबट गोड फळें.

**येरें, येरं**—न. (गो.) सुकाणूं. **येरें भर**-न. येरें धरून बसण्याचें होडीचें टोंक. **येरें घुंवडावप**-क्रि. (गो.) मार्गास लावणें; दिशा दाखविणें; किल्ली फिरविणें. **येन्हि**-क्रिवि येऱ्हवीं. 'येन्हि नाकळसी कोण्हासी।' -सप्र ६.३५.

**येऱ्ही, येऱ्हवीं**—क्रिवि. (व) सहज.

**येल**—वेल पहा.

**येल(ल्)गार**—पु. एलगार पहा. मोहीम; दौड; नेटाचें कूच; चढाई; निकराचा हल्ला. [तु. इल्गार]

**येल(ल्)ची**—पु. वकील; प्रतिनिधि; तह ठरविणारा वकील. -पया ४५४. [तु. ईल्ची]

**येलणें**—अक्रि. (ना. व.) खोडया, चेष्टा करणें; त्रास देण्याच्या हेतूनें वात्रटपणा करणें; वेडेविद्रे चाळे करणें; गमजा करणें. 'काहून येलत गा! पायजे (पाहिजे) काय कांहीं?' [वेल्हाळ?]

**येलशेल**—क्रिवि. १ (व.) एका टोंकापासुन दुसऱ्या टोंकापर्यंत. २ शेताच्या धुऱ्यापासुन दुसऱ्या धुऱ्यापर्यंत. [शेल=टोंक]

**येला**—पु. एक झाड; वेलदोडा, वेलची. 'येला कंकोळ पूगीफल खदिर शशी जायपत्री लवंगा।' -सारुह ३.४८. [सं. एला]

**येलीं**—स्त्री. (व.) लाकडाच्या लांब ठोकळयास चार पांच उभ्या खुंटया बसवून कपाशी पेरण्याकरितां केलेलें आऊत.

**येलें**—न. कच्च्या चामडयाची दोरी असलेलें नांगराच्या उपयोगाचें आऊत. हें मांग लोक करितात.

**येलया**—स्त्रीअव. (खा.) वेला; वेळा. स्त्रियांचा दंडामध्यें घालण्याचा चांदीचा दागिना; स्त्रियांचें बाहुभूषण. [वेल]

**येल्हे**—पु (व.) त्रास; कष्ट; हाल; येलणें पहा. 'काय येल्हे मांडले त्याचे.'

**येल्हावणें**—अक्रि. (व.) फाजीलपणा करणें; इत्रावणें. -वशाप ५१.४७९.

**येवंच**—क्रिवि. एवंच; एकूण; एकंदरींत; सारांश. [सं. एवम्+च]

**येवजणें**—सक्रि. (गो.) आठवण करणें, मनांत आणणें; योजणें. (अप.) [योजणें]

**येवंतणें**—सक्रि. (प्र.) वेवंतणें. पाठीस लागणें; चिडविणें; खनपटीस बसणें; त्रास देणें.

**येवा**—पु. १ येणें, आगम, आगमन, या अर्थी जावा शब्दाशींच प्रयोग होतो. २ दुसऱ्याकडून येणें असलेला पैसा. 'पांचशें रुपये लोकाकडे येवा आहे.' ३ (ल.) लाभ; प्राप्ति; मिळालेला नफा. ४ शोभा; लावण्य; रूप; देखणेपणा. 'दोन तोळे सोन्यानें कसा येवा आला.' योग्यता; शोभिवंतपणा; प्रशस्तपणा. (वस्त्रें, भूषणें यांचा). 'काळया मनुष्याला मोत्यांचा येवा असतो.' [येणें] **म्ह॰** उदंड खाल्ला मेवा तर येईना अर्धभाकरीचा येवा. सामाशब्द- **॰जावा**-पु. येणेंजाणें; घरोबा; राबता; भेटीस जाणेंयेणें, दळणवळण. [येणें+जाणें] **॰देवी**-स्त्री. जमा व खर्च; घेणी व देणी; व्यापार; व्यवहार. [येणें+देणें]

**यें(हें)वाळें**—न. (कों.) पाणसर्पाची एक जात. ही पाण्यात राहते.

**येंवि**—क्रिवि. जंव; जों. 'एथ कां पां हा उगला। म्हणौनि कृष्णें येंवि पाहिला।' -माज्ञा ११.१५३.

**येश, येशस्वी, येशवान्, येशवंत, यशापेश**—यश, यशस्वी, यशवंत इ॰ पहा.

**येशेल**—न. (व.) गोडें तेल; खावयाचें तेल; अळशीचें तेल.

**येस, येसकट, येसण, येळ, येळणें, येळू**—वेस, वेसकट इ॰ पहा.

**येस**—स्त्री. (खा. अहिराणी) शेवाडें; गाडी जाण्या इतक्या रुंद जागेस लावावयाचा (काटयांचा, कांबटयांनीं बांधलेला) दरवाजा, झाप, झापा, फाटक. [वेस]

**येसकर**—पु. (व.) वेसकर पहा.

**येसकी**—स्त्री. (पुणें, शेतकी) मोठी शिवळ.

**येसणा**—वि. इतका; असा. 'प्रामा येसणा विस्तारु।' -गीता २.२२७७. [सं. ईदृश] **येसणें**-वि येवढें; असें. 'येसणें पतन कुलक्षयीं।' -ज्ञा १.२६१ [सं. ईदृश]

**येसपार**—पु. ठावठिकाण; पत्ता.

**येसर**—न. १ (व. घाटी) आमटींत घालावयाचें भाजलेली डाळ, तांदूळ इ० कांचें मिश्रण. २ तिखट मसाला. वेसवार पहा.

**येसवा**—स्त्री. १ वेश्या. वेसवा पहा. २ (बायकी) भांडखोर, तंडणागी, तोंडाळ बाई. 'बाई येसवाच आहे.' [सं. वेश्या]

**येसवार**—स्त्री. (व.) मसाल्याची आमटी. [सं. वेसवार]

**यसान, येहसान**—न. प्रसाद; कृपा; उपकार. 'या गृहस्थावरी तुम्ही येहसान करून निरोप दिल्हा यामुळें तो उपकारी आहे.'—ख ९१६. [अर. एह्सान्] **येहसान्मन्दी**—स्त्री. कृतज्ञता. —पदमव ९९.

**येसाय**—स्त्री. (गो.) तालीम (नाटक इ०कांची). [व्यवसाय?]

**येसूर**—न. काळें तिखट; तिखट मसाला. वेसवार पहा.

**येळ, येळा**—न. (चंद्रपुरी) वेल; सोन्याचें अगर चांदीचें कडें. येल्या पहा. [वेळणें]

**येळकोट-टी**—स्त्री. खंडोबाचा जयजयकार; एळकोट. 'लोक येळकोटि म्हणती लक्ष कोटीरे।'—आप १९. —पुस्त्री. नाश. 'सगळयांच्या मदतीनें नानाचा येळकोट करण्याचें सोपें आहे.'—अस्तंभा ९६. [यळकोट]

**येळणी**—स्त्री. वेळणी; पसरट भांडें; (चंद्रपुरी) पसरट वाटी; (व.) खापराचें परळ.

**येळवाळीं**—अ. वेळेवारीं; योग्य वेळेला. [वेळ+वार]

**येळा**—पु. वेलदोडा; एला. 'चतुर्विध परिमळा। येळा वाळा उदादि।'—एरुस्व १४.१३६. [सं. एला]

**येळा**—स्त्री. खांब.

**येळाइतु**—पु. वेळाईत पहा. कैवारी; साह्यकर्ता.

**येळील**—वि. १ अळणी. 'येळील केलें सर्वस्व।'—दावि ४०. २ लज्जित. 'लोक येळील केले।'—दावि ४०.

**येळिलवाणें**—वि. ओशाळें. 'येळिलवाणें करूं नये। आपणासी।'—दा १४.१.५४.

**यैन**—क्रिवि. १ ऐन; भर; मुद्दल. 'साठ लाखाची बेरीज यैन व इजाफा मिळोन सिद्ध केली.'—रा ७.५३. २ तत्त्वत; मुख्यतः [अर. ऐन्].

**यो**—क्रि. येवो. (ये चें तृतीयपुरुषी आज्ञार्थी एकवचन) 'सुरर्षि म्हणतो तुझें यशचि धन्य यो गायना।'—केका ११४.

**योक**—पु गिरदा; खांदेपट्टी. 'योक प्रमाणेंच कापडाच्या लांबींतून कॉलर काढावयाची असते.'—शिकशि १.६० [इं.]

**योग**—पु. १ जुळणी; जोड; मिलाफ; संग; संयोग; संलग्नता; लग्न. 'योग पुढें भृगुसवें तिचा घडतां'—मोआदि ३.६. २ परस्पर संबंध; ऋणानुबंध; संगत.' तिला नहाण यावें आणि तिचा दादला मराबा असा योग होता' (समासांत) कालयोग; दैवयोग; प्रारब्धयोग इ० ३ आध्यात्मिक अथवा भाविक भक्ति अगर ध्यान, चिंतन करून होणारें ब्रह्मैक्य; ध्यानपूजा, मानसपूजा, समाधि व त्यासंबंधीं नियम व आसनें; प्राणायामादिक साधनांनीं चित्तवृत्तीचा किंवा इंद्रियांचा निरोध करणें. ४ मार्ग; साधन; आत्मसाधन या अर्थी भक्तियोग, कर्मयोग, ज्ञानयोग इ० 'संक्षेपानें नुसता योग अगर कर्मनिष्ठा असें म्हणतात. ५ खगोलाचे २७ भाग; ज्यावरून चंद्र सूर्याचे अक्षांश रेखांश मोजतात ते; ते योग असे—विष्कंभ; प्रीति, आयुष्मान्, सौभाग्य, शोभन, अतिगंड, सुकर्मा, धृति, शूल, गंड, वृद्धि, ध्रुव, व्याघात, हर्षण, वज्र, सिद्धि, व्यतीपात, वरीयान्, परीघ, शिव, सिद्धि, साध्य, शुभ, शुक्र, ब्रह्म, ऐंद्र व वैधृति असे २७ योग आहेत. ज्योतिषी २८ योग मानतात. ६ संबंध; जवळ येणें. 'ग्रहांचे कालांश (वस्तुतः भोग) सूर्याच्या इतके झाले म्हणजे त्याचा सूर्याशीं योग झाला किंवा युति झाली असें म्हणतात.'—सूर्य २३. ७ उपाययोजना; वस्तूचा उपयोग, विनियोग; कार्यार्थ साधना, प्रयत्न. ८ इष्टता; योग्यता; समत्व. ९ (गणित) रक्कम; रास; बेरीज. १० साधन; युक्ति. 'एकच योग (साधन अगर युक्ति) आहे.' —गीर ५६. ११ मिठी. १२ कवळा. १३ कार्यकुशलता. १४ संधि. 'योग बरवा हा पुन्हां घडेना।'—दावि २४२. १५ (वैद्यक) इलाज; उपाय; औषध. 'आमवायूवर एरंडेलाचा योग प्रशस्त आहे.' १६ मोठा लाभ. 'मग योग योग ऐसा सहसा उठला वळी महा शब्द।'—मोकर्ण ७.३५. १७ जारणमारण; जादूटोणा. १८ ईश्वरी संकल्प. १९ समाधिशास्त्र. २० तत्वज्ञान. २१ व्युत्पत्ति; व्युत्पत्तिमूलक अर्थ. २२ सूत्र; नियम; कायदा. २३ (ज्यो.) विशिष्ट तिथि, वार, नक्षत्र यांचें सहचर्य येणें. उदा० रविवारीं हस्त आलें असतां त्यास अमृतसिद्धि योग म्हणतात. [सं. युज्=जोडणें] सामाशब्द— **०च्युत**—पु. योगभ्रष्ट. —ज्ञा ६.४४८. **०धर्म**—पु. कर्तव्य; सद्गुण, अथवा योग्याचें विशेष कर्म; त्यांपैकीं दहा विशेष आहेत— अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्या, अपरिग्रह (हे पांच यम व) शौच, संतोष, तप, स्वाध्याय, ईश्वरप्रणिधान (हे पांच नियम होत). दुसरी गणना अशी आहे— अहिंसा, सत्य, अक्रोध, त्याग, शांति, अपैशुन, दया, अलोभ, मार्दव, लज्जा. कांहीं दम, क्षम, अचापल्य, तेज, तितिक्षा, हे यांतच गणतात. **०निद्रा**—स्त्री विश्वप्रलयानंतरची व विश्वोत्पत्तीपूर्वीची ब्रह्मदेवाची झोंप; ईश्वराची निद्रावस्था; योगमाया; सहजस्वरूपस्थिति. —ज्ञा ५.७८. **०निष्ठा**—स्त्री. योगपरायणता. —ज्ञा २.३१५. **०पट**—पु. १ श्रेष्ठ भोग. २ संन्याशदीक्षेचा एक प्रकार. संन्याशानें धारण करावयाचीं विशिष्ट वस्त्रें. ३ (ल.) संन्यास घेतल्यावर त्यासंबंधीं पाळावयाचे नियम वगैरे. 'ते योगपटाची मवणी। जीवीं अनियम चिंतवणी।'—ज्ञा १६ ३३२. **०भूमिका**—स्त्री.

योग्याचीं विशिष्ट अवस्था, स्थिति. ' द्रष्टादृश्यांचिया प्रासीं । मध्यें उल्लेख विकासी । योगभूमिका ऐसी । अंगीं वाजे । ' –अमृ७.१८५. ०भ्रष्ट–वि. योगसाधनांत कांहीं प्रत्यवाय घडल्यामुळें पुनर्जन्म पावलेला. ०माया–स्त्री. ईश्वराची जी मायारूप शक्ति ती; भ्रम; माया; माया व ब्रह्म पहा. ०मुद्रा–स्त्री. खेचरी, भूचरी, चाचरी, अगोचरी, आलेख इ०. पांच योगमुद्रा; यांचीं स्थानें अनुक्रमें नादबिंदु, नासिका, नेत्र, कर्ण, व आकाश हीं होत. ' खेचरी भूचरी चाचरी । अगोचरी आलेख यापरी । माजी समरसली खेचरी । नादबिंदूसी । ' –कथा ७.४.७३. ०राज गुग्गुल–ळ–पु. एक प्रकारचें रसायन; मात्रा. ०रूढ–वि. व्युत्पत्तीनें ज्यांचा प्राप्त अर्थ व रूढ अर्थ हे जुळतात असा ( शब्द ). जसे– अंगरखा; जलधर; पंकज; भूधर. कांहीं शब्द यौगिक, कांहीं रूढ आणि कांहीं योगरूढ असतात. ०शास्त्र–न. चित्ताची एकाग्रता करण्याच्या साधनासंबंधींचें शास्त्र; ज्यामध्यें प्राणायामादिद्वारां अंतःकरणाच्या एकाग्रतेचा उपाय सांगितला आहे असें सहा शास्त्रांतील एक शास्त्र. ०सार–पु. विचार. ०क्षेम–पुन. निर्वाह; चरितार्थ; उदरपोषण. ' यांचे योगक्षेमाबद्दल मौजे वडु तर्फ पाबल पैकीं इनाम. ' –शाछ १.३६. योगक्षेम चालविणें–एखाद्या मनुष्यास पाहिजे असेल तें मिळवून देणें; संसाराची एकंदर व्यवस्था पाहणें; उदरनिर्वाहाची तजवीज करणें. ' जे मला अनन्यभावें शरण येतात त्यांचा योगक्षेम मी चालवितों. ' योगानंद–पु. योगाभ्यासानें होणारा आनंद; पांच आनंदांपैकीं शेवटचा. योगाभ्यास–पु. हटयोगादिकांचा अभ्यास, शिक्षण; योगशास्त्राचा अभ्यास; चित्तवृत्तींचा निरोध करून ध्यानादिकांचा केलेला अभ्यास. योगायोग–पु. १ दैवगति; अनपेक्षित अशी घडलेली कांहीं गोष्ट; बनाव. २ अनुकूल काळ आणि प्रतिकूळ काळ. ' योगायोग पाहून वागावें. ' योगारूढ–वि. योगी; योगनिष्णात. ' तोच पुरुष योगारूढ म्हणजे पूर्ण योगी झाला ' –गीता ६९४. योगासन–न. योगाभ्यास करणाऱ्या योग्याची विशेष प्रकारच्या पद्धतीनें बसण्याची रीत. योगिनी–स्त्री. १ दुर्गादेवीची परिचारिका. या ६४ आहेत. २ योगाभ्यासी स्त्री; जोगीण. [ सं. ] योगी–पु. १ योगसाधन करणारा; योगमार्गास लागलेला मनुष्य. –ज्ञा ६ ३९. २ योगसाधनांचा उपयोग जादुगिरीच्या रूपानें करून लोकांस चमत्कार दाखविणारा मनुष्य. ' भारतीय वाङ्मयांत योगी याचा अर्थ बडा जादूगार असा होतो. ' –ज्ञाको ( य ) ६५. ३ ( सामा. ) संन्याशी अथवा भक्त. योगेश्वर–पु. १ श्रेष्ठ योगी; सर्वांत श्रेष्ठ प्राणी; नांवाजलेला योगी; भक्त; संन्यासी; साधु. २ कृष्ण.

**योगें**—शअ. मुळें.

**योग्य**—वि. १ शोभेलसें; स्थानानुकूल. ' पालखी जी आहे ही श्रीमंतास योग्य. ' २ मान्य; संमत; रास्त; बरोबर. ३ अनुरूप; उचित. ' या स्त्रीस हा नवरा योग्य आहे. ' ४ उत्कृष्ट; श्रेष्ठ. ' अवघ्या मंडळींत बापुजी बावांचें अक्षर योग्य आहे. ' योग्यता–स्त्री. मोठेपणा; पात्रता.

**योजक**—वि. १ कल्पि काढणारा; युक्तिवान. २ व्यवस्थापक; योजना करणारा. ३ जोडणारा; लावणारा; वियोजक; संयोजक. ४ ( गणित ) मिळवावयाचा; बेरीज करावयाचा ( आंकडा रक्कम ). ५ ( चुकीनें ) शोधून काढलेलें; योजलेलें. [सं. युज्=संयोग करणें ] योजकस्तत्र दुर्लभः–एखाद्या वस्तूचा योग्य स्थळीं व योग्य प्रसंगीं उपयोग करणारा माणूस दुर्मिळ असतो. उपयोगाच्या वस्तू जगांत पुष्कळ आहेत त्यांची योजना करणारा मनुष्य मात्र मिळणें कठिण आहे. ' योजणूक–स्त्री. योजना पहा. [ योजणें ] योजणें–क्रि. १ लावणें; नेमणें; कोणेकाला कोणेक कामीं नेमणें; किंवा स्थापिणें. ' त्याजकडे पगारदार जर चांगला कणक्या योजला तर पैक्याचा उगवा होईल. ' २ व्यवस्था लावणें; उरकणें; रचणें. ३ विचार करून ठरविणें; शोध लावणें; डोक्यांतून काढणें; युक्ति काढणें; साधन मिळविणें; कोणेक गोष्ट अशी अशी, या प्रकारें करावी इ० रूपें संकल्पिणें. ४ निश्चय करणें; निश्चित करणें; नेमणें; नेमस्त करणें; ठरविणें ' तुम्ही वर योजला होता त्याचें रासकूट मिळत नाहीं. ' ५ देणें; ठेवणें. ' यदुच्या देहीं जरेसि योजीन । ' –मोआदि ११ ६४. ६ आश्रय करणें. ' जें बुद्धियोगा योजिले । तेचि पारंगत जाहले । ' –ज्ञा २.२२७. [ सं. युज्=योजना करणें ] योजना–स्त्री. १ व्यवस्था; रचना; ठराव २ बेत; धोरण; अंदाज; कल्पना; संकल्प; युक्ति. ३ नेमणूक; लावणें; जोडणें; रुजू करणें योजित–वि. १ रचलेलें; ठरविलेलें; उपयोगांत आणलेलें. २ हुडकून काढिलेलें; शोधिलेलें; मनानें ठरविलेलें; संकल्पित. ३ जोडलेला; लाविलेला; नेमलेला; निश्चित; नेमस्त केलेला; जुळलेला; जुळविलेला. [ सं. ] योज्य–वि. १ योजण्यास योग्य २ ( गणित ) जींत कांहीं रक्कम, संख्या मिळवावयाची आहे अशी ( संख्या ). [ सं. ]

**योजन**—न १ रस्त्याची लांबी अगर अंतर मोजण्याचें माप; चार कोस; नऊ मैल; कित्येकांचे मतें ५ मैल. ' शक्रसभा सार्धशतक योजन दीर्घा तशीच विस्तीर्णा । ' –मोसभा १.२३. २ योजना; बेत इ० [ सं. ]

**योध**—पु. योद्धा; वीर. ' हरुनि यशो–धन गो–धन योध अगणित क्षयासि नेऊन । ' –मोविराट ६.५२. योधसंराव–पु. युद्धतयारीची सुरवातीस सूचना देण्याचा आवाज; शंख फुंकणें; लढाईंत स्फुरण येण्यासाठीं ओरडण्याचा शब्द ( हरहर महादेव इ० ) [ सं. ] योद्धा–पु. शूर पुरुष; वीर; लढाऊ शिपाई; लढवय्या. [ सं. ]

**योनि-नी**—स्त्री. १ (स्त्रियांचें) जननेंद्रिय. २ जन्मस्थान; झरा; उगम; त्या त्या पदार्थाचें जें उत्पत्तिकारण ती. 'मेघ हा धूमयोनि आहे.' ३ प्राण्याची जाति किंवा वर्ग; कोटी उदा० मनुष्ययोनि, व्याघ्रयोनि इ०. या योनी ८४ लक्ष आहेत असें मानलें आहेत. त्यांत २० लक्ष वृक्ष, ९ लक्ष जलचर, ११ लक्ष किडे, १०लक्ष पक्षी, ३०लक्ष पशू, ४ लक्ष मानव. ४जगाचें-निमित्त कारण जें ईश्वर, काल स्वभाव इ० त्यासहि म्हणतात. 'ईश्वर हा जगद्योनि होय.' ५होमकुंडाच्या मेखलेस पश्चिमभागीं शाळुंकेसारखी आकृति करतात ती. [सं] ०**कंद**-पु एक रोग. [सं.] ०**चतुष्टय**-न. जीवांचे चार प्रकार, कोटि (जन्माच्या प्रकारभेदानें-जरायुज, अंडज, स्वेदज, व उद्भिज). ०**दाह**-पु स्त्रियांचे जननेंद्रियांतील असह्य उष्णता; एक रोग. [सं.] ०**द्वार**-न. मूत्रद्वार; मूत्रेंद्रिय (स्त्रियांचें). [सं.] ०**नासा**-पु. स्त्रीजननेंद्रियाचा भाग ०**पुष्प**-न. (काव्य) स्त्रीजननेंद्रियाचा भाग [सं.] ०**भ्रंश**-पु योनी बाहेर येणें. [सं.] ०**रोग**-पु स्त्री जननेंद्रियाचे विकार. हे २० प्रकारचे आहेत. ०**वात**-पु. योनीसंबंधीं वातविकार. [सं.] ०**व्रण**-पु. योनीमध्यें क्षत पडणें; योनी चुरचुरणें. [सं.] ०**शूल**-पु. योनींत दुखणें; कळा येणें. [सं.] ०**संकर**-पु उत्तम, अधम वर्णाचा मिलाफ; मिश्र संतति; जारज उत्पत्ति. ०**संबंध**-पु. विवाहद्वारा जो परस्पर संबंध होतो तो; यौनसबंध. [सं.] ०**संवृत्ति**-स्त्री. योनीचें आकुंचन. [सं.] ०**स्फुरण**-न. योनी थरथरणें; एक रोग. [सं.] ०**स्फोट**-पु. योनी फाटणें; छिद्र पडणें. [सं.] **योन्यर्श**-पु. योनीचा विकार; जननेंद्रिय बाहेर येणें. [सं.]

**योषा, योषित्, योषिता**—स्त्री. १ सामान्यतः स्त्री. २ व्यभिचारी; अपतिव्रता. [सं. युष्=सेवा-चाकरी करणें]

**यौक्तिक**—वि. १ कृत्रिम; बौद्धिक; कसबाचें. २ सामासिक अथवा संयुक्त (शब्द अथवा प्रत्यय) जसें- 'देवभक्त, विद्वान्.' ३ योगविषयक. [सं.]

**यौगपद्य**—न. एककालिकता; समकालिकता; कालैक्य. [सं.]

**यौगिक**—वि. प्राकृतिक; प्रत्यय किंवा इतर अनेक अर्थवंत शब्द यांचा परस्पर योग होऊन अवयव शक्त्यनुरोधानें अर्थ व्हावयाजोगा सिद्ध झालेला (विशिष्ट शब्द). शब्दावयवांवरून निघणारा (अर्थ). ०**शब्द**-पु. ज्या शब्दाचा अर्थ त्याच्या अवयवांच्या अर्थाच्या जुळणीनें उत्पन्न होतो तो शब्द.

**यौतक**—न. स्त्रीधनाचा एक प्रकार. [सं. युज्, युति]

**यौतिकमास**—पु. नक्षत्रप्रदक्षिणेनंतर सूर्याची युति होण्यास चंद्राला २ दिवस ५ तास आणखी लागतात. ह्या कालास यौतिक मास किंवा चांद्रमास म्हणतात. हा मास २९ दिवस १४ तास आणि १४ मिनिटें त्यानीं पूर्ण होतो.

**यौनसंबंध**—पु. योनिसंबंध पहा. [सं.]

**यौवन**—न तारुण्य; वयांत येणें; पूर्ण वाढ (शरीराची) [सं. युवन्-तरणा] ०**कंटक**-पु. तरुणपणीं तोंडावर येणारे फोड अगर पुटकुळया; तारुण्यपीटिका. [सं.] ०**पीटिका**-स्त्री. कफवातपित्त यापासून शेवरीच्या काटयासारख्या पुटकुळया तारुण्यांत मनुष्याच्या तोंडावर येत असतात त्या [सं.]

**यौवराज्य**—न. युवराजाचें म्हणजे राज्याचा जो कायदेशीर वारस त्याचीं कर्मे, कर्तव्यें किंवा अधिकार; युवराजाचें पद किंवा अधिकार. [सं.]

---

# र

**र**—मराठी व्यंजनमालेंतील सत्ताविसावें व्यंजन. अक्षरविकास-चार अवस्था. पहिली अशोकाच्या गिरनार लेखांत, दुसरी मंदसोर लेखांत (इ. स. ५३२), तिसरी कुंडेश्वर लेखांत (इ. स. ६६१), व चवथी जोधपूर-लेखांत (इ. स. ८३७). [ओझा]

**र**—स्त्री. रड; रडणें या अर्थी संकेतानें; रुदन; किंकाळणें; रडणें. 'करि बहु ज्यातें मानुनि पतितजःसारपुंज राका र।' -मोअनु ३५५. **र चा पाढा वाचणें, र चें गाणें लावणें-सांगणें-मांडणें, र करणें-गाणें**-१ मोठयानें रडणें, ओरडणें. २ रडगाणें सांगणें; दुबळेपणा दाखविणें. ३ रखडणें; कसा तरी काळ कंठणें. ४ पोरकटपणें वागणें; रडणें भेकणें. **र र**-स्त्री. रडगाणें. र पहा. [र द्वि.] ०**करीत**-क्रिवि. जोरानें किंवा उत्साहानें नव्हे असें; रडत कढत; कष्टानें.

**र**—अ. रे (अप.) 'दौंडी देण्याचा हुकूम झाला है र.' -नामना ८६.

**रा**—(संक्षेप) १ रवाना. २ राजमान्य. ०**खर**-(संक्षेप) रबिलाखर. ०**वल**-(संक्षेप) रबिलावल.

**रअया-आया**—स्त्री.अव. रयत. -आदिलशाही फर्मानें. [अर.]

**रइ-ई**—स्त्री. (व.) रवी; घुसळणी. [सं. रवि; प्रा. रइ; हिं. रई]

**रईस**—पु. १ सरदार; जहागीरदार. 'अव्वल घरचा बंदोबस्त नीट राखावा हें रईसास लाजम.' -पया २१. २ श्रीमंत; मोठा माणूस. 'रईस माणसें आहेत या गांवांत.' ३ (व.) राहणारा; वस्तीदार. 'कोठले रईस तुम्ही?' [अर. रईस्]

**रंक**—वि. १ गरीब, दीन (माणूस). राजा किंवा राव या शब्दाच्या जोडीनें येतो. -ज्ञा ५.११०. -एभा ५.४६८. 'रंक राजआज्ञेसि भ्यालें। तेचि पुढें राजा जालें।' -दा ९.१०.३१. २ दीन; लाचार; क्षुद्र 'पैं रंकु एक आडलेपणें। काकुळती अंतीं

धांवा गा धांवा म्हणे।'-ज्ञा ८.१२८. [सं.] ०पण-न. दारिद्र्य -ज्ञा १८.३२३.

**रंक**—न. जीवत्व. 'भीतरीं नसतां रंक। लोक प्रसीध वाजविति संख।'-ॠ ९३.

**रकटा**—पु. दोरा; आगवळाकरितां वापरावयाचा दोऱ्याचा किंवा रेशमाचा, केळीच्या सोपाचा, गंगावनाचा तुकडा; गवताची पात चिंधी वगैरे. २ करगोटयाकरितां वळलेला दोर वगैरे.

**रकटें**—न. १ फाटकें घोंगडें; कांबळें. २ लक्तरें; जुनें, फाटकें वस्त्र. ३ जुना शेला, धोतर, उपरणें इ०स तुच्छतेनें म्हणतात. [का. रट्टु=जाडेंभरडें कापड]

**रकत, रगतओढ, रकतपिती**—(प्र.) रक्त, रक्त ओढ, रक्तपिती इ० पहा.

**रकबा**—पु. १ (अप. रुकबा) गांवाभोंवतालची जमीन; गांव, खेडें, परगणा वगैरेची हद्द अगर प्रदेश; किल्ला वगैरेच्या सभोंवतालचें मर्यादित क्षेत्र. २ गुलाम; बंदी. [अर. रकबह्= गळयाभोंवतालची कडी, सांखळी] ०**बंदी**-स्त्री. गावच्या जमिनी (पडीत, वहीत, इनामी इ०) ची माहिती देणारा तक्ता, कागद; जमाबंदीचा तक्ता.

**रकम, रक्कम**—स्त्री. १ हिशोबाची बाब; कलम; गोष्ट; अंकराशि. २ खूण; चिन्ह; हस्ताक्षर; लेख. ३ (व) जात; प्रकार; तऱ्हा. ४ चीजवस्त; डाग; दागिना. 'चांदीच्या रकमा एकशेर आदपाव वजनाच्या...'-विक्षिप्त १.११. ५ विशिष्ट द्रव्यसंख्या; परिमित द्रव्य; ऐवज. ६ पोटगी; भत्ता; खर्ची. ७ कोणत्याहि पदार्थाचें विशिष्ट प्रमाण. ८ तह, ठराव, करार वगैरेचें कलम -पया ३२०. [अर. रक्म्] **रकमेस आणणें**-मोठा ऐवज करणें; किंमतदार बनविणें; वस्तु फायदेशीर करणें. **रकमेस येणें**-१ किंमतवान होणें; मूल्यवान होणें. २ (ल.) जेर येणें. 'तो इतका उद्दाम घोडा होता पण त्या चाबुकस्वाराचे हातीं जातांच दोन दिवसांत रकमेस आला.' ३ हिशेबांत धरण्याइतकी किंमत येणें; व्यापार, देवघेव, अगर व्यवहार वगैरेची किंमत निश्चित होणें; मूल्य ठरविण्याइतकें निश्चित स्वरूप प्राप्त होणें. ०**पात**-स्त्री दागदागिने. 'शिरसाळकर व वाळूजी हुजऱ्या हे माझे घरी जाऊन माझी रकमपात घेऊन गेले'-विक्षिप्त २.७९. ०**बंद-वार**-क्रिवि. एकेक बाब घेऊन; कलमवार; अंशाअंशानें. **रकमाला**-पु. १ बाबींची, जिनसांची यादी; वस्तूंचा हिशेब. २ जमाबंदी; जमीनमहसुलाचें हिशेबपत्र; राजलेख. -राव्य ९.२५. **रकमी**-वि. १ ठराविक; निश्चित; कायम (जमाबंदी). २ कलमी. **रकमेरकमेचा**-वि. (ना.) तऱ्हेतऱ्हेचा.

**रकाना**—पु कागदास उभी घडी पाडून अगर आंखून केलेला भाग; कागदाचा उभा भाग, स्तंभ; तुर्यभाग. -राव्य १०. ८ (इं.) कॉलम. [अर. रुक्न्=स्तंभ] **रकान्यास आणणें येणें**-१ बरीच किंमत आणणें, येणें; हिशेबांत लिहून ठेवण्याइतकी किंमत आणणें, येणें. रकमेस आणणें-येणें पहा.

**रकाना-णा**—पु. (व.) माज; उन्मत्तपणा. **रकान्यावर येणें**-(व.) माजणें; जोर येणें. 'रकान्यावर आला म्हणून असें बोलतो.'

**रकाब, रकाबी, रकेबी**—स्त्री. रिकाब-बी पहा.

**रकार**—पु. १ रडगाणें; रडणें; र करणें; बोंबलणें. २ ईर्षेचा अभाव व त्यामुळें येणारा ढिलेपणा. ३ अपयश; नाश; ऑफस् (काम, योजना इ०चा). (क्रि० होणें; करणें). [र (रडणें)+ करणें]

**रकट(क्टा)ण-न**—न. (विणकाम) वशारण्याच्या गांठी दिल्यावर जें दोन बोटें विणतात ते; लुगडें इत्यादि वस्त्राच्या करळयांचा भाग. [रकटा]

**रक्त**—न. रुधिर; जिवंत प्राण्याच्या शरीरांत सतत वाहणारा तांबडा रस; शरीरांतील एक द्रवरूप धातु. -वि. १ तांबडा; तांबूस रंगाचा; रक्तासारखा (तांबडा) लाल; लालभडक. २ रंगविलेलें. रंगीत. ३ आषक; अनुरक्त; संवय, शोक, लळा, ओढा असलेला; [सं. रंज्-रत-रक्त; फ्रेंजि. रत, पोर्तु.जि. अरत] (वाप्र.) ०**आटविणें, रक्ताचें पाणी करणें**-उरस्फोड करणें; फार मेहनत करणें. ०**पडणें**-शौच्याच्यावाटे रक्त जाणें. **रक्ताचें पाणी (आणि हाडाचे मणी) करणें**-अतिशय इमानानें आणि मेहनतीनें कामगिरी करणें. ०**पाडणें**-(मंत्र, जादूटोणा इ०नीं) बाहेर रक्त पडेल असें करणें. **रक्तावणें, रक्ताळणें**-क्रि. १ रक्त वाहूं लागणें; रक्तस्राव होणें (जखमेंतून). २ रक्तबंबाळ होणें (शरीर, वस्त्र, वस्तु). सामाशब्द- ०**ओढ**-स्त्री. रक्त पडतें अशी हगवण; रक्त जाणें. ०**कांचन**-पु. एक डोंगरी झाड; तेंदू, तेंतु. ०**गुल्म**-न. मुलाच्या डोक्याचीं हाडें व त्वचा यांमध्यें कधीं कधीं रक्त सांचून गुल्म होतें तें.'-बालरोगचिकित्सा ५०. ०**गोलक**-पु. (शाप.) रक्ताचा थेंब, बिंदु इ० (इं.) ब्लड ग्लोब्यूल. -सेंपू २. ०**चंदन**-पु. एक वृक्ष; तांबडा चंदन; याच्या बाहुल्या, खेळणीं इ० करतात. [सं] ०**चंदनी**-वि. रक्तचंदनाच्या संबंधीं. ०**तालू**-वि. घोडयाचा एक प्रकार. 'तालूचे ठिकाणीं तांबडा, दारूप्रमाणें नेत्र; मानेवरील केस आरक्तवर्ण आणि बाकी सर्व अंग तांबडें अशा घोडयास रक्ततालू म्हणतात.'-अश्वप १.२३. ०**धातु**-पु. तांबडा खडू; तांबडा(हर)ताल. [सं.] ०**नेत्र**-वि. तांबडे, लाल डोळे असलेला (घोडा); अशुभ चिन्ह होय. [सं.] ०**प**-१ राक्षस. २ ढेंकूण. [सं. रक्त+पा=पिणें] ०**परमा-मे**-पु. जननेंद्रियाचा रोग; कांहीं व्याधीच्या योगानें शिश्नद्वारां जो रक्तप्रवाह तिडीक लागून होतो तो; रक्तप्रमेह. 'मूत्रकोड आणि

परमें । रक्तपिती रक्तपरमें ।' –दा ३.६.२९. [सं. रक्तप्रमेह] •पात–पु. खून; कापाकापी; मारामारी; कत्तल; रक्त सांडणें. 'त्याच्या दाराशीं रक्तपात केल्यावांचून तो पैसा देणार नाहीं.' [सं.] •पिती–स्त्री. महारोग; महाव्याधि; गलतकुष्ट रोग. [सं. रक्त+पित्त] •पित्या–वि. रक्तपिती भरलेला; महारोगी. •पित्त–पुन. नाक, तोंड इ॰ पासून रक्तस्राव होणें. 'आम्लपित्त रक्तपित्त।' –गीता१३.२४९७. •प्रदर–पु एक प्रकारचा प्रदररोग. •प्रमेह–पुन. रक्तपरमा–में पहा. जननेंद्रियाच्या द्वारें रक्तस्राव होणारा प्रमेह; लघवींतून रक्त जाणें. •बंबाळ–बोंबाळ–वि. १ रक्तानें भरलेला, माखलेला; अंगातून अतिशय रक्त वाहत असलेला. २ शरीर अवयव इ॰ची अशी स्थिति. 'हाताचा रक्तबंबाळ झाला.' •बाऊ–बाहु–पु. एक सन्निपात ज्वर; अंगावर तापाचे तांबडे चकंदळे उठणें. •बीज–वि. १ ज्याच्या रक्तापासून नवीन असुर उत्पन्न होई असा (एक असुर). २ ढेंकूण ३ (ल.) डाळिंब, तांबडे दाणे असलेलें. [सं.] •बुंद–पु. राक्षस. [सं. रक्तबिंदु] •बोळ–पु एका झाडाचा औषधी तांबडा डिंक, गोंद. •भरित (गो.) रक्तानें भरलेला •मांडळी–स्त्री. (गो.) सापाची एक जात. ही चावली असतां तोंडांतून रक्त वाहतें. •मा(मां)स–न. रक्त व मांस; शरीरांतील महत्त्वाचा अंश. 'रक्तमांस आटलें–शोषलें–सुकलें इ॰.' •मांस एक–एका रक्ताची; कुळांतील; सगोत्र. •मांस निराळें–नात्याचा कांहीं संबंध नसणें; नातें नसणें, असगोत्र. •मान्य–वि. लढाईमध्यें केलेल्या कार्याबद्दल, झालेल्या जखमांबद्दल बक्षीस दिलेल्या, सारा माफ जमिनी. •मुखराग–पु. (नृत्य) वीर, रौद्ररस, किंवा मद्याची धुंदी दाखविण्याची तोंडावरील लाली, तेज. •मेह–पु. रक्तप्रमेह पहा. [सं.] •मोक्षण–न. शरीरांतील रोगांश बाहेर पडावा म्हणून जळवा लावून, कापून, फांसण्या टाकून किंवा शिरा तोडून जें रक्ताचें निष्कासन करितात तें. •रंजन–न. तांबडें करणें. •रुधिरपेशी–स्त्रीअव. रक्ताच्या तांबडया पेशी. (इं) रेड कॉर्प्युस्कल्स. •रोडा–रोहिडा–रोहडा–पु. एक प्रकारचें झाड, औषधी वनस्पति; रगतरोडा. पानें भोकरीच्या पानासारखीं, मिऱ्याहून मोठीं गोल व तांबडया रंगाचीं फळें येतात. [सं. रक्तरोहितक] •वर्ण–वर्णी–वि. लाल; तांबडया रंगाचें. [सं.] •वाहिनी–स्त्री. जीमधून रक्त वाहत असतें अशी शरीरांतील नाडी. [सं.] •विकार–पु. रक्तदोष; रक्तांतील बिघाड [सं.] •विपाक–पु. रक्तदोषानें होणारा रोग. विपाक पहा [सं.] •वृद्धि–स्त्री. (आजारानंतर) शरीरांत रक्त वाढणें.याच्या उलट रक्तक्षय. [सं] •शोषण–न. १ (आजारामुळें) रक्त कमी होणें; अंगांतील रक्त कमी करून कृश करणें. २ (ल.) लोकांकडून त्याच्या शक्तीबाहेर पैसे उकळणें; जळवा लावणें. [सं.] •सांड–स्त्री. (कों.) रक्तमोक्षण पहा. फासण्या टाकून रक्त काढणें. •स्राव–पु रक्त जाणें, वाहणें; रक्ताचा पाट. [सं.] **रक्ताचीआण**–स्त्री. एखाद्याच्या रक्ताची शपथ घेणें; निकराची शपथ. बंदाखालीं बसणें पहा. **रक्तांजनी**–वि. एकरंगी पांढरा असून डाव्या कुशीवर फक्त तांबडी टिकली असलेला (घोडा). –अश्वप १.९७. [रक्त+अंजन] **रक्तातिसार**–पु रक्ताची हगवण. –बालरोगचिकित्सा १०७. [रक्त+अतिसार] **रक्तांबर**–पु. भगवें, तांबडें वस्त्र. –वि. १ तांबडें वस्त्र परिधान केलेला. २ रक्तानें न्हालेला; जखमी झालेला. [सं. रक्त+अंबर] **रक्तांबील–ळ, रक्ताभोंबळा**–वि (काव्य) रक्तानें माखलेला; अंगांतून रक्तस्राव होत असलेला. [सं. रक्ताविल] **रक्ताभिमान**–पु समान रक्ताविषयीं अभिमान, जागृति; जातीचा जागतेपणा. 'आम्हालासुद्धां रक्ताभिमान हा आहेच.' –टिले २.४५०. **रक्ताम्र**–पु. एक प्रकारचें झाड व त्याचें फळ. रातंबी पहा. [सं. रक्त+आम्र] **रक्तार्श**–पु. मूळव्याध; रक्ती मूळव्याध; शौचाच्या वाटेनें रक्त पडणें. [सं.] **रक्तावरोध**–पु रक्त न वाहणें; रक्ताचें अभिसरण होण्याचें थांबणें; रक्ताचा विशिष्ट जागीं संचय होणें. [रक्त+अवरोध] **रक्ताशय**–पु. शरीरांतील रक्त संचयाची जागा; हृदय. [रक्त+आशय] **रक्तासन**–न. तांबडया दुपारीचें झाड. **रक्ताक्ष**–वि. १ तांबडया लाल डोळयाचा (घोडा). २ तांबडा; लाल (मोतीं, रुद्राक्ष) [सं. रक्त+अक्ष] **रक्ताक्षी**–पु साठ संवत्सरांतील अठावन्नावा संवत्सर. **रक्ता**–वि. पंधराव्या श्रुतीचें नांव. [सं.] **रक्ति**–स्त्री. अनुराग; रंग. [सं.] **रक्तिका**–वि. सातव्या श्रुतीचें नांव. [सं.] **रक्तिमा**–पु. तांबडेपणा; लालपणा; लाली. [सं.] **रक्तिया**–वि. लाल रंगाची छटा असलेला (हिरा). हा दोष अशुभ मानतात. **रक्ती–रक्त्या मूळव्याध**–स्त्री.जींत रक्त पडतें अशी मूळव्याध. **रक्त्या बोळ**–रक्तबोळ पहा. **रक्तोत्पल**–न. तांबडें कमळ. [रक्त+उत्पल]

**रकतवान**—पु. १ शाई विकून निर्वाह करणारा. २ घराला शाई पुरविणें, द्रोण, पानें आणून जेवण्याला मांडणें या कामावरचा श्रीमंताच्या घरचा नोकर. –वाडबाबा १.९३. [फा.] •वानी–स्त्री रक्तवानाची वृत्ति, धंदा.

**रकबा** —पु. गांवाखालची जमीन. रकबा पहा. [अर. रक्ब]

**रख** —वि. (सांकेतिक) (भाजीपाला बाजार) तीन संख्या.

**रखडणी**—स्त्री १ रखडपट्टी; रेंगाळत चालणें, काम करणें; रेंगाळणें; रेंगत चालणें; ढुंगणानें सरकणें. **रखडणें**–क्रि. १ कष्टांत दिवस काढणें; कसें तरी चालणें; ढकलणें खितपत पडणें; एखादें कार्य धड न होतां त्यांतून आपली सुटका होणार नाहीं अशा कंटाळवाण्या स्थितीची विपत्ति भोगीत बसणें. २ भटक्या मारणें. 'पायाखालचे खडे तुडवीत रखडत फिरत असतो.'

–भा१११. ३ दुखण्यांत खितपत पडणें. ४ ढुंगणानें सरकत जाणें; खुरडणें. [ ध्व. खरडणें वर्णव्यत्यास ] **रखडपट्टी–पाटी**–स्त्री. (गु.) भटकणें; हिंडणें.

**रखतवाणी–वानी–वाळी**—(प्र.)रक्तवानी पहा. 'म्हणोनि केली रखतवानी ।' –दा २०.९.१०.

**रखना**—पु भांडण; वाद. 'त्या अलीकडे दरम्यान रखने जहाले.' –थोमारो १.२२१. [ फा. रख्ना=फट, चीर ] **रखनेसूरत–सुरत**–स्त्री. तंटयाची तऱ्हा; भांडणाचें कारण. दरम्यान रखनेसुरत ते तर्फेनें अमलांत आली.' –थोमारो १.६६.

**रखमंडळ**—न. १ राख पसरलेली जागा. २ (ल.) घाण जागा; उकिरडा. [ राख+मंडळ ]

**रखरख**—स्त्री. १ कडक ऊन; आग; भकभक; धगधग; तीव्र उष्णता. २ रोगामुळें पोटांत पडणारी आग; खाखा. ३ तीव्र क्षुधा अगर शोष. ( क्रि० करणें ). [ अनुकारी. लखलख प्रमाणें; तुल. सं. रुक्ष ] **रखरखणें**–अक्रि. १ रखरख होणें; प्रदीप्त होणें; ( जळजळीत असणें ) २ घसा कोरडा होणें; तीव्र क्षुधा अगर तृषा लागणें. ३ तीव्र दाह अगर आग आग होणें; तापणें. ४ रुक्ष, शुष्क होणें ( जमीन, प्रदेश ). **रखरखलेला निखारा**–पु. १धगधगीत विस्तव.२(ल.) जाज्वल्य माणूस, वस्तु. 'रखरखलेल्या निखाऱ्यांना कोणीच लाथाडूं शकत नाहीं.' -सवतीमत्सर २९. **रखरखाट**–पु. १ तीव्र भूक, तहान; अन्नापाण्याच्या अभावामुळें पोटांत होणारी रखरख. २ रुक्षता; शुष्कपणा; रखरखीतपणा ( प्रदेश इ० चा ). [ रखरख चा अतिशय ] **रखरखीत**–वि. १ स्निग्धांशविरहित कोरडा; भरभरीत; कठिण (खाण्याचा पदार्थ). २ कोरडा; नापीक; निर्जन; निर्वृक्ष (प्रदेश, प्रांत); थंडावा, स्निग्धपणा जेथें नाहीं असा ( देश–ग्रामादि ). ३ धगधगीत; अतिशय तप्त. **रखाखणें**–अक्रि. फार धगधगणें. रखरखणें पहा.

**रखवालदार**—पु. रक्षक; राखण करणारा; पहारेकरी; भय्या. [ सं. रक्ष; प्रा. रक्ख; देप्रा. रक्खवाल; हिं. रखवाला ] **रखवाली**–स्त्री. १ राखण; पहारा; संरक्षण; संभाळ.

**रखा**—पु. जागल्या. 'मुलकी खात्यामार्फत ठेवलेले रखे.' –(बडोदें) स्वारीनियम २६. [ सं. रक्षा; प्रा. रक्खा ]

**रखा**—स्त्री. ( कों. ) राख; भस्म. [ सं. रक्षा; प्रा. रक्खा ] **रखाडी**–स्त्री. राख. राखुंडी पहा. 'रखाडीला जा मिळूनियां वेगे ।' –केक १५.

**रखाद्–त्**—स्त्री. ( व. ) रद्दी. [ फा. रख्त्=माल, सामान ]

**रखेली**—स्त्री. राख; उपपत्नी; बाळगलेली स्त्री. [ राखलेली, राखणें ]

**रखत**—पुन. १ जिंदगी; सामान; २ कापडचोपड. [ फा. रख्त्=मालमत्ता ] ०**खाना**–१ कापडखाना. २ सरकारी कचेरी कोठी. 'अजरखूतखाने खोदायनंद खाने अलीशान' –रा २०. १२०.

**रख्तवान–नी** –रक्तवान–नी पहा.

**रग**—स्त्री. १ इंगा; नांगा. २ ईर्षा; मिजास; मस्ती; जोर; गुर्मी; ताठा; मग्रूरी. 'मराठयांची रग जिरविल्याशिवाय ते गप्प बसावयाचे नाहींत.' ( क्रि० धरणें; बाळगणें; येणें; मोडणें; जिरविणें ) ३ उत्साह; जोर; सहनशक्ति. ४ तीव्रता; कडकपणा; प्रभाव; वेग; सोसाटा, 'गळवाचें रक्त काढतांच त्याची रग मोडली.' 'उन्हाची–पावसाळयाची–वाऱ्याची रग.' ५ कळ; वेदना; दुःख; अवघडणें. ( क्रि० लागणें; येणें ) 'टवकारूनी दृष्टि लावूनिया रग । दावी झगमग डोळयापुढें ।' –तुगा ४०७. ६ धमनी; नस, स्नायु; शीर; नाडी. 'मिठी मारा सळसळती साऱ्या रगा ।' –प्रला १३१. ७ वेदना; पोट, हातपाय, डोकें, डोळे इ० अवयवांमध्यें सारख्या होणाऱ्या कळा. [ फा. रग=धमनी ] ( वाप्र. ) ०**जिरविणें–मोडणें**–खोडकी जिरविणें; खोड मोडणें; शासन करून एखाद्याचा ताठा नाहींसा करणें. ०**जिरणें–उतरणें**–मस्ती शमणें; नरम येणें. 'मदनरगा या त्वरितगती जिरूं देरे ।' –प्रला १८७. **( मणगटाला ) रग लावणें**–मनगट घट्ट पकडणें; अवळून धरणें; पिळणें; वेदना होतील अशा रीतीनें दाबणें. **कामाची रग**–कामाची आच, त्रास, घाई; जाचणूक. ( क्रि० लावणें; लागणें ) **सावकाराची रग, देणेदाराची रग**–स्त्री. सावकारानीं किंवा देणेदारांनीं मागें लाविलेली टोचणी, तगादा, त्रास, दुःख; छळणूक. सामाशब्द– **रगदार**–वि. १ जोरदार; पाणीदार; मस्त; रगेल, उन्मत्त; मिजासखोर; ऐटबाज. २ जिवंत; उत्साही; ईर्षेबाज, तगडा ( मनुष्य, पशु इ० ). रग पहा. **रगदारी**–स्त्री. उत्साह; ईर्षा; कस; जिवंतपणा; चैतन्य. **रगमोड**–स्त्री. गर्वहरण; मानहानि; नाक खालीं होणें; मस्ती घालविणें; जाणें. **रगेल**–वि. अंगांत पुष्कळ रग असलेला. ( मनुष्य; घोडा ); ताठलेला; गर्विष्ठ; मस्त; गुर्मीखोर. अहंमन्य; मिजासखोर; बेगुमान; दिमाखी.

**रंग**—पु १ केवळ चक्षुरिंद्रियानां जाणतां येतो असा पदार्थाच्या ठिकाणीं जो पांढरेपणा, तांबडेपणा इ० वर्ण तो; एखद्या वस्तूवर प्रकाश पडला असतां ती वस्तु ज्या रंगाची असेल त्या रंगाच्या किरणाशिवाय इतर किरण शोषले जाऊन त्या रंगाचे किरणच फक्त बाहेर टाकते. त्यास रंग म्हणतात.–ज्ञाको (र) २. २ रंगाची पूड; पदार्थाला तांबडा, काळा इ० कोणताहि वर्ण देण्याचें द्रव्य; रंगविण्याचें द्रव्य. ३ ( ल. ) तेज; तेजस्विता, चकाकी; भपका; गायन, कीर्तन, तमाशा, भाषण, इ० चा लोकांचीं अंतःकरणें रमण्याजोगा पडणारा शोभाविशेष; मजा; शोभा; आनंद. 'आजचे गाण्यास रंग चांगला आला.' ४ देखणेपणा; उत्कृष्टता; चांगली

स्थिति ( मनुष्य, वृक्ष, बाग, शेत, इ० पदार्थांची किंवा संसार, व्यवहार इ०ची ). ' नुक्ता संसार रंगास आला तों बायको मेली.' ५ देखावा; आकार; ढब; डौल; घाट; अंदाज; चिन्ह; परिस्थिति; प्रसंग; संधी. ( क्रि० दिसणें ) ' आज गरमी होती तेव्हां पाऊस पडेलसा रंग दिसतो. ' ' उन्हाचा-वाऱ्याचा-आभाळाचा-दिवसाचा-काळाचा-धारणेचा-भावाचा-पिकाचा-चाकरीचा-रंग. ' ' तूं शालजोडी मागशील तर पहा, मागण्याचा रंग आहे. ' ६ सोंगट्यांचे चार भिन्न प्रकार; गंजिफांचे निरनिराळे दहा प्रकार; पत्त्यांच्या चार बाजू प्रत्येकीं. ७ गंमत; मजा; तमाशा; खेळ. ' भंगकरी रंग, अफू करी चाळा, तंबाखू बापडा भोळा. ' ८ रंगण; क्रीडास्थान ( नाट्य, नृत्य इ०चें ); हौदा; आखाडा; रंगभूमी; सभागृह; सभामंडप. ' असें बोलून इकडे तिकडे फिरते आणि रंगांतून पडद्यांत निघून जाते.' -कमं. २; -मोआदि २६.२१. ९ नवरा; पति ( समासांत स्त्रीच्या नांवापुढें योजतात ). ' सीतारंग. ' १० विचार; बेत. ' जाणत्याचे जाणावे प्रसंग । जाणत्याचे घ्यावे रंग ' -दा १८.२.१२. ११ तऱ्हा; ढोंग. ' बहु शिकला रंग चाळे । खरें खोटें इचे वेळे. -तुगा १३५९. १२ गाणें, बजावणें, नृत्य इत्यादि करमणुकीचा प्रकार. ' आजि कुमारिकेच्या महालासी । रंग होतो दिवसनिशीं । ' -शनि २४६. १३ थाटमाट ' रंग स्वर्गींचा उतरे । ' -दावि ५०४. १४ महत्त्व. ' या कारणें कांहीं रंग । राखोन जावें ' -दा १७.७.२१. १५ विवाह, शिमगा इ० प्रसंगीं एकमेकांच्या अंगावर केशर इ० चें रंगीत पाणी टाकतात तें किंवा तें टाकण्याचा समारंभ. १६ प्रेक्षकांचा किंवा श्रोत्यांचा समुदाय. १७ चुना; सफेती; उजळा. ( क्रि० देणें ). [ सं. रञ्ज्-रंग देणें; फा. रङ्ग; हिं. रंग ] ( वाप्र. ) **०उडणें**-१ मूळचा रंग जाणें, फिका होणें; तेज कमी होणें **०करणें**-मजा मारणें; मौज करणें. **०खेळणें**-विवाहादि प्रसंगीं एकमेकांच्या अंगावर रंग उडविणें. **०चढणें**-अंमल, निशा, मद, धुंदी येणें. **०दिसणें**-एखादी गोष्ट होईलशी वाटणें, आकारास येणें; संभव असणें. ' तरी यापुढें जें एकंदर अवस्थांतर होण्याचा रंग दिसत आहे. ' -नि. **०भरणें**-१ भरास येणें; जोमांत येणें; मजा येणें. ' भलत्या प्रसंगीं भलत्या तालाची चीज सुरू केलीत तर रंग भरेल कां ? ' -नाकु ३.४६ २ रंग आणणें. ' रंग भरिती अद्भुत । ' -सप्र १०.८८. ३ तडजोड करणें. -पया १४०. **०मारणें**-बाजी मारून नेणें. ' रहस्य राखून रंग मारला । ' -ऐपो २५३. **०राखणें, रंगाची मोट बांधणें**-विजयानें, वैभवानें हुरळून न जातां सभ्य आणि सौम्य वर्तन कायम ठेवणें; आपल्या प्रतिपक्ष्यांवर वादांत किंवा कांहीं कामांत आपण सरशी मिळविली असतां आपण दिलदारीनें त्याच्याशीं वागणें; त्या सरशीच्या जोरावर त्याच्याशीं कठोरपणा न करणें; त्याला न हिणविणें; अधिक पेंचात ढकलण्याचा प्रयत्न न करणें. ' त्यानें मी चुकलों असें कबूल केलें तें बस झालें, आतां काय रंगाच्या मोटा बांधावयाच्या आहेत ? ' **०शिंपणें**-होळीचे अगर लग्नाचे वेळीं रंगाचें पाणी उडविणें, फेकणें; रंग खेळणें. **रंगाचा भंग करणें**-आनंदाचा बिरस करणें. **रंगांत येणें**-तल्लीन होणें; रंगून जाणें. **चढणें**-शोभा प्राप्त होणें; खुलून दिसणें; पूर्णतेस येणें; विकास पावणें; भरास येणें. **रंगास-रंगारूपास आणणें-येणें-चढणें**-१ फलद्रूप होणें-करणें; वैभवशाली, सुखावह, करणें; आरंभिलेलें कार्य अनुकूल संस्कारादिकांनीं चांगल्या स्थितीला आणणें, येणें. ' माझ्या ग्रंथाचा मी नुमता कच्चा खरडा तयार केला आहे. तो रंगारूपास आणावयास वर्ष दीड वर्ष तरी लागेल. ' २ ( तिरस्कारार्थी ) एखाद्या तऱ्हेस, आकृतीस, विशिष्ट अवस्थेस पोंचणें, पोंचविणें. ' हा आतां राम म्हणावयाचे रंगास आला. ' सामाशब्द- **०आखाडा**-पु. कुस्ती खेळण्याची जागा. ' धनुर्याग आरंभिला । मल्लें रंगआखाडा केला । ' -कथा ४.६.३७. **०काम**-न. १ रंग देण्याचें, रंगाचें काम. २ ( रंगारी धंदा ) धाग्यावर रंग चढवून तो पक्का बसविण्याची क्रिया; ( इं. ) डाइंग. **०डाव-बाजी**-पुस्त्री. गंजिफा, पत्ते खेळण्याचा एक प्रकार. **०डी, रंगडी ढंगडी-धंगडी**-स्त्री. १ ढंग; चाळा. २ फसगंमत; फसवेगिरी; खोडी; लबाडी; डावपेंच इ० ( अनेक वचनी उपयोग ). [ रंग+ढंग ] **०ढंग**-नपु. १ युक्ति; कारवाई; फेंद; चाळा; लटपट; कावा. ( क्रि० करणें; मांडणें; चालविणें ). २ रागरंग; स्वरूप; एकंदर देखावा. ३ नाचरंग वगैरे; स्वच्छंदी आचरण. **रंगणावळ**-स्त्री. रंगविण्याबद्दलची मजुरी; रंगविण्याचा खर्च. [ रंगणें ] **०दार**-वि. १मनोहर रंग असणारा ( पदार्थ, फूल, वस्त्र इ० ) २ रंगेल गमत्या; विनोदी विषयी; चैनी; ( माणूस ) ३ रंगीत; रंगविलेले; रंगीबेरंगी. **०देवता**-स्त्री. गाणेंबजावणें, कथा, पुराण, प्रवचन, व्याख्यान इ०कांस जिच्या प्रसादानें रंग येतो, यश मिळतें अशी एक कल्पित देवता; खेळांत रमणीयता आणणारी देवता. २ खेळांची अधिष्ठात्री देवता. [ सं. ] **०द्रव्यें**-नअव. ( रसा. ) जीं द्रव्यें सूर्यकिरणांचा कांहीं विशिष्ट भागच फक्त आरपार जाऊं देतात अथवा परावृत्त करतात व बाकीचा भाग नष्ट करून टाकतात तीं द्रव्यें. -ज्ञाको ( र ) ३. २ रंगविण्याच्या कामीं लागणाऱ्या वस्तु, पदार्थ. **०नाथ**-पु. कृष्ण; श्रीकृष्णाची बालमूर्ति. [ सं. ] **०पंचमी**-स्त्री. फाल्गुन वद्य पंचमी. या दिवशीं एकमेकांवर रंग उडवितात **०पट**-पु. रंगण्याची खोली; पात्रें रंगून तयार होण्याकरितां केलेली जागा; ( इं. ) ड्रेसरूम, ग्रीनरूम. [ सं. ] **०बहार**-पु. १ मौज. कमालीचा आनंद; सुख; आनंदाची लूट ( क्रि० करणें मांडणें; होणें) ' रंगबहार एकांतीं लुटा । घर सुंदर कर पोपटा । ' -प्रला १४०. २ भव्य, आनंददायक दृश्य; थाटमाट. ३ नानाप्रकारच्या करमणुकी, खेळ,

कसरती किंवा त्या जेथें चालतात तें ठिकाण. ४ मुबलकता; पीक इ०ची आनंदप्रद रेलचेल. ‘ पिकांचा–धान्याचा–आंब्यांचा–लाडवांचा–जेवणांचा–रंगबहार. [ रंग+बहार ] **०बाजी**–स्त्री. पत्त्यांनीं खेळण्याचा एक प्रकार; पत्त्यांतील एक खेळ; रंगडाव. **०भंग**–पु. विरस; आनंदाचा नाश; मध्येंच एकदम येऊन खेळ थांबविणें, बंद करणें; खेळांतील आनंद, गोडी न वाटेल असें करणें. **०भूमि**–स्त्री. १ नाटकगृह; प्रयोग किंवा नाटक करून दाखविण्याची जागा; सभागृह; सभामंडप. २ मर्दानी खेळांचें मैदान; रणांगण. [ सं. ] **०मंडप**–पु. कुस्त्या वगैरे खेळण्यासाठीं घातलेला मांडव. [ सं. ] **०मंडपी**–स्त्री. खेळाची अथवा करमणुकीची जागा. [ स. ] **०महाल**–पु. विलासमंदिर; दिवाणखाना; आरसे व तजबिरी लावून सुखोपभोग घेण्यासाठीं केलेलें घरांतील दालन; श्रीमंत लोकांची आरशांनीं, रंगीबेरंगी चित्रांनीं सुशोभित केलेली विलास करण्याची खोली; (विशेषतः) निजण्याची खोली. [ फा. ] **०माळ**–स्त्री. लग्न वगैरे समारंभाच्या मिरवणुकीपुढची नक्षत्रमाळा; रंगीबेरंगी कागदांचीं अथवा बेगडांचीं फुलें कातरून दोऱ्यांत ओवून काठीला बांधून लग्नकार्यांत धरण्याच्या माळा. [ सं. रंग+माला ] **०माळा**–स्त्री. १ रांगोळीचीं चित्रें; रांगोळी. ‘ प्रवर्तोनि गृहकामीं रंगमाळा घालुं पाहती । ’–भूपाळी घनश्यमाची २०. २ सिंहासन अथवा मूर्तीचें देवालय याचे भोंवतीं तिन्ही बाजूंनीं बसविलेल्या लाकडी अगर धातूच्या सोंगट्या अथवा निरनिराळ्या आकृतींचीं चिन्हें. ३ नक्षत्रपुंज; तारे. ४ नक्षत्रमाळा; (सामा.) रंगमाळ **०मूर्ति**–स्त्री. ज्याच्यामुळें समारंभास विशेष शोभा येते असा मनुष्य अथवा मूर्ति; कृष्णाचें बालस्वरूपी लांकडी अथवा धातूचें छायाचित्र; श्रीकृष्णाची मूर्ति. [ सं. ] **०मोड**–स्त्री. रंगभंग; ऐन भरांत खेळ आला असतां विरस होणें; हिरमोड; उत्साहभंग; आनंदाचा नाश; खेळाचा चुथडा. **०रस**–पु. आनंद; हर्ष. ‘ हस्ती सेवकांसुद्धां सकळही लाल रंगरसी । ’–हो २०३. **०राग**–पु रागरंग पहा. **०रूप**–न. आकार, रंग, वर्ण, चर्या, देखावा इ० (फळ, व्यापार, व्यक्ति, इ०चा); बाह्यस्वरूप. [सं.] **०रूपास आणणें**–चांगल्या स्थितीस आणणें; निरोगी करणें; ऊर्जित दशेस आणणें. **०रूपास येणें-चढणें**–चांगल्या स्थितीस किंवा पूर्णतेस येणें, पोहोचणें. **०रेज**–पु. रंगारी. [ फा. रंग्रेझ ] **०रेजी**–स्त्री. रंग देणें; रंगविणें; सफेती [ फा. ] **०रोगण**–न. १ तेलिया रंग. २ सामान्यतः रंग देणें; साफसूफ करणें वगैरे क्रिया. [ रंग–इ–रौघन् ] **०लाल**–वि. चैनी (मनुष्य). [ रंग ] **०लूट**–स्त्री गंजिफाचे खेळांतील एक शब्द; गंजीफांचे डावांत सर्वांचीं पानें एक रंगाचीच पडलीं असतां तो हुकूम फुकट जातो आणि पानें सर्वांनीं लुटून घ्यावीं असा एक प्रकार आहे ती. **०लेला ऊंस**–पु. गाभ्यांत लाल पडलेला ऊंस. **०वट**–स्त्री. खेळण्याची जागा; क्रीडांगण; रंगण. ‘ द्राखे घोंस लांबटी । रंगवटामाजी मिरवती । ’–खिपु १.८.२३. **०वणी**–न. रंगाचें पाणी. [ रंग+पाणी ] **०वल्ली**–स्त्री. रांगोळीचें चित्र; रांगोळी पहा. [सं. ] **०शाला, रंगांगण**–स्त्रीन. नाटकगृह; खेळाचें मैदान; तालीम; नर्तनशाला; जेथें नाटकांतील पात्रें रंगवितात ती जागा. [ सं. ] **०शिला, रंगशिळ**–स्त्री. १ दगडी पाटा. २ देवाच्या मूर्तीपुढील मोठी शिळा; पंढरपूरच्या विठोबाच्या पुढील मोठी शिळा ( यावर भक्त नाचतात ). ‘ नाचा रंगशिळेवरी । भेट देईगा मुरारी । रामचंद्राहो । ’–भज ८२. [सं.] **०सभा**–स्त्री. १ खेळ अथवा करमणूक यासाठीं असलेली जागा. २ खेळाडु अगर विनोदी मंडळी. ( क्रि० जमणें; भरणें; मांडणें; चालणें; उठण; मोडणें ). **०सही**–स्त्री. तिफांशी खेळांत पक्क्या रंगाच्या चारी सोंगट्या पटाच्या चारी बाजू हिंडून आपल्या पटाच्या डाव्या बाजूकडील घरांच्या ओळींत येऊन बसणें. **०स्थल**–न. रंगण; रंगभूमि पहा. ‘ विचक्षणा पडद्यांतून रंगस्थलांत येते. ’–कर्म २. **रंगाई**–स्त्री. (हिं.) रंगणावळ; रंग देण्याची मजूरी, किंमत. ‘ रंगाऱ्याला कपडे रंगविण्याबद्दल रंगाई द्यावी लागते. ’–विक्षिप्त १.१२. [ फा. रंगाई ] **रंगांगण**–न. कुस्त्या, खेळ इ०करून दाखविण्यास योग्य स्थळ; रंगशाला पहा. **रंगाचल**–न. ( महानु. ) रंगाचा भर; आनंद, उत्साह; भर. ‘ निरुपणांचा रंगाचळी । त्यागाचें आढाळ चाळी । ’–भाए २३७. [ रंग+अचल ] **रंगाची(रंगीत) तालीम**–स्त्री.रंगभूमीवर नाटक होण्यापूर्वी खाजगी रीतीनें सालंकृत प्रयोग करून पाहणें. [ इं. ] **रंगाथिणें**–क्रि. रंगविणें; रंगविशिष्ट करणें. ‘ यया भूतांचेनि संगें । जीवें घेतलीं अनेक सोंगें । विपरीत वासना संगें । रंगाथिला ।’–सिसं ३५.२२२. **रंगामेज**–पु. १ चितारी २ ढोंगी; दांभिक इसम. [फा. रंगामेझ] **रंगामेजी**–स्त्री. १ आरसे, चित्रें; इ०नीं सुशोभित करणें; दिवाणखाना इ० स्थलास नानाप्रकारचे रंगांनीं, चित्रें, वेलबुट्टी काढून शोभेसाठीं चितारण्याचा केलेला संस्कार. ‘ भीमनाथ केदार राममंदीर रंगामेजीचें । ’–प्रला ७८. २ (ल.) दांभिकता; कृत्रिमता; कुटिलता. **रंगारी**–पु. कपडे रंगविणारा; वस्त्रें रंगवून उपजीविका करणाऱ्यांची एक जात. [ सं. रंज्; फा. ] **रंगारीहिरडा**–पु. एक प्रकारचें हिरड्याचें झाड व त्याचें फळ ( पिवळसर रंगाचें ). यालाच जंगली किंवा चांभारी हिरडा म्हणतात. सुरवारी हिरडा हा दुसऱ्या जातीचा आहे. **रंगालय**–न. नाट्यशाला. [ सं. ] **रंगाळां**–न ( राजा. ) चामडें ताणून घोटण्याचें साधन ( हें सुताराच्या पटाशीसारखें पण बोथट धारेचें असतें ). [ रंगाळें ] **रंगिन**–न. चांदीवर सोन्याचा पत्रा चढवून तयार केलेलें जरतार. **रंगिला**–वि. रंगेल; ख्यालीखुशालीचा; चैनी; विषयी; खेळाडु. [ हिं. ] **रंगी**–स्त्री. ( बे. ) जुगार; जुवा; पत्त्यांतील खेळाचा एक प्रकार. **रंगी, रंगीन, रंगील**–वि. १ रंगीत; रंगविलेलें. ‘ तुम्हीं रंगीन फेटा पाठविला तो पावला. ’

–रा३२.८९. २ रंगेल पहा. [ रंग; महानु ] **रंगीढंगी**–वि. रंगेल; चंगीभंगी; व्यसनी. ' मुलगा रंगीढंगी असूनहि केवळ पैसा पाहून पांचहजार हुंडयासह त्याच्या ताब्यांत वेऊन टाकली.' –हाकांध १८२. **रंगांत**–वि. रंगी; रंगविलेलें; रंग असलेलें; रंग लाविलेला; कुसुंबा, हिंगूळ इ० रंगांनीं रंगविलेला ( पदार्थ, वस्त्र, काष्ठ इ० ). **रंगीबेरंगी**–वि. अनेक रंगाचा. **रंगीला**–वि. रंगीन; रंगेल; गुलहौशी. **रंगेरी**–स्त्री. ( गंजीफांचा खेळ ) अखेरीस म्हणजे सर्व खेळाच्या शेवटीं खेळणाराची अखेरी दोघानीहि मारली, तिघांचेंहि पान एकाच रंगाचें निघालें तर त्यास रंगेरी म्हणतात. **रंगेल-ला-ली**–वि.१ आनंदी; विनोदि; खेळाडू; खेळकर; चैनी; विषयी; विलासी; ललितकलाप्रिय; गाणें, तमाशा, इ० विषयांचा उपभोग, मस्करी, या विषयावर ज्याची अधिक रुचि असा आनंदी; रसिक; इष्कबाज. **रंगविणें**–क्रि. १ रंग लावणें, देणें; रंगानें वस्त्रादिक विशिष्ट करणें; शोभिवंत करणें. २ ( ल. ) तोंडांत देणें; भडकाविणें; मारणें. ' त्याचें तोंडांत दोन रंगविल्या म्हणजे कबूल होईल.' **( तोंड ) रंगविणें**–१ विडा खाणें. २ ( ल. ) थोबाडांत मारणें. [ रंग; रंज्=रंग देण ]

**रंगजोडवें**—रणजोडव पहा.

**रगटा, रगटें**—पुन. रकटा; रकटें; हलकें, जीर्ण, फाटकें वस्त्र. ' पाटोळ्या संवसाटी । दिली रगटयाची गाठी ।' –तुगा १३५१. –मुरंशु ३८४. [ का. रट्टु=जाडें भरडें कापड ]

**रंगटेड**—पु. भामटयांचा नाईक. –गुजा १७.

**रगड**—स्त्री. पूर्णता; भरपूरपणा; ( सामा. ) रगडा; चंगळ; वैपुल्य. –वि. भरपूर. मुबलक. [ रगडणें; अर. रघद्=विपुलता ] **पट्टी**–स्त्री. चंगळपट्टी; भरपूर पुरवठा; विपुलता. [ रगडपट्टी ] **रगाडी**–स्त्री. रेलचेल; चंगळ. ' मोरोपंतांनीं आपल्या कवितेंत संस्कृत शब्दांची रगाडी करून दिली आहे ' –नि ७६६.

**रगडणें**—क्रि. १ ( कांहीं पदार्थ ) चेपणें; दडपणें. ' कुरुबलनलिनवनांते भीमगज निकार आठवी रगडी ।' –मोभीष्म ६. ४७. २ लाटणें; मटकावणें; बळकावणें. ' भलत्याचें पागोटें रगडलें नी चालला.' ३ चेपणें; दाबणें; जोरानें चोळणें; मालिश करणें. ' निजउनि निज शयनावरि, शयनावरि बंधुच्या पदा रगडी ।' –मोकृष्ण ८१.२७. ४ खाणें. ' त्यानें पंचवीस लाडू रगडले.' ५ निष्काळजीपणानें करणें. ' त्यानें भलताच प्रयोग रगडला.' ६ घासणें; पीठ करणें; चिरडणें. ७ दटावणें. ' सांगेल कोण दुसरा भीष्महि सांगेल ज्या न रगडूनी ।' –मोउद्योग १.१९. ८ नाश करणें; मारून टाकणें. ' त्या कुरुसेनेसि वासवी रगडी ।' –मोविरा ४.८९. **रगडणी**–स्त्री. मागावर विणून झालेलें कापड गुंडाळण्याचा रूळ फिरविणारें लाकूड. [ रगडणें ] **रगडपट्टी**–स्त्री. दडपशाहीचें कसें तरी उरकलेलें, धसमुसळेपणाचें काम; धडपड; रगडमल्लाचें कर्म. ' नीट विचार करून अर्थ लिहीत जा. उगीच रगडपट्टी करूं नका.' [ रगडणें+पट्टी ] **रगडमल्ल**–वि. १ ज्याचे अंगीं काम करण्याची युक्ति नाहीं व काम कोणत्या रीतीनें केलें असतां नीटनेटकें होईल इ० विचार न करितां केवळ अंगबळानें काम करण्याचा ज्याचा स्वभाव तो; दांडगा; रानवट; ओबडधोबड. २ ज्याचे अंगीं नाजुकपणा, सुरेखपणा नाहीं आणि सामान्य रीतीपेक्षां आकारानें जो मोठा आहे असा ( दागिना, पदार्थ, पात्र, वस्त्र इ० ). [ रगडणें+मल्ल ] **रगडमल्ली**–स्त्री. १ ओबडधोबड, बिगारी, आडदांडपणानें केलेलें काम; रगडमल्लपणा. २ धुडगूस; धांगडधिंगा, बेफामपणा. **रगडा**–पु. ( कों. ) १ संकुचित स्थलामध्यें अनेक मनुष्यें जमलीं असतां होणारी दाटी; चेंगराचेंगरी; गर्दी; दाटी. ' पांचशें दळव्याचा ज्याचा एकच रगडा झाला ।' –ऐपो ६९. २ रस काढावयाचा चरक. ३ कुचंबणा; अव्यवस्थित कारभार. ४ नाश. ' वागूळाचा रगडा निजशस्त्रें कीजे ।' –एभा ३.३५. ५ ढीग; मोठें ओझें; अतिशयपणा; भार; घाई वगैरे. ' आज कामाचा रगडा आहे.' ६ ( गो. ) उखळांतील उभा वरवंटा; वाटण्याचा दगड. रगडो. **रगडा-झगडा**–पु. रगडा पहा. [ रगडा+झगडा ] **रगडून**–क्रिवि. १ खूप जोरानें; पुष्कळपणीं; मनमुराद. ' तो रगडून जेवला. २ आवेशानें; घट्ट. ' त्याला चांगलें रगडून धर नाहीं तर तो पळून जाईल.' **रगडून-बांधणें**–जोरानें बांधणें; ओढून बांधणें. **रगडून धरणें**–घट्ट, दाबून धरणें. **रगडून मारणें**–सपाटून, खूप मारणें. **रगडून जेवणें**–पोटभरून खाणें; ओकारी येईपर्यंत खाणें. **रगडून सांगणें-बोलणें**–मनमुराद बोलणें, शिव्या देणें; निर्भत्सना करणें; रागें भरणें. **रगडया**–वि. आडदांड; दडप्या; गर्दीतून, अडचणींतून वाट काढणारा; कशाहि स्थितीस न डरतां मनांत असेल तें करणारा. २ विचित्र; चमत्कारिक; बेफिकीर; ओबडधोबड काम करणारा. [ रगडणें ]

**रंगण**—न. १ मंडळ; वर्तुलाकार वाट, प्रदेश; भजनासाठीं भक्तमंडळी जो फेर धरतात तें. ' वैष्णव नाचति रंगणि करिती तव सेवा ।' –भज ७७. २ खेळाची जागा; खेळाचें मैदान. ३ अंगण; प्राकार. ' पातली अंबिकेचें रंगण । केलें करचरण क्षालन ।' –एरुस्व ६ ७८. ३ भोंवरा इ० खेळाचें वर्तुळ, हद्द. ४ घोडे फिरविण्याचें मैदान ५ नाटकगृह; नर्तनगृह. ' इतक्यासहित त्वां बा यावें माझे रंगणीं नाचावें ।' ६ सभा; मंडळी ( खेळासाठीं जमलेली ). [ सं. रंगांगण ] **रंगणांत येणें**–१ प्रतिपक्ष्याशीं लढावयासाठीं पुढें सरसावणें; सामन्यास छातीठोकपणें येणें; धैर्यानें पुढें येणें. २ देखत, समोर आरोप करण्यास धजणें. ' पाठीमागें बडबडून फळ काय ? अवसान असलें तर असा रंगणांत ये. मग पाहीन.' **०टोला**–पु. रंगणांत भोंवरा फेकणें; चिंगाटी फेकणें.

०डाव–पु. मुलांचा एक खेळ. –मखेपु १३२. ०पाणी–न. एक खेळ. –मखेपु ५५.

रंगणें—अक्रि. १ कांहीं आनंद, करमणूक, सुखास्वाद इ०मध्यें गढून जाणें किंवा तल्लीन होणें (गाणें, ईश्वरभक्ति वगैरेंत); तन्मयता पावणें. 'व्रजाचिया गोपिका स्त्रीस्वभावें । रतिप्रीतिनें रंगल्या स्वस्वभावें ।' २ वस्त्रादिक विवक्षित रंगानें विशिष्ट होणें; रंग घेणें; रंगीत होणें; विशिष्ट वर्णयुक्त होणें. ३ रंगात येणें; भर येणें. [सं. रञ्ज्]

रगत—न. रुधिर; रक्त; रक्त पहा. 'कृष्णा ताटांत तें धरी रगत।' –मोविराट ६.९३. ०ओढ–न. रक्तओढ पहा [रक्त] ०रोटी–स्त्री. (रक्तांत केलेली भाकरी) १ (ल) सैन्यांतील नोकरी; जीमध्यें जीव धोक्यांत असतो अशी नोकरी. २ (ल) लढाईत केलेल्या कामाबद्दल मिळालेलें वतन इ०. ०रोडा–रक्तरोडा पहा.

रंगत—स्त्री. सजावट. [सं.]

रगबा—पु. गांवरान; रकबा पहा.

रंगरूट—पु. सैन्यांत नवीन भरती होणारा शिपाई. –वि. (ना.) धटिंगण; आडदांड. [इं रिक्रूट]

रगस, रग्रास—न. (राजा.) गुठें; दिंड; शेत नांगरल्या-नंतर ढिखळें फोडावयाचें आउत.

रगाटणी—स्त्री. मागाचा एक भाग; फणींतून धागे ओवि-ल्यानंतर जिला बांधतात ती काठी. रगडणी पहा.

रगाडा-रगाडी—पुस्त्री. रगडा पहा.

रंगेरा—पु. वेलीसारखें झाडास विळखे घालणारें एक झाड.

रघटलें—न. (बे.) वेळूचा पाळणा.

रघत—न. रक्त पहा. (खा.) रंघत. [सं. रक्त] ०रोडा–रक्तरोडा पहा.

रंघळणें—सक्रि. १ फरपटत नेणें; फरा फरा ओढणें. २ (धोतर इ०) बरेंच वापरून गुधडणें, मळविणें. 'हें धोतर दोन दिवस रंघळून नंतर परटाकडे द्या म्हणजे पांढरें शुभ्र होईल.' –अक्रि. रेंगाळणें; मागें पडणें. रेंघाळणें पहा.

रच—पु. १ ढीग; रचना; रचाई. २ रचण्याची क्रिया. ३ रचलेली वस्तु. ४ रचून केलेला ढीग किंवा केलेली रास. [सं. रच्=रचना करणें] रचणावळ–स्त्री. जुळण्याची, एके जागीं ठेवण्याची मजूरी, किंमत. [रचणें+वळ] रचणी–स्त्री. १ रचण्याचा जो व्यापार ती. २ रचना. रचणी, रचणूक–स्त्री. रचना; जुळणूक; व्यवस्थित लावणी; व्यवस्था [सं. रचना] रचणें–उक्रि. १ मांडणें; जुळणें; व्यवस्थित रूपांत ठेवणें, उरकणें; २ पदार्थ एकावर एक ठेवणें किंवा पदार्थाच्या एका थरावर दुसरा, दुसऱ्या थरावर तिसरा, अशा प्रकारें त्यांची रास करणें; जुळणें. ३ उभें करणें; उभारणें; मांडणें. 'बाहेरी पद्मासन रचुनी।' –ज्ञा ८.९२. ४ शब्दांची, विचारांची योग्य प्रकारें मांडणी, जुळणी करून ग्रंथ, श्लोक इ० निर्माण करणें. ५ (कादंबरी, गोष्ट, बनावट हकीगत इ०) आपल्या कल्पनेनें नवीन बनविणें. ६ (माप, योजना) ठरविणें; आंखणें. –अक्रि. तन्मय होणें. 'तूं संत स्तवनीं रचसी। तरी कथेची से न करिसी।' –ज्ञा ५.१४१. [सं. रच्=रचना] रचना–स्त्री. १ मांडणी; रचण्याचा व्यापार; व्यव-स्थित ठेवणें; एकावर एक किंवा एकापुढें एक ठेवणें. 'अनेक पदांची रचना केली असतां श्लोक होतो.' २ घर, मांडव, भिंत, गवताची गंजी इ० ची उभारणी. ३ कल्पनेनें निर्माण केलेली कांहीं वस्तु, गोष्ट इ०. ४ ग्रंथ, मसलत, श्लोक इ०ची उत्तम प्रकारची जुळणी. ५ घटना; जुळणी. 'शरीराची रचना सर्व शस्त्रवैद्यांस ठाऊक असावी लागते.' ६ हार, दागिना, यंत्र इ० चे अवयव विशिष्ट प्रकारें जुळवून त्यांची विशिष्ट प्रकारें केलेली जुळणी. ७ मांडणें, बनविणें, उभारणें, निर्मिणें, जुळविणें, घडविणें, गुंफिणें इ० क्रियांनीं झालेला किंवा अस्तित्वांत आलेला पदार्थ. 'तव रचना देखे गोमटी। राजद्वारीं' –ऋ ५६. [सं. रच्=जुळणें] रचमेच–पु.(महानु.) उपद्व्याप. 'जया रचमेचची भीति। सदा जनेशीं संगती। गुरुकुळीं रती। नाहीं कदा।' -ज्ञाप्र २३५. रचयिता–वि. रचना करणारा [सं.] रचलेपणा–पु. स्थिरपणा; सुखरूपता. 'म्हणे पावो धडफडील। तरी स्वामीची निद्रा मोडैल। रचलेपणा पडैल। झोती हून' –ज्ञा १३.२५६. रचाई -स्त्री. १ रचण्याची क्रिया, सरणी; तेणेंकरून सिद्ध झालेला पदार्थ. २ अशा सिद्धतेसाठीं द्यावें लागलेलें द्रव्य. ३ व्यवस्था; तजवीज; व्यवस्थित लावणी; जुळणी. ४ रचना; मांडणी; जुळणी; उभारणी. 'धर्ममंदिराची रचाई श्रद्धेच्या किंवा विश्वासाच्या पायावर झालेली आहे.' रचावा–पु रचना. 'तरी हे इच्छा धरी कोण। सृष्टीरचाव्याची।' –दा ८.२.१२. रचित–वि. १ रच-लेला; जुळविलेला; मांडलेला; व्यवस्थित टेवलेला, लावलेला. २ योजलेलें; बेत केलेलें; जुळविलेलें; बांधलेलें (पुस्तक, कविता, फुलें वगैरे); आंखणी, अंदाज केलेलें. [सं.] रचुन, रच्चुन–क्रिवि. भरपूर, पूर्ण या अर्थी. रच्चक–स्त्री. (व.) भडिमार; एकसारखा मारा. 'पत्रांची रच्चक लाविली.'

रज—पु. न. १ धुळीचा कण; धूळ. 'नकुळ रजाहीं मळ-वुनि सर्वांगाला वनासि गेला हो।' –मोसभा ७.६३. २ फुलां-तील परागाचा कण; ३ सोनें इ० चा एक बारीक कण. ४ मनुष्याचे जे तीन गुण (सत्त्व, रज, तम) त्यांतील दुसरा. ५ स्त्रियांचा मासिक विटाळ. ६ घांसुन साफ करावयाची पूड. 'आरि-सयालागीं सांचावें। अधिकें रज।' -माज्ञा १८.१४०. [सं.] (वाप्र.) रजाचा गज करणें–१ राईचा डोंगर करणें; अति-शयोक्ति करणें; थोड्याचें जास्ती करणें; एकाचे दहा करणें;

शको. ६. २४

अगदीं क्षुल्लक वस्तूला अतोनात महत्त्व देणें; ज्यांत कांहीं अर्थ नाहीं अशा गोष्टी फुगवून सांगणें; पराचा कावळा करणें. २ पुष्कळ काळ पोसणें व चांगला वाढीला लावणें; लहानाचें मोठें करणें. **रजःकण**-पु. धुळीचा कण, बिंदु. [ रज+कण ] **रजरेण**-पु. धुळीचा कण. [ रज+रेणु ] **रजोगुण**-पु. सत्त्व, रज, तम, या तीन गुणांपैकीं दुसरा; कामक्रोधादि मनोविकार या गुणाच्या प्राबल्यानें उत्पन्न होतात. [ सं. ] **रजोगुणी**-वि. ज्यामध्यें रजोगुण पुष्कळ व प्रधान आहेत तो; विकारी; विषयी; कामुक. [ सं. ] **रजोदर्शन**-न. ऋतुदर्शन; ऋतुप्राप्ति; न्हाण; अगदीं पहिलें विटाळशीपण. [ सं. ] **रजस्वला**-वि.स्त्री. विटाळशी; ऋतुमती स्त्री; ऋतुस्नात; अस्पर्श स्त्री. हिला पहिल्या दिवशीं चांडाली, दुसऱ्या दिवशीं ब्रह्मघातिनी, तिसऱ्या दिवशीं रजकी समजतात. 'कृष्णा म्हणे सभेंत न न्यावें मज, मी रजस्वला आंगा।' -मोसमा५.५. [ सं. ] **रजी**-स्त्री. धूळ; धुराळा. [ रज ]

**रंज**—पु. दुःख; नाखुषी; खेद; त्रास. 'चेहऱ्यावर जितका .ांनंदहोता त्याचे दसपट रंज झाला' -विक्षिप्त २८३. [ फा. रञ्ज् ] **रंज करणें**-क्रि. ( माळवी ) दुःख करणें; दुःखी होणें.

**रजई, रजाई**—स्त्री. लेप; दुलई; उबदार पांघरूण, वस्त्रांचे पोटीं कापूस घालून शिवून पांघरावयास केलेलें वस्त्र. [ फा. रझाई, रजाई ]

**रजक**—पु. धोबी; परीट. 'रजक अंत्यज अत्यंत। आतळे त्यासि अधःपात।'-एभा ७.१९०. [ सं. ] **रजकी**-स्त्री. धोबीण; परटीण.

**रंजक**—विपु. १ रंगारी. २ चितारी. ३ उत्तेजक पदार्थ. -वि. १ रंगविणारा; २ करमणूक करणारा; आनंद देणारा; उत्साहक. 'तैसेचि मनासि रंजकें। श्रीकृष्णाचीं मधुरवाक्यें।' -रास २.४९. [ सं. ]

**रंजक**-स्त्री. १ बंदुकीच्या कान्यावर घालतात ती दारू; बार भरण्याची, ठासण्याची दारू. ( क्रि० देणें; भरणें ). २ बार; दारू उडणें; बार होणें. 'तोफखान्याची मात्र एक दोन वेळा रंजक झाली.' -पेद १९.८४. ३ बाण अथवा शस्त्रास्त्रांची लढाई. ४ वखारींत अगर कोठारांत साठ्याकडे भरून जाणारी पिठाची, दारूची ( सुरंगी ) गाडी; दारूगोळ्याची गाडी, डबा; दारूगोळा. [ फा. रञ्जक् ] (वाप्र.) **०उडणें-झडणें**-क्रि. १ सुरंग अगर बार उडणें, झडणें; बंदुका, तोफा यांची फैर झडणें. २ (ल.) कज्जा किंवा भांडण एकदम किंवा जोरानें सुरू होणें. **०देणें-पाजणें-भरणें**-एखाद्यास कांहीं काम करावयास भर देणें, उठविणें, चेतविणें. **०खाणें**-दारू जळून बार न उडणें. **०पिणें**-कान्यावरची दारू मात्र जळून बार न उडणें. सामाशब्द-**०दाणी-दानी-दान**-स्त्रीन. बंदुकीच्या दारुची पिशवी अगर शिंग; कान्याची दारू ठेवण्याचा डबा. **रंजकीची दारू**-स्त्री. सुरुंगाची दारू; बंदुकीच्या कान्यावर घालण्याची दारू ( ही फार उत्तम असते ). **रंजकीची विडी**-स्त्री. बंदुकीचा घोडा, काटा.

**रंजगंज**—पु. किटण; कीट; तांबरा ( धातू, लांकूड, वस्त्र, शरीर इ० वरील ). [ गंज द्वि. ] **रंजणें गंजणें**-क्रि. किटण, कीट तांबरा जमणें, बसणें. [ रंजगंज ]

**रजगा**—स्त्री. विक्रीला नालायक अशा मोड म्हणून आलेल्या सर्व जिन्नसांची खिचडी, मिसळ, भेसळ. [ रज ]

**रजगुडाई**—स्त्री. ( व. ) लाडीगोडी. 'रजगुडाईनें वागलास तर काम निभेल.' [ रंजणें+गोडी ]

**रंजणें**—उक्रि. १ एखादा विषय गोड लागल्यामुळें अंतःकरण आनंदित होऊन उद्वेगादि दुःखें विसरून त्या विषयाकडे लागून राहणें; रंगणें; मोहित होणें; ( काव्य ) गुंगून जाणें; एकतानता होणें; आल्हादणें; सुप्रसन्न होणें ( सौंदर्य, उत्कृष्टता यांमुळें ). २ मनोरंजन करणें. 'वरिवरी देह न पूजी। लोकांतें न रंजी।' -ज्ञा १३.२०७. [ सं. रञ्ज् ]

**रंजणें**—अक्रि. दुःखी होणें; कष्टी होणें. **रंजणें गांजणें**-त्रासणें; दुःखित, पीडित होणें, असणें. 'जेकां रंजले गांजले। त्यासि म्हणे जो आपुले।' -तुगा २२१५. [ फा. रञ्ज् ]

**रजत**—न. चांदी; रुपें; एक धातु. [ सं. ] **०वणी**-स्त्री. रुपेरी मुलामा; चांदीचा मुलामा. 'कां साडेपंधरया रजतवणी। तैशीं स्तुतीचीं बोलणीं।' -ज्ञा १०.१५.

**रंजन**—न. १ करमणूक; मौज; गाणें, सुभाषित इ० विषयांमध्यें दंग असतां उद्वेगादि दुःखांचा विसर पडून अंतःकरणास होणारी सुखरूपता; आनंद; सुख. २ रंग. ३ तांबड्या चंदनाचें लांकूड, खोड. [ सं. रंज् ] **रंजवण**-स्त्री. करमणूक. -वि. मनाचें रंजन करणारें.

**रजनी**—स्त्री. आरसा घांसण्यासाठीं राखेची किंवा इतर द्रव्याची पोटळी. 'आत्मलोहांचा दर्पणीं। करावी ईश्वरध्यानाची रजनी।' -भाए २११. [ रजःकण ]

**रजनी**—स्त्री. रात्र; निशा. 'न दिसे, न कळे स्वपर, ध्वांत परम गाढगाढवी रजनी।' -मोभीष्म ९.६८. [ सं. ] **०कर**-पु चंद्र. [ सं. ] **०चर**-वि. रात्रीं फिरणारा ( राक्षस, चोर, घुबड इ० ). 'अवघे मतवादी रजनीचर। शंकर त्यावरि रघुवीर।' [ सं. ] **०मुख**-न. प्रदोष; संध्याकाळ; संधिप्रकाश; संध्याप्रकाश; [ सं. ]

**रंजनी**—स्त्री. सहाव्या श्रुतीचें नांव. [ सं. ]

**रजपज**—स्त्री. सर्वसाधारणपणा; मर्यादितपणा; माफकता. [ रज द्वि. ] **रजपजचा, रजापजाचा**-वि. माफक; मर्यादित; हलका.

**रजपूत**—पु. राजपुतान्यांतील एक हिंदु जात व त्या जातींतील व्यक्ति. [ सं. राजपुत्र ]

**रजब**—पु. मुसल्मानी वर्षाचा सातवा महिना. [ अर. रजब् ]

**रजबली-ल्ली**—स्त्री. रदबदली; मध्यस्थी. ( क्रि० करणें ). [ रदबदली ]

**रजमें**—नअव. कागदाचीं रिमें. -पेशवे. [ अर. रिझ्मह् ]

**रजा**—स्त्री. १ कांहीं एक कार्याविषयीं कोणाएकाचें अनुमत; अनुमति; सम्मति; आज्ञा; परवानगी. 'तेथून जैसी रजा सादीर होईल त्याप्रमाणें वर्तणूक केले जाईल.' -रा ८.७. २ सुटी; चाकरास चाकरीवरून कांहीं काल किंवा पूर्णपणें दिलेली मोकळीक. ३ कोणी कोणास आपल्या जवळून इतरत्र जाण्यास जो निरोप देतात तो. ४ नियमित सरणीनें चाललेल्या कामांत विश्रांतीसाठीं, करमणुकीसाठीं किंवा अन्य उद्देशानें झालेला खंड किंवा बंद ठेवण्याचा काळ. [ अर. रिझा ] ०**चिठी-ट्ठी-ट्टी**-स्त्री. १ अनुज्ञा; परवानगी किंवा घालवून देण्याचा हुकूम ज्या कागदावर लिहिलेला, नोंदलेला असतो असा कागद. २ गैरहजेरीबद्दल लेखी परवानगी, पास; रजेचा अर्ज. ०**तलब**-स्त्री. आज्ञा; इच्छेप्रमाणें वागणें; यजमानाच्या हुकुमाप्रमाणें नोकरानें वागणें, वागण्याची कबुली किंवा वागण्यांत तत्परता. (क्रि० असणें; राहणें). 'कुसाजी ...आमचे रजेतलबेंत राहून सांगितल्याप्रमाणें वर्तणूक करून कार्य सिद्धि केली.' -रा १०.४१८. 'त्याचे रजातलब वर्तोन...' -रा १५.२०४. [ अर. रिझा+तलब् ] **रजावंद-मंद**-वि. १ कबूल. 'पुण्यांतील सावकार...निदान पावणा लाख रुपये पावेतो नजर द्यावयास रजावंद जाहले आहेत कीं मुंबईचा माल आणावयास मोकळीक द्यावी.' -ख ५.२३९६. २ खूष; संतुष्ट. 'रयतेस राजी व रजामंद राखून...' -रा ६.३०२. [ फा. रिझामन्द ] **रजावंती, रजावंदी, रजामंदी**-स्त्री. १ सम्मति; मर्जी; खुषी. 'धणी यानीं खुषी-रजावंतीनें निरोप दिला तर उत्तम आहे.' -भाव ८. २ समजूत. 'यानीं आमची रजावंदी केली.' -पया ३२६. ३ परवानगी; स्वतंत्रता; मोकळेपणा. ४ आपखुशी; स्वसंमती. [ फा. रिझामन्दी ]

**रंजित**—वि. अनुरंजित; आनंदित; उल्हसित; अत्यंत संतुष्ट; प्रसन्न. [ सं. ]

**रजिस्ट(ष्ट)र**—न. १ नोंदवही; नोंद. २ पोस्टाकडून पावती घेऊन जोखमीचे कागदपत्र पोस्टाच्या विशेष संरक्षणानें पाठवितात तें. [ इं. ] ०**करणें**-नोंदणें; नोंद करणें; पोस्टाच्या विशिष्ट सुरक्षित पद्धतीनें पाठविणें.

**रंजी**—स्त्री. वैताग; कंटाळा; त्रास. [ फा. रंजिश् ] **रंजीस**-वि. उत्साह, मनोरथ, यांचा भंग झाल्यामुळें खिन्न झालेला; त्रासलेला; दुःखित; असंतुष्ट; निराश; थकलेला; दमलेला; त्रस्त. 'दर्म्यान इस्कील करून गोसावी मजकूर यांसी रंजीस करिता.' -रा २०.१७२. [ फा. रन्जिश ] ०**करणें**-(व.) त्रास देणें. ०**येणें**-त्रासुन जाणें.

**रंजूक**—स्त्री. रंजक पहा.

**रज्जब**—पु. मुसलमानी सातवा महिना. रजब पहा.

**रज्जु**—स्त्री. १ दोरी; चऱ्हाट. २ धागा; दोरा; तंतु. ३ केसांची वेणी. ४ लगाम. [ सं. ]

**रंझणें**—क्रि. रंजणें पहा. गांजलें जाणें; कष्टी असणें; पीडित असणें; जुलुमांत असणें.

**रंझळणें**—अक्रि. प्रयत्न निष्फळ होण्यामुळें किंवा विलंबामुळें एखाद्या कामांत व्यत्यय येणें. रेंघळणें पहा.

**रंझाड**—पु. (व.) एक हिंदु जाति.

**रंझाड**—वि. (व.) ओंगळ; घाणेरडें. 'तिचें काम फार रंझाड आहे.'

**रट**—वि. रठ; रंठ पहा.

**रटणें**—अक्रि. १ (बेडूक इ०) ओरडणें; ओरड करणें. २ (मुलानें) एकदम किंचाळून रडणें; किंकाळी फोडणें. ३ बडबड करणें; टकळी लावणें. ४ घोकणें; घोकून पाठ करणें. [ ध्व. ]

**र ट प करणें**—थोडें थोडें वाचणें; अडखळत वाचणें (लहान मुलानें).

**रटमट-रट**—स्त्री. हुरहुर. -क्रिवि. भात इ० शिजतांना होणाऱ्या शब्दाचें अनुकरण होऊन; रटरटां. (क्रि० शिजणें; वाजणें; होणें करणें). [ ध्व. ] **रटमटणें, रटरटणें**-क्रि. १ रटरट असा आवाज होणें (तांदुळांचा शिजतांना). २ (अपचनानें अथवा जंतामुळें पोटांत) गुरगुरणें; वाजणें. **रटमट-टां, रटरट-टां**-क्रिवि. (तांदूळ इ० जिन्नस) शिजतांना होणाऱ्या पाण्याच्या आवाजाप्रमाणें; पोटांतील जंत इ०मुळें होणाऱ्या आवाजाप्रमाणें; पाणी उकळत असतां होणाऱ्या आवाजाप्रमाणें. **रटरटाट**-पु. जोराचा रटरट असा आवाज.

**रटाला-ल्या, रटेल**—वि. १ लठ्ठ; दांडगा (मनुष्य, भाकर, दागिना, पदार्थ); धष्टपुष्ट; अगडबंब; ओबडधोबड; जाडजूड; अवाढव्य; विचित्र; चमत्कारिक; वातूळ; स्थूल (व्यक्ति). २ राकट; रासवट; रानटी (काम, कामगार).

**रट्ट, रठ**—पु. १ दाटी; गर्दी; चिकार जमाव. २ जाडी ओबडधोबड भाकरी किंवा पोळी; रोठ. ३ ओबड धोबड काम; विद्रूप अगर अवाढव्य वस्तु अथवा प्राणी.

**रट्टा, रट्या, रेटा**—पु. १ टोला; तडाखा; जोराचा धक्का; धबका. (क्रि० मारणें, लगावणें, बसणें, लागणें). २ (कामाचा) नेट किंवा दडपण. (काळजीमुळें मनावर दाब. (क्रि० पडणें, बसणें). ३ मुसंडी, (लहान अरुंद मार्गानें जातांना) (क्रि० मारणें)

४ ओबडधोबड, विद्रूप वस्तु. ५ अवाढव्य, अचाट राक्षसी खर्च; ढिगारा ( वस्तूंचा ) ६ अतिशय दाब अगर चिरडून टाकण्यास समर्थ असा धक्का [ ध्व. ] **रट्टे-घट्टे खाणें-पडणें**-सराव होणें; टक्केटोणपे खाणें. **रट्टे-रट्टा-देणें**-हातानें मारणें; तडाखा मारणें. **रट्टावून**-क्रिवि. रेटून; भक्कम; पूर्ण. 'स्टेशन अद्यापि रट्टावून कोसभर आहे.' 'मघाशीं रट्टावून जेवलों, आतां भूक नाहीं.'

**रट्टा, रेटा**—पु. बाहु; हात. [ का. रट्टे=हात ]

**रठ, रंठ**—वि. १ राठ; कठिण; गांठयाळ ( लाकूड ). २ कठिण; टणक ( नारळ, फळ ). ३ जाड; भरड ( पीठ ). ४ कठोर; कर्कश (भाषा, शब्द). ५ कठिण, नापिक ( जमीन ). ६ भक्कम; घटमूट ( शरीर ) ७ ( सामा. ) रटाल, रटल ( या अर्थी ). राठ पहा ८ सोशीक.

**रड**—स्त्री. १ एकसारखें न थांबता रडणें किंवा अशा रडण्याची क्रिया. ( क्रि० घेणें, लावणें, लागणें, चालणें, खळणें, राहणें, आटोपणें ). 'या मुलाला सकाळपासून रड लागली आहे.' २ तक्रार; पिरपिर. ( क्रि० लावणें; चालविणें ). [ रडणें ] सामाशब्द— **०कथा-कहाणी**-स्त्री. लांबलचक करुणास्पद कहाणी; दुःखाची गोष्ट; विपत्तीची कंटाळवाणी हकीकत; ( क्रि० सांगणें; गाणें ). **०गाणें**-न. करुणास्पद कहाणी, गोष्ट, तक्रार इ०; रडकथा; दुःखाची गोष्ट. **०गात्या**-वि. सदा आपल्या दुःखाच्या रडकथा, गाऱ्हाणीं सांगणारा. [ रडणें आणि गाणें ] **०गाऱ्हाणें**-न. रडकथा; रडगाणें; शोकमय कथा. ( क्रि० सांगणें; गाणें ) **०गेला**-वि. रडकथा, रडगाणें सांगण्याची प्रवृत्ति असलेला. [ रडका ] **०तोंड्या**-वि. ज्याचा सर्वकाल रडण्याचा स्वभाव आहे असा; मेषपात्र; दुर्मुखलेला; नेहमीं रडगाणें कुरकुर करणारा, सांगणारा. [ रडणें+तोंड ] **०पंचक**-न. नेहमींचें रडगाणें अगर रडकथा, (प्रपंचांतील ओढाताण व दुःख यामुळें) ( क्रि० गाणें, सांगणें, वाचणें, लावणें, मांडणें ). **रडारड**-स्त्री. कोणी गेला, मेला इ०कारणानें मोठें दुःख झालें असतां कोणेकांनीं रडूं लागावें असा जो व्यापार चालतो ती; ( सामा. ) रडणें; शोक करणें; अनेकांनीं एकदम रडणें. [ रडणें ] **रडाराई, रडारोवी**-स्त्री. मोठा शोक व रडणें; छाती, ऊर बडवून रडणें; मोठा आक्रोश; आरडा ओरड. 'काय होईल माझें मांडिलें कवतुक। आदराची भूक रडारोवी।' —तुगा १५८२. [ म. रडणें; हिं. रोना=रडणें ] **रडुरडु, रडूरडू**-नस्त्री. रडण्याची पिरपीर. —क्रिवि. नेहमीं रडत रडत; मुळमुळीत संमतीनें; दीनवाणीपणानें. ( क्रि० करणें, लावणें, मांडणें ). **रडू, रडें**-न. १ रडण्याची क्रिया. २ रडण्याचा आवेश. ( क्रि० कोसळणें ). ३ शोक, भय, दुःख, प्रेम, हर्ष इ० कारणांनीं अंतःकरण शिथिल होऊन डोळ्यांत अश्रू येणें, तोंड पसरणें कंठध्वनि निघणें इ० विकारविशेष उत्पन्न होणें; रडणें; रुदन. ( क्रि० येणें ). 'देखे मडें येई रडें.' [रडणें] **रडया**-वि. १ सर्वकाल रडण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा; सर्वदा रडणारा; उत्साहहीन; मंदगतीनें चालणारा; रडतराऊत; रडतोंड्या; दुर्मुखलेला. २ ( ल. ) चालण्यास, कामास मंद असा ( बैल इ० ). ३ दुरसबबी ( इसम ). [ रडणें ] **रडका**-वि. १ सदा रडत असणारें ( मूल ); रडण्याची अगर चिरचिरण्याची संवय असलेला; नेहमीं तक्रार करणारा; गाऱ्हाणें सांगणारा. २ दुःखी; कष्टी; मंद; निराश; निरुत्साही ( चेहऱ्याचा अगर बोलणारा ). ३ ज्याचे हातून कोणतेंच काम चांगलें होत नाहीं, तडीस जात नाहीं असा. ४ रडतांना होतो तसा ( आवाज, चर्या ). ५ ज्याचा चेहरा, भाषण, काम इ० टवटवीत, उत्साहयुक्त किंवा प्रसन्न नाहीं असा. ६ कंटाळवाणें ( भाषण इ० ). [ रडणें ] **रडकी गोष्ट**-स्त्री. शोकमय किंवा शोकजनक गोष्ट; वाईट गोष्ट. **रडकी सूरत**-वि. सदा दुर्मुखलेला ( इसम ); सदा रडया; नेहमीं रडकी मुद्रा असणारा; रडकी मुद्रा धारण करणारा; रडया; दुःखी चेहरा, मुद्रा असलेला. [ रडका+अर. सूरत ] **रडकुंडा-डी**-वि. रडावयाच्या बेतास आलेला; डोळे पाण्यानें भरून आले आहेत असा; निस्तेज. [ रडणें आणि तोंड ] **रडकुंडीस येणें**-कांहीं कामांत अति त्रासल्यामुळें किंवा दुःख सोसवेनासें झाल्यामुळें आतां रडूं लागावें अशा स्थितीस पोहोंचणें; रडण्याच्या बेतांत येणें; अति दगदगीमुळें रडण्याच्या स्थितीस येणें; रडें कोसळण्याइतका त्रास होणें. याच अर्थानें जीव रडकुंडीस येणें—रडीस येणें असेंहि म्हणतात. 'ती आजोबाजवळ गेली आणि अगदीं रडकुंडीस येऊन म्हणते कीं, लोक आतां तोंड नाहीं काढूं देत बरं कां?' —पकोघे. **रडकूळ**-स्त्री. ( गो. ) रडकुंडी. **रडणें**-अक्रि. १ रुदन करणें; अश्रू गाळणें. २ विषाद वाटणें; शोक करणें. ३ ( ल. ) अपयश येणें; ठेचाळणें; आपटणें; नष्ट होणें; बंद पडणें; अनादरानें बाजूला ढकलला जाणें. 'चार दिवस पाटीलबोवांचा आश्रय होता तोहि रडला. आतां गोंदोबाला भीकच मागितली पाहिजे.' 'बक्षिशी रडो पण पगार तर याल कीं नाहीं?' ४ नुकसान होणें. 'तूं नोकरी सोडलीस तर त्यांत माझें काय रडतें?' ५ ( वैतागानें, निंदेनें ) असणें; होणें. 'दोन वर्षें मामलत रडत होती तेव्हां आमच्या मुलानें आम्हाला काय दिलें तें तुम्ही पाहिलेंतच, आतां मामलत गेली, आतां काय देणार फतऱ्या?' ६ एखादी गोष्ट घडणें, करणें, सुरू करणें या अर्थी तुच्छेतेनें योजतात. 'मी सावकारी करीन म्हटलें ती रडली. आतां दुसरें कांहीं रडावें.' ७ निंदणें; निर्भर्त्सिणें. 'मी त्याला नाहीं दोष देत. मी आपल्या दैवाला रडतों.' —सक्रि. ( निंदेनें ) चालविणें; करणें. 'दोन वर्षें तूं दुकान रडलास तेवढें बस्स झालें.' [ सं. रट्; प्रा. रड ] **म्ह०** १ रोज मरे त्याला कोण रडे. २ ( व. )

रडली तर रडली काय माणिक मोती झडतील? (ही म्हण रडणाऱ्या मुलीला अनुसरून आहे. म्हणजे रडण्याचा एवढा धाक कशाला-या अर्थी). **रडतखडत, रडतरडत, रडत पडत, रडत कसत**-क्रिवि. मोठ्या कष्टानें; इच्छेविरुद्ध कसेंबसें; रेंगाळत; आळसल्यासारखें; नाइलाजानें; बिगारीनें; मंदपणानें. **रडतगोत्र**-न. रडया वंश; रडी मंडळी अथवा जथावळ; सदोदित कुरकुरणारी अथवा रडतराऊ व्यक्ति; नेभळट, नेभळा, बिनकर्तबगारीचा, उत्साहरहित मनुष्य. 'त्याचें रडतगोत्र आहे' (म्हणजे तो रडतराऊत आहे) **रडत घोडें, रडत राऊत, रडत राव**-नपु. लोकांच्या सक्तीनें किंवा स्वतःची इच्छा नसताना कांहीं काम करणारा; रडवा मनुष्य; उत्साह किंवा धमक नसलेला, नेहमीं वाईट अगर संकटाची सबब सांगणारा इसम. **रडता राऊत घोड्यावर बसविणें**-एखाद्या कामास आंबटतोंड्या अगर निरुत्साही मनुष्यास पाठविणें अगर त्यास काम सांगणें;काम करण्याचें मनांत नसणाऱ्यास बळजबरीनें कामास लावणें. 'रडतराऊत घोड्यावर बसविला तर मेल्याची खबर आणितो.' **रडत लक्षुमी-लक्ष्मी**-स्त्री. रडतपार्वती; क्षणोक्षणीं कांहीं थोडेसें निमित्त होतांच रडूं लागणारी स्त्री; उत्साहरहित स्त्री. **रडता**-वि. रडणारा; रडका; रडया; रडतोंडया. 'हासती बायको आणि रडता पुरुष कामाची नाहींत.' [रडणें] **रडतोंड**-न. दुर्मुखलेला चेहरा अगर सुरत. **रडवा**-वि. रडका; दुःखी; खिन्न; कष्टी; नेहमीं रडण्याची संवय असलेला; सदा तक्रारी करणारा; कुरकुऱ्या किंवा तशा स्वभावाचा; निराश; दुर्मुखलेला. [रडणें] **रडविणें**-सक्रि. १ रडावयास लावणें, भाग पाडणें; दुःख देऊन रडीस आणणें. २ दुःखकारक प्रसंगाच्या वर्णनानें किंवा देखाव्यानें कोणेकाला डोळ्यांतून अश्रु गाळावयास लावणें. ३ (ल.) नाश करणें; वाढ खुंटविणें; उर्जितावस्थेस येऊं न देणें. ४ त्रास देणें; चिडविणें; एखाद्याला रडावयास येईल इतकें छळणें, गांजणें, उपद्रव देणें. 'मला ह्या कामानें पांच वर्षे रडविलें.' ५ आनंदाचा प्रसंग, पाऊस, वारा, रोग, थंडी, ऊन्ह इ०नीं शेत, रचनाविशेष इ०च्या रंगाचा भंग करणें.

**रंडकी, रंडकीमुंडकी**—स्त्री. विधवेसंबंधीं तिरस्कारयुक्त व करुणाजनक शब्द; विधवा; निराश्रित व दुर्बळ विधवा. [रंडा; रंडकी+मुंडकी]

**रडखडणें**—क्रि. (सामा.) रखडणें; जडपणें आणि मंदपणें हलणें चालणें.

**रंडा**—स्त्री. १ विधवा स्त्री; रंडकी. २ जारिणी; स्वैर स्त्री. [सं.] **रंडका**-वि. १ गरीब; निरुपयोगी. २ विधवा (स्त्री.) अगर विधुर (पुरुष). ३ (ल.) नागवा; उघडा; नंगा; कफल्लक; दरिद्री; कृपण; करुणास्पद स्थिति असलेला. ४ फायदा नसलेला; निरुपयोगी. [रंडा] **०अमल**-पु बायक्या, जनानी, नामर्द, स्त्रीबुद्धि मनुष्याचा कारभार. **रंडगोलक**-पु. गोलक नांवाचा वर्ग व त्यांतील व्यक्ति; विधवेच्या ठायीं जारापासुन उत्पन्न झालेली संतति. **रंडागीत**-न. १ विधवेची कहाणी, गीत. २ विधवेच्या शोकासारखें गाणें. (ल. वाईट काव्यास म्हणतात). 'रंडागीतानि काव्यानि' [सं.] **०पंडित**-वि. बायकांत निर्लज्जपणें बोलणारा; थापा मारणारा; बढाई मारणारा. [सं.] **रंडापति**-वि. १ ज्यानें रांड बाळगिली आहे असा. रंडीबाज; छिनाल. २ (ल.) बायक्या; बाइलबुद्ध्या; **०पुत्र**-पु आई विधवा झाल्यावर अगर बाप मेल्यावर जन्मास आलेला पुत्र, मुलगा. [सं.] **०प्रिय**-वि.१विधवांची आवड असलेला. २बाइलवेडा;स्त्रीचा नादी; स्त्रीलंपट; स्त्रैण. **रंडी**-स्त्री. (हिं.) १ वेश्या; नाचणारी स्त्री. २ दासी; रखेली. ३ पत्त्याचे खेळांतील राणी. [सं. रंडा] **रंडीबाज**-वि. वेश्या इ० रंडीचें ज्यास व्यसन आहे तो; बाहेरख्याली, व्यभिचारी; परस्त्रीगमनी; वेश्यागमनी. **रंडीबाजी**-स्त्री. १ वेश्यागमन; बाहेरख्यालीपण. २(क.) रड्डीऐवजीं उपयोग करतात. **रंडुला, रंडोला**-वि. १ बायक्या. २ स्त्रैण; बाइलबुद्ध्या. [रांड] **रंडेय**-पु. रंडीपुत्र; वेश्यापुत्र; विधवापुत्र; अनौरस मुलगा.

**रडी, रंडी, रड्डी**—स्त्री. १ (सामान्यतः रडी) भान जाऊन खेळांत खोटें खेळणें; खेळांत चिडणें. (क्रि० घेणें). २ वाटेल तेव्हां डोळ्यांतून पाणी, अश्रू आणणारी स्त्री. [रडणें] **रडी खाणें**-चिडणें; रडकुंडीस येणें; पराभव होणें. 'पांडुरंगे पहा खादलीसे रडी। परि नाम सेंडी धरिली आम्हीं।'-तुगा १२१८. **रडी येणें**-ज्यावर डाव आला असेल त्या मुलीनें किंवा मुलानें माझेवर मुळींच डाव आला नाहीं असें किंवा अशा प्रकारचें खोटें सांगणें. **रडी(रंडी)खोर**-वि. चिडखोर; खेळांत खोटें बोलणारा. **र-रंडीवाल**-वि. रडण्याची संवय लागलेला, असलेला; चिरडीस जाणारा. रडी खाण्याचा किंवा रडीस येण्याचा ज्याचा स्वभाव आहे तो.

**रण**—पुन. १ युद्धभूमि. २ युद्ध; संग्राम; लढाई. 'श्रीराम-राक्षसांचा तो कीं हा एक होय परम रण।'-मोभीष्म ३.५७. -न. १ तंटा; आवेशाचें भांडण; जोराजोराचा वादविवाद. २वाळूचें मैदान. 'कच्छचें रण.' [सं.] **०कंदन-कंदळ**-न. १ निकराची लढाई; कापाकापी; परस्परांमध्यें आवेशानें होणारें पराकाष्ठेचें युद्ध. २ ज्यांत हाणामारी, अरेतुरे होते असा जो पराकाष्ठेचा कज्या, भांडण इ०; तुंबळ युद्ध; नाश. 'मुसळघायें करी चूर्ण। रणकंदन मांडिलें।'-एरुस्व १०.६०. **०कर्कश**-वि. चिकाटीनें लढणारा. 'आम्ही प्रचंड धनुर्वाडे।

रणकर्कश रणगाढे ।'-एरुस्व ८.१९. ०कावो-पु. युद्धांतील डाव, पेच. 'वीरीं घेतला रणकावो। वेखोनि धाविन्नला शाल्वो।' -एरुस्व १०.६२. [रण+कावा] ०कुवळ-वि. १ भांडखोर. २ लढ्ठ व वातुळ व्यक्तीस म्हणतात. ०खंदळ-खुदळ-खुंदळ-ळा, ०खुदल-स्त्रीनपु. निकराची लढाई; घनचक्री; रणभूमीवरील बिनशिस्त लढाई; रणकंदन; जंगी युद्ध; दाणादाण; नाश; कत्तल. 'त्यांनीं फौजेंत रणखुंदल करून मारामारी केली.' -भाव ६७. [सं. रण+कृंतन] ०खंद(दा)ळी-स्त्री. युद्धपराक्रम; रणकंदन; मारामारी; गर्दी. 'यादव उठावले महाबळी। रणखंदळी करितील।' -एरुस्व ८.५६. ०खांब-पु. रणस्तंभ; एकमेकांवर हल्ला करून जाणाऱ्या दोन सैन्यांमध्यें पुरलेला खांब; लढाईस उत्सुक झालेल्या दोन सैन्यांमधील खुणेचा खांब. या खांबाचा सैनिकांस एकत्र जमण्यास खुणेसारखा उपयोग होत असे. 'रणखांब रोविला मुक्काम घोडेगांव।'-ऐपो ११८. [सं. रणस्तंभ] ०गंभीर-वि. युद्धाच्या वेळीं न डगमगणारा; धीराचा. [सं.] ०गरी-स्त्री. आरमार. -के १.५.३६. ०गाडा-पु. १ लढाईंत तोफा किंवा दारूगोळा वाहून नेणारा गाडा; बैल, घोडे यांनीं ओढावयाचा तोफेचा गाडा. २ ओझें वाहावयाचे उपयोगी मोठा गाडा. ०गाढा-वि. कसुन लढणारा. 'आम्ही प्रचंड धनुर्वाडे। रणकर्कश रणगाढे।'-एरुस्व ८.१९. ०घर-न. रण; रणमैदान; रणभूमी. 'आम्ही जातों रणघराला।'-ऐपो ११६. ०घाई-स्त्री. १ युद्धांतील पराकाष्ठेची गडबड; हातघाई. २ जोराचा, नेटाचा प्रयत्न. ३ घाईघाईचें काम. (क्रि० करणें, चालणें). ०घाड्या-वि. ऐन लढाईच्या दिवशीं विश्वासघात, निराशा करणारा; दगा देणारा; हातपाय गाळणारा (घोडा, मनुष्य); ऐन वेळीं अवसान सोडणारा; अवसानघातकी. ०चत्वर-चत्वार-न. रणांगण. [सं.] ०छतरी-स्त्री. सैन्याच्या भोंवतीं पहारा करणाऱ्या संत्र्यास उभें राहण्याकरितां केलेली तात्पुरती लांकडी खोली. ०जोडवें-न. पायाच्या अंगठ्यांतलें चांदीचें वळें. ०झुंझार-पु. पराक्रमी; शूर; लढवय्या. 'किती झाले तरी स्वराज्याचे ते एक अनुभवी, कसलेले वयोवृद्ध रणझुंझार वीर आहेत.'-स्वप ९६. ०झेंडा-पु. ध्वज; सैन्याचें निशाण; युद्धाच्या क्षेत्रावरील निशाण, खूण. ०टाळ-पु. युद्धांतील एक वाद्य. ०ठाण-पु. पवित्रा; युद्धाकरितां उभें राहण्याची पद्धति. 'तुझे गर्वकवच छेदन करण्याकरितां रणठाण मांडून बसलों आहे.'-पारिभौ ५३. ०ढोल-पु. युद्धांतील नौबत; मोठें ढोलगें, मृदंग; दोन्ही बाजूनीं वाजवितां येणारें ढोलगें. ०तुंबळ-न. तुमुल, घनघोर युद्ध; जोराची लढाई; धुमश्चक्री. -वि. अतिशयित जोराचें (भांडण, मारामारी, कज्जा इ०). [रण+तुमुल] ०तुरा-पु. युद्धांत विजयी झाल्याचें चिन्ह म्हणून पागोट्यांत, शिरोवेष्टणांत खोचण्याचा तुरा, दागिना इ०. ०तुरा-तूर्य-पुन. रणांत वाजवावयाचें वाद्य. 'रणतुराचेनि बंबाळें। भीडींनिलीं दोनि दळें।'-शिशु ८७६. ०तुरा लावणें-क्रि. पराक्रमी वीराप्रमाणें डौलांत चालणें, जाणें, मिरविणें. ०धीट-वि. युद्धांत ज्यास भय वाटत नाहीं असा. ०धीर-वि. रणगंभीर पहा. [सं.] ०धुमाळी-स्त्री. धुमश्चक्री; हातघाई; निकराची लढाई; युद्धांतली गडबड. ०धेंडा-पु. लग्नांत वधुवराम खांद्यावर घेऊन नाचतात त्याप्रमाणें रणांत नाचणें. 'ऐसेनि लग्न लागलिया पुढा। रणीं नाचेल रणधेंडा। वोवाळणी बाणीं प्रचंडा। परस्परें पडतील।'-एरुस्व ४.४०. ०नवरा-वि. १ मर्द; शूर; उत्साही (वीर). २ स्वारीवर असतां अथवा हिंडतांना ज्याला आपल्यापुढें वाद्यें वाजतगाजत ठेवण्याचा अधिकार अथवा मान आहे असा (योद्धा). ३ स्फुरण येऊन लढणारा; सेनापति; पुढारी; लढवय्या. 'अखंड रणनवरा।' -दावि १७६. ४ बेफाम; बेहोष. ०पंडित-पु. लढवय्या; युद्धकलेंत निष्णात; सफाईनें शस्त्र चालविणारा. [सं.] ०पिसा-न. युद्धाचें वेड लागलेला. 'एक ते रणपिसेचि जाले। कंबर सोडूनि मोकळे।'-गीता १.४८८. ०प्रसंग-न. युद्ध; लढाई. 'एकदोन वेळां रणप्रसंग पाहिल्यावांचून कोणी धीट होत नाहीं.' [सं.] ०फंदी-पु. रणशूर; लढवय्या; युद्धाची आवड असलेला. 'जिवबादादा ते रणफंदी।'-ऐपो २६७. ०बहिरी-स्त्री. रणभेरी; एक मोठें कर्ण्यासारखें वाद्य. 'कर्णे किती एक रणबहिरी कर्कती।' -ऐपो ११९. -वि. रणशूर; लढाईंत धीट असलेला. [रणभेरी= रणवाद्य] ०बावरा-वि. १ लढाईसाठीं अथवा युद्धासाठीं बेफाम. २ (ल.) भयंकर उतावळा; अत्यंत उत्सुक. ०बोका-वि. १ गलेलठ्ठ; गब्बू व अधाशी आणि विषयी (प्राणी). २ फार मोठा (खांब, तुळई, ओझें इ०). ०भीत-वि. युद्धाला भिणारा; रणभीरु. [सं.] ०भूमी-स्त्री. युद्धस्थळ; युद्धाची जागा; रणांगण. [सं.] ०भेरी-स्त्री. रणबहिरी (-स्त्री.) पहा. 'सोनजी भापकर मानाजी पायघुडे रणांत राहिल्या रणभेरी।'-ऐपो १३५. [सं.] ०मंडल-ळ-न. १ एक प्रकारचा व्यूह; योद्ध्यांची वर्तुळाकार उभारणी. २ रणभूमी; रणमैदान; रणांगण. 'रणमंडळीं रघुवीर। ऐका कैसा शोभला।' ०मोहरी-मोहरें-स्त्रीन. रणवाद्य. 'राजे गिडगिडिआं रणमोहरी।'-शिशु ५२६. ०यज्ञ-पु. युद्धरूपी यज्ञ-होम. 'गाठी आराधाया रणयज्ञें करुनि सिद्ध कटकांतें।' -मोभीष्म ५.१. ०यूप-पु. दोन्ही सैन्याच्या मधोमध खुणेकरितां उभारलेला खांब; रणस्तंभ. [सं.] ०रंग-पु. लढाईची हातघाई; घनचक्कर; युद्धाचें भीषण स्वरूप; युद्धाचा भयंकर देखावा; युद्धाच्या वेळची गडबड, गोंधळ. ०रंगधीर-वि. रणामध्यें धीट; वीर; रणवीर; युद्धांत पराक्रम करणारा. ०वट-पु. रणांगणातील स्थान. 'कीं हा (मुकुट) माथां असतां रणवट। न भंगे तुझा।' -कथा २.४.१२८. ०वाद्य-न. लढाईंतील वाद्य, शंख, दुंदुभि

इ० [ सं. ] ०विदान–न. युध्दकौशल्य. ' गदें घातली आपुली आण । रणविदान पाहे माझें । ' –एरुस्व १०.३८. ०शिंग–न. रणाच्या वेळीं योद्धयांना बोलावण्यासाठीं, उत्साह येण्यासाठीं वाजवितात तें शिंग. [ सं. रणशृंग ] ०शूर–१पु. घोडयाच्या शुभलक्षणापैकीं गणलेला, मानिलेला एक गुण. –वि. २ युध्दांत धीट, पराक्रमी, माघार न घेणारा; वीर. [सं.] ०शौंड–वि. युध्दकलानिपुण; विक्रमशाली. [ सं. ] ०संकुल–न. हातघाईची लढाई. [ सं. ] ०सज्जा–स्त्री. युध्दकाळचा पोषाख; समरशोभा. [ सं. ] ०सांडी–स्त्री. पराभव. ' होईल आतां रणसांडी । ' –उषा १७४३. ०सौरा–वि. रणशूर. ' आनंदे नाचत रणसौरे । ' –निगा ६१. ०स्तंभ–पु. १ रणयूप पहा. २ स्मारकासाठीं उभारलेला खांब; स्मृतिस्तंभ. [सं. ] ०हलकी–गी–स्त्री. एक प्रकारचें रणवाद्य. ०क्षेत्र, रणांगण–न. रणभूमि. [ सं. ] रणालगी–स्त्री. ( वे ) टिमकी. [ रण+हलगी ] रणोत्साह–पु. युध्दाची आवड; गोडी.

**रणंग, रणाग, रणांग**—स्त्री. फोड येतात आणि आग होते असा एक रोग; खवडे इ०.

**रणदिस होणें**—( माण. ) बेजार होणें; थकणें; रंजीस येणें.

**रणरण**—स्त्री. भयंकर उन्हाचा ताप; कडक ऊन. [ ध्व. ] ०करणें–अक्रि. मध्यान्हसमय, ऊन, निखारे, ज्वरविशिष्ट शरीर इ०कांनीं स्पर्शन–दर्शनादि करण्यास अशक्य पडायाजोगी अतिसंतप्तता पावणें; भयंकर तापणें, जळणें ( सूर्य, तापांतील शरीर, अग्नि, यांनीं ). रणरणणें–अक्रि. १ जळजळणें; अत्यंत तप्त होणें ( झळीनें ); अतिशय उष्णता वाटणें; उकडणें. २ ऊन, निखारे, सूर्य, अग्नी इ०कांनीं अतिशय संतप्त होणें. रणरणीत–वि. अतिशय जळजळीत; कडक; प्रखर ( सूर्य, ऊन्ह, अग्नि, दुपार इ० ). रणरणीत उन्हाळा–पु. उन्हाळयांतील कडकडीत ऊन्ह, उष्ण झळा; ( सामा. ) हवेंतील प्रखरता. रणरणीत दुपार–स्त्री. उन्हाळयांतील ऐनदुपार; मध्यान्हसमय.

**रत**—न. १ संग; संयोग; सुरतभोग; मैथुन. २ करमणूक. –वि. रमलेला; रममाण झालेला; निमग्न; गुंगून गेलेला. तल्लिन; अनुरक्त. ' ज्यांचें कृष्णीं तन मन जालें रत । ' –तुगा १२. ( समासांत ) कामरत; कर्मरत; विषयरत; स्त्रीरत; दान–धर्म–भक्ति–रत. [सं. रम्=खेळणें; क्रीडा करणें] रतणें–अक्रि. १ आनंदित होणें. २ आसक्त होऊन खेळणें रममाण होणें; सहजासहजीं गुंग होणें. ' चित्तवृत्ति रतली हरिपायीं । ' ३ भटकणें; बागडणें; करमणूक करून घेणें. ४ मैथुनांत आसक्त होणें; विषयसुखांत निमग्न होणें; संभोगणें. [ सं. रम् , रत ]

**रतन**—न. रत्न; मौल्यवान पदार्थ. [ सं. रत्न ] ०आबली–स्त्री. ( गो. ) एक फुलझाड; त्याचें फुल. ०कूप–कुंड–न. उत्तम पोसलेला, पिकलेला आणि तेजस्वी आंबा, पेरू इ० फळ. ०गुंज–स्त्री. गुंजेचा एक प्रकार; ढोरगुंज. रत्नगुंज पहा. ०जोत–स्त्री. १ डोळयास थंडावा आणणारें एक औषध. २ वेदूची कांडी. ३ ( ल. ) चणचणीत, हुषार मुलगा, वगैरे. ' तट्ट्र माझा रतन जोत ' –त्राटिका. [ रत्न+ज्योति ] ०जोध–न. कमळबीज. –मुंव्या १३२. ०पारखी–पु. रत्नांची परीक्षा करणारा; हिरे, मोतीं, माणिक इ०ची पारख असलेला. ०बाव–स्त्री. ( राजा. ) पाटाचें पाणी आंत घेऊन बाग शिंपण्यासाठीं केलेला खळगा, विहीर, खांच.

**रतनाळ–ळूं–ळें**—न. ( ना. व. ) राताळें. [ रतन+आलु ]

**रतन्या**—पु. ( व. ) शिरा घोटण्यास केलेला मोठा लाकडी सराटा.

**रतल, रत्तल**—पु. १ सुमारें १५ औंसांचें म्हणजे ३६ सुरती रुपयांइतकें वजन; कांहींच्या मतें १६ $\frac{१}{१६}$ औंस, तर कांहींच्या मतें १२ औंस; सध्यां ४० रुपये भारांचें वजन प्रमाण मानतात. २ ( सामा. ) अर्धा शेर; पौंड. [ अर. रत्ल ]

**रतांजली**—स्त्री. रक्तचंदन. –मुंव्या १६३.

**रताळूं, रताळें**—न. एक कंद; गोडा बटाटा; पांढरें व तांबडें अशा याच्या दोन जाती आहेत. [सं. रक्तालु ] रताळी–स्त्री. रताळयाचें झाड, वेल.

**रति–ती**—स्त्री. सद्दी; नशीब. ( क्रि० फिरणें, अनुकूळ होणें ). ' पहिल्यानें जुगारांत मला रती अनुकूळ होती. ' –बाळ २.२. ' रति फिरली, सारांश मिळाले लोक अपूज्याला ' –ऐपो ३६६. [ दैवाची रति याचा संक्षेप; सं. रति ] ०वंत–वि. दैववान; भाग्यशाली. ' रतिवंत महाराज पेशवे माधव विष्णू अवतार ' –ऐपो ४३९.

**रति**—स्त्री. १ कांहीं विषयाच्या ठायीं प्रीतिपूर्वक आसक्ति, इच्छा. ' कुकर्मीं रति घडे । ' –ज्ञा ३.८२. २ मैथुन; संभोग; स्त्रीसंग. ' रतीचिया बेटा । आदळती कामाचिया लाटा । ' –ज्ञा ७.७४. ३ मदनाची, कामदेवाची स्त्री. ४ विषय; कामवासना; कामेच्छा; शृंगाररसाचा स्थायीभाव. ५ आनंद; सुख. ६ क्रीडा; विलास. [ सं. ] ०चळ–पु. काम; विषयलालसा. ' नाहीं तीळ रतीचळ । तुझी कळा अचळ । ' –पला १.४. ०नाथ–पु. मदन. [सं.] ०राय–पु. ( महानु. ) मदन. ' ते रतिरायाचें माराक कासी । तरि कवण विषयविरु हातवसी । ' –भाए ४४५. ०युध्द–न. संभोग; सुरतक्रीडा. –नि ८७५. ०रोदन–न. प्रथम रतिप्रसंगींचें रुदन. [ सं. ] ०सुख–न. संभोगजन्य सुख; कामशांति. [ सं. ]

**रति–ती**—स्त्री. १ हिरे, मोतीं इ० वजन करण्याची एक बी, गुंज. २ ( ल. ) वजन करण्याचें अगदीं लहान ( काल्पनिक )

प्रमाण. सुमारें १॥ गुंज किंवा २। ग्रेन. ४ गहूं किंवा १६ तंदुल= १ रती, २४ रती=१ टाक, ६० किंवा ६४ रती=१ तोळा. [ सं. रक्तिका=गुंज ] ०रति-क्रिवि. अगदीं बारीक बारीक. ' रति रति मांसतुकडे करोनी । जळचरातें वोपीतसे । ' -नव २२.१४०.

**रतीब**—पु. १ उकाडा; रोजीं नियमित द्यावयाचें अन्न वगैरेचें प्रमाण; ठराविक देणें, खाणें, इ०. (क्रि० लावणें). २ रोज नियमित खर्चास घेण्याचा पदार्थ. ३ खुराक; पौष्टिक अन्न. [ अर. रातिब; रातिबा ]

**रत्न**—न. १ हिरा, माणिक, पाच इ० मूल्यवान खनिज पदार्थ; ( हिरा, पाचु, माणिक, पुष्कराज, नीळ, गोमेद, लसण्या, प्रवाळ इ० ). २ (ल) कोणेक जातींतील, समुदायांतील किंवा वर्गांतील रत्नाप्रमाणें उत्कृष्ट व्यक्ति. उदा० पुत्ररत्न, कन्यारत्न, अश्वरत्न, ' सखाराम बापू म्हणजे एक रत्न आहेत. ' -इंप ७१. ३ ( ल. ) शोभा देणारा, सौंदर्य वाढविणारा, संसार, सभा इ०स ज्याच्या योगानें शोभा येते असा पदार्थ. ' संसारांत मूल हें रत्न आहे. ' ४ समुद्रमंथनापासुन उत्पन्न झालेले चंद्र, अमृत, लक्ष्मी इ० चतुर्दश पदार्थ. ५ ( उप. ) मूर्ख मनुष्य. ' इंदूर प्रजेचें दुर्दैव म्हणून हें रत्न या गादीला लाभलें. ' -विक्षिप्त १.१७. **०खचित-जडित**-वि. हिरे, माणकें इ० रत्नें बसविलेलें; जडावाचें; रत्नें बसविलेला ( सोन्याचा दागिना, सिंहासन इ० ). [ सं. ] **०गुंज**-एक झाड. यास लांब शेंगा येतात. एकएका शेंगेंत ८।१० गुंजा असतात. मुंबईकडे सोनें, रुपें तोलावयास यांचा उपयोग होतो; वाल. **०त्रय-त्रितय**-न. जैन धर्मांतील सम्यक् दृष्टि, सम्यक्ज्ञान व सम्यक् चारित्र्य हीं तीन अमोलिक तत्त्वें. [ सं. ] **०दीप**-पु. दिव्यासारखा लखलखीत प्रकाश देणारें रत्न; स्वयंप्रकाशी रत्न; अशा प्रकारचीं रत्नें पाताळांत असल्याबद्दलच्या कथा आहेत. **०पारखी**-वि रत्नाची परीक्षा करणारा; ज्यास रत्नांची पारख आहे असा. **०वाटी**-स्त्री. हिरे इ० रत्नें बसविलेलें वाटीच्या आकाराचें भांडें. [ सं. ] **०सानु**-पु. मेरु पर्वत. [ सं. ] **रत्नाकर**-पु. १ रत्नांची खाण. २ ( ल. ) समुद्र (तळाशीं रत्नें असतात म्हणून). ३ रामेश्वरापासुन अलीकडील पश्चिमेच्या अंगचा जो समुद्र तो. [ रत्न+आकर ] **रत्नाकर-आळविणें**-पु. ( समुद्र शांत करणें ). काम न करतां ( रडत, बोंबलत ) परत येणें; अपयश घेऊन येणें. ' हा रडतोंडया खरा. जेथें कामास पाठवावा तेथून रत्नाकर आळवीत येतो. ' [ सं. ] **रत्नाचल**-पु. मेरु पर्वत. -ज्ञा १८.३५. [ रत्न+अचल ] **रत्नाभरण**-न. जडावाचें भूषण. [ सं. रत्न+आभरण ]

**रत्नी**—स्त्री. १ नाचणी धान्याची एक जात. २ माकडाच्या खेळांत माकडीला दिलेलें नांव. [ सं. रत्न ]

**रत्ब**—पु. ठराव; करार. ' मुरादखानानें वाजीद अलीखानाशीं फार रत्ब केला आहे. ' -रा १.१९४. [ अर. रब्त् ]

**रथ**—पु. १ राजा, देवाची मूर्ति इ०ची मिरवणूक ज्या गाडींत निघते ती गाडी. २ घोड्यांनीं ओढीत न्यावयाचें राजादिकांचें वाहन; राजेशाही गाडी. ३ लढाईंतील वाहन; आंत बसुन लढण्याची गाडी. ४ रथी; रथावरील योद्धा. ' मजपासी दूत मद्रथां बाहो । ' -मोशल्य ३.६. ५ पृथ्वी. ' चलित रथ रथाचा नाथ संतुष्ट मोदें । ' -मुरा, बाल १०२. [ सं. ] **०कार-कारक**-पु. १ रथ बनविणारा सुतार; गाड्या तयार करणारा. २ एक जात; हिचा उद्भव माहिष्य जातीचा पुरुष व करण अगर लेखक जातीची स्त्री अशा दांपत्यापासून आहे. **०भार**-पु. जींत रथासारखीं वाहनें आहेत अशी युद्धसामुग्री. [ सं. ] **०यात्रा**-स्त्री. जगन्नाथादि देवाच्या मूर्तीची रथांतून मिरवणूक काढण्याचा समारंभ. **०सप्तमी**-स्त्री. माघ शुद्ध सप्तमी; या दिवशीं सूर्य रथावर आरोहण करतो अशी कथा आहे; या वेळेपासुन दिवस वाढत जातो. [ सं. ] **रथांग**-न. १ रथाचा भाग, चाक, जूं वगैरे. ' रथांगांचा मेळावा । जेवीं रथु म्हणिजे पांडवा । का अधोर्ध्व अवेवां । नांव देही । ' -ज्ञा १३.१५१. २ चक्र; विष्णूचें सुदर्शन. [ सं रथ+अंग ] **रथी**-पु. १ रथांत बसणारा; रथाचा मालक; मुख्यस्थानीं रथावर बसणारा योद्धा. २ रथांत बसुन एकटा लढणारा वीर. **रथोद्धता**-स्त्री. एक समवृत्त; ह्याच्या प्रत्येक चरणांत ११ अक्षरें आणि र, न, र, ल, ग हे गण असतात उदा० ' मोकळा करुनि कंठ तेधवा । ' -वामन भरतभाव १६. [रथ+उद्धता] **रथोत्सव-रथोत्साह**-पु. देवाची मूर्ती रथांत बसवून मिरवणूक काढण्याचा समारंभ; रथयात्रा पहा. [ सं. रथ+उत्सव ] **रथ्य**-पु. गाडीचा घोडा. [ सं. ]

**रथ्या**—स्त्री. राजमार्ग; हमरस्ता. [ सं. ] **रथ्योदक**-न. रस्त्यावर वहाणारें पाणी. ' तंव जैसी रथ्योदकें सकळें । घेऊनि गंगा समुद्रीं मिळे । ' -ज्ञा ५ ११४. [ सं. रथ्या+उदक ]

**रद, रदन**—पु. दांत; दंत. [ सं. ] **रदी**-पु. हत्ती.

**रद, रद्द**—वि. १ काढून टाकलेलें; बातल. २ फेंकलेलें; बाजूस सारलेलें. ३ खोडलेलें; नामंजूर. ४ निरुपयोगी झालेलें; टाकाऊ. ( क्रि० होणें, पडणें, असणें ). ' ही चांगली पोथी मिळाल्यापासुन ती पहिली रद्द पडली. ' -स्त्री. परतवणें; फेड. [ अर. रद्, रद्द ] **०कर्ज**-न. १ ( हिं. ) कर्जमुक्त झाल्याची स्थिति; ऋणमुक्तता. २ कर्जफेड. ' बाकी राहील ऐवज रदकर्जास लावून देतो ' -ख ८.४३२२. **०कर्जी**-स्त्री. कर्जाची फेड. **०जबाब**-पु. (कायदा) प्रत्युत्तर. [ फा. ] **०बातल** वि ( कायदा ) कायद्यानें अमलांत आणताच येणार नाहीं असा करार -घका ९२. **रद्दी**-स्त्री. निरुपयोगी झालेल्या कागद इ०चा समुदाय. रद्द पहा. -वि. त्याज्य; कवडीमोल.

**लाणें**—न. प्राप्ति; लाभ. 'तेही पाणियांचें लाणें पाहिले। मल्लिकारा लागी।'–शिशु ५६७. [सं. लान; प्रा. लाण; हिं. लेना]

**लात-थ**—स्त्री. पायाच्या तळव्यानें केलेला प्रहार; लत्ता. 'वधि तया हरि लात-बुक्यातळीं।'–वामन, नृहरिदर्पण ११७. [सं. लत्ता; फा. लत] **०मारणें**–१ लाथेनें हाणणें; तुडविणें. (क्रि० मारणें, देणें) 'लाथ मारील तेथें पाणी काढील.' (सामर्थ्यवान्, कर्तबगार माणसाबद्दल म्हणतात.) २ अनादरानें त्यागणें; कस्पटासमान मानणें (रोजगार, कामधंदा. अन्न इ०). 'प्रपंच हरिणीस लात मारून।'–नव १५.२६. **लाताबुक्यांनीं तुडविणें**–लाथा व गुद्दे मारणें; अतिशय मारणें; फार अवहेलना करणें. **बसतां लाथ व उठतां बुक्की**–अहोरात्र एकसारख्या लाथा बुक्क्या मारणें; सारखा छळ करणें. **लात झोपडें**–(लाथ मारली असतां पडणारें झोंपडें) अगदीं काडीमोडीचें घर; टाकाऊ झोपडी (निंदार्थी उपयोग). **लातड, लातडा, लातरा, लातिरा**–वि. लाथाळ; लात मारण्याचा स्वभाव ज्याचा असा (गोमहिष्यादि पशु). [लात] **लात(थ)डणें**–लाथा मारणें; लातळणें. [लात] **लातबुकी**–स्त्री. लाथा आणि बुक्या. (सामा.) जोरानें बडवणें; मारणें. [लात+बुकी] **म्ह०** १ लातबुकी भाकरसुखी=पुष्कळ लाथा आणि गुद्दे व भाकरीहि सुकी (कोरडी–तुपाशिवाय); छळ असून शिवाय खाण्याचे हाल. २ लातबुकी आणि सदासुखी=मार असला म्हणजेच नीट असणारा. **लातळणें**–क्रि. १ लाथा मारणें; लाथाडणें (अडेलपणें किंवा स्वभावामुळें, जनावरानें). २ (ल.) तिरस्कारपूर्वक झिडकारणें; नाकारणें. **लाताखाऊ**–वि. नेहेमीं लाथा खाणारा; लतखोर पहा. **लाताडडी**–स्त्रीन. लाथ. (क्रि० मारणें; देणें). **लाताड**–वि. लातड पहा. **लाता(था)ळ, लाता(था)ळें**–न. १ दुगाण्या; लाथांचा सुकाळ (अनेक घोडे, गाढव यांच्या); जोराचा लत्ताप्रहार. 'कोप धरिला ताळें बळभुजपरि कंपितें करि लाताळे।'–मोकृष्ण ५०. २ गोंधळ; लडथडीचें व हमरीतुमरीचें भांडण; कडाक्याचा वादविवाद व गोंधळ; बजबजपुरी. [लात] **लाताळ, लाताळ्या, लाथाड-ळ**–वि. लाथरा; लाथा मारणारा.' तथापि बहु लाथळी मग अदंड मी हा किती।'–केका ५४. **लाताळणी**–स्त्री. लाथा मारणें. **लाता(था)ळणें**–क्रि. लातळणें; लाथ मारणें. [लात] **लाथरा, लाथेरा**–वि. लातडा पहा.

**लातर**—स्त्री. (कों.) माशांची एक जात. या माशांना आक्टोबर–नोव्हेंबरमध्यें पकडतात.

**लातिंबी**—स्त्री. (क.) पाला ठेंचून ठेंचून केलेला चोथा; गोळी. 'लातिंबी कर.' 'लातिंबी जखमेवर बांध.'

**लाती**—स्त्री. एक प्रकारची वडी. तांदुळाच्या पिठांत शिजविलेल्या तुरी किंवा वाटाणे घालून त्याची वडी बांधून शिजवितात तो पदार्थ.

**लाती**—स्त्री. लाटी पहा.

**लाद**—स्त्री. (कु.) अंगावर उठलेला लहान तांबडा चपटा फोड.

**लादणी**—स्त्री. (व.) धान्य, किंवा कांहीं वस्तु सांठण्याविण्याकरितां भिंतींत किंवा जमिनींत केलेली खोलीसारखी जागा. २ भारा; वजन; ओझें. ३ बुरजाच्या बाहेरील बाजूस किंवा किल्ल्याच्या भिंतीस, घराच्या पडवीप्रमाणें, युद्धाच्या सोईकरितां तयार केलेली जागा. मात्र या जागेवर पडवीप्रमाणें लांकडांची छावणी नसून विटा, रोडे, वगैरेची कमान असते. 'इतक्यांत एक गोळा लादणी फोडून आंत आला.'–मल्हारराव होळकरचरित्र ५५. ४ तटाला बळकटी येण्याकरितां बांधलेली उतरती भिंत. ५ (घोडे, उंट इ० वर कंठाळा, सलिता, कांहीं ओझें) लादण्याची क्रिया. ६ तळघर. [लादणें] **लादणें**–उक्रि. १ (बैल, गाडी, होडी, इ०वर) सामान, ओझें, माणसें इ० चढविणें; ठेवणें. २ कोणेकाच्या इच्छेविरुद्ध त्याला (कांहीं काम) करावयास लावणें; त्याच्यावर कांहीं जबाबदारी टाकणें; दोष, देयद्रव्य आरोपित करणें. ३ एकावर एक रचणें; वर जड ओझें घालणें. ३ (विटा, चुना, रंग, गिलावा इ० चा थर) भिंत, जोतें इ० बांधतांना वर लावणें, चढविणें. [दे. प्रा. लद्द; गु. लादवुं; हिं. लादना; फ्रें.जि. लद्व]

**लादनी**—स्त्री. १ (व. ना.) तळघर. लादणी पहा. २ लदाव पहा.

**लादा**—पु. १ धुण्याच्या कपड्यांचा बोजा, ढीग. २ बोजा; ओझें; भारा; लागेल त्यापेक्षां अतिशय जास्त प्रमाणांत असणारा कोणताहि पदार्थ (भात, गूळ, इ०). ३ (क.) गुंता; लगदा; एकमेकांत मिसळलेला जुडगा (केंस, कपडा, कागद इ० चा). ४ अशी गुंतागुंत, एकत्रित झालेली स्थिति. **लादावर्दीचें काम**–न. (लादलेलें असल्यामुळें) अव्यवस्थित, कसें तरी केलेलें काम.

**लादा**—पु. १ (कालवलेलें पीठ, मळलेला चिखल, चुना इ० कांचा भिंत इ० कांवर मारण्याजोगा) गोळा; (सामा.) चांगला भिजवून मळलेला गोळा. २ पाण्याचे बांध तयार करण्यासाठीं पळीवानें खणून काढलेल्या मातीचे चौरस गोळे. ३ (पीठ, भात, गूळ, इ० कांचें) पातळ स्वरूप; लिबलिबीत अवस्था. ४ पाणवट चिखल. 'लादा लाटा कातरें। ठाईं ठाईं'–दा ११.६.३.

**लादी**—स्त्री. १ घडीव दगड (फरसबंदी, लादनी इ०कांचे उपयोगी); चीप. 'चार हात नळाला दहा हात लाद्या असल्या म्हणजे आच्छादला जाईल.' २ फरशी (शहाबाद, तांडूर इ०कडील). ३ (सामा.) चौकोनी वडी, चिरा; चौकोनी तुकडा.

**लाधण**—स्त्री. लाडन पहा.

**लाधणें**—अक्रि. १ लाभणें; मिळणें; प्राप्त होणें. –एभा २.२४८. –तुगा ४५२. २ लाभणें; मिळालेली वस्तु आपल्या सुखाची

होणें; आपल्या जवळ टिकणें ( निषेधार्थी प्रयोग ). ' ही वस्तू अखेर याला लाधली नाहींच. ' –सक्रि. मिळविणें; संपादणें; जोडणें. ' ऐसा पुत्र लाधसी । ' –मुआदि १६.७५. [ सं. लभ्–लब्ध; प्रा. लद्ध ]

**लान**—पु. व्यभिचार केल्याचा आरोप ठेवल्यास मागतां येईल असा घटस्फोट. –घका ७५. [ सं. ला=तोडणें ]

**लानगो**—पु. ( भि. ) लांडगा. ' लांनगो लांनगो आलोरे ! '

**लानी**—स्त्री. लाणी पहा.

**लाप**—स्त्री. ( बे. ) मृगारंभीं उगवणारें कुरणांतील गवत.

**लापट**—वि. लंपट पहा. [ सं. ]

**ला(लां)पट**—वि. १ लटपटीत; ढिलें; घट्ट न बसणारें; सांधे खिळखिळे झालेलें ( कुलूप, गाडा, पेटी इ० ). २ झिजल्यामुळें सईल झालेला (कुलपाचा कांटा, पेटीचें झांकण, खुंटी, मळसूत्र इ० ). ३ निर्लज्ज; कोडगा; लोचट. [ ? ध्व. लप् ! ]

**लापण**—वि. जींत रेती व चिकणमाती यांचें प्रमाण सारखें असतें अशी ( जमीन ). –कृषि १६.

**लापणिका, लापण्णिका, लाफण्णिका, लापनिका–लापटणिका**—स्त्री. १ लांबलचक, कंटाळवाणी हकीगत; चर्‍हाट. २ लबाडीची मसलत; कपट; लपंडाव. ' प्रपंच वाटे लटिका। माया वाटे लापणिका । ' –दा १.९.१६. ३ विवेचन; स्पष्टीकरण. लापनिका पहा. ' कथा अन्वय लापणिका । नामघोष करतालिका ' –दा ४.२.४५. ४ कुभांड; थोतांड. –वि. मिथ्या; खोटें. ' सदा सर्वकाळ लटिका । बोले माईक लापणिका ।' –दा ५.३.६०. [ सं. लापनिका ]

**लापणी**—स्त्री. भाषण. [ सं. लापन ]

**लापणीक**—स्त्री. १ (महानु.) विवेचन; स्पष्टीकरण. २ लबाडीची मसलत; कपट. ' हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लापणीक वरी साच भाव । ' –तुगा ९४२. लापणिका पहा.

**लापन**—न. १ लावणें; बंद करणें. २ रोंवणें; स्थापणें; गच्च बसविणें. ३ अर्थबोध होईल अशा प्रकारें जुळणी करणें; अन्वय लावणें; योग्य क्रम ठेवणें ( कविता, कूट, हिशेब इ०चा ) व्यवस्थित रचना, योजना. बहुधा समासांत उपयोग; जसें–श्लोकलापन, ग्रंथलापन. [सं. ] **लापनिका**–स्त्री. १ अन्वय; ( कवितेंतील शब्दांचा ) संबंध, अर्थ लागेल अशी रचना; ( श्लोक, वाक्य, कूट इ०चा ) अर्थ लावणें. २ वाक्य, श्लोक इ० चा अर्थ समजून सांगण्याची विशिष्ट धाटणी, शैली, सरणी; स्पष्टीकरण किंवा अनुवाद करण्याची रीत, पद्धत. ' अर्थ तर एकच पण त्या टीकाकाराची लापनिका निराळी, याची निराळी. ' ३ वादविवादाची, लेखनाची, संभाषणाची पद्धत, शैली, रीत; वक्तृत्वाची व निबंधाची पद्धत, रीत. ४ शब्दपांडित्य. तुल० –एभा १०.४१८. पहा. [ सं. ]

**लापशी, लाफशी**—स्त्री. १ दूध, ताक, नारळाचा रस इ० कांत शिंगाडे, रताळीं, तांदूळ वगैरेचें पीठ, तवकील वगैरे लावून, कढवून करतात तें पेय; लाबशी; खीर. २ साबुदाणा पाण्यांत धुऊन तुपाच्या फोडणींत मिरच्यांचे तुकडे टाकून फोडणीस टाकल्यावर त्यांत ताक ओतून मीठ घालून करतात तो प्रकार. ३ साबुदाण्याची वगैरे खीर. –गृशि ४७१. [ वे. प्रा. लप्पसिया; हिं. लप्सी ]

**लांपळ, लांफळ**—वि. लांपट; लटपटीत; ढिलें.

**लाफ**—पु. दिवा. ' लाफांत तेल घालावयाची त्यांची पाळी आहे ना ? ' –खेडयांतील स्वभावचित्रें. [ इं. लँप ]

**लाफा**—स्त्री. फळीला वळकटीसाठीं खिळे इ० नी ठोकलेली पट्टी.

**लाफा**—स्त्री.अव. १ अतिशयोक्ति; विस्तार; तिखटमीठ लावून, वाढवून, फुगवून सांगणें. २ बढाया; बाता; गप्पा; बडबड ( क्रि० मारणें; झोंकणें; लावणें ). [ सं. लप्; बडबड करणें ] **लाफ्या**–वि. बाताडया; गप्पीदास.'

**लांफाळ**—वि. लुब्ध; अधीन; लंपट. (वाईट अर्थानें उपयोग)

**लांब**—वि. १ दीर्घ; आखूड नव्हे असा. २ ( स्थल किंवा काल या बाबतींत ) दूर; अंतरावरील. ' अजून दिवाळी लांब आहे. ' ३ विस्तारयुक्त; पाल्हाळिक. ' म्हणाल बोलणें कां केलें लांब । ' –दावि ३००. –क्रिवि. दूर; अंतरावर. कधीं कधीं लंबा या अर्थी उपयोग. लंबा पहा. [ सं. लंब ] **०लांब गोष्टी सांगणें**–१ पूर्वीची विपदवस्था विसरून उद्दामपणाच्या, शेखीच्या गोष्टी सांगणें. २ गप्पा, बाता मारणें. **०बसणें**–( बायकी ) विटाळशी असणें. सामाशब्द– **०कान्या**–वि. गाढव. ' माणसांचे कान लहान असतां ते लांबकान्यांप्रमाणें कां वागतात ? –नपुक ९. **०लांब, लांबचे लांब**–वि. १ फार लांब; दूर असलेलें. २–क्रिवि. दूरच दूर. **लांबट**–वि. ( विवक्षिताहून ) किंचित अधिक जो लांब तो. ' माझ्या धोतरापेक्षां हें धोतर लांबट आहे. ' २ लांब घाटाचा, आकाराचा. **०टांग्या**–वि. लांब तंगडयांचा, पायांचा; ढांगळया; लंबाडया. **०रुंद**–वि. प्रशस्त लांबी, रुंदी असलेला. **०लचक**–वि. १ चांगली लांबी, रुंदी, उंची असलेला. २ प्रशस्त उंचनिंच; ( सप्रमाण, पाहिजे तितका ) लांब; अवाढव्य. ३(ल. ) दीर्घसूत्री; कंटाळवाणें ( भाषण, गोष्ट ). **०लेखा**–पु. भारी लांबण, विस्तार; उगीच पाल्हाळ, वाद, चर्चा इ० ( निंदार्थी उपयोग ). 'या गोष्टीला होण्यास कांहीं लांबलेखा नको, आतां करून येतों. ' **०सर**–वि. लांबट; अधिक लांब. **०हस्त**–वि. ( हिं. ) विस्तीर्ण. **लांबडा**–पु. साप; ' घरांत रात्रीं लांबडा निघाला होता. ' –वि. लांबोडा; लांबट. **०करणें**–क्रि. पुष्कळ चोपणें; ठोकणें; लंबा करणें.' शिवाजीनें अफझुलखानाला लांबडा केला. '

**लांबण**—स्त्री. १ बरेंच मोठें अंतर; दूरपणा. 'किल्ला दिसतो खरा पण हो काय लांबण थोडी आहे.' २ सावकाशी; दिरंगाई; दूर टाकण्याचा प्रकार. 'त्याच महिन्यांत लग्न करून घ्या. उगीच लांबण लावूं नका.' ३ (तुलनेनें पाहतां) जास्त लांबी, अंतर. 'पायवाटेपेक्षां गाडीवाटेकडून लांबण आहे.' ४ विस्तार; पाल्हाळ (भाषणादि व्यवहाराचा). 'काय तें हंशील सांगा, उगीच लांबण लावूं नका, उशीर होतो.' [सं. लंबन] **लांबणीवर घालणें-टाकणें-लोटणें**-दूर मुदतीवर ढकलणें; उशीरां करण्यासाठीं ठेवणें. **लांबणीवर पडणें**-दूर मुदतीवर जाणें; पुढें ढकललें जाणें. **लांबणें**-अक्रि. १ लांब होणें; वाढणें (स्थळ किंवा काल या बाबतींत). २ (लांबी, विस्तार व अवधि या बाबतींत). वाढणें (वस्तु, व्यवहार, गोष्ट इ०). 'काम एकदोन दिवसांत झालें असतें पण सुभेदार गेले, आतां चार महिने लांबलें.' प्रमाणाबाहेर वाढणें. 'प्रथमत: दहा हजारांत घर बांधावें असा बेत धरून आरंभ केला मग जें लांबलें तें पंचवीस हजारांवर गेलें.' ३ भर घातल्यानें प्रमाण वाढणें; अधिक होणें (ताक, दूध इ०मध्यें पाणी वगैरे घातल्यानें); विस्तार होणें. ४ (बातमी, गुप्तगोष्ट, मसलत इ०) अनेकांस विदित होणें; जाहीर होणें. ५ (भाषण, ग्रंथ इ०) कंटाळा येण्याइतकें अधिक मोठें, पाल्हाळीक होणें. [सं. लंबन] **लांबता**-वि क्रिवि. १ लौकर न करतां हळू हळू केलेला, करून लांबविलेला (क्रि० धरणें) 'दोन गृहस्थ येणार आहेत, कथा जराशी लांबती धरा.' २ लांबलेला; बराच दूर गेलेला; (आकाशांत बराच वर आलेला). 'लांबतिजे सूरिजें। केवि लाजिजे नु!' -शिशु ४७०. **लांबरा**-वि. लांबट 'मोठाले कुच इंदुवक्र नयनें कर्णावधी लांबरे।' -वमं २. **लांबविणें**-क्रि. १ लांब करणें (स्थळ, काळ या बाबतींत); २ (सामा.) लांबीरुंदी वाढविणें. ३ पुढें टाकणें; खेंचणें; ओढणें. ४ (मालकाकडून) काढून नेणें; पळविणें; लुबाडणें. [लांबणें प्रयोजक] **लांबवालांबव**-स्त्री. १ घाईनें, कसें तरी दूर नेणें, धाडणें (चोरादीच्या भीतीनें द्रव्य, वस्तु इ०). २ लुबाडणी; पळवापळव. **लांबवून**-क्रिवि. (कों.) लांबून. -लोक २.४७. **लांबी**-स्त्री. १ लंबाई; दीर्घता. २ लांब बाजू. ३ अंतर; अवधि; मधली जागा किंवा वेळ; दूरता. ४ एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंतचा विस्तार; त्याचें माप. ५ (गो.) उशीर; दीर्घकाल. 'रुपये पाठविण्यास लांबी झाल्या-बद्दल राग धरूं नये.' **लांबीवर पडणें**-लांबणीवर पडणें; विलंब असणें. **लांबून**-क्रिवि. दुरून; अंतरावरून. **लांबोडा, लांबुळा, लांबुडा**-वि. वाटोळा, चतुष्कोण इ० जे आकार त्यामध्यें लांबी म्हणून जें प्रमाण तत्प्रधान जो आकार तो; लांबट; दीर्घ वर्तुळा-कार; अंडाकृति. 'तोफेच्या गोळ्यासारखा वाटोळा गोळा करूं नको; वरवंट्यासारखा लांबोडा गोळा कर.'

**लांबणदिवा**—पु. लामणदिवा पहा. 'तेविला लांबणदिवा।' -वसा २८.

**लांबणी**—स्त्री. (हैद्राबाद) मोठी चंची.

**लांबणें**—न. १ (कों.) विहिरींतील पाणी दोरीनें बाहेर काढ-ण्याचें साधन (बादली, पोहरा इ०). २ लांबणदिव्याची सांखळी ३ (वे) पडदांडी जूं.

**लांबर**—वि १ मध्यें तोंड घालणारा; लुतरा; (प्र.) लाहबर. २ (सामा.) लुडबुड्या; चोंबडा. [हिं. लहबर=पोपट]

**लाबरी**—स्त्री. (वे) टप्पा.

**लाबशी**—स्त्री. लापशी पहा.

**लांबा**—पु. शेतांतील भात कापतेसमयीं गळलेले किंवा एऱ्हवीं पडलेले जे भातगोटे त्यांच्यापासून उगवलेलें रोप. 'लांबा उगवे आगरीं। विभवश्रियेचा।' -ज्ञा ६.४४४. २ बिन भाज-लेल्या शेतांत भाताचें टाकलेलें बी. (क्रि० टाकणें).

**लांबा**—पु. डाग; दोष. 'सख्यीं लांबा लागला पातकाचा।' -सिमं ८.१८४.

**लाबाड**—वि. (रामदासी वाङ्मय) लबाड. 'बाष्कळ लाबाड ऐसें। जना कळों आलें।' -दा १९.३.२१; -दा २.३.९. **लाबाडवाणा**-वि. लबाड. 'किती येक लाताड लाबाडवाणे।' -रामदासी २.१५९.

**लांबी**—स्त्री. लुकण; एक प्रकारचा चिकण जिन्नस. ही चुना किंवा सफेता आणि जवसाचें तेल एकत्र करून तयार करतात. कांचेचीं तावदानें घट्ट बसविण्यासाठीं किंवा गळकीं भांडीं दुरुस्त करण्यासाठीं ही बसवतात.

**लांबीझोंबी**—स्त्री. (प्र.) लोंबीझोंबी पहा.

**लाबूद**—वि. स्वल्प. -राव्य ८.८२. -क्रिवि. अवश्यमेव; सर्वथा. [फा.]

**लांबोडा**—वि. लुच्चा; लांबर पहा. 'बायकांत पुरुष लांबोडा भाजून खातो कोंबडा.'

**लांबोरा**—वि. लोचट; कंटाळा येईपर्यंत पाठीमागें लागणारा (भीक मागण्यासाठीं, द्रव्य गोळा करणें इ० साठीं).

**लाभ**—पु. १ फायदा; प्राप्ति. 'तुज लाभ काय यांत...।' -मोविराट १.१८६. २ धान्य वगैरे मोजतांना बरकत यावी म्हणून एक अशा अर्थानें वापरतात, नंतर दोन, तीन असें म्हणून माप टाकतात; बरकत पहा. ३ (कु.) शेंकड्यावर दिलेला जास्त माल (नारळ वगैरे). **(भेटीचा) ०देणें**-भेटणें; भेट घेणें (आदर दर्शविण्यासाठीं योजतात). **लाभा येणें**-१ लाभणें. २ अनुभ-वास येणें; समजणें. 'जऱ्ही वैसेनि हे लाभा। आयेचि ना।' -ज्ञा १५.५४२. सामाशब्द- **०काळ**-पु. फायद्याचा, प्राप्तीचा काळ, वेळ, हंगाम; उत्कर्षकाळ. 'जिवाशीं जडविलेल्या जीवासाठीं

अंतकाळाला लाभकाळ समजावें लागतें.' -राजसंन्यास ५. उलट शब्द विनाशकाळ; आपत्काळ. ०गुण-पु. फायदा; प्राप्ति. 'ह्याच्या मैत्रकीनें मला कांहीं लाभगुण नाहीं.' ०दायक-वि. ज्याच्या संग्रहानें संग्रहकर्त्यास द्रव्यादि लाभ होतो असा (अश्व, नीळ इ० पदार्थ, शुभकर्म, व्यापार इ०); फायदेशीर. ०दृष्टि-स्त्री. लाभाची, फायद्याची इच्छा. -वि. ज्याला केवळ फायद्याची इच्छा आहे असा; ज्यांत त्यांत लाभाची अपेक्षा ठेवणारा. [सं.] ०लोभ-पु. १ (लाभाचा लोभ) कोणेक कार्यामध्यें मला कांहीं प्राप्त होईल असा जो लोभ असतो तो; लोभदृष्टि. २ (लाभ द्वि.) लाभ; प्राप्ति; फायदा (व्यापकार्थी व सामान्यपणें उपयोग). 'मी तीन वर्षें व्यापार करतों परंतु लाभलोभ म्हटला तर कांहीं एक नाहीं.' ३ प्राप्ति किंवा स्नेह; लाभाची अपेक्षा किंवा लोभाची भावना. 'लाभ लोभ धरून कोण्ही कोण्हाचें काम करतो.' 'लाभा-लोभावांचून कोण कोण्हाला पुसेल.' ०वेळ-ळा-स्त्री. १शुभकाल; लाभदायक वेळ किंवा संधी. 'लाभवेळ पाहून काम केलें असतां अवश्य लाभ होतो.' २ दिवसाच्या किंवा रात्रीच्या आठ भागां-पैकीं एका वेळेचें नांव वेळ पहा. ०हानि-स्त्री. नफानुकसान; सुखदुःख. 'ज्या लाभहानि जेथें, नेतो बांधोनि काल दाव्यानें।' -मोकर्ण ४७.६१. लाभणें-१ मिळणें; प्राप्त होणें. 'आज मला भेट लाभेल.' संपादन होणें. २ निष्पन्न होणें; उद्भवणें (फायदा, नफा). ३ उपयोगाचें, फायद्याचें असणें; उपयोगी पडणें ४ शुभ-कारक, लाभदायक होणें-असणें (मुहूर्त, ग्रहबल इ० लग्न, मुंज इ० करितां). लाभाईत-वि. लाभदायक. 'घरीं येवोनिया आनंदें बोलती। कन्या आम्हाप्रती लाभाईत।' -ब ४. लाभागळी-वि. लाभदायक. 'बोलती लीळा लाभागळी।' -दावि १३१. लाभागोभा-पु. (व्यापकार्थी) नफा; फायदा. [लाभ द्वि.] लाभाचा-वि. फायद्याचा; लाभदायक. 'त्या वांचुनि यांसीं जो करणें संग्राम तो न लाभाचा।' -मोविराट. लाभालाभ-पु. १ नफानुकसान; नफातोटा. २ दैव; नशीब. [सं. लाभ+अलाभ] लाभालोभा-पु. (कों.) लाभलोभ पहा. लाभालोभाचा-पु. स्नेह किंवा लाभ यांमुळें जोडलेला, गुंतलेला. 'चौघे लाभा-लोभाचे असले म्हणजे निर्वाह होतो.' लाभावळी-स्त्री. अनेक लाभ. 'तो चिन्हें शुभ पाहुनी नृप म्हणे लाभो न लाभावळी।' -र ३०. [लाभ+आवलि]

**लाभरा**—वि. लांवर, लबरा पहा.

**लामटे**—पु.अव. (व.) (प्र.) लांबटे; शेवया. [लांबट]

**लामणदिवा, लाम्हणदिवा, लामणें, लाम्हणें**—पुन. १ लांबणदिवा; लांबगें. दोरी इ० कांस टांगून ठेवावयाजोगा जो लोखंड, पितळ इ० चा करतात तो दिवा २ (कों.) ज्यास मध्यें सांखळी लाविलेली असते असा पितळी कंदील. [लांबण+दिवा; तुल० सं. लावण्यदीप]

**लामा**—पु. १ बौद्ध धर्माची तिबेटांतील शाखा. २ या शाखेचा गुरु. ३ तिबेट किंवा मोंगोलिया यांतील बौद्ध भिक्षु. दलाईलामा=प्रमुख लामा. (तिबेटी)

**लाय, लायलाय**—क्रिवि.स्त्री. लडालडा पहा.

**लायक**—वि १ सुयुक्त; प्रासंगिक; साजणारा (शब्द, कृति). २ समर्थ; योग्य; शक्त; पात्र (माणूस). ३ सोईचा; सोईस्कर; उपयुक्त; लागू पडणारा (जिन्नस, जागा). 'जमीन पडीत जमा-खेरीज लायक-जिराईत.' -वाडसनदा ९१. ४ (गंजिफा) उतारी करतेवेळीं उतरावयाजोगा (हुकूम). [अर. लाइक्] लायकी, लायकपण-स्त्री. १ औचित्य; योग्यपणा (शब्द, कृति यांचा). २ सामर्थ्य; योग्यता (माणसाची) ३ जुळतेपणा; योग्य मिळणी (वस्तू, स्थळ इ०ची). [फा. लायकी] लायकीचा दाखला-पु. योग्यतापत्र; शिफारसपत्र; (इं.) सर्टिफिकेट.

**लायणें**—कि. (कों.) लावणें पहा. -लोक २.८०.

**लायनी**—स्त्री. अपशब्द, शिवी. 'रयतीस लायनी सिवीगाली न करणें व तश्वीस न देणें.' -रा १६.२९. [अर. लअन]

**लायरी**—स्त्री. (मुंबई) मिजास. [लहरी, लाहरी]

**लारांज**—न. (गो.) साखरलिंबू. [पोर्तु.]

**लारी**—स्त्री. एक जुनें चांदीचें नाणें. आकार लहान चिमटया सारखा, किंमत साधारणपणें आठ आणे. 'होन एकुनु लारी ६' -भाद्रिसंवृ ४८.

**लाल**—वि. प्रिय; प्रियकर; आवडीचा (माणूस). 'या जगांत खरेखुरे सरस्वतीचे लाल कितीसे सांपडतील?' -विवि ८.८.१४३. -होला १२०. [सं.] ०बनणें-(व) श्रीमंत, गब्बर होणें. लाला-पु मुलगा; पुत्र. -वि. (हिं.) बहुमानार्थी महाराज, साहेब या प्रकारचें विशेषण.

**लाल**—पु. १ एक रत्न; माणीक. २ एक पक्षी. -प्रला १३. -वि. १ तांबडा; रक्त (रंग, कपडा इ०). २ अतिशय तांबडा (तांबडा शब्दाशीं जोडून). 'या पागोटयाचा रंग तांबडा लाल आहे.' ३ मूर्ख. [फा. लाल्] ०अंगार होणें-(व.) अतिशय रागावणें. ०कांगोणी-स्त्री. एक झाड. कांगोणी पहा. ०गंध-न. (व.) वाङ्निश्चयाचें साक्ष गंध. 'त्याचें लालगंध झालें'=लग्नाची तिथी ठरली! ०गेरू-पु. गेरूचा एक प्रकार. ०पिशी-गव्हाची एक जात. -मुग्या ४२. ०बावटा-पु. १ प्रतिकूल परिस्थिति. (क्रि० दाखविणें). २ समाजसत्तावादी मजुरांचें निशाण. ०बोर-वि. विशिष्ट रंगाचा (घोडा). 'घोडा अस्सल काबूलाचा। लाल-बोर टाकम तुरकी।' -पला ४.२६. ०बुझक्कड-भुजःक्कड-भुजःकण-पु. (हिं.) दीडशहाणा, स्वतःला हुषार समजणारा परंतु खरोखर मूर्ख व अज्ञानी असणारा (इसम). लालबुझक्कड या

नांवाची अशी एक व्यक्ति होती म्हणतात. ०भडक, ०लाल-भडक-वि. अतिशय तांबडा; अत्यंत गर्द तांबडा; भडक तांबडया रंगाचा. ०वट-वि. १ लालसर; तांबडसर. २ अतिशय, भडक तांबडा. [ लाल+वत् ] लालट-वि. लालसर. ' पूर्व दिशाही लालट झाली अरुणोदय होउनी। ' -रत्न ४.२. लालटपणा-पु. किंचित् लालपणा. ' नंतर लालटपणा आला. ' -वज्राघात ४९. लाली-स्त्री. रक्तिमा; तांबडेपणा. [ फा. ]

लालच, लालचखोर—पु. लालूच, लालूचखोर पहा. लालचणें, लालचावणें-अक्रि. १ लोभाविष्ट होणें. २ सवकणें; आमिष लागणें. लालचाई-स्त्री. लालूच, लालची पहा.

लालची—स्त्री. १ लालसा; लोभाविष्टता; इच्छा; लोभ; काम. २ लालूच; लांच. ( क्रि० दाखविणें ). -वि. लोभी; लालूचखोर [ सं. लालसा ]

लालझगडा-डें—पु न. प्रीतिकलह. लाडझगडा पहा.

लालचेल—वि. १ लोभी; अभिलाषी. २ जास्त लालचावलेला; लोभाकुल. [ लालच ]

लालटिन-टेन, लालटेम—पु. ( व. हिं. ) हातकंदील. ' लालटिन हातांत घेऊन जा. ' [ इं. लॅन्टर्न ]

लालडी—स्त्री हलक्या जातीचा लाल; एक रत्न; माणकाचा तुकडा ( नथेंत घालतात. ) ' राधा-कृष्णलाल आम्ही लालडी त्या। ' -रासक्रीडा २.

लालणें—क्रि. लालन करणें; संगोपन करणें; लाड करणें; संभाळणें. ' पाहुनि घेउनि सेउनि लालुनि पांवनसंस्कृतिबंध-निवृत्ता। ' -निमारामायण ४.३०. [ सं. लालन ]

लालन—न. १ पुत्र इ० कांस मागितलेला पदार्थ द्यावा, करतील तसें करूं द्यावें, त्याजवर माया करावी, चुंबनालिंगनादि करावें इत्यादिकेंकरून त्याचें मन संतुष्ट करण्याचा जो व्यापार तें; लाड; खुशामत. ' दुर्मंत्रैर्नृपसंगतीस्तव यती श्रीं पुत्रही लालनें। ' -वामन, स्फुट श्लोक १५ ( नवनीत १३४ ). २ संगोपन; पाळण. -ज्ञा १०.२. [ सं. ] ०पालन-न. १ लालन; लाड; लालनाचें आधिक्यदर्शकरूप २ सांभाळ; संगोपन; पालनपोषण.

लालमो—पु. ( कु. ) एका माशाचें नांव.

लालस—पु. १ औत्सुक्य; तत्परता. २ कोड; लडिवाळपणा. ' एके जनलीला विलासें। एके पालनशीले लालसें। ' -ज्ञा ११. १३०. -वि. तत्पर; उत्सुक. ' दासी तुझी परम लालस वाट पाहे। ' -सारह ५.१०३. [ सं. ] लालसा-स्त्री. अतिशय आवड; जबर इच्छा; अभिलाष; आकांक्षा. ' तयाही हा ऐसा। लोभें वेतसां जरी लालसा। ' -ज्ञा १८.३९२. [ सं. ]

लालाभाईचा चुरमा, लालाभाईचुरमा—पु. १ प्रत्येकाला प्रत्येक गोष्टीची चैन, रेलचेल, सुबलकता; कल्पतरु असणें. २ रंगविलासाची झोड; बेसुमार चैन, मौज. [ लालाभाई=एका वैराग्याचें नांव+चुरमा ] म्ह० लालभाईचा चुरमा आणि शेटजी सडक.

लालामेह—पु. तंतुमय लाळेसारखी लघवी; एक प्रकारचा परमा. [ सं. ]

लालित—वि. १ लाडका; आवडता. २ ज्याचें लालन केलें आहे तो. [ सं. लल्=विलास करणें; लाड करणें ]

लालित्य—न. आंतील प्रेमविकारामुळें बायकांच्या ठिकाणीं उत्पन्न होणारी विशेष कृति-आळसानें अंग टाकणें, कोमल दृष्टीनें पाहणें, नाजूक विकाराचे द्योतक असे इतर हावभाव करणें. २ सौंदर्य; शोभा; मोहकता; ललितपणा. ' प्रत्येक धंद्यांत लालित्य उत्पन्न करण्याची त्या त्या धंद्याचीं विशिष्ट तत्त्वें असतात. ' ३ काव्य, प्रबंध, भाषण इ० त अर्थ-पदरचनाकृत सौन्दर्य. उदा० अर्थ-लालित्य; वाक्यलालित्य; रसलालित्य; शब्द अथवा स्वर-लालित्य. [ सं. ]

लालुचणें—अक्रि. लालसा धरणें; लालूच वाटणें; इच्छा होणें; आकांक्षा धरणें. लालचणें पहा. [ लालूच ]

लालुप्य—न. आसक्ति. [ सं. लोलुप्य ]

लालूच—स्त्री. १ लोभ; हांव. २ आमिष; मधाचें बोट. ( क्रि० दाखवणें, लावणें ) [ सं. लालसा; हिं. लालच ] ०खोर-वि. लोभी; लाचची.

लालें—न. ओष्ठबंधन; मुकेपणा [ फा. लाल् ]

लाल्हात—वि. ( महानु. ) रमणीय; सुंदर. ' । जंव तारुण्याचा पडिभरु। तंव लाल्हात दिसे। ' -ज्ञाप्र ७६०. ' तो वाळाकरूं बाळु। लाल्हातु दिसे। ' -शिशु ३०४. [ सं. ललित ]

लाव—अ. साहित्य; लवाजमा ( जमा. किंवा ) लष्कर शब्दाला जोडून येतो. ' लाव-लष्कर फौजेचा थाट। '-होपो १८.

लाव—पु. निशाण. [ अर. लीवा ]

लाव—पु. एक पक्षी; लांवा. [ सं. ]

लांव—स्त्री. १ एक राक्षसी; लांस; जखीण; हडळ; हडळी; पिशाच्च. ( हलक्या जातींत हिची उपासना आहे. ) -ज्ञा ७. १४७. ' कपाटें उघडी नरनायका। लांव पाठीं लागली ' -मुद्दरिश्चंद्राख्यान ( नवनीत पृ. २०८ ). २ ( ल. ) ओंगळ, दुष्ट, घातकी स्त्री. ' तशा जावा लांवा उचित करणी ते दुषणदा। ' -मराधा ६९. ३ कजाग, कोपिष्ठ स्त्री.

लावक—पु. एक पक्षी; लावा. हा पक्षी फार स्त्रीलंपट असतो. ' बंधूसि बंधु पाहे माराया लावकासि लावकसा। ' -मोभीष्म ३.५०. [ सं. ]

लावक—न. १ भांडण; तंटा. २ कुरापत; लावालावी. 'कांई लावकैआं केउतें। ' -शिशु ११६. [ लावणें ]

**लावगन**—स्त्री. लागवण; लागवड. ' लावगनसहित पुगी फल त्रिक्षभूमि ...' -शके ११८१ चा बप्प चालुक्य ताम्रपट.

**लावण, लावणिक**—वि. खारट; खारें; क्षारयुक्त. [ सं. ]

**लावणी**—स्त्री. १ एक प्रकारची कविता, गाणें, चीज. ही खास महाराष्ट्रीय आहे. हींत शृंगार, वैराग्य वगैरे विषय दृष्टीस पडतात. लावणी बहुधा पहाडी, काफी वगैरे रागांत गाइलेली ऐकूं येते. [लावणें]०**बाज**-वि.१ लावण्या म्हणणारा. २(ल.)तमासगीर.

**लावणी**—स्त्री. १ लागवडीचें व पेरणीचें काम; लावण्याचा व्यापार ( रोपें, ढाळया इ० जमिनींत ). ' गुडघ्यावेरी चिखल जाहला आतां करूं लावणी । संपवूं काम गीत गाऊनी । ' २ जमीन पिकायोग्य करणें; वहीत करणें. ३ गणना; संख्या. ' या निरूपणाचेनि नांवें । अध्यायपद सोळावें । लावणी पाहतां जाणावें । मागिला वरी । '-ज्ञा १६.६३. ४ स्थापना; मांडणी. ' ऐसी देतां उलठणी । अनुराग रोपाची लावणी । '-शिशु ६८१. ५ ( गो. ) रतीब. ' दूधाची लावणी दुसरीकडे लावुंक जाय ' ( दुधाचा रतीब दुसरीकडे लावला पाहिजे ). ६ जडवणूक; शृंगार; आरास. ' अवघी जडिताची लावणी । ' -ऐपो १५. [ सं. लापन ? ] (वाप्र.) ०**लावणें**-क्रि. १ तुलना करणें. ' कृष्णागरु आणि मलयानिल । लावणी लावितां मोल तुटे । ' -भवि २.२४. २ व्यवहारीं-उपयोग करणें. ' वर्तल्यावीण शिकवी । ब्रह्मज्ञान लावणी लावी '-दा २.१०.३६. सामाशब्द- ०**अळपणी**-स्त्री. ( व्यापकार्थी ) पेरणीमळणी; अव्वल तें अखेरपर्यंतचें सर्व शेतकाम. ०**उगवणी**-स्त्री. शेतपेरणी, सारा वसुली इ०. ०**कमउयास्ती टिपण**-न. लागवडीसंबंधाचें कच्चें टिपण. विशिष्ट काळांतील पडीत-वहीत जमीनीचा हिशोब. ०**जुंपणी**-१ नांगरणी, जुंपणी इ०; लागवडीचीं कामें सर्व मिळून किंवा निरनिराळीं. ' आमची लावणीजुंपणी आटपली-उरकली-संपली-अगदीं बुडाली-बरी पिकली. ' ' लावणीजुंपणी मला कांहीं येत नाहीं. ' २ जडविणें; स्थापणें; जुंपणें; मार्गाला लावणें; सांखळींत बसविणें. ०**टुपणी**-स्त्री. ( व्यापकार्थी ) सर्व शेतकाम; कृषिकर्म; लागवड. ' परगणे मजकुराची लावणीटुपणी उत्तम प्रकारें करून ... ' -वाडबाबा १.८४. [ लावणी द्वि. ] ०**पत्रक**-न. लागवडीखालीं आणलेल्या ( वहीत ) जमीनीचा तक्ता; गांवची खातेवारी वही. [ लावणी+पत्रक ] ०**मांडणी**-स्त्री. (व्यापकार्थी) लागवण; लागवडीला आणणें. [ लावणें+मांडणें ] ०**संचणी**-लावणीटुपणी पहा. ' आपल्या तालुक्याची लावणीसंचणी करून सुखरूप राहणें. ' -वाडबाबा १.१५७. **लावणीचा**-वि. आपल्या आपण झालेलें नव्हे; लावणी करून केलेलें ( वृक्षादि ). ' लावणीचा ऊंस काय माय प्रकाश वर्णावया ' -वसा २६.

**लावणें**—न. ( झाडांची रोपांची ) लागवड; स्थापना; लावणी. -सक्रि. १ जोडून ठेवणें; लावून ठेवणें; जुळविणें; बसविणें; चिकटविणें. ' पत्र नाटपेड न व्हावें म्हणून त्यास तिकीट लावावें ' २ पाठविणें; धाडणें; मार्गावर सोडणें. ' सगळें खटलें घराकडे लावलें, मग मी निघून आलों. ' ' वित्तेशाकडे विमान । रामभद्रें लाविलें । ' -मोरा १.२४८. ३ पगारपत्रक, बील वगैरे रुजू करणें; सादर करणें ( फेडीसाठीं ); पाठविणें. ४ बसविणें; वस्ती स्थापना करणें; वसाहत करणें ( गांव प्रदेश इ०ची ). ५ (दुकान इ०) घालणें; उघडणें. ६ (जहाज, बोट) नांगरणें. ७ कुळास (जमीन) लागवडीसाठीं देणें. ८ ( ल. ) हांकलून देणें; बाहेर घालविणें. ' नातरि बैल विकूनि गोठा । पुंसा लावोनि बांधिजे गांठा । इया करणी वीं चेष्टा । कांइ हंसो । ' -ज्ञा १३.२३३. ९ पेटविणें. ' लाखेचें करावें दामोदर । त्यांत घालावे पंडुकुमर । कोणा नेणतां मंदिर । लावावें तुवां । ' -कथा ५.११.९६७. १० तोडणें; कापणें. ' तयाचें जें कर्मसांडणें । तें तया पै मी म्हणें । शिसाराचें रागें लावणें । शिसचि जैसें । '-ज्ञा १८.१७९. ११ नाहींसें करणें. ' तेसें आत्मनाथाचिया आधी । लाऊनि विषयविषाची बाधी । ' -ज्ञा १६.१८८. १२ ओळीनें मांडणें; हारीनें ठेवणें; जुळविणें; व्यवस्थित करणें. ' गंजिफा लावण्यांत येतात. ' १३ व्यवस्थित, जागच्याजागीं ठेवणें. ' विमान लाविलें अंतराळी । सर्व शोधोनि वनस्थळी । ' -कथा २.९.२०. १४ आरोपणें; माथीं मारणें; अंगीं लावणें ( दोष इ० ). 'दुसऱ्यास दोष लावण्यास जागा राहणार नाहीं. '-विवि ८.११.२०८. ' देव आपणाला पाप लावील असा लोकसमज होता. ' -कोरकि ४४१. १५ लावणी करणें; पेरणें. 'अगोदर रोप तयार करून मागून भात लावावें. १६ करणें, देणें, योजणें, आणणें इ० अर्थीहि वापरतात. उदा० धार लावणें; तजवीज लावणें, लाज लावणें इ०. १७ लागणें पहा. [ सं लापन ? ] **लावून घेणें**-( बायकी ) वेढून घेणें ( वस्त्र ). **लावून पाहणें**-( एक पदार्थ दुसऱ्या पदार्थाशीं ) ताडून पाहणें; परस्परांची किंमत, योग्यता इ० ठरविणें. **लावून बोलणें**-टोमणे मारणें; दुसऱ्याला झोंबतील अशीं विधानें करणें.

**लावण्य**—न. १ सौंदर्य; रूप. -ज्ञा १.४. २ शोभा; दिमाख. ३ खारटपणा; क्षारता. [ सं. ] ०**खाणी**-स्त्री. (सौंदर्याची खाण) बायकांच्या अंगची सुंदरता व मोहकपणा या गुणांना उद्देशून हा शब्द योजतात. ( सामा. ) सुंदरी. ' लावण्यखाणी । हस्तिनी-वरून उतरे ते क्षणीं । ' अत्यंत, अपरंपार सौन्दर्य असणाऱ्या व्यक्तीला म्हणतात.

**लावतोड, लांवतोड**—स्त्री. १ अत्यंत पराकाष्ठेची घाई, लगबग. ' कामाची-देण्याघेण्याची-जाण्यायेण्याची-लावतोड ' २ घाईमुळें चित्ताला वाटणारी अस्वस्थता; जिवाची त्रेधा; मनाला त्रास. 'जिवाची-प्राणाची-अंतःकरणाची लावतोड.' ३ कामामध्यें केलेली किंवा करावी लागणारी धांवपळ; धडपड; उतावळेपणा;

घाई इ०. ४ जोराची, निकराची ओढाताण. ५ अत्यंत जोराचें, कडाक्याचें भांडण. [ लावणें+तोडणें; किंवा लांव ( राक्षसी )-लांवा ( पक्षी ) याचें तोडणें ]

**लावपिसा**—पु. एक क्रूर प्राणी. लांव पहा. ' रानगाई रानम्हैसे । रानशकटें आणि रिसें । रानहाती लावपिसे ।'-दा३.७.९.

**लावबाज**—वि. लाव्याकडील कामगार; लावा पक्षी धरणारा. 'तेथें आज्ञा कीं, रामचंद्र पायेदामी व महादजी खपाणा लावबाज पाठविले आहेत. '-पेद ८.२७. [ लाव+फा. बाज ]

**लावरा**—पु. लहान कोंबडयासारखा एक जंगली प्राणी; याचें मांस खातात. -बदलापूर १०४.

**लावलद**—वि. निपुत्रिक. ' तो लावलद, लेकीन हिले हयात असतां मुतवन्ना ( दत्तक ) पुत्र घेतला. ' -रा २२.१०३. [ अर्. लावलद् ]

**लावलिजाव**—वि. ( क. ) जुजबी; तात्पुरतें. ' लावलिजाव काम करून कसें चालेल ? '

**लांवसट**—स्त्री. राक्षसी; डाकीण; जखीण; लांव पहा. -वि. ढालगज याअर्थी योजतात. **लांवसटणें, लावसरणें, लांवारणें**-क्रि. लांवसटीपासून बाधा-त्रास-पीडा होणें ( फळ, दूध, इ०स ). नारळ, ताडफळ इ० फळासंबंधानें लांवसरणें हेंच क्रियापद बहुधा योजलें जातें.

**लावा**—पु. ( क. ) लाहो पहा. एकसारखी तीच गोष्ट करणें; धोशा; तडाखा लावणें. ' त्यानें शिष्यांचा लावा घेतला. '[लाहो]

**लावा, लांवा**—पु. एक पक्षी; लाहूर. -सारुह ३.४७. ' गरुड म्हणतां प्रतिभटा वांचेल कसा म्हणोनि ओ लावा । ' -मोविराट १.१११. [ सं. लावक ]

**लावा**—पु (काव्य) ( शोभा येण्यासाठीं, खुलविण्यासाठीं ) पदरचें घातलेले शब्द; तिखटमीठ; साफसुफी; मसाला; झिलाई. [ लावणें ]

**लावा**—पु. ( कु. ) तुकडा ( मांसाचा ).

**लावा**—पु. खेळ; लीला. ' लाविसि कां बोल ? हे तुझे लावे । ' -मोउद्योग १०.११०. [ लावणें ]

**लावारिस**—वि. ज्याला कोणी वारस नाहीं असा; बिनवारशी. [ फा. ला=नाहीं या अर्थी प्रत्यय+वारिस=वारस ]

**लावालाव, लावालावी**—स्त्री. १ तुकडयाला तुकडा, वस्तुला वस्तु जोडणें; वाढविणें. २ नीट, व्यवस्थित करणें; मांडणी. ३ (ल.) खुलण्यासाठीं भर घालणें; तिखटमीठ, मसाला घालणें. लावा पहा. ४ इकडील हकीकत तिकडे, तिकडील इकडे जाऊन सांगणें व अशा रीतीनें दोघांचें आपआपसांत भांडण लावणें; चुगली; चहाडी; कलागत. ' त्याची माता असे म्हातारी । तिनें लावालावी केली उत्तरीं । ' -कथा ४.६.१५५. [ लावणें द्वि. ]

**लाविरा**—वि. लावालावी करणारा.

**लांव्ह, लांव्हा, लांव्हारणें**—लांव,लांवा लावारणें इ०पहा.

**लाव्हर**—स्त्री. कोंकरूं; कोंकरी (एकवर्षाचे आंतील वयाची); लाहोर.

**लाशा**—वि. १ लास ( डाग ) दिल्यासारखें चिन्ह ज्या आम्रादि फलावर असतें तो. २ लासाचे चिन्हानें युक्त असा ( मनुष्यादि ); डागलेला. [ लास ] **लांशें**-न. काळा डाग. [ लास ] **लास**-पु. १ वायुविकृति किंवा अन्य रोग इ० च्या निरसनार्थ त्वचा तापलेल्या लोखंडानें भाजणें; डागणी. ( क्रि० देणें, घेणें ). ' अज्ञानाचें लांशें । जेथ लागलेंचि न दीसे । ' -भाए ५८९. २ अशी त्वचा भाजून पडलेला डाग किंवा वण. ३ जन्मापासून माणसाच्या तोंड इ०वर जो तांबडा, काळा, पिवळा इ० रंगाचा डाग असतो तो; तीळ; वांग. ४ आंबा इ० फळ अंशतः सडल्याचा जो डाग सालीवर उत्पन्न होतो तो. -न. अंगावरील केंसाळ तीळ ( मागील जन्माची खूण समजतात ) [ सं. लाञ्छ, लांछन ] **लासणी**-स्त्री. १ तापलेल्या लोखंडानें दिलेली डागणी. ( क्रि० करणें ). २ ( विणकाम ) शाई, कोळसा इ० नीं विणावयाच्या वस्त्राच्या ताण्यावर केलेली खूण; लासन. [ लास ] **लासणें**-सक्रि. १ विस्तवांत घालून लाल केलेल्या लोखंडाचा डाग देणें; भाजणें. २ कोणत्याहि कारणासाठीं ( त्वचा किंवा पृष्ठभाग ) भाजून, डागून खूण करणें. ३ पाजणीनंतर ( ताण्याला ) लासें लावणें, खुणा करणें. ४ भाजणें; जाळणें. ' मूर्खा, दीपा पतंग । स्वमनिं जन्हि म्हणे ' हें खरें फूल ' लासी । ' -मोकृष्ण ५६.३९. -दा ३.७.२५. -दा १०.१०.६१. -अक्रि. १ जळणें. ' कपडा लासेल ! जरा इस्त्री थंड कर. ' २ बिघडणें; डागळणें ( फळ इ० ). **लांसरूं**-नपु. केंसाळ तीळ; वांग; लांस. **लासें**-न. १ डाग; वण. लास पहा. ' परी गुणत्रय वशें । त्रिविधपणाचें लासें । श्रद्धे जें उठिलें असें । ते वोळख तूं । ' -ज्ञा १७.७३. २ ( विणकाम ) लास; लासणी पहा. ( क्रि० लावणें ).

**लास**—पु. ( नाविक ) वल्ह्याचें टोंक जमीन इ०वर टेंकून होडी मागें ढकलणें. ( क्रि० धरणें; करणें )

**लास**—स्त्री. ( हिं. गु. ) कलेवर. ' तों एका लहान मुलाची लास तेथें झांकून ठेवलेली तिला दिसली. ' -मौज २.६.३०. [ फा. हिं. लाश् ]

**लास**—पु. ( चांभारी ) जोडयांत आकार येण्यासाठीं घालावयाचा लांकडी ठोकळा; पायाचा ठोकळा; कलबूत. ' किती नंबराची लास घेऊं ? '

**लांस**—स्त्री. १ एक राक्षसी; लांव पहा. २ लांडगी; वृकी; कोल्ही.

**लांस**—स्त्री. ( कों. ) एक प्रकारची माती. रंग आणि मेण मिसळून करतात.

**लांस घालप**—क्रि. ( गो. ) लिलांव बोलणें.

**लासन**—न. कापड किती विणलें गेलें हें मोजण्यासाठीं त्यास दोन हातावर खुणा करतात त्या प्रत्येकी. लासणी पहा. ०काठी—स्त्री. सणंग ( कापडी वस्त्र ) मोजण्याचें व खुणा करण्याचें साधन.

**लांसरू**—न. लांस; राक्षसी ( तुच्छतेनें स्त्रीस योजतात ). लास पहा.

**लांसरू, लासूर**—न. १ नेत्ररोग. नासुर पहा. 'डोळे लाल असुन एकाला लासरूं असल्यामुळें त्यांतून पाणी गळत होतें.' –सूर्योदय ८८. **लासु**–पु. ( महानु. ) २ चामखीळ; नासरू. एक डोळयांचा रोग. ' तुझिये माया शक्तीचा डोळे लासु लागला ब्रह्मादिका ' –भाए ५३५.

**लासा**—वि. ( सामा. ) लाशा पहा.

**लांसो**—स्त्री. १ डाकीण; राक्षसी; लास. 'पाठीं लागलीसे लांसी । इच्छा जिते जैसी तैसी ।' –तुगा ११९५. २ मांजरी. –ज्ञा १३.२५१. ' अथवा लांसीचे दांत अति तीख । येरां दिसती परि पिलियां सुख । ' –स्वादि १२.३.५६. –तुगा. ३ कोल्ही. ' तंवतंव डांडाति उठी । रसना लांसि । ' –भाए १९७.

**लास्य**—न. एक नृत्य; सुकुमार व शृंगाररसपोषक नाच. –ज्ञा १७.८. ' लास्य आणि तांडव । दोन्ही नृत्याचे भाव । लास्यकला माधव । दावीतसे तेधवां । ' –ह ५.५६. [ सं. ]

**लाह**—पु. छंद; नाद. लाहो पहा. ' तेणें निदसुरपणाचेनि लाहें । कर्माकर्माचें पसरी पाये । हिताहित कोण पाहे । वेहमोहें मोहितु । ' –एभा १०.३१६. [ सं. लाभ; प्रा. लाह ]

**लाहकी**—स्त्री. ( अव. लाहक्या ) १ उकळी; अतिशय उष्णतेमुळें खालवर, घालमेल होणें; लहालहा होणें. ( क्रि० मारणें; देणें; टाकणें). २ अंगाचा दाह, तलखी होणें; राग किंवा त्रास होणें. ' अंगाची व शरीराची लाहकी झाली. ' ३ लाहो; एकसारखा ध्यास; हट्ट धरणें ( लहान मुलानें ); जीव काढणें. ( क्रि० देणें; टाकणें; वर प्रत्यय लावून ). ४ उत्कट इच्छा. ५ ( माण. ) त्वरा; घाई ( कार्यसिद्धीची ). ' बसा हो ! काय लाहकी आहे, जाल आतां ! ' [ लहा, लाही ] **लाहकणें**-क्रि. ( व. ) धापा टाकणें; तगमग करणें ( उन्हानें ).

**लाहंगड, लाहंचट, लाहंचड, लाहंचर, लाहन, लाहनखुरी, लाहनगा, लाहंबर लाहांगड, लाहांचट, लाहांचड, लाहांचर, लाहान, लाहानखुरी, लाहा-लाहा**—लहांगड, लहांचट इ० पहा. (लाहा–नें आरंभ होणारें रूप अयोग्य, अमान्य आहे. )

**लाहडा**—पु. तगमग; अतिशय जोर; भर. ताप, देवी, गोवर, खरूज ह्या शब्दांना जोडून येतो. जसें–तापाचा–देवीचा–गोवराचा–खरजेचा–कांजण्याचा–लाहडा. ' तापानें–देवीनें–खरजेनें–कांजण्यानें–उन्हानें लाहडा. ' [ लहा ]

**लाहडा**—पु. १ लगदा; राडा; गोळा ( गूळ, चिखल इ० चा ) २ गुंता; गुंतागुंत; मिसळ.

**लाहडा**—वि. अत्यंत लाचावलेला; मागें लागलेला; आसक्त; अत्यंत शोकी, नादी; हावरा ( चांगल्या आणि वाईट अर्थानें ). [ लाह ]

**लाहणा**—पु. प्राप्ति; उत्पन्न; लाभ. ' म्हणोनि इये-अध्यायीं । निरूप्य नुरेचि कांहीं । आतां गुरुशिष्या दोहीं । स्नेहो लाहणा । ' –ज्ञा १६.४६. –वि. १ लाभदायक; नफा देणारा. ' गुरु उपदेश नाहीं लाहणा । ' –दावि १५०. २ प्राप्त होणारा; मिळणारा. ' येतुलेनि पंडुसुता । अनुभव लाहाणा आयिता । ' –ज्ञा १३.१०४८. ३ आवडता; स्वाधीन. 'एवं भाविकू देवाचा लाहणा –एभा २५.६२०. [ सं. लाभ; प्रा. लाह ] **लाहणी**–स्त्री. प्राप्ति; लाभ. ' परि समर्यी झाली सुदैव गति लाहणी । ' –राला १०. **लाहणें**-अक्रि. १ प्राप्त होणें; मिळणें ( नफा, लाभ म्हणून ). –ज्ञा १.७७. ' तुजदेखत मीं जयासि लाहेन । '–मोकर्ण ३४.२६. २ लाभणें. लाधणें पहा. ' मेलाचि मरोनि लाहे । गेलाचि जावोनि लाहे । कर्मवशें । ' ३ उत्पन्न होणें; फळ मिळणें. ' जैसें पेरिलें लाहणें । ' –कमुरा ४२.५८. ' लाहोनि इच्छेसारिखें फळ । ' –मुआदि ३.७२. ४ धजणें; धैर्य करणें. ' परि अपराधु तो आणीक आहे । जें मी गीतार्थु कवळुं पाहे । ते अवधारा विनवूं लाहें । म्हणऊनियां । ' –ज्ञा १.६६. ५ शेवट होणें; फळ मिळणें; परिणामीं हातीं येणें. ' नातरी जैसें तोय । साखर घालितां गुळचट होय । लवण मिळवितां पाहे । क्षारत्व लाहे तत्काळ । ' [ सं. लभ्; प्रा. लह ]

**लाहणी**—स्त्री. कापणी. [ सं. लापन ]

**लाहणी**—स्त्री. ( उच्चारदोषामुळें ) राहणी पहा.

**लाहणी**—स्त्री. ठाणवाई ( दिव्याची ).

**लाहयकी**—स्त्री. ( ना. ) लाहकी; त्वरा; घाई.

**लाहरी, लाहारी**—स्त्री. लारी; जुन्या काळचें चार–पांच आणे किंमतीचें एक चांदीचें नाणें. साडेतीन मोठया लाहरींचा व चार लहान लाहरींचा एक रुपाया होतो. ' लाहरी रजतवर्ती ' –राज्य २.८.

**लाहलाहात, लाहलाहत**—वि. लुसलुशीत. ' पुढां उपरति रागें लोहिवी । धर्म मोक्षाची शाखा पालवी । लाहलाहात नित्य नवी । वाढतीचि असे । ' –ज्ञा १५.१९४. [ लाह+लाह ]

**लाहवा**—पु. लावा पक्षी.' लाहवे रावे । '–दावि २४४.[लाव]

**लाहा**—स्त्री. अतिशय इच्छा. लाह–हो पहा. –भाए ५१४. **लाहाइजणें**–क्रि. लाभणें; लाहणें. ' दैवयोगें ब्रह्मवाणि । जरी न लाहाइजेचि श्रवणीं । '–ऋ ३.

**लाहा**—पु. लास; अंगावरील तीळ. ' तम म्हणजे काळिमा। एया लाहासें । जैसें अवघें आंग गौर वर्ण परि कणु एक अनदस्य । ' –चक्रधर सिद्धांतसूत्रें ३६. [ लास ]

**लाहा**—पु. नादारी. ' मुंबई, कलकत्ता, मद्रास वगैरे मोठ्या शहरांत लाहा घेण्याचा स्वतंत्र कायदा आहे. ' –घका १३४.

**लाहांकणें**—क्रि. ( महानु. ) शोक, दुःख करणें. ' जेवीं अपत्य मातेशीं चुके । तें भंवतें पाहे तेवि भेके । हिंपुटी होउनी लाहांके । जियापरी । ' –ज्ञाप्र ९९७.

**लाहाणा**—वि. १ लाभदायक. लाहणा पहा. २ लाभ करून घेणारा. ' साधकहि येथ लाहाणा । जो या साधना साधूं जाणे । ' –एभा११.५०७. **लाहाणी**–स्त्री. प्राप्ति. लाहणी पहा. **लाहाणें**–न. १ प्रेम; निष्ठा. ' नवल भावार्थाचा महिमा । मज विश्वात्म्याचा झाले आत्मा । ऐसें लाहाणें तया आम्हा । मज पुरुषोत्तमा वश केलें । '–एभा ११.१५५९. २ ऐक्य. ३ प्राप्ति. ' जयां मोक्षाचें लाहाणें।'–ज्ञाप्र ८९४. –क्रि. प्राप्त होणें. लाहणें पहा. ' लाहोनि उत्तम शरीर । व्यर्थ विषयासक्त नर । '–एभा २०.१९३. **लाहातें**–न. प्राप्ति; लाभ. ' जीवा नाहीं कुडीचें लाहातें । ये भिन्नभिन्न पंचभूतें । '–तुगा ७१३.

**लाहान**—वि. लहान पहा. **लाहानाळणें**–क्रि. कमी होणें. लहानाळणें पहा. ' अन्नरसें वाढे शरीर । शरीराप्रमाणें विचार । वृद्ध-पणी तदनंतर । दोन्ही लाहानाळती । '–दा १३.९.६; ९.९.३४.

**लाहानवति**—क्रि. गाळीव माती; वाळू. तयांची लाहानवती। मळिजे वातपीति । '–भाए ४०१; १९३.

**लहापाहा**—वि. ( व. ) तेजदार; तजेलदार. ' पिकें लाहा-पाहा दिसतात. ' [ लखपख ]

**लाहाबरा**—वि. ( व. ) कोणतेंहि काम हावरेपणानें, गड-बडीनें करणारा. ' भारी लाहाबरा आहे तो मनुष्य. ' [ हिं.लहबर ? ]

**लाहासी**—स्त्री. लांस; लासी; राक्षसी. ' लाहासि अविवे-चिआं । '–दाव ४४६.

**लाहासें**—न. काळिमा. लांस, लासें पहा. ' अज्ञानाचें लाहासें जेथ । लागलेचि न दिसे । '–भाए ५८९.

**लाहिरी**—स्त्री.( मुंबई ) मिजास. [ लहरी ]

**लाहिरी**—स्त्री. चटणी. –बदलापूर १४८.

**लाही**—स्त्री. १ तांदूळ, मका, जोंधळा इ० भाजून फुलविलेला पदार्थ, दाणा. 'काळानलीं द्विट् चमू घातली लाही । '–मोरा१.३८८. –मध्व ५९५. २ तुरटी, मोरचूद वगैरेपासुन वरीलप्रमाणेंच केलेला पदार्थ. ' टांकणखाराचा स्फटिक उष्ण केला म्हणजे त्याची लाही होते. '–पदाव ११५. सामान्यतः अनेकवचनी (लाह्या) उपयोग. ३ हल्ला. ' मोगल व भोसले यांची लाही येऊन मौजे मजकूर दरोबस्त लुटला '–समा १.७. ४ अतिशय रागामुळें(अंगाची होणारी) तलखी; आग; काहली; दाह इ० [सं. लाजा; हिं. लाई; सं. लांजिका–लाई आ–लाया–लाह्या–भाअ १८३२] ०**उडणें**–क्रि. १ (गोळ्यांची–जरीमरीची–शिव्यांची–पायपोसांची लाही ) भराभर, सपाट्यांत भडिमार,वर्षाव होणें. २ ( दाण्याची, आंब्यांची इ० ) तडकाफडकी विक्री होणें. ०**फुटणें**–मोठा मारा होऊन नाश होणें. ' अठरा घटका लाही फुटली । '–ऐपो २१४. ०**भाजणें–१** ( अंगाची ) गदमदणें; उबगणें. २ (उन्हाची) कडकडीत ऊन असणें; उन्हाच्या झळा येणें, लागणें. ०**होऊन जाणें**–संतापणें. ०**लाही होणें**–रागानें अंगाची आग होणें. ' ह्या अत्याचार पाहून सारखी लाही-लाही होत होती. '–स्वप १४५. ०**पीठ**–न. लाह्यांचें पीठ ( जोंध-ळ्याच्या ) ०**सांडगे**–पुअव. कोहळे सोलून किसल्यावर त्यांत मीठ-मसाला घालून लांबट आकाराचे गोळे करून वाळवितात व तळून उपयोगांत आणतात. –गृशि ३६९. **लाह्याचा मान**–लग्नसमा-रंभांत लाजाहोमानंतर वरपक्षाकडून वधूपक्षाकडील लाह्या घाल-णाराला नारळ पागोटें वगैरेचा केलेला आहेर.

**लाहु–हू**—पु लाहो पहा. ' पुढें गुण काय विसरावे आणखी भेटु नेत्र घेति लाहु । '–सला ७९.

**लाहूर**—नपु. लावापक्षी [ सं. लावक ]

**लाहेंलाहें**—क्रिवि. त्वरेनें; लगबगीनें. ' लाहेंलाह तांतडी । पुढती पंक्ती बैसावया '–हवि ३४.८४. [ लहालहा ]

**लाहो**—पु. १ छंद; नाद; हव्यास. ' राम राम स्मरा आधीं । लाहो करा गाठ घाला मूळबंदी '–तुगा ३४४२. २ अत्यंत लोभ; हावरेपणा; अतृप्तता. ( क्रि० घेणें ). ' भुलला भक्तिभावें । लाहो घेतला वेहीं । '–भज ७५. ३ प्राप्ति; फायदा; लाभ. ' प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो ज्यानें केला। तो भलाभला । '. 'अश्रु-नीर पुसि, वे सुख-लाहो । '–वामन भरतभाव ६९. ४ टाहो; हट्ट; सारखा आक्रोश. 'शोकांतही घे प्रभुनाम लाहो । '–वामन, भरतभाव ३०. [ सं लाभ; प्रा. लाह ]

**लाहो**—पु. त्वरा; घाई; जलदी. ' ऐसें वरचिलीचि बरवा। सुख जावों लागले फावा । तंव रसस्वादाचिया हांवा । लाहो केला ।' –ज्ञा ७.१९१.

**लाहोजाळ**—पु लोखंडी शस्त्र. ' लवलवीत लाहोजाळ ' । –उषा ४८. [ सं. लोह+जाल ? ]

**लाहोटा**—पु. १ फार लोभीपणा; हांवरेपणा. २ उत्कट इच्छा; आकांक्षा. ( क्रि० घेणें ) [ लाहो ]

**लाहोरी**—वि. लाहोरचा ( साबण, साबू ). [ लाहोर ]

**लाहार**—स्त्री. एक वर्षाची शेळी. लाव्हर पहा.

**लाह्य, लाह्यलाह्य**—क्रिवि.स्त्री. लहालहा पहा.

**लाह्यकी**—स्त्री. (व. ना.) घाई; त्वरा. लाहकी पहा.

**लाह्या**—स्त्रीअव. मुलींचा एक खेळ. -मखेपु ३००.

**लाह्लाणें**—क्रि. तळमळणें; लाहालाहा करणें. 'घेऊनि अज्ञानें उसंगिए। आर्ती लाह्लाति जियें।' -ऋ २. [लहा]

**लाळ**—स्त्री. १ काटयाचें बारीक टोंक; कूस; तूस (धान्याचें). (क्रि० शिरणें; राहणें; काढणें). २ विंचवाच्या नांगीचें टोंक.

**लाळ**—स्त्री. १ मुखरस; तोंडाला सुटणारें पाणी; खाण्याचा पदार्थ तोंडांत घालून चर्वण करीत असतां तो घशाखालीं उतरण्यासाठीं व पचनास मदत होण्यासाठीं मिश्रणाचा स्वाभाविक पातळ पदार्थ. २ जनावरांना होणारा एक रोग. याचेमुळें त्यांच्या तोंडातून लाळ किंवा पाणी गळतें व कित्येक वेळां त्यांच्या खुरांतून पाणी वाहूं लागून ते सडूं लागतात. (क्रि० येणें; जाणें). [सं. लाला] (वाप्र.) ०उठणें-तोंडास पाणी सुटणें. 'परी अमृताही उठी लाळ।'-अमृ १०.२०. ०गळणें-(ल) दृढ स्नेह-मैत्री असणें. 'काय त्या दोघांची लाळ गळती.' ०गाळणें-अतोनात किंवा फाजील स्तुति करणें. 'राजांच्या पदरीं लाळ गाळणारे पुष्कळ असतात.' ०घोटणें-१ तोंडाला पाणी सुटणें; अभिलाष धरणें. 'देखुनी तुझें रूप वेडावलें भूप। अंतरीं घोटिती लाळा' -मध्व ३४; -ह ३४ ७. २ लांगूलचालन करणें. 'विश्वामित्रानें मेनकेपुढें लाळ घोटावी?' -नारुकु ३.४७. **लाळेनें चणे भिजवून खाणें**-(आपल्याच लाळेनें चणे भिजवून खाणें) मिळावयाचा अगर मिळणार अशी खात्री असलेला योग्य मान वगैरे तो मिळाला नसतांहि पुढें अद्याप मिळेल अशा आशेवर स्वतःचें समाधान मानून घेणें; दुसऱ्यानें न केला तरी स्वतःच स्वतःचा गौरव करून घेणें. **लाळणें**-अक्रि. १ लाळ गाळणें; लाळ पाझरणें. २ लाळ गळण्याच्या विकारानें युक्त होणें. **लाळी, लाळेरें**-स्त्रीन. लहान मुलाच्या तोंडातून गळणारी लाळ धरण्यासाठीं गळयांत अडकविलेला कापडाचा अगर रबराचा तुकडा. **लाळें**-न. जनावरास होणारा एक रोग. **लाळयो**-पु. (कों.) सारखी लाळ गाळणारा मनुष्य.

**लाळणें, लाळवणें**—क्रि. लाड करणें. 'तूं पिता जालासी। फुन लाळऊंनी कहीं न बोलाविसी।' -शिशु १०२; -ज्ञा २.३५० [सं. लल्]

**लाळणें**—अक्रि. लवलव करणें (जीभ); बाहेर लोळणें, लोंबणें. 'डोल्वी मस्तक जिव्हा लाळी।' -दा १.२.८८. जिव्हा लाळी वेळो वेळां। भयानक।' -दा ३.१०.५.

**लाळें**—न. घोडयाच्या सरोसरीस किंवा म्होरकीस खालच्या बाजूस एक अवयव असतो. ज्यास जेरबंद किंवा दवासन बांधितात तें.

**लाळेमुळे**—पुअव एक प्रकारचे मासे. -प्राणिमो ८१.

**लाक्षणिक**—वि. १ लक्षणेनें जाणावयाचा जो अर्थ तो, लक्षणासंबंधी. २ सांकेतिक; सांज्ञिक. ३ वैशिष्टयबोधक; दिग्दर्शक; ज्ञापक. 'ज्याप्रमाणें आल्कोहोलांत हैआ हा समूह लाक्षणिक असतो तसा आल्डिहाइडांत काहैआ हा असतो.' -सेंपू ३. ४ अलंकारिक; औपचारिक. ५ अप्रत्यक्ष; गौण. [सं.] **लाक्षण्य-वि.** लक्षणांनीं, गुणधर्मांच्या योगानें ओळखतां येणारे. [सं.]

**लाक्षा**—स्त्री. लाख. [सं.] ०जोहर-न. लाखेच्या घराचें जळणें; लाक्षागृहदहन: (पांडवांना जाळण्यासाठीं कौरवांनीं केलेलें). 'पांडव निमाले लाक्षा जोहरीं।' लाखाजोहर पहा. ०तेल-न. लाखेपासुन काढलेलं तेल (औषधोपयोगी)

**लाक्षायणी**—स्त्री.लक्ष तीर्थांचें स्थान. 'लक्षतीर्थ जेथं मज्जना सर्वदां। लाक्षायणी सदां वास तेथें।' -ब २.५.

**लाक्षारस**—पु. दहाभाग लोध्र, त्याच्या दहाव्या हिश्शानें सज्जीखार, थोडी बोरीचीं पानें व सोळापट पाणी घालून केलेला काढा. -योग १.१८९. [सं.]

**लि॥**—(संक्षेप) लिहिलें; लिखित.

**लिइ(ही)न**—क्रिवि. (खा. भिल्ली.) घेऊन. 'हाकाल लकडी लिइन आवजा.' -भिर.

**लिंक**—स्त्री. सांखळीची एक कडी; एक इंग्रजी रेषापरिमाण; एका सांखळीचा शतांश; ७.९२. इंच. [इं. लिंक=सांखळीचा दुवा]

**लिकचोरी**—स्त्री. चोरून केलेलें काम; गौप्य. **लिका(की) चोरी**-स्त्री. चोरून काम करण्याची पद्धत. लिकचोरी पहा. [लिकणें+चोरी] **लिकून चोरून**-क्रिवि. लपूनछपून; चोरूनमारून; गुप्तपणें; लबाडीनें; दडून. [लिकणें+चोरणें] **लिकीर**-वि. (कों.) लबाड; गुप्तपणें काम करणारा; खोल वृत्तीचा; एखाद्या कामांत आपलें अंग असतांना नाहीं असें दाखविणारा. [लिकणें]

**लिकटणें**—अक्रि. चिकटणें; चिकटून राहणें.

**लिकंडाव**—पु. (कों.) लपंडाव. [लिकणें+डाव]

**लिकडें, लिकडेंमिकडें**—लिखडें, लिखडेंमिखडें इ० पहा.

**लिकण**—स्त्री. लपून बसण्याची जागा; दडण्याची जागा; दडी; आडोशाची जागा. [लिकणें=लपणें; हिं.] **लिकणें**-अक्रि. लपणें; दडणें; छपणें. [सं. लुप्? हिं. लुकना; प्रा. लुक्क]

**लिकलिकणें**—अक्रि. लुकलुकणें; मंद प्रकाशानें चमकणें; मध्यें मध्येंच एकदम चमकणें; (बारीक पदार्थ) थांबून थांबून प्रकाशित होणें; (लकलकणें व लिकलिकणें या दोन शब्दांच्या अर्थांत थोडा भेद आहे). [ध्व; किंवा सं. लोक्] **लिकलिकी**-स्त्री. मरणवेळचा किंवा आजारपणांतील डोळयांतील निस्तेजपणा; मिचमिचीतपणा; फिकटपणा; मालवत्या दिव्याचा अंधुक उजेड; किंचित् चकाकी; चमक; लुकलुकी. (क्रि० राहणें; होणें; करणें;

दिसणें ) ( लिकलिकी आणि लकलकी यांच्यांत भिन्नता आहे. पहिल्याचा अर्थ चमक किंवा अंधुक तेज असा आहे व दुसऱ्याचा लख्ख प्रकाश, झगझगीत उजेड, डोळे दिपवून टाकणारा प्रखर प्रकाश असा आहे ). -वि किलकिलीत; थोडी उघडलेली. 'माडीवरील मंडळीपैकीं एक अमळ खिडकी लिकलिकी करून खालीं पाही.' -नि ३४५. **लिकलिकीत**-वि. चमकणारा; लुकलुकणारा; चकचकीत. मध्येंच चमकणारा; थांबून थांबून प्रकाशणारा; चंचल प्रकाशयुक्त. अंधुक प्रकाशाचा; जात आलेल्या तेजाचा.

**लिकषणें**—सक्रि. लपविणें.

**लिका**—स्त्रीअव. ( कु. ) लिखा; उवांचीं अंडीं.

**लिखडें**—न. लहान आकाराचा दागिना; बारिक दागिना. ०**मिखडें**-न. किडुकमिडुक; बारीकसारीक दागिना. (-अव.) लिखडीं मिखडीं.

**लिखणें**—सक्रि. ( काव्य. कुण. ) लिहिणें. [ सं. लिख्; हिं. लिखना ] **लिखन**-न. १ लिहिणें; लेखन. २ लिहिलेला कागद; लिखाण; लिहिलेलें पुस्तक. [ सं. ] **लिखा**-पु. १ लेख; दस्तऐवज. २ हिशेबाच्या; नोंदीच्या ( वह्या ). 'यजमानकृत्याच्या लिख्याच्या व नामावळीच्या वह्या त्रिवर्ग सरकत्यांनीं नेल्या आहेत.' -वाडसमा ३.६४. **म्ह०** एक लिखा हजार बखा. ( बखा हें रूप बका 'बक' चे अनेकवचन. आहे. यमक साधण्यासाठीं क चा ख झाला ). **लिखाई**-स्त्री. १ लिहिणावळ; लिहिण्याबद्दल द्यावयाचें मोल. २ लेखन; लिहिणें. ३ हस्ताक्षर; अक्षर; लेख. **लिखाण**-न. लेख लिहिणें; लेखन; हस्ताक्षर; पत्र. **लिखापटी**-स्त्री. ( खा. ) वारंवार पडणारा पत्रव्यवहाराचा त्रास. **लिखापढा-पुसा**-पु. १ कायद्याचे, फिर्यादीचे, सरकारी कामाचे कागद. २ दस्तऐवज; लेख; सनद; लेखपत्र. ३ (सामा.) कोण ताहि लेख; लिखाण. -वि. सुशिक्षित. [ हिं. लिखना+पढना ] **लिखापढी**-स्त्री. लेखी व्यवहार; कागदावर लिहिलें जाणें; निश्चित होणें. ( क्रि० करणें. ) **लिखावट**-स्त्री. लिखाई; लेख लिहिणें; लिपी. **लिखित**-न. पत्र; चिठ्ठी; लेख ( हातांनीं लिहिलेला ). 'लिखित पाठविलें सकळ नृपां वैसें।' -र ११३. -वि. १ लिहिलेलें. २ काढलेलें; आंखलेलें; रेखाटलेलें; चित्रित. [ सं. ] **लिखितार्थ**-पु पत्रीं लिहिलेला मजकूर; एखाद्या पत्राचा, लेखाचा अर्थ-सारांश-उद्देश इ० **लिखें**-न. लिखाण; लेखन. 'बसोन ससांग लिखें करी।' -दावि २५१. [ सं. लिख्=लिहिणें ]

**लिखा**—स्त्रीअव. उवेचीं अंडीं. (-एव.) लीख. [सं. लिक्षा; प्रा. लिक्खा ] **लिखी**-स्त्री. लिखा काढण्याची लांबट फणी. **लिखो**-स्त्री. ( कु. ) उवा.

**लिख्या**—वि. बारीक; लहान ( डोळा ). [ सं. लिख्या—खसखस ]

**लिंग**—न. १ पुरुषाचें जननेंद्रिय; शिश्न. २ ( व्याकरण स्त्रीपुरुषत्वभेद; पुल्लिंग, स्त्रीलिंग आणि नपुंसकलिंग अशीं तीन लिंगें व्याकरणांत आहेत. ३ शंकराची विशिष्ट प्रतिमा; ईश्वरप्रतिमा; शंकर; शिवलिंग. 'दुर्दम काळासि जसा लंघाया विश्वनायका लिंगा।' -मोभीष्म ३.३७. ४ आराध्यदैवत. 'तंव वैकुंठपिठीचें लिंग। जो निगमपद्माचा पराग। जिये जयाचेनि हें जग। अंगच्छाया।' -ज्ञा १७.४६. ५ लिंगाईत लोकांच्या नांवापुढील प्रतिष्ठावाचक शब्द. उदा० सदलिंग; दादलिंग. ६ लिंगाईत लोक गळ्यांत बांधतात तो शिवस्वरूप कवचसहित खडा. ७ खूण; चिन्ह; लक्षण; स्वरूपबोधक चिन्ह. 'आतां शांतीचें जी लिंग। तें व्यक्त मज सांग।' -ज्ञा १६.१३६. ८ ( सांख्य मताप्रमाणें ) प्रकृति; सृष्टींतील चिच्छक्ति. ९ (ल.) अडथळा; उपाधि; ज्याच्या योगानें मनुष्य बांधला जातो-त्याची स्वतंत्रता जाते-अशी गोष्ट; अडचण; त्रास. ( क्रि० लागणें; अडकणें; असणें ). [ सं. लिग्=चालणें, हालणें] **लिंगविभक्ति संभाळून बोलणें**-व्याकरणशुद्ध बोलणें. ०**देह-शरीर**-पुन. सूक्ष्म देह; वासनात्मक शरीर. मन बुद्धि, दशेंद्रियें व पंचप्राण इतक्या सतरा तत्त्वांचा हा देह असतो. 'जालिया लिंगशरीराचा भंगु। चुके निरयस्वर्गाचा मार्गु। स्वभावेंचि।' ०**भद्र**-न. कीर्तिमुखादि विशिष्ट आकृति; यंत्र. 'वोडविजेति लिंगभद्रें। नवीं नवीं।' -ऋ ७८. ०**भेद**-पु. १ सूक्ष्मदेहभेद; लिंगदेहाचा भेद. २ पूज्यांचा उच्छेद. 'हें झुंज नव्हे प्रमादु। एथ प्रवर्तलिया दिसतसे बाधु। हा उघडा लिंगभेदु। वोढवला आम्हां।' -ज्ञा २.३१. ३ वैषम्य; विषमता; फरक; भेद. 'तेथ मी नमस्कारा। लागि उरों दुसरा। तरी लिंग भेद पऱ्हा। जोडूं जावों।' -अमृ १५१. ०**भेद विशिष्ट आकर्षण**-न. भिन्न लिंगांच्या माणसांचें परस्परांकडे आकर्षण. 'आतां पुंस्तकें वाचून लिंगभेदविशिष्ट आकर्षण असें मी म्हणेन.' -सुवे १०१. ( इं. ) सेक्सुअल अट्रॅक्शन्. ०**वंत, लिंगायत**-पु. शिवाचे उपासक. हा एक पंथ आहे. या पंथाचे लोक गळयांत लिंग घालतात. ०**व्रण**-पु. लिंगक्षत; शिश्नाला पडणारे चट्टे. ०**शरीर**-न. लिंगदेह; सूक्ष्मशरीर. याच्या उलट स्थूलशरीर. **लिंगाड**-वि. ( निंदेनें ) लिंगाची पूजा करणारा; लिंगाईत. **लिंगशा**-वि. (कों.) चेंगटया; धिमा; थंड; मंदगति; आळसट; काम करण्यांत मंद. **लिंगस्ता(-स्था)ई, लिंगिस्ताई**-स्त्री. ( कों. ). मंदपणा; आळशीपणा; कोणत्याहि कामांतील थंडपणा; धिम्मेपणा. **लिंगडणें**-अक्रि. ( अडथळा; अडचण इ० ) चिकटणें; बिलगणें; न निघे असें चिकटणें. **लिंगाईत**-लिंगवंत पहा. **लिंगाध्यास**-पु. वासना तादात्म्य. **लिंगायत**-पु. लिंगाईत, लिंगवंत. **लिंग्या**-पु. (निंदेनें) लिंगाईत; लिंगडा. 'पंथ कुमति नित्य बरोबर लिंग्या घेऊनी।' -प्रला ३३.

**लिगट(ड)णें**—सक्रि. चिकटणें; लागणें; स्पर्शणें. 'अश्व-भारांमागें लिगटले। उन्मत्त नागभार उठावले।' -ह २२.५३. 'मीपण सांडूनि लिगटा।' -दावि ४१६.

**लिंगड**—स्त्री. (हेट.) निर्गुडी; निगड; एक वृक्षविशेष.

**लिगडेंझगडें**—न. (कु.) खोटया भांडणानें स्वार्थ साधणें.

**लिगाड**—न. १ लचांड; लटांबर; कटकट; अडचण; पंचाईत; बंधन; संकट; कोणतेंहि त्रासदायक काम किंवा परिस्थिति. 'कैसें कराल तें नेणें। लिगाडाच्या गुणें।' -तुगा १२५४. २ चिकटा; चिकटपणा. 'तोही (गुळ) ठेवितां लिगाड धरी।' -एभा १६.१९. **लिगाडी-डया**-वि. लचांडखोर; खोडसाळ; उलाढाल्या; कचाटया; भांडण लावणारा; भयंकर भानगडी करणारा. 'देव लिगाडया देव लिगाडया। तुका म्हणे भाडया दंभें ठकी।' -तुगा ३६९९.

**लिगाड**—न. एक कसरतीचा खेळ. (क्रि० टोंचणें). 'लिगाड इत्यादि कसरतीचीं कामें बायकामुलें करून दाखवीत.' -स्वप ३१.

**लिंगी**—स्त्री. एक औषधी वनस्पती.

**लिंगोरची**—स्त्री. लगोरीचा खेळ. (हा शब्द प्रचारांत कमी आहे) (-अव.) लिंगोरच्या.

**लिचक, लिच्चक**—वि. (ना.) दिरंगाईचा; चिकट; वेळमोडया. **०घणाणा**-पु. (ना.) कामाचा घातलेला घोळ; कामांची खोटी; काम लांबणीवर टाकणें.

**लिचं(चां)ड, लिचांडखोर**—लचांड, लचांडखोर इ० पहा.

**लिचपिच**—क्रिवि. वेताची छडी, बारीक काठी; शिमटी, इत्यादींस जो एकदम बांक येतो त्याचा निदर्शक शब्द. **लिचपिचीत**-वि. १ लवचीक; बारीक; थोडयाशा भारानें सुध्दां लिचपिच लवणारा; घटमूठ नव्हे असा. २ (ल.) अशक्त; क्षीण; दुर्बळ; निस्तेज.

**लिचाड**—न. (कु.) नेत्रविष्ठा; चिपड.

**लिची**—स्त्री. एक फळझाड. हीं झाडें बंगाल, लखनौ, अलाहाबाद, सहाराणपूर या प्रदेशांत फार होतात. यांचीं फळें भुरक्या रंगाचीं बारीक काटयांनीं युक्त व रुचीला आंबट-गोड अशीं असतात.

**लिचीडा, लिचो(चों)डा**—पु. (ना.) अंगाला घेतलेला चिमटा; चिमकोरा.

**लिचोड**—पु. (ना व.) पिसू; घाणेरडेपणामुळें मनुष्याच्या व ढोरांच्या अंगावर होणारे कीटक प्रत्येकी.

**लिटकणें**—अक्रि. चिकटणें; बिलगणें; चिकटून बसणें. [लिकटणें पासून वर्णव्यत्यासानें]

**लिटी**—स्त्री. (को.) अगदीं लहान आंब्याची जात; लहान फळ; विटकी.

**लिडबिडणें**—अक्रि. लडबडणें; हलणें; ढिलेपणामुळें झोके खाणें; ढिलावणें. -सक्रि. माखणें; लिडबिडीत होणें; लडबडीत होणें; लपेटलेलें असणें. 'नरकाचें कोठार भरलें। आंत बाहेरी लिडबिडिलें।' -दा ३.१.१८. [लडबडणें] **लिडबिडीत**-वि. १ लडबडीत; शेण, माती इ० नीं माखलेलें, भरलेलें. २ ढिलें; लुटलुटीत; हलतांना कुरकुर आवाज होणारें.

**लिडया**—वि. (राजा.) शरीरानें अशक्त, रोड असें (मूल.)

**लितणें**—क्रि. (महानु.) माखणें; माखलेलें असणें. 'घेइ आइ। आंतु तर्‍हीं लीतैल।' -दृष्टांतपाठ ४४. [लिंपणें]

**लिथन**—न. दुसर्‍याकडून यावयाचें येणें येईपर्यंत त्याची वस्तु अडकवून ठेवण्याचा हक्क.

**लिथाडणें**—अक्रि. बरबटणें; भरलेला असणें; माखलेला असणें. 'कामक्रोधें लिथाडला। तो कैसा म्हणावा भला।' -दा १.१.२५.

**लिथाडणें**—उक्रि. लाथाडणें; पायाखालीं तुडविणें. 'थोरपणासि पाडिलें। वैभवासि लिथाडिलें।' -दा ५.९.३८. [सं. लत्ता]

**लिथियम**—पु. एक धातुरूप रासायनिक मूलद्रव्य. या धातूचा रंग रुप्यासारखा असून हा धातु पाण्यापेक्षां हलका आहे. हा हवेंत ठेवल्यास गंजतो. लिथियमयुक्त पाण्याचा उपयोग संधिवात झालेल्या मनुष्याला औषध म्हणून देण्याकरितां करतात. -ज्ञाको (ल) ४१.

**लिदवळ**—वि. (को.) १ घोडयाची लीद खाणारें (जनावर). २ (ल.) लाचखाऊ; भाडोत्री; हलकट; पैशासाठीं घाणेरडें काम करणारा. [लीद] **लिदाड**-न. घोडयाच्या लिदीची रास; उकिरडा.

**लिधा**—क्रि. (कातवडी) घेतला. 'तिनी पोटीं जन्म लिधा.' -मसाप २.१. [लेणें=घेणें]

**लिनेट, लिनत**—पु. एक पक्षी. -प्राणिमो ६२.

**लिपडा**—वि. निप्राण; अशक्त; कमकुवत; बारीक; रोड.

**लिपंडाव**—पु लपंडाव पहा.

**लिपडें**—न. (कर) लुगडें (हा शब्द बागवानांत रूढ आहे).

**लिपण**—न. (कु.) कांटयांच्या शिर्‍यांची वई; कुंपण.

**लिपण**—स्त्री. १ लपण्याची जागा. २ झांकण; आच्छादन; [लिपणें] **लिपणी**-स्त्री. (को.) लपणें; लपंडाव.

**लिंपण**—नस्त्री. १ धान्य वगैरे नासूं नये म्हणून कणगी इ० भांडयाला चिखल, शेण इ० चें दिलेलें सारवण-लेप-आच्छादन. (क्रि० घालणें). **लिंपणी**-स्त्री. सारवण; लेप; आच्छादन;

माखण. ३ सारवलेली स्थिति; माखलेली, लेप घेतलेली अवस्था. ४ (ल.) कुभांड; किटाळ; बालंट; दोष; कलंक. (क्रि० लावणें) [सं. लिप्=लिंपणें] **लिंपणें**-न. कोठयास शेण थापून बंद करणें; लिंपण अर्थ १ पहा. ' सर्वही धान्यासी लिंपणें घालोनि । ' -रामदासी २.१३६. **लिपाण**-न. (कु.) चोरांस चढतां येऊं नये म्हणून नारळीच्या झाडाला केलेलें कांटेरी फांद्यांचें वेष्टन.

**लिं(लि)पणें**—सक्रि. १ लेपानें बुजविणें; थापणें; चोपडणें; भोकें, खळग्या इ० बुजून पडलेली भिंत, कूड, बीळ इ० चांगलें होण्यासारखें शेण, चिखल इ०चा लेप देणें. २ चिखल, चुना इ०चे गोळे मारून चूल, ओटा इ० रचणें-तयार करणें-घालणें. ३ भिजणें; लिप्त होणें. ' तो वर्में करी सकळ । परि कर्मबंधा नाकळे । जैसें न लिंपे जळीं जळें । पद्मपत्र । ' -माज्ञा५.५०. ४ (ल.) दोष लागणें. ' परी त्याचेनि वेव्हारें न लिंपिजे तो । ' -विपू १.१०८.

**लिपणें**—अक्रि. लपणें; दडणें; लपून किंवा दडून राहणें, बसणें; दडी मारून राहणें. [लपणें]

**लिपि**—स्त्री. १ लेखनपद्धति; हस्ताक्षर; अक्षरें. २ लीप; भाषेंतील निरनिराळ्या ध्वनींचें पृथक्करण करून त्यांपासुन वर्णमालायुक्त अक्षरें तयार झालीं त्यास लिपि ही संज्ञा आहे. ५ भाषा; लेखन; लेख. ' इहीं बोधाचीं रोपें लंचिलीं । सुखाची लिपी पुसिली । ' -ज्ञा ३.२५४. ३ रंग देणें, भरणें; चित्रें काढणें; आकृति; चिन्ह. ४ लेप; माखण; सारवण; लिंपण. [सं.] ०**मात्र**-वि. निरर्थक; तथ्य नसलेलें (पुस्तक लिखाण). म्ह० लिपिमात्र पुस्तक योनिमात्र स्त्री.' ०**लेखन**-न. कारकुनी; लिहिण्याचें काम.

**लिप्त**—वि. १ माखलेलें; सारवलेलें; लेपयुक्त. २ व्यापलेला; पूर्णपणें गुरफटलेला; (संकटांत, अडचणींत) सांपडलेला. ३ दूषित; गुन्ह्यांत सांपडलेला; गुन्ह्याचा आरोप आलेला [सं. लिप्=लिंपणें] **लिप्ताळा**-वि. १ गुन्ह्यांत सांपडलेला; गुन्ह्याचा आरोप आलेला; दूषित; एखाद्या कृत्यांत गोंवला गेलेला, गुरफटलेला. २ ओशाळा; मिंधा; अंकित; अधीन; दुसऱ्यानें केलेल्या उपकारांनीं मिंधा बनलेला; उपकाराच्या ओझ्याखालीं वांकलेला. **लिप्ताळणें**-अक्रि. दूषित होणें; बाधा पावणें; अंगावर येणें, शेकणें; दोषारोप केला जाणें; किटाळ, गुन्हा, आरोप केला जाणें.

**लिप्सा**—स्त्री. लोभ; मिळण्याची इच्छा; आकांक्षा. [सं.] **लिप्सु**-वि. मिळण्याची इच्छा करणारा; आकांक्षी; लोभी; शोधणारा; मिळवूं पहाणारा. [सं.]

**लिफाप-पा-फा**—पु. पत्रवेष्टन; पाकीट; लखोटा; मळपृष्ठ. [अर. लिफाफा]

**लिंब**—पु. १ कडूनिंब. २ बकाणा निंब. [सं. निम्ब; प्रा. लिम्ब किंवा निंब]

**लिंबडथा**—पु. कडूनिंब.

**लिंबन्हाण**—न. नवऱ्या मुलाच्या किंवा नवरीच्या आजीला तांदुळाच्या पिठाच्या लिंबाएवढ्या गोळ्यांनीं व पाण्यानें घालावयाचें स्नान. मुलाला लग्नाआधीं व मुलीला लग्नानंतर वरातीच्या आधीं हें स्नान घालतात. ही चाल हबसाणांत आहे. -मसाप १.११. [लिंब+न्हाण]

**लिबलिबीत**—वि. १ लबलबीत; पाणथळ; पाणेजलेला; फार मऊ. २ बिलबिलीत; अति पिकून मऊ झालेला; थलथलीत. [ध्व.]

**लिंबलोण, लिंबा, लिंबारा, लिंबी, लिंबुनी, लिंबू, लिंबूण, लिंबूर, लिंबोटी, लिंबोणी, लिंबोर, लिंबोळी, लिमचा**—हे सर्व शब्द लोकांच्या बोलण्यांत असले तरी निंबलोण, निंबा इ० शब्दांचीं अशुद्ध रूपें होत. म्हणून निंबलोण इ० पहा. **लिंबू तोंडावर फुटणें**-तोंडावर तजेला, टवटवी येणें; तोंड तेजस्वी दिसणें. ' अलीकडे त्याच्या तोंडावर लिंबू फुटलें आहे जसें कांहीं. '

**लिबा**—वि. १ दुबळा; अशक्त; कमजोर; लेचापेचा. २ सैल किंवा कमजोर बांधणीचा.

**लिबाज**—पु. थाट; ऐश्वर्य. ' मोठ्या लिबाजानें गोरे कँपांत रेसिडेन्ट साहेबांच्या बंगल्यांत । ' -गापो ११८. [अर. लिबास]

**लिबा(भा)रा**—पु. १ निंबाऱ्याहून निराळें, एका जातीचें झाड. २ निंबारा द्राहि अर्थ आहे.

**लिबा(भा)स**—पु. १ वेष; पोशाख; पेहेराव; वस्त्रें; (राजदरबार किंवा समाज यांतील दर्जा दाखविणारा) पोशाख. ' नारीचे दिपले डोळे लिभास पाहून । ' -पला ७९. २ लवाजमा; डौल. [अर. लिबास] **लिबासी**-वि. खोटें; कृत्रिम; बनावट; तकलुबी; कपटानें बनविलेलें. ' हे नक्कल लिबासी आहे ' -रा २०.६२.

**लिमणें**—अक्रि. (गो.) ढुंगण धुणें; गुदप्रक्षालन करणें.

**लिमलेट**—न. लिंबू व साखर यांपासुन केलेली मिठाई. [इं० लेमोनेड]

**लियाकत**—स्त्री. योग्यता; सामर्थ्य. [अर. लायक]

**लिलाम, लिलांव**—पु. १ हराज; हरराजी; जाहीरपणें सर्वांत जास्त किंमत बोलणारास माल विकणें. २ (क.) वरील तऱ्हेनें विकलेला माल. [पोर्तु. निलामु.] ०**दार**-पु. लिलांव करणारा; लिलांव पुकारणारा.

**लिवका**—वि. (कों.) १ लवचीक; लवणारा; वांकणारा; लवका. २ (राजा.) ढिला; सैल; अंगांत बळकटी नसलेला; लिडबिडीत. [लवणें]

**लिवचीक**—वि. लवचीक; ताणला जाणारा; वाकणारा; लवणारा; लवका.

**लिवणं**—न. (कुण.) लिहिणें; विया. **लिवणें**-सक्रि. (कुण.) लिहिणें. [ सं. लिप्. –भाअ १८३४. ]

**लिवलिवणें**—अक्रि. इच्छिणें; इच्छेनें हालणें. वळवळ करणें; चुरचुरणें. 'जीभ फार लिवलिवते आहे.'

**लिवलिवीत**—वि. ताठ नसलेला; लवचीक; मजबूत नसलेला; चिवट; स्थितिस्थापक; मऊ आणि ढिला; मृदु आणि शिथिल.

**लिवा**—पु. जिल्हे. [फा.]–मुसलमानी मुलखांतील मुशाफरी.

**लिव्हणें**—सक्रि. (काव्य) लिहिणें. 'लिव्हलिव्होनि कवण सुरत।'–दावि १८०.

**लिसा**—स्त्री. बारीक कणांची दमट साखर; पिठी साखर.

**लिसाळ**—वि. ढिसाळ; थिलथिलीत; फोफशा.

**लिसेंस**—न. (गो.) परवाना; परवानगी. 'दुकानाचें लिसेंस काढलां मू?' [ इं० लायसेन्स ]

**लिहणें**—सक्रि. (प्र.) लिहिणें पहा. [ सं. लिख् ]

**लिहाज**—पु. छद्मीपणा; लबाडी; फसवेगिरी; ढोंगीपणा. [ फा. ]

**लिहा(इ)जा**—अ. म्हणून. –आदिलशाही फरमानें. [फा.]

**लिहिणें**—सक्रि. १ अक्षरें काढणें; लेखन करणें. २ रचणें; रचना करणें; ग्रंथरचना करणें. ३ चितारणें; चित्रित करणें; आकृति, चित्र काढणें; वेलबुट्टी काढणें. 'पत्रीं लोकत्रयींचे पुरुष लिहिन ते त्वां पहाया बसावें।'–मोकृष्ण ६२.१७.२५३. [ सं. लिख् : प्रा. लिह् ] ०**पुसणें**-न. लेखन,वाचन, हिशोब, इ० विद्या. **लिहिलें पुसलें**-न. १ कायद्याचे किंवा सरकारी कागद; लेख; दस्तऐवज; लेखपत्र सामान्यपणें लेखन. [ लिहिणें द्वि. ] **म्ह०** (गो.) लिहितां पुसतां, चारी दसरां चलयतां (अष्टपैलू मनुष्यास उद्देशून योजितात.) ०**वाचणें**-न. लेखन आणि वाचन. **लिहितांवाचतां येणें**–लेखन-वाचन करतां येणें; लिहिणें वाचणें जाणणें. साक्षर, सुशिक्षित, होणें. **लिहिणावळ**-स्त्री. लिहिण्याची मजुरी; लिहिण्याकरितां दिलेला पैसा. **लिहिता**-वि. लेखक; ग्रंथकर्ता; लिहिणारा. 'जनार्दनची ग्रंथ लिहिता। सत्य सर्वथा हे वाणी।' –एरुस्व १८.८२. **लिही**-स्त्री. लेख; लिपी; शब्दोच्चार. 'जेथ शब्दाची लिही पुसे। तेणेंसीं चावळों बैसे।'–अमृ २.२८. **लिहिलीं**-न.अव. सनदा; लेख. 'अधर्माची अवधी तोडी। दोषांचीं लिहिलीं फाडी। सज्जनाकरवीं गुढी। सुखाची उभवीं।' –ज्ञा ४.५२.

**लिळा**—स्त्री. खेळ; मौज; करमणुकीच्या गोष्टी वगैरे [ सं. लीला ] ०**फिरणें-बदलणें-पालटणें**-अक्रि. (चांगल्यापासून वाईटाकडे किंवा त्याविरुद्ध) वळणें; दिशा–मार्ग बदलणें.

**लिक्षा**—स्त्री. १ लीख; उवेचें अंडें. २ खसखशीचा दाणा. ३ मोहरीच्या दाण्याच्या एकषोडशांश वजनाइतकें परिमाण.

**ली**—स्त्री. लेख. लिही पहा. 'तेवीं हे गोष्टी दिसोन आली। कार्यकारण कर्त्याची बोली। आधीं कर्त्याचिचि जेथें ली पुसिली। तेथें कार्यकारण काइसें।'–स्वादि ८.३.७६. [ सं. लिख् ]

**लीक-ख**—स्त्री. १ उवेचें अंडें. २ रेशीमकांठ इ० रेशमाच्या विणकामांत मध्यें रेशीम घट्ट न भरलें गेल्यामुळें मध्यें मध्यें दिसणारा बारीक पांढरा ठिपका. [ सं. लिक्षा; फ्रेंचजि. लीख ]

**लीची**—स्त्री. एक प्रकारचें फळ. हीं फळें बिहारमध्यें पुष्कळ होतात. लिची पहा.

**लीद**—स्त्री. १ हत्ती, घोडा, उंट, गाढव, इ० ची विष्ठा; घोड्याच्या लेंड्या. २ एक वेल. [ हिं. प्रा. लद्दी; गु. लीद ]

**लीन**—वि. १ मिसळून गेलेला; एकजीव झालेला; गुप्त; लय पावलेला. 'प्रलयीं सर्व प्रपंच ब्रह्मस्वरूपीं लीन होतो.' २ नम्र; आदरशील; सौम्य वृत्तीचा. 'साधूपाशीं लीन व्हावें.' [ सं. ली= भेटणें; चिकटून असणें ] **लीनकरण**-न. (नृत्य) हाताची पताकांजलि करून वक्षःस्थलावर ठेवणें, मान उन्नत करणें, खांदे किंचित् वांकडे करणें.

**लीप**—स्त्री. लिपि पहा. लेखनपद्धति; अक्षरें किंवा वर्ण लिहिण्याची पद्धति; उच्चारांत येणारे निरनिराळे वर्ण कांहीं एक संकेतानुरोधानें रेषा-चिन्हरूप लिहिण्याची पद्धति. [ सं. लिपि ]

**लीला-ळा**—स्त्री. १ क्रीडा; खेळ; कौतुक; मौज; गुण. 'बुझावी हरीं तेचि लीळा वदावी।'–वामन, भामाविलास (नवनीत पृ. ९८). २ सहज घडणारी क्रिया; स्वाभाविक गोष्ट–कृति. 'जयांचिये लीलेमाजीं नीति। जियाली दिसे।'–ज्ञा ९. १९२. ३ (लीलावतार याचा संक्षेप) विष्णूचा अवतार. –क्रिवि. (काव्य) सहज; स्वाभाविकपणें; खेळांतल्याप्रमाणें. 'लीला–कमल घेतां हातीं। कृष्णचरण आठवती।'–एरुस्व ५.६६. [ सं. लीला ] **लीलाधारी**-पु. अवतार घेणारा. ०**चरित्र**-न. सहज केलेला चमत्कार. 'रविकुळीं अवतरला श्रीधर। कैसें केलें लीला–चरित्र।'–रावि १.१०३. ०**मुद्रा**-स्त्री. खेळकर किंवा आनंदी चेहरा (अर्जदाराच्या वकिलाच्या किंवा आशाळू चेहेऱ्याला उद्देशून कुत्सितपणें उपयोगांत आणण्याखेरीज इतर विशेष उपयोग नाहीं). ०**विग्रह**-पु. लीलेनें धारण केलेलें शरीर; भक्तांच्या इच्छा पुरविण्याकरितां देवानें धारण केलेला देह. ०**विग्रही**-पु. लीलेनें देह धारण करणारा; मौजेनें देहधारी झालेला. 'तोचि जाहला जी साकार। लीलाविग्रही श्रीकृष्ण।'–एरुस्व १.२०. **लीलांजन**-न. नीरांजन. [ लीला+अंजन ] **लीलाधारण**-न. **लीलावतार**-पु. लीलेनें धारण केलेला अवतार; विष्णूनें केवळ लीला म्हणून घेतलेला अवतार [ लीला+अवतार ]

**लीलावती**—स्त्री. खेळकर-विलासी स्त्री; चंचल बाई; कामचेष्टा करणारी स्त्री. २ भास्कराचार्यांचा गणितशास्त्रावरील ( त्यांच्या याच नांवाच्या मुलीला उद्देशून लिहिलेला ) सुप्रसिद्ध ग्रंथ.

**लीली**—स्त्री. हिरवें केळें. -कृषि ९०. [ गु. लीलुं=हिरवें ]

**लुकई**—पु ( सोनारी ) गोळा.

**लुकड-डा-ड्या**—वि. कृश; रोड; बारीक; सडपातळ.

**लुकड-ण, लुंकण**—न. चिकटवण; डिंकवण; एक चिकट पदार्थ; दगड, काष्ठ इ० चा सांधा बसविण्याकरितां शेंदूर, राळ, चुना, मेण इ० पदार्थ एकत्र करून तयार केलेला रांधा; रोगण; तकाकी आणण्याकरितां लावावयाचा पदार्थ. २ रांध्याचा केलेला लेप, आवरण; पूट. [ ते. अलुकु=घराची जमीन किंवा कूड शेणकाल्यानें सारवणें अगर ती क्रिया. ]

**लुकलुकणें**—अक्रि १ चकचकणें; चकाकणें; चमकणें; झळकणें. २ टिकटिकणें; ( उजेड ) लहान मोठा होत राहणें; एकसारखा नसणें; लिकलिकणें. ३ ( चेहरा ) तेजस्वी होणें; टवटवीत होणें; तेजःपुंज दिसणें. [सं. लोक्] **लुकलुकी**-स्त्री. १ चकाकी; तेज; चमक; झळक; लकलकी. २ दिव्याचा चंचल प्रकाश; विझत आलेल्या दिव्याचा कमीजास्त होणारा प्रकाश. ३ ( ल. ) मरणसमयींची जीवाची चंचल स्थिति. ४ (चेहरा, फुलें इ० चा) तजेला; टवटवीतपणा; तरतरी; झळकणारी टवटवी. **लुकलुकीत**-वि. १ प्रकाशणारा; चमकणारा; झळकणारा. २ लुकलुक करणारा; जात आलेला; फडफडणारा; चंचल. ( दिव्याचा प्रका. ) ३ चकाकणारे, चमकणारे; तेजस्वी; टवटवीत; तकतकीत. ( डोळे, चेहरा, झाड, इ० ).

**लुकसान**—नस्त्री. १ नुकसान; हानि; तोटा; नाश. २ दुखापत; जखम. -वि. अशक्त; निर्बल; रद्दी; किरकोळ; निःसत्त्व ( प्राणी, पदार्थ ). [नुकसान] **लुकसानी**-स्त्री. १ नुकसान; तोटा; नाश; २ हानि ( प्राणाची किंवा पदार्थाची ) ३ अशक्तता; निर्बलता; निःसत्त्वपणा;

**लुका-क्का**—वि. १ रोडका; कृश; सडपातळ ( माणूस ); मरतुकडा. २ धूर्त; कपटी; लुच्चा; नीच; सोदा. ३ कोणत्याहि कामास गेला असतां तें न करितां रर करीत माघारा येणारा; दैवचातुर्यादि हीन (मनुष्य). [अर. लुक्का] **म्ह०** समुद्रास गेला लुका तो सुका.

**लुकान**—न. कुस्तीचा एक डाव. आपल्या मानेवर जोडीदारानें हात ठेविला असतां त्याच बाजूच्या आपल्या हातानें जोडीदाराची कोपराची लवण आपल्या पंजानें धरून आपला दुसरा हात जोडीदाराच्या मानेवर ठेवून जोडीदाराच्या कोपराच्या लवणींत ठेविलेल्या हातानें त्याचें कोंपर वर झटका देऊन फिरवून जोडीदारास चीत करणें. [ हिं. लुका=हलविणें ]

**लुकुलुकु**—क्रिवि. लुखुलुखु पहा.

**लुक्कड**—वि. अशक्त; किरकोळ; रोड; सडपातळ; कृश. **०पेंच**-पु. कुस्तींतल्या एका पेंचाचें नांव.

**लुक्कण**—न. लुकण पहा. **०पेंच**-पु. कुस्तींतला एक पेंच.

**लुक्णा, लुक्काना**—वि. दडलेला; लपलेला; झांकलेला. [ हिं. लुकाना ]

**लुक्सान**—न. ( प्र. ) नुकसान.

**लुख**—स्त्री. १ उन्हाचा तडाखा; तिरीप ( क्रि० लागणें ). २ ( गरम पाण्याची ) वाफ.

**लुखुलुखु**—क्रिवि. हालणारा; डळमळीत; ढिला; लटपटीत ( खांब, खुंटी, यंत्र, मनुष्य इ० च्या हलु, मंद, निःसत्त्व रीतीचा निदर्शक शब्द); रुटुखुटु; लटपट. (क्रि० हालणें; करणें ).

**लुगट**—न. १ (विशे. मुंबईत रूढ) लुगडें. २ (कों.) मेणकापड; कपडा. **लुगटावुं( वों )णें**-क्रि. ( गो. ) कापडावर वारणिसांतून रंग देणें; मेणकापड तयार करणें; कापड मेणानें मढविणें.

**लुगडें**—न. १ बायकांचें वस्त्र; साधारणतः सोळा हात लांब व दोन हात रुंद कांठपदर असलेलें रंगीत वस्त्र. २ साधारणपणें वस्त्र ( पुरुषाचें सुद्धा ); धोतर; मानाचा पोशाख; कापड. देशमूख पाटील यांना पूर्वी वस्त्रें देत त्यांना लुगडीं ही संज्ञा असे. 'ऐसे ठाकले मंडपातळीं । महापंडित भगवीं लुगडीं । तो बलदेवास म्हणे वनमाळी । कीं हे पांडव वोळखे ।' -कथा ५.१३.१३. 'लुगडीं दिलीं हेजिबाला ।' -ऐपो १३. [ सं. दुकूलम्-दुगुलम्-लुगुडं-लुगडें-भाअ १८३३; गु लुगडुं; सिं. लुगिडो ] **म्ह०** सात लुगडीं शेटें उघडी=विपुलतेचा योग्य उपयोग न करणें; विपुलतेचा उपयोग करितां न येणें. **०खण**-पु. लुगडें फाडून केलेला खण.

**लुंगणें**—अक्रि. १ निर्बल होणें; निःसत्त्व, कमजोर, अशक्त होणें; हालतांचालतां न येण्यासारखी स्थिति होणें. २ त्रस्त होणें; कंटाळणें; दमणें; थकणें. [ लंगणें, लंघणें ]

**लुगदा, लुगदी-घी**—पुस्त्री. मऊ व चिकट पदार्थाचा गोळा; वांटलेल्या, मळलेल्या, तिंबलेल्या पदार्थाचा गोळा;(भांग, कणिक, पाला, ओली माती इ० चा ) गोळा; लगदा.

**लुंगर**—स्त्री. उंबराच्या जातीचें एक मोठें झाड.

**लुगलुगीत**—वि. ओला व मऊ; दमट व मऊ; लिबलिबीत ( लोणी, ओली माती, कणिक इ० ).

**लुंगस**—न. १ खुरटलेलें व बारीक असें ( जोंधळा, बाजरी, गहूं इ० चें ) कणीस. २ ( कपडा, दोरखंडें यांची ) रास; ढीग. ३ कुंचला किंवा इतर केसांची वस्तु यांचीं टोकें; झिजलेलें टोंक; झिजलेला, घासलेला, दगडाचा किंवा लांकडाचा तुकडा. ४ लुंगी पहा.

**लुंगा**—पु. १ ( राळा, नाचणा, राजगिरा इ० ) धान्याचें लहान कणीस. २ शिंगरूं; घोड्याचें पोर. ३ लहंगाबद्दल चुकीचा प्रयोग. [ दे. लुंगा ] **लुंगा, लुंगापुंगा, लुंगासुंगा**-वि. १ बारीक; क्षुद्र, निःसत्व; खुरटलेलें ( धान्याचें कणीस, पीक ). २ (ल.) अशक्त; किरकोळ; सडपातळ; बारीकसारीक; बुटका; गरीब (मनुष्य, प्राणी ). ' शिपाचा ज्यान बत्तीस फेंच । ना लुंगा।' -ऐपो ४२३. ३ सामान्य; हलका; कमी योग्यतेचा.

**लुगाई**—स्त्री. बायको; स्त्री; नारी. ' गुजराथ किंवो हिंदुस्थानापासुनि आणली लुगाई।' -सला ७२. [ हिं. ]

**लुगारणें, लुंगाडणें**—सक्रि. लुटणें; लुबाडणें; नागविणें; फसवून घेणें. **लुगारणी, लुंगाडणी, लुगारा**-स्त्री. लूट; नागवणूक; फसवणूक; लुबाडणें. **लुगारी-रू, लुंगाड्या**-वि. लुटारू; लुटणारा; नागविणारा; पेंढारी; विशेषतः टिपूकडील कानडी पेंढारी किंवा बाजारबुणगे. हे लोक शत्रूकडील लष्करांत लुटालूट करीत. -ख २०९३.

**लुगारी**—स्त्री. लोळण; लोळणें. [ सं. लुंटन ]

**लुगी**—वि. लहान.

**लुंगी**—स्त्री. १ चारपांच हात लांबीचें गडद निळ्या किंवा तांबड्या रंगाचें कमरेभोंवतीं गुंडाळण्याचें मुसलमानांचें लहानसें वस्त्र. २ पंचा; धोतर; अरुंद व लांब कापडाची पट्टी; लंगोटी; नेसण्याचें वस्त्र; काचा; पायजमा; पटका. ३ ( व. ) न्हावी हजामतीचे वेळीं अंगावर केंस पडूं नये म्हणून वापरतो तो कपडा. ४ बाजरीचें नाक; सजगुऱ्याच्या दाण्यावरील बोंड; भूस. 'लुंगी भुस नाहीं कोंडा।' -निगा १०२.

**लुंगू-गूं**—न. १ बाजरी, राळा इ० धान्याचें बारीक लहानसें कणीस. २ लुंगस पहा.

**लुंगूस**—स्त्री. ( व. ) चिंधी. ' टोपींतून आंतली लुंगूस दिसूं लागली तरी अद्यापि तो ती टोपी टाकीत नाहीं.'

**लुंघणें** —अक्रि. थकणें; अशक्त, निर्बल होणें; श्रमणें; दमणें; गळून जाणें; दमून जाणें. [ लंघणें ]

**लुंघणें**—अक्रि. लूट केली जाणें; लुटला जाणें; नासधूस होणें ( मनुष्य, मालमत्ता इ०ची ). **लुंघविणें**-सक्रि. लूट, नासधूस जाळपोळ, नाश करणें; लुटणें; लुबाडणें.

**लुघत**—स्त्री. जीभ; भाषण; भाषा; शब्द; शब्दकोश.

**लुचईपुरी**—स्त्री. पुरीचा एक प्रकार. -गृशि २.३६.

**लुचक**—वि. ( गो. ) लावालावी करणारा.

**लुचक**—पु. (गो ) मोठमोठ्या माशांच्या पोटाला चिकटून त्याला ठार मारणारा एक जीव.

**लु(लुं)चणें**—अक्रि. वासरानें गाईच्या, म्हशीच्या (आपल्या आईच्या ) स्तनांतील दूध पिणें; स्तनपान करणें.

**लु(लुं)चणें**—सक्रि. १ चिमट्यानें केंस उपटणें; केंस काढणें. ' केशश्मश्रु लुंचतां देखा । क्षपणिक तैसे भासती।' -मुआदि ६. ५७. २ तोडणें; फाडणें; ओरबाडणें; उपटणें. ' बरें वाईट हा न म्हणेचि कांहीं । पापपुण्य तेंहि लुंचियेलें।' -निगा २६२. [ सं. लुञ्छ् ]

**लुचपत**—स्त्री. अन्यायाची प्राप्ति; धन्यास न कळवितां चोरून खाल्लेला पैसा; आडमार्गानें मिळविलेला पैसा; लबाडीनें मिळविलेला पैसा; लांच.

**लुचपणें**—अक्रि. लंगडणें; उडत उडत चालणें; [illegible] चालणें; थांबणें; थबकत चालणें. **लुचपत-तां**-क्रिवि. [illegible]; थांबत; थबकत; उडतउडत (क्रि० चालणें; जाणें; करणें ).

**लुचया**—स्त्रीअव. चिरोटे; एक पक्वान्न. ' फेण्या खाजी करंजी मृदुतर लुचया शर्करेमाजि घोळी।' -किंसुदाम ३४.

**लुचर**—स्त्री. (राजा.) ( आंबा इ० फळांमध्यें असणारे ) तंतूचें जाळें; रेषा.

**लुचलुचणें**—सक्रि. पंजांत धरून ओढणें; नखांनीं ओरबडून घेणें; पंजांत धरून फाडून घेणें.

**लुचाडणें**—सक्रि. लबाडणें; दुसऱ्याची वस्तु बळजबरीनें हस्तगत करणें; बुचाडणें; लुटणें; नागविणें. ' दिवाणाचे शिपाई, काजीचे शिपाई वगैरेंनीं तीं वांगीं लुच्चाडून घेतलीं.' -तीप्र ८७. **लुचाडणी, लुचाडणूक**-स्त्री. लूट; लुबाडणें; लुटारूपणा; नागवणूक.

**लुचाबुचा, लुचाभुंडा, लुचामुंडा**—वि. उघडा; अलंकारविरहित; नेहमीं असणाऱ्या दागिन्यांविरहित.

**लुंचाय, लुच्चेपण**—न. ( गो. ) लुच्चेपणा; लबाडी.

**लुंचित**—वि. टकल्या; डोक्यावर केंस नसलेला. ' लुंचित नागिवा उघडा।' -दावि १६८. [ सं. लुञ्च्; म. लुंचणें ]

**लुची**—वि. रुचिकर अन्न खाणारी ( जीभ ). [ सं. रुचित-लुचिअ-लुची-भाअ १८३४. ]

**लुचुमुचु**—क्रिवि. (गो.) खालींवर; वरखालीं. ' मजो जींव लुचुमुचु जाता.' [ ध्व. ]

**लुचूपुचू**—क्रिवि. अस्पष्ट; असेंतसें; भलतें सलतें. ' तेथें कांहीं लुचूपुचू बोलणं नाहीं.' -मोर २३.

**लुचौचें**—क्रि. ( गो. ) लुचणें; दूध पिणें; स्तनपान करणें.

**लुच्चा**—वि. लबाड; सोदा; असभ्य कर्म करणारा; ठक; कुकर्मी; दुराचारी; दुष्ट; दुर्व्यसनी; बदफैली. [ हिं; सं. लुञ्च, दूर नेणें; चोरणें; लुञ्चक-लुच्चअ-लुच्चा; राजवाडे ग्रंथमाला; फा. लुवा=व्यसनी, बदफैली ] **लुच्चाई, लुच्चेगिरी, लुच्चेपणा (पु.) लुच्चेशाई**-स्त्री. धूर्तता; ठकबाजी; लबाडी; सोदेगिरी; लुच्चे लोकांचा व्यवहार; लबाडीची वागणूक.

लुंझा—वि. ( ना. ) ढिला; सैल.

लुटकण-न-र, लुटकणें—लुडकण, लुडकणें पहा.

लुटणें—सक्रि. १ अपहार करणें; लुबाडणें; लूट करणें; नुकसान करणें; नाश करणें; नागविणें; धन हरण करणें; बळजबरीनें किंवा कायद्याच्या जोरावर एखाद्याला किंवा एखाद्याची वस्तु हरण करून नेणें. २ एखाद्याला जिंकणें; त्याचें सर्वस्व हरण करणें. 'भक्ति बळेंचि पहा हो परमेश्वर आजि अर्जुनें लुटिला।' —मोउद्योग. १ [ सं. लुंटन; लुट्=चोरणें ] लुटविणें-सक्रि. १ लुटणेंचें प्रयोजक रूप. २ ( लुटण्यास परवानगी देणें. ) अरभक्कम ( लुटून नेल्याप्रमाणें ) देणें; अतिशय देणें. लुटवैया-पु. चोर; लुटारू; उधळ्या. [ हिं. ] लुटा-पु. लुटारू. 'कोठें केंचे आले लुटे। वायां झाले टाळकुटे।' ( रामदास मूर्खपंचक ( नवनीत पृ. १५८ ). लुटाऊ-वि. लुटून आणलेला; लुबाडलेला; लुटीचा. लुटार-न. १ लुटारू लोकांची टोळी. २ लुटारू लोकांची जात-वर्ग; लुटारू लोक. लुटारा-री-रू-वि. लुटणारा; लुबाडणारा; दरोडा घालणारा. 'गांवोगांवचे आले लुटारी। तीं धरून घेऊन जाती।'—ऐपो २५९. लुटालूट-स्त्री. सर्वत्र चाललेला लुटण्याचा प्रकार. सार्वत्रिक लूट; नाश; जाळपोळ इ०

लुंटणें—अक्रि. लोळणें; लोळण घेणें. लोटांगण घालणें. 'तेयां श्री चक्रधराचा चरणकमळीं लुंटतुसें।'—शिशु ५. [ सं. लुट्= लोळणें ]

लुटपु(फु)ट—स्त्री. ( मुलें, वासरें, खारी, उंदीर इ०ची ) धांवपळ; बागडणें; उड्या मारणें; धडपड. [ ध्व. ]

लुटपुट—स्त्री. भरगच्ची; अति विपुलता; भरमसाटपणा. 'दागिन्यांत खुप लुटपुट झाली लवली कर्दळी जशी।'—पला ४.३९. [ लुट द्वि. ]

लुटपुट—वि. थोड; अपुरें; क्षुद्र; बारीकसें; वरवरचें; कमी महत्त्वाचें ( काम ). —क्रिवि. पळभरांत; झटपट; हां हां म्हणतां. लुटपुटणें-अक्रि. खिळखिळी होणें; सैल होणें; कमजोर होणें; फुटणें. 'प्रभाकर गाइ बुट, अपरूप अजुसुट, सारी जुट लुटपुटली।' —प्रला ११२. [ लटपटणें ]

लुटपुटीचा—वि. लटपटीचा; खोटा; नकली. ( लहान मुलांचा खेळ ). लुटुपुटु-फुटु-बुटु-मुटु-फुटयां-वि. (लहान मुलांच्या खेळांत उपयोग. ) लटका; कल्पित; खोटा, खरोखरीचा नव्हे असा; मानलेला; फक्त बतावणी केलेला; कल्पिलेला. लुटुपुटुचा-फुटूचा-बुटूचा-मुटूचा-बुटयांचा-वि. खोटा; कल्पित; मानलेला.

लुटलुट-टु, लुटुलुटु—क्रिवि. चटपट; चुटचुट; झपझप अवळ अवळ परंतु हलके टाकलेल्या पावलांच्या आवाजाचा दर्शक शब्द. [ ध्व. ]

लुटलुटीत—वि. मध्यम लठ्ठ, पुष्ट, ठेंगणें, वाटोळें असें परंतु जड व सुस्त नव्हे असें ( शरीर, शरीरावयव अगर मनुष्य ). [ध्व.]

लुटुलुटु—क्रिवि. लुटलुट पहा.

लुंठणें—अक्रि. १ लोळणें. 'तरंग सर्वांगीं तोय चुंबी। प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं। नाना अवकाश नभीं। लुंठतु जैसा।'—ज्ञा १८.११४८. २ लोटांगण घालणें. 'देखिलिये वस्तु उजू लुंठिती। मीचि म्हणोनि।'—ज्ञा ९.२२२. [ सं. लुठ्=लोळणें ] लुंठन-न. लोळण.

लुंठन-ण—न. १ लूट; चोरी; लुबाडणें. २ नासधूस; नुकसान. झाड, वेल इ० ची पानें, फुलें, फळें वगैरे सर्व तोडून टाकणें. [ सं. लुंटन ]

लुंड, लुंडुक, लुंडो—न. ( गो. ) डोकें नसलेलें शरीर; धड; कबंध. [ सं. रुंड ]

लुडकण-न-र—क्रिवि. झटकन्, झपकन्, पडणें; लुडकणें, निजणें, लवंडणें. इ० क्रिया झटकन् होतांना होणाऱ्या आवाजाचें अनुकरण करून. [ ध्व. ]

लुडकणें, लुडगणें—अक्रि. १ आडवें होणें; हळूच निजणें. २ वरून हळूच पडणें; लवंडून पडणें; कोसळणें. ३ एखाद्याकडे प्रेमानें ओढला जाणें. [ ध्व. ] लुडक्या-वि. अडखळणारा; पडणारा; धडपडणारा; पडण्यासारखा.

लुडगी—स्त्री. १ भांगेचा केलेला एक प्रकार. २ झोकांडी; हेलकावा. ( क्रि० खाणें; जाणें ).

लुडतें—न. नकसगाराचें एक हत्यार.

लुडथावणें—अक्रि. लोळणें; उलटेंपालटें होणें.

लुडया—वि. १ ( राजा. ) बोबडा ( माणूस, मूल ). २ वर्णोच्चार करण्यास असमर्थ (जीभ, ओठ, कंठ इ०). ३ अस्पष्ट किंवा बोबडें; स्पष्ट वर्णोच्चार न करितां बोललेलें ( भाषण, शब्द, अक्षर. ). ४ लुडबुडया; ढवळाढवळ करणारा; नसते उपद्व्याप करणारा. लुडबेपणा-पु. बोबडेपणा.

लुडबुड—स्त्री. १ दुसऱ्यानें बोलाविलें नसतां त्याच्या कामांत पडणें; दुसऱ्याला मदत करण्याकरितां त्याच्या कामांत केलेली ढवळाढवळ; चाललेल्या कामांत उगाच केलेली गडबड. २ एखाद्याला मूल इ०नीं केलेली किरकोळ मदत. लुडबुडणें-अक्रि. १ दुसऱ्याला त्याच्या कामांत मदत करूं लागणें; गडबड करणें; लुडबुड करणें; ढवळाढवळ करणें; ज्या योगें दुसऱ्याला अडथळा होईल अशी मदत करणें; विनाकारण दुसऱ्याच्या कामांत गढून जाणें. २ इकडून तिकडे आणि तिकडून इकडे असे हेलपाटे घालणें किंवा खाणें. 'द्राविडो लुडबुडाम्यहम्।' लुडबुडत पडणें-एखाद्याच्या मार्गांत पडणें; दुसऱ्याला अडथळा उत्पन्न होईल अशा रीतीनें निष्कारण त्याच्या कामांत असणें किंवा मदत

करणें. **लुडबुड्या**-वि. १ दुसऱ्यानें बोलाविलें नसतांना त्याला मदत करून त्रास देणारा; लुडबुड करणारा; लुडबुडणारा; पुढें पुढें करणारा; उपदेश किंवा मदत करण्याच्या ऐटीनें विनाकारण चुकीच्या मार्गानें कामांत पडणारा. २ ढवळाढवळ करणारा; लुडबुड करणारा. 'शौर्यें निर्दय, आर्जवें लुडबुड्या कीं दीन सद्भाषणीं ।' -वामन, स्फुटश्लोक १६ (नवनीत पृ. १३५). म्ह० 'लांडें लुडबुडें आणि नाचे पुढंपुढें.'

**लुडमा**—वि. १ आंखुड; तोकडा; लांडा (हात, पाय, बोट इ०). २ आंखूड किंवा लांडा हात, पाय इ० कोणताहि अवयव असलेला. ३ लुडबुड्या.

**लुंडमुंड**—वि. निश्चेष्ट पडलेला; कासावीस.

**लुडवा**—वि. हस्तपादरहित; थोटा व पांगा. 'प्रसुतिसमयीं आडवा आला । शस्त्रें छेदुनि लुडवा केला ।' -अमृत १६.

**लुंडा**—वि. लुळा; पंगु; थोटा; पांगळा. 'शास्त्राचा केला लुंडा । तोंडीं पाडियेला धोंडा ।' -तुगा ३१८१.

**लुडाखुडा**—वि. १ थकलेला; अशक्त; म्हातारा. २ जरठ; मोडकळीस आलेला; सरासरी काम चालावयाजोगा; मोडका (नांगर, गाडा इ०) ३ लोळा-गोळा; फाटका तुटका. [लुला+खुडा]

**लुडाबुच्चा**—वि. भुंडा; बोडका; उघडाबोडका; खांद्या, पानें इ० नीं विरहित असा (वृक्ष). **लुंडाभुंडा**-वि. रिकामा; मोकळा; (बांगडया इ०नीं) विहीन. 'हातांतल्या बांगडया फुटून ते लुंडेभुंडे दिसले.' -अस्तंभा ६०. [लांडा+भुंडा] **लुंडी**-वि. लुटलेली. 'अशी दुनिया लुंडी ।' -विवि ८.८.१५७.

**लुडी**—स्त्री. (गो.) हुशारी.

**लुढावणें**—सक्रि. धुडकावणें; उधळून देणें; उलटापालटा करणें. 'मान भिडावून देति लुढावून टोपीवाले नाहीं गणती ।' -ऐपो २५३. [सं. लुंठनम्; हिं. लुंढाना]

**लुढिया**—पु. १ भांग घोटण्याचा दगड; विशिष्ट आकाराचा बरवंटा. 'गंगाकिनारीं ह्या लुढियानें छानलेल्या विश्वेश्वराच्या प्रसादाची लज्जत औरच आहे.' -भाऊ २१. २ भांग घोटणारा माणूस. [हिं.]

**लुतकरी**—स्त्री. लक्तरी; चिंधी; लुगडें, धोतर बंडी इ० फाटून त्याची लोंबत असलेली चिंधी; चिरफळी. [फा.]

**लुतफ, लुत्फ**—स्त्री. मेहेरबानी; कृपा. 'यापासी येऊन... याचे म्हणवल्यानें लुतफ नाहीं.' -पेद ६.१९०. [अर. लुत्फ्] **लुत(थ)फी, लुफ्ती, लुत्फी**-वि. कृपेनें दिलेला; दत्त.

**लुतरा, लुत्रा**—वि. १ लपळ; बडबड्या; गप्पीदास. २ निंदक; चुगलखोर; लुबरा; चहाडखोर; पाठीमागें निंदा करणारा; चोंबडा; खोडसाळ. 'ही काय सांगे लुतरी कुत्री वसवस करती सदां ।' -पला ८४. [हिं. फा. लुत्रा] **लुतरापन**-न. खोडसाळपणा.

**लुती**—स्त्री. १ त्वचेला होणारा रोग; लूत; कोड; कुष्ट. 'तेसा नवहीं द्वारें स्रवती । आणि देहाची लुती जिती ।' -ज्ञा १३.७३१. २ (व.) ओकारी; उलटी. ३ जननेंद्रिय; शिश्न. 'दोन्हीं अंड झडो तुझी लुति गळो दुर्गंध हो मंदधी ।' -कीर्तन १.८२. **लुतिजणें**-सक्रि. गलत्कुष्ठ व्याधीनें युक्त होणें; त्वचारोग होणें.

**लुतूफुतू करप**—क्रि. (गो.) कानगोष्टी करणें.

**लुंधळणें**—अक्रि. (व.) घुटमळणें; एखाद्याच्या मागें फिरणें.

**लुपोनी**—अ. (महानु.) लपून. 'लुपोनि राहिला माजिवाऱ्याथारा । जंघद्वई ।' -ऋ ८९. [सं. लुप्]

**लुप्त**—वि. १ लोपलेला. २ लपलेला; अदृश्य झालेला. ३ रद्द पडलेला. ४ वहिवाटींतून गेलेला. ५ लिहितांना किंवा बोलतांना गळालेला. ६ विसर पडलेला; विस्मरणांत सांपडलेला. [सं.] ०प्राय-वि. बहुतेक लुप्त झालेला; लुप्त झाल्यासारखा. **लुप्तोपमा**-स्त्री. (साहित्य) उपमा ह्या अलंकाराचीं उपमेय, उपमान, साधारण धर्म, आणि उपमावाचक शब्द अशीं जीं चार स्पष्ट अंगें त्यांपैकीं एक किंवा अधिक अंगें ज्या उपमेंत नसतात तिला लुप्तोपमा म्हणतात. हिच्या उलट पूर्णोपमा. लुप्तोपमा आठ प्रकारची आहे-उपमान, उपमेय, धर्म, धर्मवाचक, धर्मोपमान, धर्मोपमेय, धर्मोपमानवाचक, धर्मोपमेयवाचक. यांपैकीं कोणतेंहि एक लुप्त असते.

**लुबकणें**—अक्रि. १ एखाद्या पदार्थासाठीं टपून किंवा वाट पहात बसणें; आशा धरून बसणें. 'उंदरासाठीं मांजर मघांपासून येथें लुबकून बसलें आहे.' २ चिकटणें. [सं. लुभ्]

**लुबडो**—वि. (गो.) वोवडें बोलणारा.

**लुबरा, लुब्रा**—वि. १ कारणावांचून मध्यें तोंड घालून बोलणारा; दुसऱ्यांनीं विचारिलें नसतां त्यांना उपदेश करावयास जाऊन किंवा आपलें मत सांगू जाऊन उपद्रव देणारा; लुडबुड्या; ढवळाढवळ करणारा. २ तोंडपुजा; चोंबडा. 'मला जरि म्हणाल बा तरि विशंक लुब्रा म्हणा ।' -केका ७२. [ध्व.]

**लुबलुब**—स्त्री. वटवट; बडबड; कंटाळवाणें भाषण; टुरटुरणें; मुलाचें भराभर बोलणें. [ध्व.] **लुबलुब-बां**-क्रिवि. १ लुबरेपणानें; पुन्हां पुन्हां मध्यें तोंड घालून; मध्यें तोंड घालून (दुसऱ्याचें बोलणें थांबविण्याकरितां रागानें उपयोगांत आणतात). 'चार वेळां तुला बोलूं नको म्हणून सांगितलें तरी मारक्यानें लुबलुबां बोलतोस.' २ शेळी इ० नीं मचमचां खाणें याचें अनुकरण करून (क्रि० खाणें). भराभर परंतु

हळवीं पावलें टाकून चालण्याच्या ध्वनीचें अनुकरणकरून ( क्रि० चालणें ). जोराची दंगल अगर वडवड दाखविणारा शब्द. ( क्रि० करणें ). लुबलुबणें-अक्रि. हलणें; लवलवणें.

लुबाडणें—सक्रि. हरण करणें; लुटणें; नागविणें; लुंगारणें; दुसऱ्याची वस्तु त्याच्या इच्छेविरुद्ध, त्याची परवानगी नसतां उपटणें. लुबाडणी-स्त्री. लूट; लुबाडणूक; नागवणूक.

लुंबी—स्त्री. लोंबी; लोंगर; लोंबट; लोंब; घोंस; कणीस.

लुबुधका—स्त्री. पारध. [ सं. लुब्धक ]

लुब्ध—वि १ आसक्त; आशा असलेला; आशाळू. २ लोभावलेला; लोभी; लोभाविष्ट. ३ उत्कटतेनें कांहीं पदार्थ इच्छिणारा. ४ मोहित; लोलुप. 'जो अनुसरेल इंद्रियमदा। लुब्ध होऊनियां स्वादा।' -ज्ञा ३.१०३. [ सं. लुभ्=लोभ धरणें. ]

लुब्धक—पु. १ पारधी; शिकारी. २ लोभी. ३ रांडबाज वेश्यालंपट. ४ गुदद्वार. ५ ( ज्योतिष ) बृहल्लुब्धक ह्या तारकापुंजांतील पहिल्या प्रतीचा तारा; मृग नक्षत्राजवळील व्याध हा तारा. लुब्धणें-अक्रि. ( काव्य ) लोभ सुटणें; एखाद्या वस्तूची अनावर इच्छा होणें; एखाद्या वस्तूविषयीं मोहित होणें; भुलणें 'भरज्वानीमधीं मस्त तुझा भर नौतिची बाहारी। पाहून लुब्धलों तुसी आतां किती दिवस चाळविसी नटधारी।' -होला ८९. [ सं. लुभ् ]

लुब्रा, लुभरा, लुभ्रा—वि. लुबरा पहा.

लुमणा, लुमणें—स्त्रीन. रुमणी-णें इ० पहा. नांगराचा दांडा.

लुमणें—न. लोढणें ( विशेषतः लाक्षणिक अर्थे ) पहा.

लुलपणें, लुलणें—अक्रि. ( काव्य महानु. ) लोभ धरणें; आसक्त होणें; भुलणें; लोभानें आकृष्ट होणें; एखाद्या वस्तूकडे प्रेमानें ओढलें जाणें. 'सदां इंद्रियार्थादिकांतें लुलावें ।' -उपदेश चाळिशी ६. [ सं. लोलुप ]

लुला—वि. १ जन्मतः किंवा रोगादि कारणांमुळें व्यंग, अशक्त झालेला; पंगु; ताठपणा नसलेला; ढिला; लोंबत असलेला ( हात, पाय, मनुष्य, प्राणी इ० ). 'हातानें, पायानें किंवा जिभेनें तो लुला आहे.' २ अशक्त; कमजोर; निर्जीव. ३ म्हातारपणामुळें किंवा अन्य कारणामुळें आपलें कर्तव्य करावयाला असमर्थ. ४ अपूर्ण; सदोष. ५ यथास्थित न चालणारा. 'माझी बायको मेल्यापासून माझा संसार लुला पडला.' [ सं. लोल्=हलणारा ] ०पांगळा-वि. हात किंवा पाय लुला असलेला; अशक्त; कमजोर; निरुपयोगी; व्यंग असलेला. लुलावणें-अक्रि. १ ( हात, पाय, इ० गात्र ) अशक्त होणें; आपआपलें कर्तव्य करावयाला असमर्थ होणें; लुला होणें; पंगु होणें. २ अशक्त किंवा कमजोर होणें. ३ ( कों. ) दुसऱ्याच्या कारभारांत लुडबुड करून त्याला उपद्रवकारक होणें. [ लुला ] लुलित-वि. १ खिळखिळें झालेलें. २ चिरडलेलें; कुसकरलेलें; कोमेजलेलें. ३ रेंगाळणारा; कंपायमान; लोंबणारा. ४ ढवळलेलें.

लुलाय—पु. रेडा; टोणगा; महिष. 'यायां मज यश लोकां सुख गृध्रां तो लुलाय मांस मरे ।' -मोभीष्म १.४८. [ सं. ] ०वाहन-पु. यम.

लुलु—स्त्री. लालूच; लोभ. 'लुलु न धरावी देहातीत व्हावें।' -दावि ३९.

लुलुपत, लुलुपतू, लुलुपुतू, लुलुपुतू—स्त्री. मनधरणी; हांजी हांजी; आर्जव; एखाद्याला वश करून घेण्यासाठीं त्याला दादाबाबा करणें. 'बराडी-पणानें त्याची लुलुपत। न करी तो विरक्त गुरुवर्य।' -दावि २१०.

लुलुपु(ब)टी, लुलुमिठी—स्त्री आतुरता; उत्कट इच्छा; लालसा; लोभ. 'कृष्णरूपीं पडे मिठी। होत लुलुबटी डोळयां।' -एभा १.२९०.

लुलुवाना—पु. ( व. ) भिकारी; दरिद्री; दीन; दुबळा. 'लुलुवान्यासारखा फिरतो.'

लुल्ल—वि. गुल्ल; झिंगलेला; दारूचा कैफ चढलेला.

लुवलुवणें—अक्रि. १ अंगावर उवा, मुंग्या, किडे इ० अतिशय चढणें, चालणें व त्यामुळें खाज सुटून त्रास होणें. २ बोलण्याकरितां जीभ वळवळणें; बोलण्याची जिभेला खाज सुटणें. 'मी आतां अगदीं बोलणार नाहीं असें म्हणतों पण प्रसंग आला म्हणजे जीभ लुवलुवत्ये, राहवत नाहीं.' [ ध्व. ]

लुवुंक—क्रिवि. ( गो. ) कापण्याला; कापणी करावयास. 'शेत लुवुंक गेल्यांत.' लुंवणी-स्त्री. ( गो. ) शेतकापणी; लाणी. [ सं. लु=कापणें ]

लुस—वि. लुसलुशीत. 'हें वालुक कोवळें लुस आहे.'

लुसलुशी-सी—स्त्री. ( फळें, झाडें, चेहरा इ० वरील ) टवटवी; तजेला; ताजेपणा; तेजस्विता; पक्वतेचें तेज; पूर्णतेची झळक. लुसलुशीत-वि. मऊ; टवटवीत; अतिशय कोंवळा; स्वच्छ व तजेलदार; कोंवळेपणामुळें टवटवी, मृदुत्व आलेलें ( फळ, पर्ण, अंकुर, शरीरावयव इ० ). लुसलुशीतपणा-पु. लुसलुशी पहा. लुसलुसणें-अक्रि. टवटवीत असणें; तजेलदार असणें, दिसणें. लुसकान-नी—लुकसान, नुकसानी पहा.

लुसलुस—स्त्री. उत्सुकता; उत्कट इच्छा; इच्छेची उसळी; प्रबळ इच्छा. [ ध्व ] लुसलुसणें, लुसलुस करणें-अतिशय उत्कंठित होणें. लुसलुस, लुसुलुसु-क्रिवि. उत्कट इच्छेनें; इच्छेच्या उसळीनें; उत्सुकतेनें.

लुसणें—सक्रि. ( महानु. ) लुटणें; आकर्षणें; ओढून घेणें. 'मज निद्रिस्थातें खाणोरियें। लुसौनि नेति।' -ऋ ५५.

लुह, लूक—स्त्री. झळ. [ हिं. ]

**लुहंगी, लुहांगी, लुहांगीकाठी**—लोहंगी इ० पहा.

**लुळणें**—अक्रि. ( काव्य ) लोळणें; लोळण घेणें. ' ऋद्धि-सिद्धि पाय- । धुळीमाजीं लुळती सर्वदा । '

**लुळलुळीत**—वि. लुसलुशीत; कोमल; मृदु; लवचीक; हुळ-हुळीत; सत्त्वाच्या कमीपणानें मृदु ( जीभ, अति पिकलेलें फळ, नुसतें मांस ).

**लुळा**—वि. लुला पहा. ०**खुडा**—वि. म्हातारा आणि अशक्त; जीर्ण आणि निकामी; फुटलेला तुटलेला ( मनुष्य; प्राणी, गाडी, पदार्थ ). ०**खुळा**—वि. शरीरानें व मनानें पंगु; अशक्त; निर्वीर्य; खुळा ( लुळा खुडा या अर्थीहि हा शब्द चुकीनें वापरतात ).

**लुळी, लोळी**—स्त्री. १ ( कों. ) श्रम, झोंप, थकवा इ० मुळें मूल, माणूस, पशु यांना होणारी लोळण्याची इच्छा. ( क्रि० येणें ). लोळण; उन्हाळ्यामुळें येणारी सुस्ती; लोळण्याची इच्छा; पेंग. २ ( महानु. ) गुंडाळी, गांठ. ' जाणिवेयांची लुळी झळा-ळिली। ' -शिशु ४३.

**लुळें**—न. बाजारबुणगें; हलक्या सलक्या लोकांचा समु-दाय; वात्रट, टवाळ, मवाली लोकांचा समुदाय, दाटी; दुकान-दार, गिऱ्हाईक, सट्टेबाज लोक इ० ची गर्दी; तमाशा, मारामारी, भांडण इ० चाललें असतां गोळा झालेली दाटी.

**लू, लूक-ख**—स्त्री. उन्हाचा तडाखा; तीव्र झळ; उष्ण हवा; उष्ण वारा. [ हिं. लूक ]

**लूं**—न. लोंकर; बारीक केंस; लव. ' त्याची आयाळ जाड असून पोटाखालीं केसाळ असें पांढरें लू असतें. ' [ सं. लोम ]

**लूट**—स्त्री १. लुटण्याची क्रिया. २ लुटण्यानें मिळालेलें जें कांहीं तें; लुटून आणिलेलें द्रव्य इ० ३ सढळपणानें केलेला खर्च ( गरिबांना घातलेलें जेवण, दिलेलें दान इ० ). ४ विपुलता; समृद्धि; लयलूट; भरमसाटपणा. [ लुटणें ] ०**मारणें**—लूट करणें; लुटणें. ०**फाट-फूट-लबाड**—स्त्री. लूट; लुबाडणी; नासधूस. ' शत्रूच्या मुलखांतून लूटफाट करून विजयी होऊन आलेलें सैन्य...'-स्वप. ३६. [ लूट द्वि. ]

**लूड**—स्त्री. शेतांत करावयाचा राब. (दाढ.) -बदलापूर २८३.

**लूत**—स्त्री. १ मनुष्य, कुत्रा इ० प्राण्यांस होत असतो तो एक प्रकारचा त्वचारोग. २ सुरणाच्या झाडासारखें एक औषधो-पयोगी झाड. याच्या फुलानां शेवाळें म्हणतात.

**लूता**—पु. कोळी; कांतीण. ' बहुधा बद्ध करीलचि लूतेचें जिष्णुवारणा सूत । ' -मोविराट ४.३६.

**लूनिया**—पु. मीठ पिकविणारा वाणी. [ सं. लवण; हिं. ]

**लूव**—स्त्री. ( गो. ) प्रबल इच्छा; रुचीची परमावधि.

**ले**—( ग्रा. ) चतुर्थीचा प्रत्यय; ला. उदा० रामाले.

**लेइणें, लेणें**—सक्रि. धारण करणें; घालणें; धरणें; नेसणें. ' आपुलेनि सुकुमारपणें । हे न ले परागाचें लेणें ।' -शिशु ६९०. [ हिं. ]

**लें( ले )क**—पु. १ मुलगा; पुत्र. २ पादपूरणार्थक बुवा इ० अर्थी उपयोग. ' आतां तिकडे जाणार तरी कोण लेक. ' -मृ ४४. ३ हीनतादर्शक, तुच्छता, तिरस्कार अगर निंदाव्यंजक शब्द. 'म्हणती अहारे नपुंसका । ऐसें राज्य सोडुनी लेका । भीक मागणें वरियेलें । ' -नव १८.२५. -स्त्री. मुलगी; कन्या. ' म्हणे तुझी होइन मीच लेकी । ' -सारुह २.२५. **म्ह०** लेकी बोले सुने लागे. ०( **पु** )**पूत-वाळ**-पु.न. मुलगा; मूल; मुलगा किंवा मुलगी. ( सामा. ) मूलबाळ; मूलबाळ. ०**वळा**-पु. राखेचा मुलगा; रांडेचा मुलगा; स्वस्त्री वांचून इतर स्त्रीचे ठिकाणीं झालेली संतति: दासीपुत्र. ०**पिता**-पु. बाप; पिता. **लेकाचा-लेको**-पु. निंदा किंवा तिरस्कारदर्शक शब्द. ' कसा लेकाचा कार्याला जुंपला आहे. ' -नाकु ३.५५.

**लें( ले )करूं**—न. मूल; बालक; बाळ. ( पुत्र किंवा कन्या या अर्थी. ) ' तरी सकृप बाप तूं म्हणसि नायके लेंकरूं । '-केका ९२. **लेकरालेकरीं, लेंकुरालेंकुरीं**-क्रिवि. १ वाडवडिलां-पासून ( चालत असलेलें वतन, हक्क, इ० ); मुलापासुन त्याच्या मुलाकडे अशा क्रमानें; वंशपरंपरेनें. २ मुलांत; मुलांशीं; मुलांमध्यें इ० [ लेकरूं द्वि. ] ०**बाळ, लेकरेंबाळें**-न एव.अव. मुलेंबाळें; लहान मुलें; मुलेंबिलें; कुटुंबांतील लहानमोठीं मुलें ( सामान्यत्वें-करून. ) **लेंकुरडा**-वि. लहानसा; पोरकट. ' न्हाण आलें शोभेना अंगाचा बांधा लेकुरडा । ' -प्रला ९९. **लेंकुरछंद**-पु. १ मुलांत मिसळण्याचा छंद, हौस, आवड; मुलांचा शोक; लहान मुलांसारखें वागण्याचा स्वभाव. ' अरे तूं एवढा मोठा झालास तरी लेंकुरछंद टाकीत नाहींस. ' २ पोरकटपणाचा नाद; बालिश हट्ट. ' आई-बापावांचून मुलाचे लेंकुरछंद दुसरा कोण पुरवील? ' **लेंकुरपण-पणा**-नपु. १ बाल्यावस्था; शैशवावस्था. २ पोरपणा; बालि-शता. **लेंकुरवा**-वि. ( राजा. ) पोरकट; बालिश; लहानसा. **लेकुरवाला-ळा**-वि. १ मुलेंबाळें असलेला. 'लेकुरवाळी बाईल म्हणतें आतां याला झोंका । ' -मध्व. २ ज्याला आडवे कोंब किंवा बारीक फाटे आहेत असें ( हळकुंड ). **लेंकुरसमजूत**-स्त्री. पोरबुद्धि; लहान मुलाचें ज्ञान. **लेंकुरस्वभाव**-पु. पोर-स्वभाव; बालिशपणा; लहान मुलाचा स्वभाव. [ लेंकरूं+स्वभाव ]

**लेकि( की )न**—अ. पण; परंतु; शिवाय. [ फा. लेकिन्; अर. लाकिन् ]

**लेख**—पु. देव. ' गुरुपुत्र हा तूं न समान लेखीं । जयाचा असे फारसा मान लेखीं । ' -वामन, विराट ७.१२३. **लेखर्षि**-पु. देवर्षि; नारद. -हंको.

**लेख**—पु. १ जें लिहिलें किंवा लिहिण्यांत आलें तें; अक्षर. 'नाना त्रुटितां लेख। पुसिले जैसें।' –अमृ ७.७०. २ दस्तऐवज; लिहिलेला कागद. ३ गणना; हिशेब; मोजदाद. 'थेंबीं घडे ये लेख।' –अमृ ५.९. ४ प्रतिग्रा; आकार; तुलना; पर्वा. 'खांडे थोवेकारू असमसाहु। एरां लेख नाहीं।' –शिशु १०२२. ५ प्रत्यय; पारणें. 'औचिता करौनि भरा। मग लेखा येईल।' –शिशु ६९६. ६ –न. एक, दोन इ० जे पाडे मुलें शिकतात तेंप्रत्येक. [सं. लिख्=लिहिणें] ०निबद्ध–वि. लेखांत नमूद केलेलें ०पत्र–पढा–पूस–न पु. देणें घेणें इ० व्यवहार करतांना उभयपक्षांना किंवा एका पक्षाला बंधनकारक ताकीदपत्र, दस्तऐवज, कर्जखत, सनद, इ० लेख केलेला असतो तो. 'साहेब लोकांचे सरकारकामांत जे लेखपूस होतात ते समग्र छापून लोकांस कळण्याकरितां प्रसिद्ध करीत जावे.' –इनाम १२६. ०प्रमाण–न. लेखी पुरावा; लिखित आधार, प्रमाण; प्रमाण मानलेला दस्तऐवज. **लेखांक**–पु. लेखाचा विभाग; एखाद्या मोठ्या लेखाच्या पाडलेल्या भागांपैकीं प्रत्येक. [लेख+अंक] **लेखादेवी**–स्त्री. कर्जखत. **लेखापुढीं**–क्रिवि. लिहिण्यांत; लेखामध्यें; लिहून टाकून (तोंडातोंडी नव्हे असें). **लेखावेगळा**–वि असंख्य; मोजतां न येणारा; अगणित. 'नाना दृष्टीचे उमाळे। उठती लेखावेगळे।' –अमृ ७.१४३ **लेखी**–वि. लिहिलेला.

**लेखक, लेखिक**—पु. १ लिहिणारा; नकला करणारा; कारकून; लिहिण्यावर उपजीविका करणारा. २ स्वतंत्रपणें चित्र, ग्रंथ इ० रचणारा. ३ (सांकेतिक) कारभारी; कारकून. 'नाना फडणवीस तेथील निखालसता लेखकमुखें...दिसून आल्यावर.' –ख २०८९. [सं.] ०प्रमाद–पु लिहिणाराची (ग्रंथकर्त्याची नव्हे) चूक; हस्तदोष; नकलणाराची चूक. **लेखकी**–स्त्री. लेखकाचा धंदा; लेखकाचें काम; कारकुनी. –वि. कारकुनानें लिहिलेला; लेखकानें लिहिलेला.

**लेखणी-नी, लेखण**—स्त्री. १ शाईनें कागद इ० वर लिहिण्याचें बोरू, कांबटी इ०चें केलेलें साधन; कलम. २ (व.) दगडी पेन्सिल. [सं. लेखनी] **लेखणीस चंग बांधणें**–सुंदर लिहिण्याचा धंदा करणें; उत्तम, वळणदार अक्षर लिहिणें. **लेखण्या करणें**–१ तुकडे करणें. २ (सैन्याच्या) तुकड्या पाडणें. ३ ठार मारणें. ०हांक्या–वि. कसें तरी आणि कांहीं तरी लिहिणारा; वाटेल तें लिहिणारा; विचार न करितां लिहिणारा; मूर्ख संपादक. 'हे सूक्ष्म भेद डोकें एकीकडे तर लेखणी एकीकडे अशी जेथें स्थिति आहे तेथील लेखणीहांक्यांच्या लक्षांत कसे येणार?' –टिले ३.२९७. **लेखणीचा धड-पुरा-बहादर**–पु. अति उत्तम लेखक; लेखनकलेंत निष्णात; कलमबहादर; कुशल लेखक; लिहितांना न चुकणारा, वळणदार लिहिणारा.

**लेखणें**—सक्रि. १ मानणें; समजणें; गणणें. 'मग संक्षुब्धौर्वानळदर्शन जालें असेंचि लेखाल।' –मोकर्ण २.११. २ पर्वा करणें; चाहणें; आदर करणें. 'न गणावा गरुडहि मग लेखावा काय हो मशकतातें।' –मोभीष्म १.२५. ३ लिहिणें. 'निश्चेष्ट कृष्ण केले मेलेसे लेखिलेचि लेखगणें।' –मोकर्ण ३५.२२. ४ विचार करणें. 'पैं गा भक्तीचेनि नांवें। फूल मज एक द्यावें। तें लेखें तरि म्यां तुरंबावें। परि मुखींचि घालीं।' –ज्ञा ९.३८४. [सं. लिख्]

**लेखन-ण**—न. १ लिहिणें. २ लिहिण्याची धाटणी; शैली. ३ जें लिहिलें तें. ४ चित्र, नकाशा इ० काढणें किंवा रेखादिकांनीं निर्मिणें. [सं. लेखन] ०कला–स्त्री. लिहिण्याची कला. ०प्रशस्ति–स्त्री. श्रीशिवाजी महाराजांच्या आज्ञेवरून सरकारी कागदपत्रें लिहिण्याचे ठराविक मायने वगैरे पद्धति बाळाजी आवजी चिटणीस यांनीं तयार केली ती. ०सीमा–स्त्री. पत्राचा शेवट; मजकुराची अखेरी. यापुढें दुसरा मजकूर येत नाहीं. पेशवाईत हा एक शिक्का होता. ०स्वातंत्र्य–न. वर्तमानपत्रांतून लेख लिहिण्याचें स्वातंत्र्य. (इं.) लिबर्टी ऑफ् प्रेस. **लेखनाडंबर**–न. १ पुष्कळ लिहिणें; लेख-विस्तार. २ लांबलचक पत्र इ० लिहून वाचणारास त्रास देणें किंवा आपल्या लेखनपटुत्वाची ऐट मिरविणें. पत्र इ०चा शेवट करतांना पुढील प्रमाणें हा शब्द योजतात. उदा० कळावें ही विज्ञप्ति, लेखनाडंबर कशास पाहिजे? '**लेखनीय, लेख्य**–वि. १ लिहिण्यास योग्य, लिहिण्याजोगा. २ खिजगणतींतील. 'पार्था नवल हें पाहीं। जेथ स्वर्गसुख लेखनीय नाहीं। तेथ ऋद्धिसिद्धि कायी। प्राकृता होती।' –ज्ञा २.३६५. **लेख्यमूर्ति**–स्त्री. कागदावर किंवा कापडावर काढलेली मूर्ति.

**लेखा**—पु. १ हिशेब; गणती; मोजणी. 'जाती लवपळ घटिका काळ लेखा करितो।' –दत्तपदें पृ ५५. २ पर्वा; खिजगणती; पाड; किंमत. 'म्हणउनि करणाचा हा असे आजि लेखा।' –सारुह ७.१६८. ३ लिखितप्रमाण; दस्तऐवज. 'त्यांचें त्यांस द्याल धन। काळांतरीं ओपिल्या प्राण। तुज देतील लेखा करून। फाडीवाडी हरतपीं।' –मुसभा १४ १२५. [लेख]

**लेखित**—वि. लिहिलेलें. [सं.]

**लेखीं**—क्रिवि. १ (व.) मतानें. 'माझ्यालेखीं तो मेला.' २ तऱ्हेनें; परीनें; सारखें. 'कोण लेखीं मोक्षाला मिटावें। तेथें' –दावि ९५५.

**लेंगडलेंगड**—स्त्री. पिरपीर.

**लेगुटी**—स्त्री. (खा. भिल्ली.) लंगोटी.

**लेंगो**—पु. (गो.) खेकड्याचा पाय.

**लेचणें**—अक्रि. खचणें; दबणें; नमणें; दबकणें; बांक येणें.

**लेचापे(फे)चा**—वि. अशक्त; कमजोर; निर्वीर्य; निर्बल; निःसत्त्व; कच्चा; दुर्बळ. स्थैर्य, शक्ति, सत्त्व इ०चा अभाव असलेला. ' लेच्यापेचांच्या नादीं बायका लागत नसतात. ' –सवतीमत्सर ५४.

**लेंची**—स्त्री. एक प्रकारचें झाड.

**लेजणें**—सक्रि. घालला जाणें; धारण केला जाणें. ' कां हीर कंकण न लेजति वायकांहीं । ' –आमु ५८. [ लेणें ]

**लेजीम**—स्त्रीन. लांकडाच्या दांडयाच्या दोन टोकांना धातूच्या चकत्या ओंवलेली सांखळी वसवून व्यायामासाठीं केलेलें एक धनुष्याकृति साधन. [ फा. लेझम् ]

**लेंझा**—वि. ( व. ) ढिला; मेंगळा; सैल; ताठपणा नमलेला. ' असा लेंझा कारभार काय कामाचा ? ' ' उशी जरा लेंझी भरली गेली. '

**लेटणें**—अक्रि. पडणें; लोटणें; पसरणें; निजणें; विश्रांति इ० साठीं जमिनीवर आडवें अंग करणें. [ सं. लुट्; हिं. लेटना ]

**लेटी**—स्त्री. ( व. ) हातग्याचें झाड; अगस्त्याचें झाड.

**लेटीस**—स्त्री. एक भाजी. हिचे दोन प्रकार. –क्याबेज व कास. [ इं. ]

**लेंड**—स्त्रीपु. १ दोन या अर्थाची विटीदांडूच्या खेळांतली संज्ञा. २ विटीचा एक प्रकारचा टोला. विटीचें एक टोंक हातांत धरून व दुसरें जमिनीकडे करून ती खालीं सोडून जमिनीवर पडण्यापूर्वी मधल्यामध्येंच तिच्यावर टोला मारून ती फेकणें. –मखेपु १८. [ ते. रेंड्डु ]

**लेंड**—न. लेंडूक; विष्ठेचा लहान गोळा ( मनुष्य, कुत्रा, मांजर इ०च्या ). **म्ह०** ( गो. ) एकाच लेंडाचे तुकडे, एक परमाळतलो नी एक घाणतलो. **लेंडतुखास येणें**–आपलें आवडतें मूल इ०चें प्रेम करतां करतां अत्यंत तल्लीन होऊन देहभान विसरणें.

**लेंडओ(वो)हळ, लेंडि, लेंडिया**—स्त्रीपु. लहान ओघळ; लहान ओढा; पऱ्हा. ' गांवींचे होते लेंडवोहळ । गंगेसि मिळतां गंगाजळ । ' –व्यं ३४. **लेंडकी**–स्त्री. चरकांतून पिळून काढलेला ऊंस; चिपाड. **लेंडक्या, लेंडकवळ्या, लेंडूकवळ्या**–पु एकदां चरकांतून पिळून निघालेलें कांडें पुन्हां चरकांत लावणारा. **लेंडपटाऱ्या**–वि. ( व. ) बेशरम; निर्लज्ज. ' त्याला एकदां घालवून दिलें होतें तरी तो लेंडपटाऱ्यासारखा त्यांच्या घरीं गेलाच. ' **लेंडपेंड**–पुन. दागदागिने; नटण्याच्या उपयोगाचे जिन्नस. [ लेंड द्वि. ]

**लेडकटर**—पु. ( छाप. ) शिशाच्या पट्या कापण्याचें यंत्र. [ इं. ]

**लेंडसणें**—सक्रि. ( ना. ) एखाद्याची कणीक तिंबणें; एखाद्याला बेदम मार देणें.

**लेंडा**—पु. ( व. ) घोडयाच्या खोगीरास असलेला शेपटीखालून घेण्याचा पट्टा किंवा दोरी.

**लेंडा(ढा)र**—न. लटांबर; प्रवासांत बरोबर न्यावयाची भरपूर व त्रासदायक मुलेंमाणसें, गुरेंढोरें, सामानसुमान इ०

**लेंडारगी**—पु. ( कु. ) गिधाड.

**लेंडावर्त**—पु. घोडयाच्या दाढेखालीं असणारा केंसांचा भोंवरा. हें अशुभ लक्षण मानतात.

**लेंडि-डी, लेंडिया**—स्त्रीपु लेंडओहळ पहा. नाला; ओहळ; पऱ्हा. ' लेंडिये आला लोंढा । न मनी वाळुवेचा वरवंडा । ' –ज्ञा १३.६९३.

**लेंडी**—स्त्री. एक झाड. याच्या दोन जाती:–काळी व पांढरी. या झाडाचीं पानें उंबराच्या पानासारखीं असतात.

**लेंडी**—स्त्री. १ ( शेळी, उंट, बकरा, घोडा, घूस, उंदीर इ०ची ) विष्ठेची लहान गोळी. २ मळाचा जमलेला खडा; लेंड. ३ घोडयाचें खोगीर पुढें सरकूं नये म्हणून जो शेपटीच्या खालून घातलेला पट्टा त्याला बांधितात तो. ४ खोगिरास पुढच्या अंगास असणारा घोरबंद. ५ वांझोट्या अगर नर जातीच्या ताडाला शेंगेसारखा एक अवयव येतो तो. ६ एकेरी मखमलीचें फूल. [ लेंड ] **लेंडया गाळणें-टाकणें-हगणें**–भयानें गर्भगळित होणें; भीतीनें गाळण उडणें; फार घाबरणें; भिणें. **०खत**–न. बकऱ्यामेंढयाचें खत. **०टयाक**–स्त्री. ( अशिष्ट ) धनधान्याची समृद्धि; चंगळ; भरभराट. **०तलाव**–पु. ( व. ) गांवांतून घाण पाणी वाहून बनलेला तलाव. **०पिंपळी**–स्त्री. उंदराच्या लेंडीच्या आकाराची एक शेंग. ही औषधी आहे. **०प्रसाद**–पु. चाबूक किंवा छडी मारतांच हगणारा घोडा; वाईट घोडा. **लेंडयाताड**–पु. फळ न येतां नुसत्या लेंडयाच येतात असा ताड; नर ताड. **लेंडुरी**–स्त्री. लेंडीनाला; फक्त पावसाळ्यांत वाहणारा ओढा. **लेंडूक**–न. मनुष्य, कुत्रा इ०ची केळ्याच्या आकारासारखी पडलेली विष्ठा. **लेंडार-रा-रें**–न लेंडयांचा समुदाय; लेंडया; ' लेंडोरा आगीं धूमावधि । कां अपाना आंगीं दुर्गंधि । ' –ज्ञा १८.६८५.

**लेंडी**—स्त्री. पांघरण्याचें लोंकरीचें वस्त्र. [ सिं. ]

**लेडीस हॅमर**—स्त्री. ( चांभारी ) एक प्रकारची हातोडी. [ इं० लेडीज हॅमर ]

**लेंडूकवळ्या**—वि. लेंडक्या पहा.

**लेंडूर**—न. ( मुलांचें ) लेंढार पहा. **०लागणें**–पुष्कळ मुलं होणें.

**लड्या**—पु ( व. ) एक शिवी.

**लेढ**—न. (व.) १ रेत; वीर्य. २ एक शिवी. ०**पाडणें**—सक्त मेहनत करून घेणें. 'खूप लेढ पाडलं त्यानं तेव्हां इतके पैसे दिले.'

**लेंढार**—न. टोळी; समुदाय; कळप. लेंडार पहा. 'हाक वेती येक वेळे। सहस्रार्जुन पारधी खेळे। मग लेंढारें निघालें। सकळ सैन्य।' –कालिका २२.२०. [ हिं. लेंढा ]

**लेण**—स्त्री. रेघ; ओळ; रेषा. [ इं. लाईन. ]

**लेणदेण**—स्त्रीन. देणेंघेणें; देवघेव; देण्याघेण्याचा व्यवहार. [ म. लेणें+ देणें; गु. ]

**लेणारत**—न. ब्राह्मणांत बोडणाचे वेळीं करण्यांत येणारें कणकेचें पाटयाऱ्या आकाराचें सिंहासन व वरवंटयाच्या आकाराचा लोड. –बदलापूर २१९.

**लेणें, लेइणें**—सक्रि. १ डोळयांत (काजळ) घालणें; कपाळावर (कुंकू) लावणें; अंगावर यथास्थानीं (दागिने) घालणें; धारण करणें. 'पौष्य भूपाळ पत्नी । दिव्य कुंडलें लेइली कर्णी।' –मुआदि २.८५. २ (काव्य.) (वस्त्र) नेसणें; परिधान करणें; धारण करणें. 'वस्त्रें सुंदर भूषणें उभयतां लेती नवीं नित्यहो।' –उमाविलास पृ. ६. भूतकाळीं ह्या क्रियापदाचा कर्तरिप्रयोग होतो. उदा० पीतांबर परिधान। लेइली अलंकार भूषण।' –एरुस्व ५.२०. ३ घेणें. **लेणार-रा**-पु. धारण करणारा; घालणारा. 'कृष्ण असे गोरसचोर। महाकपटी अकर्मी जार। हाच काय मणि लेणार। जाहला थोर अवघ्यांत।' –ह २९.२८. **लेता**-पु. धारण करणारा; लेणार पहा. **लेणें**-न. १ शरीराला शोभा देणारा कोणताहि पदार्थ-दागिना, कुंकु, काजळ इ० 'मग रायें तयां लेणियांचें वृत्त पुसिलें।' –पंच १.३५. २ चैत्र महिन्यांत गौरीच्या उत्सवांत भिंतीवर गोपुर इ०चें जें चित्र काढतात तें; मंगळागौरीच्या वेळीं देवीला वाहण्याचे कणिकेचे अलंकार. ३ पांडवकृत्य; डोंगर पोखरून त्यांत सभामंडप, देवादिकांच्या मूर्ती इ० कोरून तयार केलेली गुहा; कोरीव लेणें. उदा. कार्ल्याचें लेणें, वेरूळचें लेणें. [ सं. लेपन-लयण-लेणें. किंवा लेपन-लेवन लेणें; रत्न-लयन-लेणें; प्रा. लेण ] **लेणेपण**-न. अलंकारदशा-अवस्था. 'मुकुटकुंडलें करकंकणें। न घडितां सोनें सोनेंपण। त्याचीं करितां नाना भूषणें। लेणेपणें उणें नव्हेचि हेम।' –एभा २८.२६३.

**लेथडणें**—सक्रि. शेण, माती, खरकटें इ०नीं (भांडें, अंग इ०) माखणें; लिप्त करणें; चोपडणें; लिडबिडणें. [ सं. लिप् ] **लेथडणी**-स्त्री. लेप; माखण; चोपडण; लिडबिडाट.

**लेप**—पु. खाडीमध्यें सांपडणाऱ्या काळया पाठीचा व पांढऱ्या पोटाचा एका जातीचा मासा.

**लेप**—पु. १ सारवण; माखण. २ अंगाला लावण्याची चंदन इ०ची उटी. ३ चुना, चिखल इ०चा भिंत इ०वर केलेला गिलावा. ४ भिंत इ०वरील रंगानें किंवा चुना इ०नीं काढलेलें किंवा लिंपलेलें चित्र. 'निर्जीव लेप हार गिळिला।' –शनि ३६५. 'लेपाचां देउळीं न बैसावें।' –सूत्रपाठ ४०. ५ भात, भाजी इ०चा हात, भांडें इ०ना चिकटून राहिलेला अंश; खरकटें. ६ बाधा; दोष; विटाळ; मळ; बाह्यात्काराची संलग्नता. 'जेथ न संचरे पुण्यपाप। जें सूक्ष्म अति निष्कंप। गुणत्रयादि लेप। न लगति जेथ।' –ज्ञा २.२३६. ७ रंग; वरचा रंग; मुलामा. 'तें आनंदचित्रींचे लेप।' –ज्ञा ६.२५६. ८ ओढा; सारवण; ओढा घालण्याचें द्रव्य; दुखणारें किंवा ठणकणारें गात्र इ०वर झाडाचीं पानें इ०चा बांधण्याचा ठेंचा. [ सं. लिप् = लिंपणें; लावणें ] **लेपटणें, लेपणें**—सक्रि. १ लेप देणें; माखणें; ओढा घालणें. २ लिंपणें; लिंपून आकृति तयार करणें. 'तेथें हंसमयूर कोकिळा। नाना प्रकारचे लेपिले।' –शनि १३२. ३ एखाद्या पदार्थाचा दुसऱ्यास लेप लागणें; दोष लागणें; स्पर्श होणें. 'विहिन भंगाचा कर्दम। तुज लेपला नाहीं कीं।' –मुमभा ३.४. **लेपन**-न. १ ओढा घालणें; लिंपणें; लेप देणें. २ लेप देण्याचा पदार्थ. **लेपवणी**-न. १ खरकटीं भांडीं, हात इ० धुतलेलें अन्नांशयुक्त पाणी. २ (कु.) गुरांना द्यावयाचें पाणी; पेज वगैरे मिश्रित कदान्न. **लेपवळ**—न. (राजा) खरकटें; जेवण झाल्यानंतर ताटांत राहिलेले अन्नाचे अवशेष; खरकटयाचा पसारा. **लेपाटा**-पु. औषध, चिखल इ०चा वेडावांकडा व जाडा लेप; ओढा. (क्रि० लावणें; देणें). **लेपाळणें**-सक्रि. लेप लावणें; माखणें. **लेपाळा**-पु. भांडीं, हात इ०वर तेल, तूप इ०चा जमलेला थर. (क्रि० बसणें; लागणें; जमणें; दाटणें). –वि. १ लेप देण्यास योग्य; लिंपण्याजोगा; लेप देण्यास जरूर असलेला. **लेप्य**-न. चित्र. 'जैसें सप्तरंग भरोनि जाण। लेप्य काढिलें चिताऱ्यानें।' –कथासारामृत ७.४२. –वि. लिंपलेला; लिंपून तयार केलेला. 'लेप्या लेख्या ज्या मूर्ति जाण। त्यांसि करावें ना स्नान। इतरां मूर्तीसि स्नपन। यथाविधान करावें।' –एभा २७.१२२.

**ले(लें)प**—पुन. आंथरण्यापांघरण्याच्या उपयोगी असें कापूस भरून केलेलें वस्त्र; रजई; दुलई. **ले(लें)पडी**-स्त्री. बसण्याची किंवा आंथरावयाची दुलई; आंथरण्याची लहान गादी. **लेपडीची टोपी**-स्त्री. लेपाची खोळ. (चहादाणीतील चहा थंड होऊं नये म्हणून त्यावर घालण्याची). **ले(लें)पडें**-न. हलक्या जातीचा लेप; बारीकसा व वाईट असा लेप.

**लेपसट**—वि. (ना.) लेचापेचा; शिळपट; स्त्रैण.

**लेपाटी**—स्त्री. विशिष्ट प्रकारचें नळकांडें; टाकर लोकांचें पांखराच्या शिकारीचें एक साधन. –बदलापूर १७६.

**लेफ**—नपु. एक प्रकारचा मासा. लेप पहा.

**लेफडा**—पु. (कों.) सारवणाचा पट्टा किंवा रेघ; वांकडा तिकडा पट्टा. ' सुरेख चांगलें कपाळीं गंध लावावें तो लेफडा काय लावला आहेस ? ' [लेप]

**लेबक**—पु. (व.) पुत्र; मुलगा.

**लेंबटा**—वि. (गो.) आशाखोर.

**लेब(भ)डा, ले(लें)भळा**—वि. १ नेभळा; ' (पोशाखांत, बागणुकींत); दुबळ; नेभळट. २ अस्ताव्यत; अव्यवस्थित; घाणेरडा (मनुष्य, पोशाख.) (लेभडा शब्द फक्त घाणेरडा या अर्थानेंच योजतात).

**लेंभड**—स्त्री. (कों.) रोडकेपणा; कृशता; क्षीणता; बारीकपणा; अशक्तपणा. **लेंभडणें, लेंभणें**-अक्रि. (कों.) १ क्षीण होणें; रोडावणें; वाळणें. २ (आजार, उपवास अगर श्रम यांनीं) गळून जाणें; दमणें; लंघणें; अशक्त होणें.

**लेभागू**—वि. उचल्या; एखादी वस्तु घेऊन पळणारा. [हिं. लेना+भागना]

**लेभाशा, लेंभाळ्या**—वि. (वना.) नेभळट; पुळचट; कुचकामाचा; अशक्त ' लेभाशा माणूस शेतकीच्या काय कामाचा ? '

**लेभें**—न वाद; तंटा; झोंबड; खटलें; लडथड; लढा; खरकटें.

**लेलाम, लेलांव**—न. लिलांव पहा. ०**दार**-पु. लिलांव बोलणारा, पुकारणारा.

**लेलिहमुद्रा**—स्त्री. चौसष्ट हजार तंत्रमुद्रांपैकीं एक. ही मुद्रा अशी:- उजवा तळहात डाव्या उलट्या हातावर धरावा व बोटें नागाच्या जबड्याच्या उघडमिटीप्रमाणें खालींवर करावीं.

**लेलूत**—स्त्री. उसने आणणें व परत न करणें. [सिं.]

**लेलेमजनू**—पु. गरीब, कींव करण्यास योग्य, भितरामाणूस. **लेले मजूर**-पु (व.) अशक्तपणामुळें काम करण्यास असमर्थ मनुष्य. ' आपण पाहिला तर लेलेमजूर, दुसऱ्यावर अवलंबून. ' [लैलामज्नून या प्रेमी जोडप्याचें जें शिमग्यांत सोंग आणतात त्यांत यांचें उच्च प्रेम न दाखवितां कांहीं तरी विकृत स्वरूपांत अत्यंत शेळपट असा मज्नू दाखविला जातो यावरून रूढ.]

**लेवचें, लेवप**—क्रि. (गो.) चाटणें. **लेंवड्डो**-पु (गो.) हात चाटणारा; भांडें चाटणारा.

**लेवट**—न. (कों.) मैथुनार्थ संयुक्त झालेलें जोडपें.

**लेवट**—पु. (राजा.) भाजावळीकरतां गोवरी, कवळ, जाडें गवत इ० पसरल्यानंतर त्यावर जें फार बारीक गवत किंवा भातेणाचा चुरा पसरतात तो. [लेवा]

**लेवट**—नपु जाड व मजबूत असा कापसाचा पदार्थ. [लेप]

**लेवठावचें**—क्रि. (गो) देतों म्हणून न देणें.

**लेवणा-णू**—वि. (नंदभाषा.) तीनचतुर्थांश; पाऊण.

**लेवणें**—न. (कों.) लेवट पहा. भाजावळी करतां कवळावर घालावयाचें बारीक गवत. -सक्रि. भाजावळीकरतां कवळावर गवत, काटक्या इ० पसरणें. **लेवणी**-स्त्री. कवळावर गवत, काटक्या, माती इ० टाकण्याची क्रिया.

**लेवदेव, लेवादेवा, लेवादेवी**—स्त्रीपु.स्त्री. देवघेव; व्यवहार; व्यापार धंदा; उदीम; घेणें देणें. [लेंगेंदेणें; गु.]

**लेववणें**—सक्रि. चढविणें; घालणें; धारण करविणें. ' लेवविलीं पांचपुडी आंगलीं । ' -शिशु ९१. [सं. लेपन]

**लेवा**—पु. लेप; लेपन; गिलावा; पुट; लिंपण. ' जैसे लेवे दिधेल तमा । काजळाचे । ' -ज्ञा १६.३९०. [लेप]

**लेवाडा-ड्या**—वि. कृश दिसत नसतां तितकी शक्ति नसलेला; मजबूत बांध्याचा नसल्यामुळें अशक्त; कमजोर; ढिला.

**लेश**—पु. १ अल्प अंश; सूक्ष्म भाग; कण. ' जें जें अत्यंत सुंदर दिसे । तें तें कृष्णाचेनी लेशें । ' -एरुस्व १७०. २ शेष; अवशिष्ट भाग. ' करी तेथें भस्म लेशु । ' -अमृ ३.२६.

**लेश-स**—वि. एकादें काम करण्यास तयार; तत्पर; हुषार.

**लेश(स)पंड, लेसट**—न. त्रासदायक होणारी अनिश्चित गोष्ट; घोंटाळ्यांत पाडणारी गोष्ट; त्रास, अडचण; लचांड; लिगाड. लांझा पहा.

**लेषावळी**—स्त्री. लेखावळी; मोजदाद; गणती. ' नृपती नाहीं लेषावळी । ' -उषा ८.७१. [लेख+आवली]

**लेस**—वि. तयार; उत्कृष्ट सामान वगैरे भरपूर तयारीनें असलेला; लेशमात्रहि न्यूनता नाहीं अशा तयारीचा. ' छऱ्यांच्या थैल्या लेस करून ठेविल्या आहेत. ' -ख ४३०९.

**लेस**—स्त्री. १ किनार; फीत; जाळीदार फीत; जोडावयाचे कांठ; बुटाचे बंद. २ (चांभारी) गिरणींतील तुटलेला पट्टा शिवण्याकरितां काढलेलें सल. [इं.] ०**दार**-वि लेस लाविलेला; जाळीदार फीत जोडलेला. ' अंगांत लेसदार ब्लाऊज असून... ' -हाकांध १०७.

**लेंस**—पु. (गो.) हातरुमाल.

**लेसट**—न. १ (भांड्याला अगर हाताला) चिकटून राहिलेला तेल, तूप इ० पदार्थाचा अंश. २ अपूर्णता; उणेपणा; कमीपणा; कमतरता (इ० अर्थी कारभार, व्यवहार, काम, बोलणें इ० शब्दांना जोडून योजतात.) ३ लेशपंड पहा.

**लेसन**—न. धडा; शिकविण्याचा पाठ. ' याचें वीतभर लेसन तर त्याचें हातभर. ' -ब्रावि १७१. [इं.]

**लेसन, लैसन**—न. परवाना; परवानगी; मंजुरी. [इं. लायसेन्स]

**लेसां**—क्रिवि. तयारीनें; बऱ्या रीतीनें; जपून. ' मग प्रमेयाचिया गांवा। लेसां जाइजे । ' -ज्ञा ७.२०९. [लेस]

[वसणें+करू प्रत्यय] **वसता**-वि. १ वस्तीचा; लोक असलेला. -एभा ३.६७९. 'वाटती दशदिशा उदासा। वसतें गोकुळ वाटे ओसा।'-ह २१.१३. २ राहणारा. 'स्वानंद वैकुंठीं सदा वसता। तुझें ऐश्वर्य स्वभावता।'-एभा २१.१. **वसति-ती**-स्त्री. १ रहिवास; मुक्काम. २ राहण्याची जागा, ठिकाण; निवास. **वसतिगृह**-न. १ निवासस्थान; घर. २ (विद्यार्थी, पांथस्थ इ० करितां) राहण्याजेवण्याची जागा; भोजननिवासगृह; खाणावळ. (इं.) होस्टेल. **वसविणें**-उक्रि. १ स्थापन करणें; रचणें. २ वस्ती करविणें. ३ नेऊन ठेवणें. 'वसिष्ठपुत्र एकशत गुणी। जेणें वसविले कृतांतभुवनीं।'-मुआदि १५.१२२. ४ ठेवणें; देणें. 'त्याचि चारी भुजा शोभती। आयुधें वसविलीं हातीं।'-एरुस्व १.४६. ५ वसति करणें, राहणें, प्रत जाणें. 'तेणें वसविलें स्वर्गा लय। आतां कवणा पुसावें।'-जै १२.१०६. **वसिन्नणें**-वसणें पहा. -मुआदि ५.१११; -ह २६.१७७.

**वसणें**—उक्रि. कांहीं धार्मिक व्रत आचरणें (विशेषतः बायकांनीं). 'मंगळागौरी पांच वर्षे वसावी लागते.' [सं. उप+आस्-उपासना; वसा]

**वसंत**—पु. १ एक ऋतु; चैत्र आणि वैशाख या दोन मासांचा किंवा मीन आणि मेष या दोन संक्रांतींचा काळ. 'हा वसंत म्हणजे सृष्टिसतीची करमणूक नुसती।'-टिक. २ या ऋतूची अधिष्ठात्री देवता. 'सुखकर वसंत सरसावला, किं कोकिला करि गायनाला।' ३ (संगीत) एक राग. यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, तीव्र मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात; जाति संपूर्ण-संपूर्ण. वादी तार षड्ज, संवादी पंचम. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर व वसंत ऋतूंत सार्वकालिक. याचे आणखी दोन प्रकार आहेत. एकांत आरोहांत पंचम वर्ज्य ठेवतात व दुसऱ्यांत पंचम वर्ज्य करून कोमल धैवताच्या जागीं तीव्र धैवत घेतात. 'वसंत पावक पद्म सुरंग। नीलांबर राग वाजवित।'-ह १०.११७. ४ आर्यवैद्यकांतील एक औषध; सुवर्ण मालिनीवसंत. [सं.] ०**खेळणें**-रंग खेळणें. 'जें सिंहासनीं राजत्व जोडे। तें वसंत खेळतां न मोडे।'-एभा १३.७०१. ०**ऋतु**-पु. वसंत अर्थ १ पहा. ०**कुमार-कुसुमाकर**-पु. एक औषधी रसायन. अनेक भस्में, फुलें, चंदन इ० पासून हा तयार होतो. सर्व रोगांचा यानें नाश होतो.-योर १.५९६. ०**तिलका**-स्त्री. एक वृत्त. याच्या प्रत्येक चरणांत १४ अक्षरें असतात व त, भ, ज, ज, ग, ग असे गण असतात. उदा० 'जो मानसीं विहरतो विहरो परी तो।' ०**पंचमी**-स्त्री. माघ शुद्ध ५. ०**पूजा**-स्त्री. वसंतऋतूंत वसंतमाधवाप्रीत्यर्थ समारंभपूर्वक जी ब्राह्मणांची पूजा करतात ती; मंत्रजागर. ०**माधव**-पु. वसंताची अधिष्ठात्री देवता; विष्णु. ०**मुखारी**-पु. (संगीत) एक राग. या रागांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण-संपूर्ण. वादी धैवत संवादी ऋषभ. गानसमय प्रातःकाळ. **वसंताचें बोलणें**-न. नुसतें गोड, मिटास भाषण; भारून टाकणारें, फुसलावीचें वचन. 'त्याचें बोलणें म्हणजे वसंताचें बोलणें, मधुर किती म्हणून सांगू!' **वसंतारंभपात**-पु. उत्तरायणपात पहा. **वसंती**-वि. वसंता (ऋतु-रागा) संबंधी.

**वसद**—न. (राजा. कुण.) औषध. (-अव.) वसदां. [सं. औषध अप.]

**वसन**—न. १ कापड; वस्त्र. २ कपडा; प्रावरण; चिरगूट. 'कै उत्तम प्रावर्णें। कै वसनें तीं जीर्णें।'-तुगा २७१७. ३ राहण्याचें ठिकाण; जागा; घर. [सं.] ०**ग्रंथि**-पु. लग्नांत नवरानवरीच्या वस्त्रांना दिलेली गांठ; वस्त्राची गांठ. ०**भूषण-णें**-नअव. कपडे व अलंकार; पोषाख; दागीने. 'वसनेंभूषणें सावरून। चापाकडे चालिला रावण।'-राचि ८.७२.

**वसन**—शअ. १ मतानें; मतें. २ पासुन; कडून. [पासुन, पासने अप.?]

**वसनपुजा**—स्त्री. (अप.) वसंतपूजा पहा.

**वसनवात**—स्त्री. (प्र.) उसनवार. 'गांवगन्ना बाकी सालगुदस्तांची वसनवात सरकारची राहिली असेल ...'-वाडसमा १.१६१.

**वसनावणें**—(व.) वसणणें पहा.

**वसपय**—स्त्री. (कु.) सावली; काळोख. [वसवा]

**वसमरणें-मारणें**—अक्रि.उक्रि. (प्र.) वस्मरणें पहा.

**वसर, वसरणें, वसरी**—ओसर, ओसरणें इ० पहा.

**वसला**—पु. १ जमीन मोजणीच्या सोयीसाठीं शेताचे, जागेचे जे तुकडे पाडतात ते प्रत्येक. 'वसले म्हणजे ऐक साचार। जैसा जैसा भूमीप्रकार। तुकडे योजीती पैमायषदार। जेणें मोजणी पुरी होय।'-पैमा ६.१४. २ (सामा.) कोणत्याहि जमीनीचा तुकडा; प्लॉट. ३ (चांगलें वस्त्र इ० चा) धडपा; तुकडा; रखट; चिंधी. (बहुधा अव. प्रयोग). (क्रि० करणें; उडवणें) [अर. वसली= तुकडा]

**वसलात-द**—स्त्री. आनुवंशिक स्वभाव, गुण; वंशांतील, घराण्यांतील एक विशिष्ट चिन्ह, प्रकृति. [अर. वस्ल्]

**वसली-ल्या**—वि. वसूल करण्यासाठीं ठेवलेला (शिपाई, इ०). [वसुल]

**वसवटा**—पु. वास्तव्य; वसणूक; वसति. 'पवनाचिया नेटा। सर्वेंद्रियां वसवटा।'-सिसं ३२. [वसणें]

**वसवस-वसां**—क्रिवि. ओरडण्याच्या, चिडून बोलण्याच्या, तुसडेपणाच्या उत्तराच्या आवाजाचें अनुकरण करून; वसकन. (क्रि० बोलणें; अंगावर येणें). 'पुसो जातां वसवस। वक्ता करी।'-दा

१८.५.६. वसवसणें-अक्रि. ओरडणें; दरडावून, रागानें बोलणें; अंगावर येणें. -एभा ११.१३७४. 'अवली तयासी देखोनि नयनीं। वसवसोनि पाठी लागे।' [वसवस]

वसवस, वसवसणें—वखवख, वखवखणें पहा. 'अंग मोडुनी उठिला कैसा। भुंके वसवसत तैसा।' -कालिका २७.४.

वसवसा—पु. १ दरारा; भीति; धास्ती. 'म्हणजे शेटये महाजन वसवसा न धरितां पेठीची अबादानी करितील.-वाडबाबा २.८५. २ संशय; भीतियुक्त शंका. (क्रि० धरणें, पाळणें, बाळगणें). 'नमन पुरे संकोचासह अंजलि वसवसाहि सोडावा।' -मोउद्योग १३.१७४. ३ कल्पना; विचार; तर्क. (क्रि० जाणें). [अर. वस्वास, वस्वसा] ०खाणें-धास्ती घेणें. 'आम्हीहि वसवसा खाऊन निघोन आलों.' -ख ३५२६. वसवास-पु. भीति; शंका. वसवसा पहा. 'या गोष्टीचा वसवास जनराल मारनिले याही चितात धराबासा नाहीं.' -पेद ३.६४. वसवासी-वि. संशयी; शंकेखोर.

वसवा—पु. १ सावली; छाया; सावट. 'दिव्याच्या वसव्यांत बसूं नये.' २ प्रकाशाच्या आड येऊन सावली पाडणारी वस्तु. [सं. च्छाया]

वसवी-वें—स्त्रीन. कोयता, मुसळ, फाळ इ०स वसवितात ती मांडळ, कडें इ०.

वसवो, वसा—पु. (कु. गो.) संगत; सहवास. 'तुम्ही कांहींहि म्हणा पण त्याचाच वसवो बाधला.' [सं. वास-सहवास]

वसहत-हात—वसात, वसाहत पहा.

वसा—पु. (व.) सुताचा धागा.

वसा—स्त्री. १ मज्जा; मगज. २ चरबी. 'दुधांत एक प्रकारची वसा असते.' -विवि ८.२.२२. ३ अंतस्त्वचा. [सं.] ०मेह-पु. लघवीचा एक विकार. मेह पहा.

वसा—पु. एक माप, प्रमाण. (१६ आणे=१ विश्वासी, २४ विश्वासी=१वसा) लांकूड मोजण्याचें कोष्टक. -मुंव्या ११४. [अर. बसली]

व(वं)सा-वोवसा—पु. १ (बायकी) स्वतः लावून घेतलेला नेम, व्रत. (क्रि० घेणें; होणें). २ (क.) वाण (संक्रातीचें); सुघड. [सं. उप+आस्-उपासना] वसा(सो)ळी-स्त्री. वसा पूजणारी, व्रत पाळणारी स्त्री.

वसांग-ळ-ळी—ओसंग, ओसंगळ इ० पहा.

वसाड, वसाडी, वसाडींचा लांडगा—ओसाड, ओसाडी इ० पहा.

वसाडा—पु. तुषार; बुरबुर; शितोडा; ओसाडा. (क्रि० येणें; लागणें; उडणें). 'वसाडे थांबल्यावर बाहेर पड.' [सं. उत्सृ-उत्सर; सडा]

वसात-द, वसाहत—स्त्री. १ वस्तीचा देश, ठिकाण. २ देशांत वसति, लोक असल्याची स्थिति. वस्ती पहा. ३ परमुलखांत जाऊन राहिलेली वस्ती; देशशाखा. (इं.) कॉलनी. 'हिंदुस्थान व वसाहती यांची नेहमीं तुलना करण्यांत येते.' -के १४. ६.३०. [सं. वस्. तुल० अर. वुस्अत्] वसाहतीचें स्वराज्य-न. साम्राज्याच्या शाखांना, वसाहतींना मिळालेली राज्यघटना. (इं.) कलोनियल गव्हर्मेंट. 'वसाहतीसारखें स्वराज्य हें राष्ट्रीय सभेचें प्राप्तव्य आहे.'

वसान—वि. (व.) ओसाड; उजाड.

वसार—पु. (प्र.) ओसर. १ जाण्याकरितां दिलेली वाट. (क्रि० देणें, घेणें). २ वसारा पहा. [ओसर] वसारा-पु. ओसरा; ओहटी; कमी होणें (फुगलेलें पाणी, ताप इ०). वसरणें-ओसरणें पहा.

वसिष्ठता—स्त्री. (महानु.) (अप.) विशिष्टता; वैशिष्ट्य. 'बोरें अंब्र दोहीं फळासि वसिष्ठता नाहीं. विद्रुपजे ऐसे दोन्ही फळ प्रशंसीलें.' [सं. विशिष्टता]

वसु—पु. पोळ. वसू पहा.

वसु—पुस्त्री. मायणी; कंडें. वसू पहा.

वसु—पु. एक विशिष्ट देवता. या आठ आहेत. अष्टवसु पहा. -न. संपत्ति; धन. -वि. अष्ट संख्या; आठ. 'कर वसु पद बेविस ज्या वेद स्तन शोभती शिरें सात।' 'तिथि तरि वसु जाणा।' -देप ४६. [सं.]

वसुंधरा, वसुधा, वसुमती—स्त्री. पृथ्वी. -ज्ञा ११.६१; १२.१४५. 'धरा धरिली फणिवरें। वरती छप्पन कोटी विस्तारें। वसुंधरा हे।' -दा ४.१०.३. [सं.] म्ह० वसुधैव कुटुंबकम्।'

वसुआर—न. (महानु.) निवासस्थान; वसुवार पहा. 'हे तुम्हां वसुआर ना।' -पैठण चरित्रलीळा १४०.

वसुजणें—अक्रि. सुज उतरणें, ओसरणें. [अव+सुजणें ?]

वसुधारा—स्त्री. १ बद्रीनारायणाजवळचें एक तीर्थ. २ (अथ.) धार्मिक संस्कारांत भिंतीवर पातळ तुपानें पांच किंवा सात रेषा काढतात त्या. ३ पूर्णाहुतीच्या वेळीं अग्निकुंडांत तुपाची अखंड धार धरतात ती; वसोर्धारा. 'वसुर्धारा धृतावदान। तेथें तृप्ती न पावे नारायण। तो गौळियांचें घृत चोरून। भक्षून तृप्त जाहला।' -ह ७.३६. -वि. समृद्ध; अखंड. [सं.]

वसुला-ली—पुस्त्री. तासणी; वाकस. [वसा=तुकडा]

वसुवार—न. निवासस्थान; मंदिर. 'ना तें वसुवारु। अनंगरायाचें।' -शिशु ६४५. 'सतखणांचीं धवळारें। सदीप दिसतीं वसुवारें।' -कालिका १९.३८. [वसणें]

वसू—पु. डाग देऊन मोकळा सोडतात तो गोऱ्हा, बैल; पोळ. 'वसु जैसा मोकाटु।' -ज्ञा १३.६९७. [सं. वृष; प्रा. वस]

स्तु० माजला वसू खायास काळ. ०बारस-स्त्री. आश्विन वद्य द्वादशी; गोवत्सद्वादशी. या दिवशीं एकाच रंगाची गाय व वासरूं यांची पूजा करतात. ०वसुसर्ग, वसोछार्ग-(अप.) वृषोत्सर्ग पहा. 'राजश्री अमृतराव याजकडून कार्तिकमासी वसोछार्ग करावयाचें बाईचें मानस आहे.' -पेद ४.१८. [सं. वसु+उत्सर्ग]

**वसू-सूं**—स्त्रीपुन. गाडीचें चाक, नांगराचा फाळ, मुसळ इ० काच्या तोंडाशीं बसवितात तें लोखंडी कडें; मायणी.

**वसूल**—पु. १ उत्पन्न; आवक. २ सरकार, सावकार इ० कांस शेतकरी, कुळें यांजपासून आलेला पैसा; कर; खंड; भाडें. ३ शेतसारा. ४ उगवणूक; येण्यापैकीं जमा झालेला पैसा. ५ हप्त्यांनीं येणारी उगराणी. ६ किंमत; मोल. 'गुलामगिरी व तिचें भावंड हीं पुस्तकें कोणत्या वसुलाची आहेत' -नि ४७२; ८०९. [अर. वुसुल] ०दार-वि. वसुली करणारा; वसुल्या. ०बाकी-स्त्री. १ वसूल घेणें, घालणें, बाकी काढणें इ० व्यापार. 'सरकारनें ह्या गांवची वसूलबाकी आम्हास सांगितली'. २ वसूल न झालेली उगवावयाची रक्कम. ०बाकीपत्रक-न. आलेला व यावयाचा वसूल ज्यांत नोंदला आहे ती नोंदवही, रजिस्टर. ०वासलात-स्त्री. १ वसुलाचा हिशेब. २ वसूल-वासूल पहा. ०वासूल-वसुलात-पु. १ (व्यापक अर्थी) वसूल पहा. २ वसुलीचा व्यापार; वसूल बाकी अर्थ १ पहा. [वसूल द्वि.] वसूली-स्त्री उगराणी. -वि. १ वसुलासंबंधीं. २ चांगला वसूल यावयाजोगा (गांव, शेत, इ०). वसुली-ल्या-पु. वसूलदार. वसूली आकार-पु. कमाल आकारांत कमजास्त करून सालोसाल जो ऐनवसूल करतात तो. वसूलीगल्ला-पु. वसुलीचें धान्य; धान्याचा खंड. ०जमा-स्त्री. प्रत्यक्ष उत्पन्न, जमा. याच्या उलट आकारजमा. ०बेरीज-स्त्री. देणें वगैरे देऊन राहिलेला वसूल; निवळ वसूल.

**वसे**—स्त्री. विस्तार. 'किल्ल्याची वसे पाहून खुद्द आले.' -ख ११.६१३२. [अर. वसूआ]

**वसें**—न. (रूढ) वसूं पहा.

**वसैठा**—पु. (महानु.) घर; स्थान. 'कीं शृंगाराचा वसैठा।' -शिशु ४६. [सं. वसति+स्था]

**वसोळी**—वसाळी पहा.

**वसौट-टा-टें**—पुन. १ आश्रय; वस्ती. 'ऐसा क्रोधाचा वसैटा।' -एभा ५.१०१. २ आश्रयस्थान. वसैठा पहा. -ज्ञा १. २२८. 'जें मृत्यूचें वसौटें।' -स्वादि १०.३.४८. [सं. वस्]

**वस्त**—शअ. (व.) कडून; नें; करवीं. 'माझ्यावस्त हें काम होत नाहीं.' [अर. वासित-मध्यस्थ, माध्यम]

**वस्त**—स्त्री. वस्ती पहा. 'जेथें वसे थोर वस्त। तेथें न प्रार्थितां येती अनर्थ।' [सं. वस्-वसति] ०बांध-वि. वस्ती करणारा. -वर. वस्ता-वि. वस्तीचा.

**वस्त**—स्त्री. १ वस्तु; जिन्नस; पदार्थ. 'अपूर्व जे का वस्त। आणून मातापितरांसी देत।' -ह २७.१२२. २ चांदीसोन्याचा दागिना; (सामा.) अलंकार. (अव.) वस्ता याचाच विशेष प्रयोग. 'माझ्या आंगावर कांहीं वस्ता नाहींत.' -सिंब १४. [सं. वस्तु] ०भाव-वानी-स्त्री. १ (व्यापक) दागदागिने; अलंकार. २ घरांतील किरकोळ सामान; चीजवस्त. 'बयाबाईची वस्तवानी वगैरे...' -वाडसमा ३.६४. ३ प्रवासाचें सामान.

**वस्तर**—न. (व.) वस्त्र (अप.) पहा.

**वस्तरा, वस्तारा**—पु. वस्त्रा पहा. [फा. उस्तरा]

**वस्तरें**—न. (गो.) टसका. उस्तरें पहा. वस्तऱ्या, वस्तेरां जाणें-पातळ पदार्थ पितांना घशांत अडकणें; उलटून पडणें.

**वस्ताद**—पु. १ विद्या-कलादिकांमध्यें निष्णात, पटाईत, वाकबगार. २ शिक्षक; गुरूजी; अध्यापक (विशेषतः गायन, व्यायाम, नृत्य या कलांचा.). 'वस्ताद गंगु हैबती तेथील रहिवाशी।' -प्रला १९४. ३ दमनकर्ता; तोडीस तोड असणारा माणूस; शेराला सवाशेर. ४ कावेबाज, धूर्त मनुष्य. [अर. उस्ताद्] ०गिरी-स्त्री. वस्तादाचें, गुरूचें काम, धंदा. २ चातुर्य; कौशल्य. ३ धूर्तता; कावेबाजी; लबाडी. वस्तादी-वि. वस्तादापासून मिळालेली (गायनादि विद्या). -स्त्री. १ प्रावीण्य; मर्मज्ञता. 'पीळ पेच अर्धे अक्षरांत वस्तादीचे।' -प्रला ६२. २ धूर्तता; कावेबाजपणा. [फा. उस्तादी]

**वस्ति**—स्त्री. १ ओटीपोट. २ मूत्राशयाच्या चर्माची पिचकारी. [सं.] ०शोधन-न मूत्ररेच. [सं. बस्ती]

**वस्ती**—स्त्री. १ वास; राहणें. वसति पहा. २ निवास; घर. ३ लोक राहात असलेली; ओसाड नसलेली स्थिति (गांवाची). ४ लोकसंख्या. [सं. वसति] ०करू-कर-वि. प्रवासी; वाटसरू. 'अहो जीवु पथ उखिता। वस्तीकरू वाटे जातां।' ज्ञा-१३.३४. 'देखोनिया राजमंदिर। सुरावाड न घेती वस्तिकर।' -भवि १४.६४. ०वाडी-स्त्री. १ लोकवस्ती असणें. २ संतति; प्रजा. वस्तीस राहणें-एखाद्या ठिकाणीं मुक्काम करणें, प्रवासांत उतरणें.

**वस्तु-स्तू**—स्त्री. १ पदार्थ; जिन्नस; चीज. वस्त पहा. २ काम; व्यवहार; गोष्ट. ३ परब्रह्म; ब्रह्म. -ज्ञा ६.७१. 'वस्तु प्रगटची असे। पाहतां कोणासीच न दिसे।' -दा १.५.३. ४ नाटकाचें कथानक, विषय. ५ (संगीत) चीज. (सं. शब्दाचें लिंग नपुं. आहे पण मराठींत हा शब्द नेहमीं स्त्रीलिंगीच वापरतात). [सं. वस्तु] ०कथन-न. खरी हकीकत; सत्यस्वरूप सांगणें. ०गत्या, वस्तुतः-क्रिवि. १ वास्तविक; खरें पाहतां; परमार्थतः. २ स्वभावतः; मूळपासून. 'इंग्रजींत घोंटाळा नाहीं असें नाहीं. सर्व भाषांत वस्तुगत्याच असायचा.' -नि १२९. ०चित्रलेखन-न. चित्रकलेचा एक प्रकार. समोर ठेवलेल्या पदार्थाचें चित्रण. (इं.) मॉडेल

ड्रॉईंग. ०जात-न. पदार्थमात्र. 'मग पासींच असनां न दिसे । वस्तुजात।'-ज्ञा २.५६. ०तत्त्व-न. (तत्त्व.) कल्पना.-साक्रेस २८१. ०पाठ-पु वस्तूची सप्रयोग माहिती देणें; अध्यापनाचा एक प्रकार. (सामा.) धडा. 'कायदामोडायचा वस्तुपाठ हवा.' -के २६.७.३०. ०मात्र-न. १ आराखडा; सांगाडा (संवाद, निबंध इ० चा). २ वस्तुजात पहा. ०लाभ-पु. (लग्नांत) चांगली वधू मिळणें. 'बाकीच्या गोष्टींकडे पाहाण्याची जरूरी नाहीं वस्तुलाभ पहा.' ०वाद-पु. (तत्त्व.) वास्तववाद; (इं.) रिआलिझम. ०शक्ति-स्वभाव-स्त्रीपु. पदार्थाच्या ठिकाणची नैसर्गिक शक्ति; निसर्ग-प्रकृतिप्रवृत्ति; नैसर्गिक गुणधर्म. ०सत्ता-स्त्री. खरें, सत्य अस्तित्व; असृष्ट, स्वतंत्र वस्तु (म्हणजे ब्रह्म, परमेश्वर). याला विरोधी व्यावहारिकसत्ता व प्रातिभासिक सत्ता. ०सिद्धि-स्त्री. (कायदा) झालें तें सशास्त्र हा न्याय. (इं.) फॅक्टम व्हॅलेट. ०स्थिति-स्त्री. खरा प्रकार; खरी गोष्ट. ०स्थितिकथन-न. खरी, वास्तविक गोष्ट आहे ती सांगणें. ०स्थितिविचार-न. खऱ्या गोष्टीचा शोध, विचार ०स्वरूपवाद-पु. वस्तुवाद पहा. वस्तूक-स्त्री. खेळणें; खाऊ (मुलास खेळण्यासाठीं दिलेला). वस्तूपपाद्य-न. सिद्धांत [वस्तु+उपपाद्य]

वस्तु-स्तू—शअ. कडून; गुजारतीनें; हस्तें. वस्त पहा. माझे वस्तू होईल-जावेल.' 'यांचे वस्तू आपले सर्वेरा होऊन साध्य घडावयाचे नाहीं.'-मराचिस १४. वस्त पहा.

वस्त्र—न. १ कापूस, रेशीम, लोंकर इ० चें कापड. २ कपडा; अंगावर घेण्याची, नेसण्याची वस्तु; प्रावरण; चिरगूट. ३ पोषाख. म्ह० १ लाभ पांचाचा आणि वस्त्र दाहाचें. २ वस्त्राआड जन नागवें. ४ देवास वाहतात ती सुत पुतळी. [सं.] (वाप्र.] ०आड करणें-लज्जारक्षणासाठीं नेसणें. 'जुनेर आड करून चार लोकांत कसें बरें यायचें बाहेर!'-एकचप्याला. एका वस्त्रानें निघणें-(अंग शब्दाच्या पोटांत) एका अंगवस्त्रानें निघणें पहा वस्त्रें देणें-दिवाणगिरी इ०चा अधिकार देणें. काळीं वस्त्रें देणें-पदच्युत करणें; काढून टाकणें. (शब्दशः व ल). वस्त्रें होणें-१ अधिकार प्राप्त होणें. २ (विपरीतल.) अधिकारावरून दूर होणें. वस्त्रांतर होणें-करणें-पोषाख बदलणें. ०गाळ-गाळीव-वि. कपड्यांतून गाळून घेतलेलें. ०गोपन-न. एक कला; वस्त्रें नेहमीं नवीं राहतील अशा युक्तीनें ठेवणें. ०परिधान-न पोषाख चढविणें, करणें. ०पात्र-न. नेहमीच्या व्यवहारांतील भांडीं कुंडीं, कपडे लत्ते इ०; सामानसुमान. ०प्रावरण-न. (व्यापक) कपडालत्ता; वापरण्याचे कपडे. ०प्रासाद-पु. तंबू. 'वस्त्रप्रासादीं शुभशयनीं जातांचि भागला पहुडे।'-मोकर्ण ३९.४. ०लोचन-न. (प्र.) वस्त्रलुंचन; वस्त्रें लुबाडणें, चोरून नेणें; नागविणें. ०विलास-वि. नटवा; उंची, सुंदर पोषाख करण्यांत आनंद मानणारा. ०हरण, वस्त्रापहरण-१ वस्त्र बुचाडणें, फेडणें. 'द्रौपदी० वस्त्रहरण.' २ वस्त्रें चोरून नेणें, लुबाडणें. वस्त्रागार-न तंबू. 'निर्मिऊन पैलाडी वस्त्रागार।'-दावि ३९१. वस्त्राचा ताणा-पु. वाळत घातलेल्या कपड्यांची रांग. (क्रि० लावणें). -वस्त्रे भूषणें-न.अव. कपडे; अलंकार; कपडेलत्ते, दागदागिने. 'तिला वस्त्रेंभूषणें घालून संतोषित केलें'-कमं २.

वस्त्रा—पु. १ केंस काढावयाचें एक शस्त्र; वस्तरा. २ (ल.) कडकडीत विद्वान्, पंडित. ३ निस्पृही मनुष्य. ४ तिखट, झोंबणारें भाषण; मर्मभेदी, जहाल शब्द. [फा. उस्तुरा]

वस्नावणें—क्रि. झोपेंत बरळणें; वसनावणें पहा. 'किंकाळी फोडुनी पवित्रा विचित्र वस्नावली'-शशिमोहन. [सं. स्वप्न]

वस्मरणें, वस्मारणें—अक्रि. १ तक्रार करणें; कांहीं दुःख, अडचण यांविषयीं बोलणें; आठवण करून उगाळीत बसणें. उस्मरणें पहा. २ (-उक्रि.) सारखें आठवणें, पुढें आणणें. ३ वथणें आणि वदणें पहा. फाजीलपणें, मूर्खपणें बोलणें. ४ फोडणें; तोंडाळणें. ५ झोपेंत बरळणें. [सं. उत्+स्मरण] वस्मरा, वस्मारा, वस्त्रमा-उस्मारा पहा.

वस्वसा, वस्वास—पु. १ भीति; काळजी. २ अंदेशा; संशय. 'जहाले कामाचा वस्वसा न धरितां समर्थी महाराजांचा मनोरथ सिद्धीस नेणें.'-चित्रगुप्त ५. ३ पर्वा ४ (मुंबई) चाहूल. वसवसा पहा. [अर. वस्वास्, वस्वसा] वस्वासी-वि. वसवासी; संशयी. 'आईसाहेब (ताराबाई) वस्वासी फार.'-पया ३२३.

वस्वी-स्वें—स्त्री.न. लहान लोखंडी कडें; मांडळ. वसवी पहा.

वह—पुन. मान व खांदा यांमधील अंतर. -अश्वप १.६२.

वहट-टी—पु.स्त्री. ओहट टी पहा. वहटणें-अक्रि. ओहटणें पहा.

वहड, वहडणें—ओढ, ओढणें पहा.

वहडास—पु. (कातोडी) नवरा. -बदलापूर १२८.

वहणें, वहाणें—उक्रि. (प्र.) वाहणें पहा. [सं. वहन] वहन-न. १ वाहून नेण्याचें साधन; गाडी; वाहन पहा. २ वाहून नेणें; एकीकडून दुसरीकडे पोंचविणें, नेणें. ३ (पदार्थ.) उष्णता, वीज इ० वाहणें, जाणें. (इं.) कंडक्शन. [सं.] वहनीय-वि. वाहून नेण्यालायक, नेण्यास शक्य, योग्य. [सं.] वहित-वि. १ वाहिलेलें; नेलेलें. २ (शेत.) लागवडीस आणलेली, लागवड केलेली (जमीन) -न. लागवड. [सं.]

वहन काढणें—क्रि. (व.) पुष्कळ चोप देणें. 'खूब वहन काढलें त्याचें!'

वह(हि)मा—पु. १ शंका; संशय; किंतु. (क्रि० धरणें; येणें). 'ह्या कारणास्तव त्यांचा कोणास वहमा येत नाहीं.' -मराठी ३ पु. (१८७३) पृ २०. २ भय; धाक. 'करवीरच्या

राजकारणाचें दृढीकरण जाहलें म्हणजे यजमानास वहमा पटेल कीं यांस भारी आसरा जाहला.' -ख १.१७२. ३ (लोकांची) समजूत; कल्पना (चांगल्या किंवा वाईट अर्थानें). क्रि० असणें; होणें). वहीम पहा. [अर. वहम्]

**वहमाय**—स्त्री. (लग्नांत) वधूची आई. वहूमाय पहा [सं. वधू-माय]

**वहर**—न. वधूवर. वहूवर पहा.

**वहळ, वहळणें, वहळी**—ओहळ, ओहळणें इ० पहा.

**वहाटळ, वहाट्ळ**—स्त्री. (व.) वावटळ पहा.

**वहाडणें**—वाढणें पहा.

**वहाण-ळ**—स्त्री. १ नदी इ०चा प्रवाह; पाट. २ ओढा; नाला. [वाहणें]

**वहाण**—स्त्री. पायतण; चप्पल; पादत्राण. 'वर्णिल कोण शहाणा, आपण काठी करीं पदींहि वहाणा।' -मोकृष्ण १३.२१. [सं. उपानहः प्रा. वाहणा] **म्ह०** पायींची वहाण पायींच छान= ज्याच्या त्याच्या योग्यतेनें वागवावें. ०**धर**-वि. जोडे उचल्या. 'जीवें संतांचें होत वाहण धरू।' -ज्ञा १३.१११३२.

**वहाणी**—स्त्री. (नाविक. कु.) संकटाच्या वेळीं माल समुद्रांत फेंकणें. [सं. वहन]

**वहाणी, वहाणें, वहाता, वहाती कूस, वहावट, वहावटळ, वहावण, वहावणी, वहावणें, वहावरा, वहाळी**—वाहणी, वाहणें इ० पहा.

**वहाणें**—क्रि. (माडी) काढणें व विकणें. -मसाप ४. ४.२५३.

**वहादन**—न. (व.) तुफान वारा. 'एकदम वहादन सुटलें त्यामुळें स्वयंपाक सुचेना.'

**वहारी**—स्त्री. (खा.) सुन. [सं. वधू; म. वहू]

**वहावट**—स्त्री (प्र.) वहिवाट पहा.

**वहाविणें**—उक्रि. १ वाहवणें पहा. २ लागवड करणें. 'मग अहंकारासि एकलाधी। करूनि जीविताव‍धी। वहाविलें बुद्धी। चराचर।' -ज्ञा १३.४९.

**वहाळ वोहळ**—पु. लहानमोठे नाले; ओढे. 'जैसे तंवचि वहाळ वोहळ। जंव न पवती गंगाजळ।' -ज्ञा ९.४५८.

**वहिनी**—स्त्री. (आदरार्थी संज्ञा) वडील भावजय. 'एक म्हणे भात आणी। एक म्हणे आजि हरिदिनी। एक म्हणती एका हो वहिनी।' -ह २४.५०. [वे. प्रा. वहुण्णी. सं. वधू; प्रा. वहू; सं. भगिनी?] **वहिनक**-स्त्री. (वंजा.) नवऱ्याची वडील बहीण. [वहिनी+अक्का] **वहिन्स**-स्त्री. (ना.) नवऱ्याची बहीण; नन्स पहा.

**वहिमा**—वहमा पहा. **वहिमी**-वि. ज्यावर वहीम आहे असा; संशयास्पद वर्तनाचा. 'वहिमी जाती मध्यवस्तींत ठेवणें धोक्याचें असतें.' --गांगा ४.

**वहिला-ली-लें**—क्रिवि. (जुन्या काव्यांतून हा शब्द अनेक ठिकाणीं येऊन त्याचे अनेक विविध अर्थ संभवतात). १ सत्वर; लवकर; तातडीनें. 'तरि वहिला धावै जंव आहे। कंठीं प्राणु।' -ऋ ३३. -एभा २२.६२६. 'मातेनि वर्तलें ब्रह्मांड जालें। मी जें करीन तें होईल वहिलें।' -स्वादि १०. १.३६. २ आधीं; अगोदर; प्रथम. 'टाटाओनी बांधा वहिला। एन्हवी जाइलु हा।' -शिशु १३१. 'श्रवण करीं तूं बरें अंतरीं घे समजून वहिली।' -होला १३. ३ एकदां. 'याजी युत खेळों वहिलें। अवश्य म्हणे कृष्णाग्रज।' -ह ३२.६५. [सं. प्रथम; वे. प्रा. वहिल्ल=शीघ्र; गु वहेलो; म. पहिला]

**वहिला-लें**—वि.क्रिवि. खरोखर; निश्चयानें. 'त्याचा दास मी जाण वहिलें। करीन कंदन लंकेचें।'

**वहिला**—वि. १ स्वतंत्र; निराळा. वायला पहा. 'करी माळा घेऊनि रडे बाळा। कृष्ण झाला सांग हो काय वहिला।' -व ५५३. २ सुंदर; चांगला. 'वरीं पितांबर कास मिरवली। दाखवी वहिली ऐसी मूर्ती।' -तुगा ८२८.

**वहिली**—स्त्री. बुरख्याची गाडी; मेणा; डोली. ०**महाल**-पु. रथशाळा; गाडीखातें. -भाअ १८३४. **वहिलवान**-पु. सारथि. -राव्य ५ ३८. **वहिलेंपण**-न. वाहण्याचा वेग. 'तया पाणियाचेनि वहिलेपणें। अझुनी न धरिती बोभाणें।' -ज्ञा ७.८१.

**वहिवट, वहिवटणें**—वहिवाट, वहिवाटणें पहा.

**वहिवाट**—स्त्री. १ कारभार; व्यवस्था; (काम, धंदा इ०) चालविण्याचा व्यापार. 'दिवाणगिरीची वहिवाट आम्ही करूं आणि जकातीची वहिवाट ते करतील.' २ कारभारांतील, व्यवस्थेतील कौशल्य, हातोटी. ३ कारभाराचा अहवाल; कामाची नोंद; वहिवाटपत्र. ४ व्यवहार; धंदा; दळणवळण. ५ उपभोग; वापर; भोगवटा. 'शंभर वर्षें या वृत्तीची वहिवाट मी करीत आलों.' 'शालजोडी नेहमीं वहिवाटींत पाहिजे, नाहींतर कसर लागेल.' ६ चाल; रिवाज. 'तिकडेस जाण्यायेण्याची आमची वहिवाट नाहीं, मग ते कोठून आढळतील?' ७ जाणेंयेणें; परिचय; सहवास. [सं. वह्+वृत्; प्रा. वहवट्ट] ०**दार**-पु. १ कारभारी; व्यवस्थापक; (इं.) मॅनेजर. 'केसरी छापखान्याचे वहिवाटदार रा० धोंडोपंत विद्वांस यांजकडून २॥ हजार रुपये घेण्यांत आले.' -के १०.६.३०. २ प्रतिनिधी; मुखत्यार; एजंट; मालकासाठीं जबाबदारीनें काम पाहणारा. ३ (वतनी कायदा) वतनदारांपैकीं प्रत्यक्ष काम पाहणारा वतनदार. ४ (गु.) मामलेदार; वसुलीकामगार. ५ (कायदा) कोर्टानें नेमलेला कारभारी; रिसीव्हर. ०[illegible]-पु.

( कायदा ) चालू वहिवाटीनें, भोगवटयानें प्राप्त होणारा हक्क. ( इं. ) प्रिस्क्रिप्शन. **वहिवाटणें**–अक्रि. १ सहवास, संबंध, वहिवाट ठेवणें; व्यवहार करणें. ' असा चोरा मोरा किती दिवस वहिवाटणार ? ' –सूर्यग्र १२९. २ पार पडणें; निभावणें (संकट, नोकरी, वहिवाट इ०त ). ' म्हणूनीयां काळजी फार वाटे । कसें मोठें हें विघ्न वहीवाटे । ' –कीर्तन १.६०. ३ वहिवाटीखालीं चालणें; ताब्यांत, दिमतींत असणें. ' ती खोली त्या तिघांच्या वहिवाटीस लागली होती. ' –विवि ८.२.२८. ४ संवय होणें. ' हा घोडा लष्करांत वहिवाटलेला आहे. ' –उक्ति. १ कारभार पहाणें; व्यवस्था करणें, चालविणें. ' सरकारी हुद्देही त्यानें सचोटीनें वहिवाटल्यावरून त्याचा लौकिक वाढत चालला. ' –नि २८२. २ वापरणें; उपभोग घेणें; वहिवाट करणें. ३ ठेवणें; कामाला लावणें; सरावाचा करणें. ४ निवारणें; बाजूला सारणें ( संकट इ० ). ५ उपभोग घेणें ( स्त्रीचा. ). **वहिवाटी, वही घटी**–वि. वहिवाटींत, रोजच्या उपयोगांत असलेला ( दागिना इ० ). –स्त्री. वहिवाट. –ज्ञा ११.४.२६.

**वही**—स्त्री. १ जमाखर्च, नोंद इ०ची चोपडी. ' विसाळा भाळाचां वहिवटीं । भणानि प्रकृति सठी । ' –ऋ ९७ २ कांहीं कागद एकत्र टांचून बांधलेली चोपडी; कोरें पुस्तक. ३ पुस्तक; बूक; लघुग्रंथ. ४ दफ्तर. ' पैं जीवाचें कसी उतरली । ते दासी कीं गोसावीण जाली । सिसे वचि तया मविली । वही जेथीं । ' –ज्ञा १८.९१२. ५ हिशेब; व्यवहार. ' अर्जुना जिये ठायीं । न सरे द्वैताची वही । ' –ज्ञा १३.९३८. [ दे. प्रा. वहिया; हिं. वही ] ( सामासांत ) खातेवही; पावतीवही; रोजकीर्द वही इ०.

**वही**—स्त्री. १ ( लग्नांत ) वहुल्याभोंवतीं उतरंडी रचण्याकरितां आणतात तो मडक्यांचा समुदाय. बहुलें पहा. २ या समुदायांतील एक मडकें. ' बहुल्याच्या उतरंडींतील एक वही फुटली आहे ' **वहीवरून अंबट होणें**–( बहुल्याच्या चार कोंपऱ्यास प्रत्येकीं पांच पांच मडक्यांच्या चार उतरंडी असतात; लग्नानंतर य .कीं दोन वरपक्षाकडे जातात, यावेळीं भांडण होतें त्यावरून ) क्षुल्लक कारणासाठीं भांडण. ' लग्न झालं गोड पण वहीवरून झाला अंबट, हें काय ? ' [ सं. वृत्ति ]

**वही**—स्त्री. १ कुंपण. वई, वय, वै. ' त्याचा एकांत व्यर्थ देख । जैसें वहीस बेसले मूषक । ' २ अटकाव; प्रतिबंध. ( क्रि० घालणें ). सं. वृत्ति; प्रा. वइ ] ०**वाडा**–पु. वयवाडा पहा.

**वहीत**—वि. लागवडींत असलेली, आणलेली ( जमीन, शेत, इ० ). –वाडमा १.२३. ०**जमीन-शेत**–स्त्री.न. लागवडीची, पीक येणारी जमीन, शेत.

**वहीन, व्हैन**—न. ( बे. ) उखळ. [ फा. हावन ]

**वहीम**—पु. वहमा पहा. [ अर. वह्‌म् ]

**वहीरान**—वि. वैराण पहा.

**वहू**—स्त्री. १ वधू; बायको; नवरी. २ सून. [ सं. वधू; प्रा. वहू; गु. वहू ] म्ह० वहू नाहली आणि वाफा शिंपला. ०**माय**–स्त्री. ( लग्नांत ) नवरीची आई; वधूमाता. ' अवधानकळा ते वरमाय । वक्तृत्वशक्ती ते वहूमाय । ' –मुआदि ४३. ७५. ०**वर**–न. नवरानवरी ( विशेषतः लग्नानंतर देवदर्शनास जातांना योजतात ); ओहर पहा. ' वहुवर बैसले पंगतीं । ' –वसा ५२. ०**वरजत्रा-भरणी-भरणें**–स्त्रीन. लग्नानंतर कुलधर्माप्रमाणें जोडप्यानें देवदर्शनास जाणें. **वहुल्या**–स्त्री.अव. ( ठाकूर ) लग्नांत रांजण भरणाऱ्या बायका. –बदलापूर १४८.

**वह्नणी**—स्त्री. वांटणी. –मौज २.६.३०. [ गु. ]

**वह्नि**—पु. १ अग्नि; विस्तव. वन्हि पहा. २ जठरानल; कोठयांतील आग. यामुळें अन्न पचतें. [ सं. ]

**वह्या, वह्यताड**—वि. ( व. ) वेडा; पागल. [ वाह्यात ]

**वह्याळ-ळी**—स्त्री. खेळ; क्रीडा. ' तिहीं अवस्थाचिया वह्याळी । दावी जें जीवा । ' –ज्ञा १८.५४१.

**वळ**—पु. १ मांडया, काखा, कान इ०च्या संधिप्रदेशीं असणारें लांबट उठाणूं. २ हात, पाय इ० अवयवांस वायुविकारानें उत्पन्न होणारी व्यथा; वांब. ३ –पु.स्त्री. काठी इ० मारल्यानें अंगावर उठणारें त्या आकाराचें चिन्ह; वण. [ सं. वल् ] ०**वाणें**–न. वळ; वण; खूण. ' त्या धगधगीत सुदर्शनें । दैत्य हाणिला पंचाननें । परी आंगीं नुठेचि वळवाणें । जालंधरासी । ' –कथा ५.५.६९.

**वळ**—पु. १ दोरी, सुत इ०स असणारा पीळ. २ ( बुरूडकाम ) टोपलीच्या तोंडाला तीन कामटयांचा देतात तो गोठ. ३ वळवळ; तळमळ; अतिशय उत्कंठा. [ सं. वल्; म. वळणें ] **वळई**–स्त्री. १ भूस इ० ठेवण्यासाठीं करतात ती वाटोळी, भोंवताल्न बंद केलेली जागा. २ भूस इ०ची वाटोळी, भोंवताल्न कडब्याच्या पेंढया लावलेली रास. ३ कडबा, गवत, कणसें न खुडलेली ताटें इ०ची रास, गंज, गंजी. ' तृणाचे वळई माजी देखा । कैशी उगी राहे दीपकलिका । ' –रावि १५.११८. ४ वळी; वळकटी. [ सं. वलय, वलयित; प्रा. वलइय ] **वळकटी-कुटी-कोटी**–स्त्री. १ गुंडाळी ( कागद, कपडा, इ०ची ); गुंडाळलेली वस्तु. २ घडी; दुमड; मोड; सुरकुती. ०**कुटी सुरकुटी**–स्त्री. वळकटी अर्थ २ पहा. (अव.प्रयोग) वळकुटया सुरकुटया. ०**खर**–वि. पीळ घातलेली; पीळदार ( दोरी, सूत इ० ). ०**वट**–न. १ खिरीसाठीं पिठाचा वळून केलेला बोटवा, शेवया इ०पदार्थ. ' वळवटाची नवलपरी । एक पोकळें अभ्यंतरीं । एकें वर्तुळें साजिरीं । सुमनाकारीं पै एक । ' –एरुस्व १४.१११; –मुवन ११.१२४. २ दळणवळण; घरोबा; परस्पर व्यवहार. ०**वटी-वंटी**–स्त्री.

गुंडाळी; वळकटी पहा. ॰वळ-ळा-ळी-स्त्रीपु १ साप, किडा इ०च्या अंगास मोडी पडत असें त्यांचें चलनवलन. २ (ल.) एका कुशीवरून दुसऱ्या कुशीस वळावें, लोळावें इ० चळवळ. ३ चुटपुट; अस्वस्थ करणारी उत्कंठा; तळमळ. ( क्रि० करणें; येणें ). ' माथे पाहे घरिंची राटावळी । करी भोजनाची वळवळी । ' -खिपु २.३६.१६. ४ चडफड; धुसफुस. ५ कंड; खाज ( गळूं, इ०ची ). ( क्रि० सुटणें; येणें ). ६ हालचाल; तंटा; कुरापत. ' फिरंगी वळवळ करतां राहत नाहींत. ' -पया १२२. ७ चपळाई; एकसारखें चलनवलन. ८ ( कु ) रग. ( क्रि० जिरणें; जिरविणें ). ॰वळ-ळां-क्रिवि. १ नागमोडीनें; किडयाप्रमाणें वळवळ करून. २ गडगडत; लोटांगणें घालीत; चक्करें खात ( जाणें ). ३ भरभर; घाईघाईनें; तोंडाला येईल तसें; अचावचा ( बोलणें, खाणें, लिहिणें ). ॰वळणें-१ नागमोडीप्रमाणें अंगविक्षेप करणें; आळेपिळे देणें. २ वेदनांनीं तडफडणें; तळमळणें; विवळणें. ३ अस्वस्थ असणें (दुःख, उत्कंठा इ० मुळें). अत्युत्सुक होणें. ॰वळाट-पु. अतिशय वळवळ; चुळबुळ; अस्वस्थता. ॰वळ्या-वि. १ गडबड्या; धांदऱ्या. २ अस्वस्थ; बेचैन असणारा. ॰शेण-शेणी-शिणी-नस्त्री. गोंवरी ( थापलेली ). याच्या उलट रानशेण-णी. वळापिळा-पु. आळापिळा; अंगविक्षेप ( पिशाचसंचारादि कारणामुळें होणारा ). [वळणें+पिळणें] वळावळ-स्त्री. उत्कंठा; चुळबुळ; अस्वस्थता. वळावळी-क्रिवि. तडकाफडकीं; त्वरेनें. -शर.

वळ—स्त्री. १ ओळ; पंक्ति; रांग. २ टांकानें, लेखणीनें काढलेली रेघ; लिहिण्यासाठीं ओढलेली रेघ. ३ ( ल. ) तऱ्हा; रीत; वहिवाट. ४ ( व. शेती ) नांगरटीच्या बारा-चौदा तासांचा समूह. बारा-चौदा पराटीच्या तासांनंतर एक तास तुरीचा घालतात, यावेळीं प्रयोग. [ सं. आवलि ] ॰वटा-पु. १ रीत; संवय; परिपाठ; वहिवाट; पद्धत. ' वळवटा पाडून देणें म्हणोन... ' -वाडसमा ३.२४७. २ दळणवळण; घरोबा; परस्पर व्यवहार.

वळ—एक मूल्यार्थी प्रत्यय. उदा० दळणावळ; धुणावळ; बांधणावळ इ०.

वळई—स्त्री. ( कों. कुण. ) जमीन करणें.

वळई—स्त्री. ( हेट. ) माजघर. [ दे. प्रा. वलय=घर ]

वळकंबणें-कुंबणें, वळकंबा-कुंबा, वळख, वळखण, वळखणें, वळखदेख, वळखपाळख, वळखी, वळखीदेखी, वळखीदेखीचा, वळखीपाळखी—ओळकंबणें ओळकंबा इ० पहा.

वळग-घ—स्त्री. पकड; घट्ट मिठी; आलिंगन; वेंघ. ( क्रि० मारणें; घालणें ) [ सं. अव+लग्; म. ओळगणें ] वळग( घ )णें, वळंग( घ )णें-उक्रि. १ मिठी मारणें; पकडणें; झडून पडणें. २ लोंबकळणें; ओळंबणें. ' कीं वळघौनि झाडा । एरझारा करी माकोडा । ' -ऋ ३०. ३ चढणें; आरूढ होणें. ' पवनवारू वळंघला । आणि गगनामाजीं पैं उडाला । ' -सिसं ४.१२८. -एरुस्व ८.१२. ' हा परम उंच सुवेळ गिरी । अवघे वळघोनिया वरी । ' -रावि २४.१४१. ४ (व्यापक) आश्रय करणें, धरणें; पकडणें (एखादा प्रदेश, प्रांत ) ' बुद्धीतें सांडोनि ज्ञान । भेणें वळघलें । ' -ज्ञा ११;६६४. ५ भटकणें; हिंडणें; भ्रमणें; फिरणें. ' मग हिंडणें; वळंगत वासुदेव । ' -भज १९. ६ वळणें; ओढणें. ' पाकळ्या पसरूं लागल्या म्हणजे त्यांचे शेंडे पहिल्यानें अंतर्गोल म्हणजे आंतल्या बाजूनें वळंगलेले असून...'-मराठी ६ वें पु (१८७५) पृ. २४०. -अक्रि. १ पोंचणें; जाणें. ' जयजयकार त्रिलोक करी । नाद वळघला सत्य शिरीं । ' -निमा १ ( निर्वोष्ट राघव ४१). २ चिकटून राहणें; लोंबणें. ' अचिंत्या अनंतशक्ति । श्रीहरीतें वळंगती । ' ३ वर चढण; भोगणें (घोडी-गाढवीला, घोडा-गाढव यांनीं). [ सं. अव+लग्; प्रा. वलग्ग=चढण; गु. वळगवुं ] वळगा-घा-पु. विळखा मिठी. 'सागरलहरी किनाऱ्यास घे वळघे आलिंगाया ।'-केक १२५. वळघी-स्त्री. चाल; हल्ला. ' साहे बोलाची वळघी । ऐसी अविद्या असे जगीं । '-अमृ ६.२७.

वळचण—स्त्री. १ ( कों. राजा. ) घराच्या मूळ पायाच्या बाहेरचा पागोळ्यांच्या आंतील प्रदेश. २ घराच्या पाख्याचा अग्र प्रदेश. ' जाणोनियां अग्नि लाविला घरीं । तो जाळूनियां सर्वेही भस्म करी । मा नेणतांही ठेविला वळचणीवरी । तोही करी तैसेंचि । '-एभा ३०.२९९. ( क्रि० बांधणें ). ३ पागोळी; पावळी. [ सं. वलभिस्थान-वहलचाण-वळीचाण-वळचाण-वळचण. -भाअ १८३२ ] म्ह० भुकेलें गुरूं वळचण ओढतें. ( वाप्र. ) वळचणीचा वासा-पु. (ल.) खेटून असलेला शेजारी (विशेषतः ऋण, उसनेपासनें यासंबंधीं योजतात ) वळचणीची पाल-स्त्री. आडून कानवसा घेणारी व्यक्ति. वळचणीचें पाणी आढ्याला(जात नाहीं-गेलें-चढलें नाहीं )-( पाणी खालून वर जात नाहीं यावरून ) लहानाला मोठें होणें अशक्य.

वळण—न. १ आकारभेदाचे प्रकार ( अक्षर, चित्र, शरीर, अवयव इ०चे प्रत्येकी ); तऱ्हा; मोड. '.गोंदूनानाच्या अक्षराचें वळण बिवलकरी दिसतें. ' २ वागण्याची रीत, पद्धति, व्यवहार. ३ कल; प्रवृत्ति; झोंक (अंतःकरण, मन इ०चा ). ४ शिक्षण; शिस्त; व्यवस्था. ' बाळकास वळणांत ठेवावें. ' ५ देणें, घेणें, जाणें, येणें इ० व्यवहार व त्यामुळें येणारा संबंध; दळणवळण. ' सरकारांत वळण बांधावें, मग फिर्याद करावी. ' ६ वक्रता; सरळपणा नसणें; वांक, (नदी, रस्ता, काठी इ०चा). ७ डोंगराचें धांकण ८ नद्यादिकांचें पाणी विवक्षितजागीं न्यावयासाठीं बांधतात तें धरण; बांध; माती दगड वगैरेचा वळ. ' उदधीचें वळण फुटें । '-उषा

१९.२३. ९ वशिला; वजन. (क्रि० बांधणें). ' चितोपंतांनीं रामशेटजीकडे वळण बांधून नोकरी मिळविली. ' १० वेढा; वळसा. ' दुर्मोच्य काळपाशासम याच्या होय वळण वळयाचें। '-मोवन ६.२०. [ सं. वलन ] म्ह० १ वळणाचें पाणी वळणानेंच जाईल. २ पाण्याआधीं वळण बांधावें. (वाप्र.) **वळण बांधणें**-( ल. ) मैत्री संपादन करणें; संधान बांधणें. **वळणावर जाणें**-अनुसरणें; प्रमाणें चालणें, वागणें. ' हा अगदीं बापाच्या वळणावर गेला. ' सामासिक शब्द- ०**वळण-दळण**-न. दळणवळण पहा. ०**दार**-वि. १ चांगला आकार, वळण असलेलें; नीटनेटकें. २ सारखें, व्यवस्थित, शुद्ध ( लेखन ). घटींव आणि घोटींव यांपासून हें निराळें आहे. ०**शुद्ध-सूद**-वि. प्रमाणशीर; वळणदार. ' तीं कामाच्या सोईकरितां अथवा वळणसुदपणाकरितां सुधारण्यांत आलीं. '-इंमू ३५२. **वळणी**-स्त्री. वळणें, वळण पहा. **वळणीं, वळणीस आणणें-येणें**-वळणीस आणणें-येणें पहा. ' तव विक्रमाविण पळभरिहि न येतीच खळ बळें वळणी। '-मोनामरसायन. **वळणें**-उक्रि. १ दिशा बदलणें; फिरविणें. २ राखणें; सांभाळणें ( गुरें, मेंढया इ० ). ' चला वळूं गाई। बैसो जेऊं एके ठायीं। '-तुगा २००. ३ बनविणें; घडविणें ( पिळून, इतर क्रिया करून ). ' संस्कृत इक्षुदंडरस अपार। त्याची प्राकृत हे वळिली साखर। '-ह १९.२२२. ४ अंकित करणें; वश करणें. ' मातल्या कामभद्रजाती। विवेकांकुशें वळावा। ' -मुआदि १६.११. ५ वळवून, परतवून नेणें, आणणें. ' जन कथिति धेनु कुरुनीं वळिल्या येऊनि उत्तराशेला। '-मोविराट ६.६३. ' वळल्या हातीवरल्या ढाला। '-ऐपो २१. ६ वळता करणें, घेणें. -अक्रि. १ घटलें जाणें; चांगलें तयार होणें ( अक्षर ). २ वळणदार होणें; योग्य रूप घेणें. ( चित्र, प्रतिमा इ०नीं ). ३ वांकणें; कलणें; दिशा, रूप, आकार इ० बदलणें. -ज्ञा ११.४८७. ' मडक्याचा कांठ ओला आहे तो वळेल. ' ' आकाशीं मेघ करी गर्जना। वळला पर्जन्य सभोंवतां। ' ४ शरीरावयव वायूनें आंत ओढला जाणें, त्याला वेदना होणें; पेटका येणें; वांब येणें. ५ अनुकूल, वश होणें; कबूल होणें. ' वळला न ईश्वरासहि तो दुष्ट वळेल काय इतरांला। ' -मोउद्योग १०.७१. ६ प्रसन्न होणें. ' म्हणे सोसिका नृपा! वळलों। '-मोअश्व १.३५. ७ फिरणें; विशिष्ट दिशेनें जाणें. [ सं. वलन ] **वळता देणें**-परत देणें, करणें ( पैसा, उसनी वस्तु ). **वळती**-स्त्री. १ रानामध्यें गेलेलीं गुरें परत वळवून आणण्याचा व्यापार. २ गुरें वळून आणण्याची पाळी ( गुराखी पोरें खेळत असतां ज्यावर डाव येतो त्यानें गुरें वळावीं असा संकेत ). ' वांसुरें चारितां गोविंदा। वळत्या न देसी तूं कदा। '-ह ३६.५६; -तुगा १७०. ३ एकदम, एकाएकीं आगमन, फेरी. ( क्रि० येणें ). ' दूध उघडें टाकूं नको मांजराची जर कोणीकडून वळती आली तर खाऊन जाईल. ' ४ उलट चाल, जाण्याचा रोख, वळण; फेरी. ' गुरें गांवाकडे येत होतीं आतां वळती रानाकडे चालली. ' ५ ( जुगार ) विशिष्ट दान पडलें असतां घेण्यासाठीं मांडलेलें द्रव्य. ६ छपराचा सुरुवातीचा, तळचा भाग. ( क्रि० बांधणें ). ७ हल्ला चाल. ( क्रि० करणें ). ' मौजे मजकुरावरि डफळेची फौज येऊन वळती केली ते समयीं युद्ध जाहलें. '-बाडशाछ १०७. **वळतीस येणें**-वळणीस, वळणीस येणें. ' त्यांनीं धनीण बहु दक्ष असें म्हणावें। घेवोनि धाक हृदयीं वळतीस यावें। '-अर्वाचीन ३८२. **वळते करणें**-वजा करणें. **वळवणी**-स्त्री. एक हत्यार; पकड. **वळविणें**-उक्रि. ( वळणें प्रयोजक ). १ आकार देणें; घडविणें. २ फिरविणें; कलतें करणें ( केंस इ० ). ३ गिरविणें; घटवणें, वळण देणें ( कित्ता, खरडा, हस्तव्यवसाय इ०ला ). ४ तयार करणें ( पिळून, विणून ). **वळाण-न**-न. ( प्र. ) वळण पहा. **वळित, वळीत**-स्त्री. १ सुरकुती. ' लपौनि चोर खाचेचां वोहळीं। वळीतपळिताचें तांडवन घाली। '-भाए ५२१. २ वळती; परत फिरणें. (क्रि० धरणें). ' आतां मोडूनि टेलीं दुर्गे। कां वळित धरिलें खगें। ' -ज्ञा १३.५८१. ३ वळती पहा. ४ मेलेलें माणूस भूत होऊन घरीं परत येणें. **वळींव**-वि. १ वळलेलें; पीळ दिलेलें; विणलेलें. २ घट्ट पिळलेलें, वळलेलें; पीळदार. ३ भक्कम; चांगलें मजबूत; घटलेलें ( शरीर इ० ) **वळीव गवरी**-स्त्री. गोळा बनविलेलें शेण; गोल गवरी; थापा-थापटी नव्हे.

**वळण**—स्त्री. ( व. ) वळचण पहा.

**वळण**—वि. ( गो. ) अर्धे जळलेलें. **वळणुचें**-क्रि. ( गो. ) अर्धेमुर्धे जळणें. [ सं. ज्वलन-वळणें ]

**वळंत**—स्त्री. ( गो. ) भिंत.

**वळतर**—न. ( बडोदें ) मोबदला; परतफेड. 'दिलेला इजारा विशेष कारणानीं इजारदाराच्या कसुरीवांचून रद्द होईल तर वळतर देणें. '-खाअं १२०. [ गु.; तुल. म. वळता ]

**वळंदी**—स्त्री. ( हेट. ) माजघरांत वस्त्रें ठेवण्याकरितां बांधलेली काठी. वळय पहा. [ देप्रा. वलय=घर ]

**वळंबणें**—अक्रि. ओळंबणें पहा. **वळंबा**-पु. ओळंबा पहा.

**वळय**—स्त्री. ( कु. ) माजघर. [ देप्रा. वलय=घर ]

**वळंव**—न. ओबडधोबड मोठा धोंडा ( शेताचा बांध, पाया इ०स लावतात ).

**वळवंजी**—स्त्री. ( राजा. ) गोमेची एक जात. हिच्या अंगास चिकट मळ असून तो रात्रीं चकाकतो. -शाकको.

**वळवणी**—न. वळवाचा पाऊस. वळवा पहा. ' आला पुर वळवणी वहालें। तळचें जळ तसेंच सख्या राहिलें। '-प्रला १७२. [ वळवा+पाणी ] म्ह० वळवणी आलें आणि तळवणी घेऊन गेलें.

**वळवा**—स्त्री.अव. १ (वारा-पाऊस पूर्वेकडे जाऊन पुन्हां पश्चिमेकडे वळतो यावरून) पावसाचीं पूर्वा ते स्वातीपर्यंतचीं नक्षत्रें. २ या नक्षत्रांचा पाऊस. [वळणें] **वळवाचा पाऊस**-पु. १ पूर्वेकडून येणारा पाऊस. २ (ल.) कोणीकडे वळेल, काय करील याचा नेम नसलेला माणूस; लहरी माणूस. **वळीव, वळीव पाऊस**-पुस्त्री. वळवाचा पाऊस.

**वळवास**—पु. माशाची एक जात. आक्टोबर-नोव्हेंबरांत पकडतात.

**वळविच-ज**—स्त्री. १ (कों.) घोण. २ एक प्रकारचा मुंगळा.

**वळविणें**—उक्रि. (क.) विळविणें पहा.

**वळशिंगटी**—स्त्री. माशाची एक जात.

**वळसणें**—अक्रि. (प्रां.) वळसा घेणें; भोंवतीं फिरणें.

**वळसा**-पु. १ वेढा; भोंवती, मागेंपुढें फेरा. (क्रि० घेणें; घालणें; पडणें). 'हरि म्हणे गा अविनाशा। जरासंधें घातला वळसा।' -कथा २.२.८९. २ वळण; प्रदक्षिणा. -ज्ञा ७.७२. 'पदार्थास वळसा घालून किरणांस पलीकडे जाववत नाहीं.' ३ बंधन. 'उडाला देहबुद्धीचा वळसा। तुटला फांसा कर्माचा।' -एभा १८.७७. ५ भोंवरा. -ज्ञा १३.१८६. 'संता ठाया ठाव पूजनाची इच्छा। जीवनींच वळसा सांपडला।' -तुगा ३४४३. ६ संकट; त्रास; अनर्थ. 'निद्राकाळीं ढेकूणपिसा। नाना प्रकारीं वळसा।'-दा १७.६.११. ७ गांठ; अढी. 'अंतरीं पीळपेंच वळसा। तोचि वाढवी बहुवसा।'-दा १५.६.१४. ८ सहाणेवर एक वेळ मागेंपुढें घासणें (मात्रा). (क्रि० घेणें; घालणें; उगाळणें). ९ गोंधळ; गलबला; 'बाहेर फुटली मात। वळसा होत नगरांत। लोक दुःखें वक्षस्थळ पिटीत। राजकिशोर आठवुनि।' -शिली १४.१७१. [वळणें] **म्ह०** काखेस कळसा आणि गांवास वळसा. **वळसे वेलांट्या**-स्त्री.अव. फाटे; फिरवाफिरव. 'आतां या वेळेस वळसे वेलांट्या नकोत.' -भा ३७.

**वळसरा**—पु. पावसाचा तोटा; दुष्काळ. 'टोळखाद व वळसरा होऊन ...'-ख ४२६०.

**वळसा**—पु. गडबड; धामधूम (जनतेची) 'चंद्ररायदुर्ग येथील तमाम वळसा निघून गेला.' -ख २०७४.

**वळसाल**—न. (बे.) पेरणी केल्यानंतर शेतांत फिरविण्याचें कुळवापेक्षां हलकें हत्यार. (क्रि० घालणें; करणें).

**वळसाव(वि)णें**—उक्रि. १ (नवीन मडकें) निरढावणें; रांपवणें; पक्कें करणें. -अक्रि. २ सरांवणें; पडकणें. [वळसा ?]

**वळही, वळ्हई**—स्त्री. गंज. (प्र.) वळई पहा.

**वळाण**—न. (व. ना.) शेताची वाफ; शेतांत पाऊस पडल्यानंतर शेत कोरडें होणें; वाफसा. [वाळणें] ॰**पडणें**-औत चालण्याइतकी जमीन कोरडी होणें; वाफसा येणें. ॰**सार, वळाणी-नी**-वि. (व.) पाणी धरून न ठेवणारी व वाहण्यास लवकर योग्य होणारी (जमीन).

**वळार**—पु. (गो.) बांगड्या भरणारा कासार.

**वळिंबा**—पु. १ वळंबा, ओळंबा पहा. २ खळ्याच्या मेढीभोंवतालचें दोरीचें कडें.

**वळिवट**—पु.अव. गव्हले; वळवट पहा. 'नखिया माळतिया सळिवें। इत्यादि वळिवट् बरवें।' -ऋ ८२. -एभा २५.२७२.

**वळी**—स्त्री. १ रांग; ओळ; पंक्ति. 'जेथें वळी धरुनि पंचनळी बसे ते।' -र ४६. २ लिहिण्यासाठीं ओढलेली रेघ; ओळ. ३ (ल.) तऱ्हा; पद्धत; वळण; धोरण. ४ सुरकुती; वळकटी (शरीरावरील). ५ (कु.) वाफा. [सं. आवलि]

**वळी**—स्त्री. १ जनावराच्या पाठीला लागूं नये म्हणून खोगिराखालीं दोन उशा एकत्र शिवतात ती; खोगिराखालची गादी. 'ठेवितां वरि पलैंक वळीतें। वावरोनि धरणी कवळी ते।' -किंगवि २५; -मोउद्योग १३.३१. २ वळकटी; गुंडाळी. ३ रास; गंज. 'वळी पोथ्यांच्या त्या तुम्हि असुर रीती शिकवितां।' -वामन नृहरिदर्पण १.३७. ४ सुरकुती; घडी; दुमड. 'भीतरीं वळी न धरे। कोठ्यामाजी संचरे।' -ज्ञा ६.२१७. ५ (विणकाम) तातूला तातू जोडणें; सांधणी पहा. [वळणें] ॰**मूठ**-पु. १ वळी आणि मूठ. खोगीर समुच्चयार्थी. (क्रि० कसणें; बांधणें; आवळणें; घालणें; ठेवणें). 'चवकीदारानें वळीमूठ नेटी उचलून हकाची।' -पला ७०. २ गोणी. ३ लग्नांत वधूमातेला देण्यांत येतें तें खणलुगडें.

**वळीत**—न. धरपकड; घेरणें. 'गुंडांचें वळीत करण्याचें कामहि कांहीं भागांत पोलिसांनीं सुरू केलें होतें.'-केसरी २७.१०.३६.

**वळू, वळ्हू**—पु. १ प्रजोत्पादन करण्यासाठीं राखलेला घोडा किंवा बैल; न खच्ची केलेला न बडवलेला घोडा, बैल. 'वळू, घोडे मधुर ध्वनी ऐकून धावत येतील.' -व्हेनिसचा व्यापारी (शेक्सपियर नाट्यमाला) पृ. १७२. ॰**दाखविणें**-फळविणें; घोडी, गाय यांना गर्भधारणा करविणें.

**वळे, व्हळे**—स्त्री. (बे.) जाळ्याची टाकी.

**वळेसर**—पु. (कु. गो.) फुलांचा गजरा, वेणी.

**वळोंचा-जा**—स्त्री. (कों.) एक जातीची गोम, वळविच.

**वळ्या**—पु. शंखासारखें एक कवच. हें वळावर घासतात. [वळ]

**वळें**—न. १ बोटांत घालण्याचें सोन्या-चांदीचें वेढें; लहान कडें; अंगठी; जोडवें. 'पोल्हारें विरह्या दशांगुलिं वळें गर्जोनिय पोंचटें।' -अनंत सीस्व ३९. २ (कु.) नारळाचा अर्धा भाग;

वाटी. ३ (कु.) शिगर करण्याकरितां माडाच्या पिढ्याचें काढलेलें बातळ भेत. [सं. वलय]

**वळूहई**—स्त्री. वळई पहा.

**वक्ष, वक्षस्थल**—न. १ छाती; उर. -ज्ञा ९.४८०. 'वरूनिया हाहाकार। वक्षस्थळ बडवी नृपवर।' २ (नृत्य) एक अभिनय हा वक्षस्थलानें दाखविला जातो. सम, निर्भुग्न, अभुग्न, प्रकंपित व उद्वाहित अशी पांच प्रकारची वक्षस्थळाची ठेवण असते. [सं.] **वक्षःस्वस्तिककरण**-न. (नृत्य) पाय स्वस्तिक करणें, हात रेचित करणें व छातीवर ठेवणें, छाती आकुंचित करणें. **वक्षोज, वक्षोरुह**-न. स्तन; कुच. 'उठेत वक्षोरुह हे उठाणे।' -सारुह २.५६.

**वक्ष्यमाण**—वि. बोललें जाणारें. [सं.]

**वा**—उभय. १ पक्षांतरबोधक अव्यय; नाहींतर; अथवा; किंवा. 'त्या तो भी जैसा गज भीतो सिंहासि सिंह शरभा।' -मोभीष्म ५.४०. २ व, आणि. 'हिराजि वा केसव मलह वा माळि.' -मंगळवेढ्याचा शिलालेख, ग्रंथमाला.

**वा**—स्त्रीभव. (संक्षेप) उवा. 'वा चामवा गोचिड।' -दा १७.६.२३. 'तुका म्हणे वाच्या रागें' -तुगा ३२८४.

**वा**—उद्गा. आश्चर्यदर्शक उद्गार; वाहवा. 'वा! असं कधीं झालंय.'

**वा**—स्त्री. (गो.) आई. 'वा भार गेलां' [आवय]

**वा**—क्रि. (वहा याचा संक्षेप) वहा. 'संतचरणीं अभिमान।' -आपद ३३ ८०. [वाहणें]

**वाइच, वांइच, वाईच, वां(ई)स, वाइसा, वाईसा**—वि. (अशिष्ट) थोडा; जरा; अल्प; किंचित. -क्रिवि. थोडासा; जरासा; क्षणिक. [सं. अल्पीयस्]

**वाइ(ई)चाळ**—वि. अश्लील; वात्रट; वाईट. 'मस्करी करून वाइचाळ शब्द बोलत असे.' -स्त्रीच २.१२२. 'माजिऱ्या सारिखें वाईचाळें' -तुगा ३०८७. [वाचाळ]

**वाइ(ई)णें**—सक्रि. १ वाहणें; धारण करणें; चढविणें. 'धनुष्यें वाइलीं हातीं।' -ज्ञा ११.६८२. -एरुस्व १०.२४. २ देणें; अर्पण करणें. 'तेणें रीतुरायें वाईलें।' -भाए ४२८.१३३. 'महातपाचा पाउड वाइजेंच।' -शिशु ११३. 'प्रवृत्तीवरी निगड वाउनि' -ज्ञा ८.२४. [सं. वह्]

**वाइणें**—सक्रि. वाजविणें. 'भयंकर, अति भेदकु महा मोठा शंखु। वाइला भीमसेनें' -गीता १.१०९९. 'नारदतुंबर वाउनी ब्रह्मवीणा।' -दावि ३४१. [सं. वाद्]

**वाइ(ई)ला**—वि. वेगळा; निराळा; भिन्न. 'कैसेमि वाइले वतरे। हे मुगुट भोजा।' -ऋ ३६. **वाइलपण**-न. (व.) रिकामपण. [वायला]

**वाई**—स्त्री. वायु; वातः वारा. [सं. वायु]

**वाई**—क्रिवि. वाया; व्यर्थ; निरर्थक. -तुगा. [सं. व्यय]

**वाई**—स्त्री. (भि.) वेळ. 'धोडीक वाईनें तिया डेडिम दुवां लाग्यो' -भिल्ली २५. [सं. वेला]

**वाईट**—वि. अनिष्ट; गुणरहित; अयोग्य; अशुभ सामान्यतः चांगला याच्या उलट फार व्यापक अर्थानें वापरतात. [सं. वि+अय्+त] ०करणें-नाश, अहित करणें. **वाइटावर असणें**-द्वेष करणें; बरें न पाहणें. अहित चिंतणें. सामाशब्द- ०बरा-वि. सामान्य; मध्यम; थोडा फार वाईट. ०**वांकडा**-वि. अयोग्य; निरुपयोगी. निरर्थक; सर्वतः वाईट; सामान्यतः वाईटच ०**वाणा**-वि. थोडासा साधारण वाईट. ०**विठ्ठल**-वि. १ निरुपयोगी; कुचकामाचा; व्यर्थ. २ कुरूप; विद्रूप; वेडावाकडा. ०**साईट**-वि. अपथ्यकर; निरर्थक; निरुपयोगी; सामान्यतः वाईटच.

**वाईण-न**—न. (कों.) उखळ. [सं. वह्]

**वाईनसळ**—न. उंसाच्या चरकाचीं मुसळें बसविण्याची खालची लाट; काटवट. [सं. वाहन+शलाका]

**वाईल**—पु. आवेल; चुलीशेजारचा भाग; वैल. [वायला] ०**चूल**-स्त्री. वैल असलेली चूल.

**वाईसर**—पु. नट घट्ट बसविण्यासाठीं, दोन भाग एकत्र घट्ट जुळण्यासाठीं मध्यें दिलेली चकती. [इं. वॉशर]

**वाउ(ऊ)गा**—वि. व्यर्थ; निरर्थक; रिकामा; मिथ्या. 'कीर्ती जल्पेसी वाउगें।' -शिशु १०७२. -ज्ञा १५.२३८. [सं. वि+अय्]

**वाउधाण-न, वावधाण-न**—न. वादळ; वावटळ. 'वाउधाणाचिया परी। जो आश्रो केहींवि न धरी।' -ज्ञा १३.६८८. [सं. वायु+उत्थान]

**वाउर-ळ**—वि. व्यर्थ; वावगें; निरर्थक. 'कायिसया ते असुर। संपत्ति पोषिति वाउर।' -ज्ञा १६.४२२. 'ऐसी तूं महा पुंश्चली। आतां काय स्फुंदसी वाउळी।' -कथा ३.१६.५२. [वाउगा]

**वाउरुळ**—न. वारूळ. 'म्हणती वाउरुळाचे नळे।' -उषा १७०८. [वारूळ]

**वाऊ-ए-ओ**—वि.क्रिवि. व्यर्थ; वाऊगें; वाईट. 'धरितासि ममत्वें करून। परंतु वाऊ।' -गीता १३.३७४. 'हें काई वो माये। कैसें वायाचि वाए' -शिशु ६७४; 'तंव देखिलें तें जालें वाओ' -दाव ३८२. -ज्ञा ८.२४८. **वाएकेलें**-वि. व्यर्थ. 'आमुते संबंध सोहळे। पृथ्वी कुंजे वाए केलें।' -ऋ १५.

**वाऊळ**—न. दोरीस माडाच्या पात्या लावलेलें एक आऊत. याचा मासे धरण्यास उपयोग करतात.

**वाऊळ**—न. (राजा.) कातळीवरील खळग्यांत माती सांडून झालेलें शेत.

वाक्-ग्—स्त्री. वाणी; भाषण; आवाज; वाचा; बोलण्याची शक्ति किंवा इंद्रिय. [ सं. वाक् ] सामाशब्द–०चतुष्टय–न. वाणीचे चार प्रकार –परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी. ०चातुर्य–न. बोलण्यांतील कौशल्य; वक्तृत्व. ०चापल्य–न. १ बोलण्यांतील अस्खलितपणा, चतुरता. २ बडबड; वटवट; भरमसाटपणें बोलणें; अतिशय बोलणें. ०पटु–वि. बोलण्यांत कुशल, तरबेज; पंडित; वक्ता. ०पंडित–पु. (उप) ताडकन् उत्तर देणारा मनुष्य; वाचाकुशल; तडकाफडकी उत्तर देणारा. ०पथ–पु. संभाषण; भाषणाचा ओघ. 'नुसधीच शांतिकथा। आणिजेल कीर वाक्पथा।' –ज्ञा १३.११५५. ०पाटव–न. बोलण्यांतील चातुर्य, कौशल्य; वक्तृत्व. ०पांडित्य–न. बोलण्यांतील तत्परता; सद्यः-प्रत्युत्तर देण्याची कला. ०पारुष्य–न. कठोर भाषण; खरडपट्टी; शिवीगाळी; दुर्भाषण. ०प्रचार–पु. भाषेतील संप्रदाय; म्हणी; विशिष्ट शब्दसमूहास वारंवार उपयोजिल्यामुळें विशिष्ट अर्थ येण्याचा प्रकार; रूढी. ०प्रतिबंध–पु. १ भाषणबंदी; बोलण्याचें थांबविणें; गप्प करणें, बसविणें; तोंड बंद करणें; कुंठित करणें. २ स्तब्धता; शांतता; निःशब्दता. ०सरणी–स्त्री. बोलण्यांतील अस्खलितपणा; वाक्प्रवाह; शैली. ०सिध्दि–स्त्री. शब्दांतील अमोघता; बोललेला शब्द खरा होण्याची शक्ति. ०सुकुन–न वचन. 'म्हणूनु वाक्सुकुन दिधलें.' –मंगळवेढें लेख, ग्रंथमाला. ०सृष्टि–स्त्री. बोलण्यांतील चातुर्य, विचित्रता, कौशल्य. 'हे वाक्सृष्टि एके वेळे। देखतु माझे बुद्धीचे डोळे।' –ज्ञा १४.२०. ०स्तम्भ–पु. बोलण्यांत अडखळणें; थांबणें; वाग्रोध; गहिंवरामुळें वगैरे बोलतांना कुंठित होणें. वाग्जल्प–ना–पुस्त्री. वल्गना; बडबड; वटवट; लबलब; टकळी. ०जाल–न. शब्दपांडित्य; बडबड; वटवट; पोकळ भाषण. 'वाग्मिश्रयाचें वाग्जालिक। शब्द शास्त्रं सोडिलीं।' –एरुस्व २.३७; –ज्ञा १३.२०. ०दंड–पु १ धमकी; खरडपट्टी शब्दताडन. २ वाचेचा संयम; भाषणावर नियंत्रण. ०दत्त–वि. १ वाङ्निश्चय झालेला; शब्दांनीं दिलेला; विवाहवचन दिलेला. २ तोंडी वचन दिलेला; शब्दांनीं संमत केलेला; वचनांकित. ०दान–न. १ वाङ्निश्चय; विवाहाचा करार; वरवधूयोजना. २ तोंडी करार; वचन. ०दुष्ट–वि. १ अभद्र बोलणारा; अपशब्द बोलणारा. २ चुकीचें बोलणारा; चुकीची भाषा वापरणारा. ०देवता–स्त्री. वाणीची देवता; सरस्वती. ०दोष–पु. १ वाणीची अशुद्धता; चुकीचे उच्चार. २ अपशब्द; निंदा; अश्लीलता. ३ जिव्हाभ्रंश; चुकून शब्द बाहेर पडणें; वाक्स्खलन. ०ध्वज–ध्वज–पु. १ वाणीरूप पताका. २ प्रसिद्धी; दवंडी. 'स्वधर्मु वाग्ध्वजीं। बांधी नेणे।' –ज्ञा १३.२०७. ०नियम–ङ्नियम–पु. १ भाषेसंबंधीं, बोलण्यासंबंधीं नियम, विधि. २ भाषणबंदी; बोलण्यावरील नियंत्रण. ३ मौन; मूकत्व. 'वाङ्नियम सदैव विहित कां गमला।' –मोसभा ३.७. ०निरोध–ङ्निरोध–पु. १ बोलणें कुंठित करणें; गप्प करणें. २ वाचेवरील संयम; निःशब्दता; शांतता. ०निश्चय–ङ्निश्चय–पु. लग्नाचा करार; वरवधूयोजना; वरवधू निश्चित करण्याचा विधि. ०बाण–पु. कठोर शब्द; टोंचणारे, बोचणारे शब्द; कटु वाचा. 'लागति वाग्बाण काळजाला कीं।' –मोभीष्म १०.८. ०ब्रह्म–न. वेद. 'एकीं वाग्ब्रह्म अभ्यासें थोकडें केलें।' –ज्ञा १२.११२. ०भव–वि. वाचिक; वाचेपासुन होणारें. 'वाचे वसे तें वाग्भव। तप जाणावें।' –ज्ञा १७.२२३. ०मय–ङ्मय–न. साहित्य; भाषेतील ग्रंथसंपत्ति; गद्यपद्यादि ग्रंथसमूह. –वि. १ शब्दांस अनुसरून; मूळ वचनाप्रमाणें; वाणिरूप. 'विवरण जाला वाङ्मय। संपूर्ण पर्याय नवमिचा' –ज्ञानप्रदीप ७७९. २ वाचिक; शब्दमय. 'एवं शारीर जें तप। तयाचें दाविलें स्वरूप। आतां आईक निष्पाप। वाङ्मय तें।' –ज्ञा १७.२१५. ०मयी–स्त्री. वाणी; वक्तृत्व. 'जी एकमात्र भूषण पुरुषाप्रति तीहि वाङ्मयी देवी।' –गोविंदाग्रज. ०मात्रा–स्त्री. सेकंद; क्षण. ०माधुर्य–न. वाणीची मोहकता, मधुरता, गोडी; रसाळपणा. वाग्मी–वि. १ बोलण्यांत पटाईत; चतुर; वक्ता. २ बोलघेवडा; बोलका; वटवट करणारा; वावदूक. ०मुख–न. आरंभीचे शब्द; सुरवातीचें वाक्य. ०युद्ध–न. वादविवाद; आवेशयुक्त व जोराची चर्चा; तोंडातोंडी. ०रोध–पु. १ बोलण्याची मनाई; तोंड बंद पाडणें; गप्प करणें. २ स्तब्धता; मूकता. ०वज्र–न. शब्दशस्त्र; वाचारूप हत्यार; शाप. ०वल्लरी–वल्ली–विलासिनी–स्त्री. सरस्वती; वाणीची देवता. ०वाद–पु वादविवाद; वितंडवाद. 'पाखंडाचे दरकुटे। मोडी वाग्वाद अव्हाटे।' –ज्ञा १२.१४. ०विलास–पु. १ शब्दकौतुक; शाब्दिक करमणूक; वाणीची क्रीडा; वाणीचा प्रभाव. 'जेसें सरस्वतीपुढें मूढें बहुत। वाग्विलास दाविती।' २ भाषाविनोद; शाब्दिक करमणूक. ०वीर–शूर–वि बोलण्यांत धीट, शूर, पटाईत. ०वृद्धि–स्त्री व्याख्यानविस्तार; स्पष्टीकरण. 'आतां गीतार्थाची मुक्तमुदी। लावी माझिये वाग्वृद्धी।' –ज्ञा १८.२७. ०व्यय–पु. व्यर्थ बडबड; निरर्थक भाषण, बोलणें; शब्दांची व्यर्थ काथ्याकूट. ०व्यापार–पु. बोलाचाली; गप्पासप्पा; भाषण; परस्पर बोलणें, चालणें. 'तेथ के नाग्व्यापारा। अवकाशु असे।' –ज्ञा १८.१.३०. ०शून्य–सून्य–वि. वाचाहीन; मुका; बोलतां येत नाहीं असा. 'मज वाक्सुन्यास वदवावें।' –दा १.२.२.

वाक–ख—पु. ताग, अंबाडी, घायाळ वगैरेच्या सालीचा दोर; तंतु.

वाक—पु. एक पक्षी.

वांक, वाक—स्त्री. १ स्त्रियांचें एक बाहुभूषण; दंडांतील दागिना. 'नेपुरें वांकी कट किंकिणी।' –वेसीस्व ५.६. १

पायांतील वाळें; पायांतील दागिना. 'गजेती चरणीं वाकी अभिनव ।' -तुगा २९१. -न. १ हांडीची फासळीसारखीं लांकडें; गोजापासुन वन्यापर्यंत टोकावयाचीं वमानदार लांकडें. २ व्हाटास आढयांच्या दोन बाजूंस बसविलेलीं बांकदार लांकडें -पु. १ वक्रता; वांकडेपणा. २ (ल.) कल; ओंक; ओढा; तोल. ३ (ल.) द्वेष; तेढ; मत्सरबुद्धि. ४ (ल) दोष; चुकी. 'ह्यांत शिवबाचा कांहीं वांक नाहीं.' -सूर्यग्र ७. ५ (व.) तथ्य; अर्थ. 'त्यांत कांहीं वाक नाहीं.' **वाकड्वेळा-वाकरवाळ्या-वेळा**-स्त्री. वाकी; स्त्रियांच्या दंडावर घालण्याचा दागिना.

**वाकई**—वि. दुरुस्त; यथायोग्य. 'पैसा मजकूर करार वाकई याणी सांगितला.' -पेद ६.१९; -पया ४६६.

**वाकचवडा-डें**—वाघचवडा पहा.

**वाकटांवचें**—क्रि. (गो.) चोरी करणें. **वाकटी**-स्त्री. (गो.) चोरी.

**वाकड-डी**—स्त्री. पावसाची झड; सर; सतत वृष्टि. 'कां वाकडिया ढोरें बैसलीं ।' -ज्ञा १३.५६५. 'अति वृष्टीची वाकडी लागली ।' -दावि १४१.

**वाकड**—वि. वांकडा; वक्र. 'वेऊनि वाकड करूनि मुख ।' -दावि ११५.

**वांकडणें**—अक्रि. १ वांकणें; वांकडें होणें; आंखडणें; कलणें. २ वांकडें बोलणें. 'संगिकासी बोलतु वाकडोनि ।' -दावि ३७१.

**वा(वां)कडा**—वि. १ वांकलेला; वक्र; कललेला; लवलेला; वळलेला; सरळ नव्हे असा. २ (ल.) विरुद्ध; तेढ असलेला; प्रतिकूल **वाकडकोका-मुसका-वाकिडातिकडा-वाकडा तिडका-वांकडा तेहुडा**-वि. वक्र; वाकलेला; कुबडा; वक्रांग; सरळ नसलेला. **वाकडवाद**-पु. तंटा; बखेडा; याप्रमाणेंच. **वाकडनाक्या - पावल्या - मान्या - मुसका - शिंगी - शिंग्या-इ०. वाकडा गुणाकार**-पु. गुणाकाराचा एक प्रकार **०ताईत**-पु. एक गळयांतील ताईतासारखा अर्धचंद्राकृति व घागऱ्या लावलेला मुलांचा अलंकार. **०भांग**-पु. एका बाजूस कमी केंस ठेवून पाडलेला भांग. **०मार्ग**-पु. आडवाट; अप्रत्यक्ष मार्ग. 'वांकडया मार्गानें कां बोलेल ।' -कर्म १.२९ **०विंचुका**-वि. वेडावांकडा. 'कां वाकडा विंचु कां पाडलीं ।' -ज्ञा ९.६. **वांकडी दृष्टि-नजर, वांकडा डोळा**-स्त्रीपु. तिरस्कार, द्वेषयुक्त किंवा पापी दृष्टि. **०पगडी**-स्त्री. अवज्ञासूचक वर्तणूक; विरुद्धाचरण. (क्रि० करणें; ठेवणें). **०मान करून पाहणें**-स्त्री. अवज्ञादर्शक दृष्टि. **०म्हैस**-स्त्री. १ वाकडया शिंगाची म्हैस. २ (सांकेतिक) भिंच. **वाकडी वाट**-स्त्री. १ विपथ; व वळलेला रस्ता; रहदारीचा नव्हे असा मार्ग. 'वाकडी वाट कोणीकडे केली ।' -होला २७. २ अन्याय्य मार्ग; कुमार्ग. 'स्वइच्छेविरुद्ध वाकडया वाटेनें जावें लागतें.' -विक्षिप्त २.१३. **०समजूत**-स्त्री. १ कलुषित मन; पूर्वग्रह; दुराग्रह. २ तेढ; द्वेष; गैरसमजूत. **वांकडें**-न. १ वैर; द्वेष. 'बाहेर मिरविशि आंत हरिशीं वांकडें ।' -राला -क्रि. १ प्रतिकूल; निष्ठुर; न आवडणारें. 'प्रभो शरण आलिया वरि न व्हा कधीं वांकडें ।' -केका ४०. २ अयोग्य. 'सद्गुरु वाचुनि वांचुनि विफल जिणें यांत वांकडें काय ?' -कीर्तन १.३. **०नेरा**-पु.अव. तिफाशी सोंगटयांतील एक दान. ६+५+२. **०दाखविणें**-क्रि. वेडावणें. **०पडणें-येणें**-क्रि. भांडण होणें; वितुष्ट येणें; कलह होणें. **०पाऊल** न. दुर्वर्तन; दुराचरण; व्यभिचार.

**वांकडा**—पु. १ मुलाचें हातांतील दागिना. २ स्त्रियांच्या पायांतील दागिना.

**वाकंडी**—स्त्री. (प्र.) वाखंडी; घायपात.

**वाकण**—न. १ वळण; बांक; वक्रमार्ग (नदी, मार्ग वगैरे मध्यें). 'जेथें रान भयाण फार असती कांटे कडे वांकणें ।' -केक ४५. २ खाडी; आखात; उपसागर. ३ सामान्यतः बांक; वक्रता. **वाकणें**-क्रि. १ कलणें; वांकडें होणें; तिरपें होणें. २ पोंक येणें. ३ (ल.) नम्र होणें; शरण येणें; नमणें. [सं. वंक्=वाकणें]

**वाकता**—स्त्री. पदराची वगैरे खोळ; झोळी.

**वाकदोर**—पु. वाकाचे दोर; वाखदोर.

**वाकनवीस-निवीस-नीस, वाकेनीस**—पु. १ (मूळ फारसी) लेखक; वृत्तांतलेखक; रोजची दैनंदिन माहिती लिहून ठेवणारा; अखबारनवीस. २ (रूढ) मोठया घराण्यांतील खासगीकडील हिशेब, कागदपत्र, भोजन वगैरे सर्व कामें करणारा कारभारी. -रा ६.५०९. [अर. वाकिआ+नवीस्]

**वाकफ, वाकब, वाकीफ**—वि. १ जाणता; हुषार; तज्ज्ञ; माहितगार; अनुभविक. 'माझे चालीस व मुलखास वाकब.' -भाअ १८३८. २ माहीत; ठाऊक. 'त्याची अवस्था काय हें वाकफ.' -रा ५.१६८. [अर. वाकिफ] **०गार**-वि. माहितगार; तरबेज; निष्णात. 'त्यांचे विचार विशिष्ट शास्त्रांतील वाकबगार विद्वानांपेक्षां पुढें गेले होते' -टिले ४.३६३. **०गारी**-स्त्री. माहितगारी; हुशारी. 'तुम्हास वाकबगारी आहे.' -रा १२.६१. **वाकफीयत**-स्त्री. माहिती; ज्ञान; अनुभव. 'पागेचे कामांत महमद अजीमखां यांचीच वाकफीयत चांगली.' -रा ७.५६.

**वांकर**—पु. (कु.) बैलानें शिंगानें पाडलेला ओरखाडा, वळ. [वांक]

**वाकल्या**—स्त्रीअव. वांकुल्या पहा. 'वाकल्या दाविती अर्भका।'—दावि ७.२३३.

**वाकवट**—स्त्री. (प्र.) वाकवट-टी. वाखाचा गुंजडा, गुंडा.

**वांकवणें**—क्रि. (वांकणें प्रयोजक) १ वांकण्यास लावणें. २ (ल.) मानहानि करणें; नम्र करणें. 'फडणिसास वांकविला आहे हें पाहून विसूभाऊस समाधान झालें.'—अस्तंभा ३५.

**वा(वां)कस**—न. सुताराचें लांकूड तासण्याचें हत्यार; तासणी. **वाकसणें**-वाकसानें तासणें.

**वाकसणी-नी**—स्त्री. (व.) भांडीं घांसावयाची काथ्याची, वाखाची गुंडी. [वाख] **वाकसणें**-क्रि. (व.) दशादशा होणें; वाकासारखा पिंजला जाणें. **वाकसला**-वि. (व.) शिळा; वातड; लवकर न तुटणारा.

**वाकस(सा)ळ**—स्त्री. एका जातीचें भात.

**वाकळ**—स्त्रीन. १ गोधडी; अनेक चिंध्या शिवून केलेलें वस्त्र. 'घरीं मोडकिया बाजा। वरी वाकळांच्या शेजा।'—तुगा ६८२. २ जीर्ण वस्त्र; फाटकें वस्त्र, कपडा. 'कीं वाकळ पडे वाटेवरी। तें काठीमें उचलिजे वाटसरीं।'—मुरंशु ४११. ३ (ल.) वृद्ध, जरठ, जख्खड स्त्री; गलिच्छ, अजागळ स्त्री [सं. वल्कल] ०**गुंडी**-स्त्री. (व.) वाकळ गुंडाळलेला बागुलबुवा किंवा बाई. ०**फाडणें**-(व.) (ल.) व्यर्थ बडबड करणें.

**वाका**—पु. १ हकीकत; वर्तमान; घटना; म्हणणें. 'बोललेप्रमाणें वाकाहि लिहिला.'—चित्र १३७. 'उभय पक्षांचा वाका ऐकून निर्णय सांगितला.'—वाको ६२. २—स्त्री.मृत्यु. '२७ जिल्कादी पादशहाची वाका फौत जाली.'—रा ११.५५. [अर. वाकिआ]

**वांका**—पु. वाजविण्याचें शिंग. ०**ईत**, **वांकेकरी**-पु. शिंग वाजविणारा. 'इटेकरी, पटाईत वांकाईत...यांची संचणी करून इसम मेळविले.'—मराआ ६.

**वांकाड-ण**—न. वांकण पहा. 'वळणें वांकाणें भोंवरे।'—रा ११.७.३. **वांकाडी**-स्त्री. वांकण पहा.

**वाकांडी**—स्त्री. १ घायपात; वाकंडी पहा. २ (प्रां.) स्त्रियांचें कमरेभोंवतीं नेसण्याचें वस्त्र. (क्रि० नेसणें)

**वांकारणें**—क्रि. १ रस्ता सोडून बाजूनें जाणें (टाळण्याकरितां); चुकवून जाणें. २ दूर राहणें; संबंध टाळणें; बाजूस सरणें. ३ दूरदूर राहणें; संबंध टाळणें.

**वांकाळा**—पु. रहाटाच्या प्रत्येक बाजूस दोन वांकें कमी लावून तेथें सुंभाचा दोर बांधतात तो. [वांक]

**वाकि(की)फ**—वाकफ पहा. 'आपण वाकिफ नव्हतों.'—पेद २०.९४.

**वाकी म्हैस**—वांकडी म्हैस पहा.

**वांकीव**—वि. वांकविलेला; वळविलेला; वांकडा केलेला. 'पालखीचा दांडा वांकीव असतो.'

**वाकुडणें**—वांकडणें पहा. **वाकुडपण-पणा**-नपु. तीढ; तेढ; वक्रता. २ द्वेष; वितुष्ट. 'उभयतांचा हजारपांचशें वर्षांचा वांकुडपणा असल्यामुळें'—आगर ३ २२५. **वांकुडा**-(काव्य) वांकडा पहा. —ज्ञा १३.३४३.

**वांकुडी**—स्त्री. वाकांडी पहा.

**वा(वां)कुडी**—स्त्री. वाकडी पहा. झड; वृष्टि; मेघाच्छादन. 'जैंवी वांकुडी घाली घन।'—मुविराट ५.१११. 'बाणांची वाकुडी वर्षत। मंडप दिसत अंतराळीं।'—ह २४.२४.

**वाकुदणें**—अक्रि मनस्वीपणें नाचणें, उडणें, बागडणें, हंसणें.

**वा(वां)कु(को)ली**—स्त्री. (बहुधा अनेकवचनी उपयोग) वांकुल्या; विडंबन; चेष्टा; वेडावणें; तोंड वेडीवांकडीं करणें. 'द्विविद कुमति त्यातें दाखवी वांकुल्यातें।'—मोकृष्ण ६७ ८. —ज्ञा १७.९४.

**वांकें**—न. वांक अर्थ ४ पहा. १ रहाटाची अढेकड; चाकाच्या परीघाचा भाग. २ बांकदार लांकडाचें खुंटाळें. ३ हत्यारें, पळण वगैरे ठेवण्याचें बांकदार लांकडाचें साधन. ४ बावकडाच्या तिन्ही लांकडांपैकीं प्रत्येक.

**वाकेनवीस**—वाकनीस इ० पहा.

**वाकेरी**—स्त्री. एक सागरगोटीसारखी औषधी वनस्पती. इच्या गड्डयास भातें म्हणतात.

**वांकेस**—वाकस पहा.

**वांकेसिर**—वि. वांकडा, वक्रांग; कुब्ज. 'वाकेसिर पांगुळ थोटे।'—दावि ४७४.

**वांकोण**—न. वाकण पहा.

**वाकोरणें**—क्रि. वांकोऱ्यानें तास पाडणें.

**वाकोरा**—पु ओरखडा; ओचकारा; करकोचा.

**वाकोरी**—पु. (कुण. कर.) न्हावी; नापित. 'वाकोऱ्याला पोराकडून निरोप पाठविला.' [वाकोरा]

**वाकोरें**—न. १ दाराच्या फळीचा खालचा वात्या, वाता, वाथा. २ लहान तास पाडण्याचें आऊत; नांगरी.

**वाको(कु)रें**—न. लहान वाफा; पाणी देण्याच्या सोईकरतां पाण्याच्या दांडाजवळ पाडलेला लहान वाफा.

**वाक्य**—न. १ एक संपूर्ण विधान करणारा शब्दसमूह; पूर्ण अर्थ होईल इतका शब्दसंघ; लहान परिच्छेद; सिद्धान्त. २ उक्ति; वचन; नियम; सूत्र; विधान. 'सत्यव्रतरतमति पतिस तिचें वाक्य करावें लागे।'—मोरामायणें १.४९९. [सं. वच् = बोलणें] ०**खंडन**-न. १ सिद्धान्ताची असिद्धता प्रस्थापन करणें, खोडून काढणें; चुकीचें ठरविणें. २ वाक्यांतील दोषदर्शन; वाक्य चुकीचें ठरविणें. ३ वाक्याचे अवयव पाडणें; विभाग करणें; तुकडे पाडणें.

०दीप-पु. स्पष्ट, सुबोध वाक्यें. ०दोष-पु. वाक्यांतील न्यूनता, चूक, अशुद्धता इ०. साहित्यशास्त्रकार हे दोष अनेक मानतात. उदा० प्रतापरुद्र ग्रंथांत पुढील वाक्यदोष दाखविले आहेत:-शब्दहीन अथवा शब्दशास्त्रहीन; क्रमभ्रष्ट; विसंधि; पुनरुक्ति; व्याकीर्ण; वाक्यसंकीर्ण; भिन्नलिंग; भिन्नवचन; न्यूनोपम व अधिकोपम; भग्नबंद; विसर्गलुप्त; अस्थानसमास; वाच्यवर्जित; समाप्तपुनरात्त; संबंधवर्जित; पतत्प्रकर्ष; अधिकपद; अष्टाधांधिवाह;प्रक्रमभंग; अपूर्ण; वाक्यगर्भित; यतिभ्रष्ट; अशरीर; अरीतिक इ० काव्यप्रकाशांत हे दोष पुढील सांगितले आहेत:-प्रतिकूलवर्ण; उपहतविसर्ग; लुप्तविसर्ग; विसंधि; हतवृत्त; न्यूनपद; अधिकपद; कथितपद; पतत्प्रकर्ष; समाप्तपुनरात्त; अर्धांतरैकवाचकपद; अभवन्मतयोग; अनभिहितवाच्य; अस्थानपद; अस्थानसमास; संकीर्ण; गर्भित; प्रसिद्धिहत; भग्नप्रक्रम; अक्रम; अमतपदार्थ. याप्रमाणेंच शब्ददोष, शब्दालंकार, वाच्यालंकार पहा. ०पद्धति-स्त्री. वाक्यरचनेसंबंधीं नियम, वाक्यरचनेची रीति. ०पूजा-स्त्री. शब्दरूपी पूजा. 'स्वामी निवृत्तिरांजा तो अवधारू वाक्यपूजा ज्ञानदेवो म्हणे।'-ज्ञा १५.५९८. ०पृथक्करण-न. वाक्यांतील उद्देश-विधेयादि निरनिराळे भाग सांगून त्यांचा परस्परसंबंध दाखविणें. ०प्रयोग-पु. वाक्याची, शब्दांची किंवा भाषणाची योजना, रचना. ०रचना-स्त्री. वाक्यांतील शब्दांची मांडणी, ठेवण. ०विन्यास-पु. वाक्यांतील शब्दांची जुळणी, मांडणी, परस्परसंबंध; त्यासंबंधीं नियम वगैरे. ०विशारद-वि. वक्ता; पंडित; भाषणांत कुशल, चतुर ०शः-क्रिवि. प्रत्येक वाक्य घेऊन; प्रत्येक वाक्यास अनुसरून. **वाक्यार्थ**-पु. १ विधान; सिद्धान्त; वाक्याचें उद्दिष्ट; भाव. २ कथा. 'समर्थसेवकें वाक्यार्थ लिहिले।'-सप्र ३.२. **वाक्यालंकार**-पु. वाक्यांतील निरर्थक शब्द; केवळ शोभेकरितां वापरलेले शब्द; वाक्यांतील मोकळी जागा भरण्यासाठीं किंवा खंड पडूं नये म्हणून वापरलेला शब्द. उदा० जेंहस्ते.

**वांक्या**—स्त्रीअव. वांकी. वांक अलंकार पहा. 'पिंवळ्या वांक्या रुणझुणती।'-रामाची भूपाळी.

**वाख**—पु. धागा; तंतु. वाक पहा. **वाखंडी**-वाकंडी पहा.

**वाख**—पु. वाखळ; खळगा; खड्डा. 'वेंचेना परी कुसी। वाखा न पडे।'-अमृ ७.२६७. **वाखती**-स्त्री. खड्डा; खळगा; खोळ.' भरोनियां घरीं। राहिलों वाखती। तुका म्हणे संतापाडें। करा पुढें वाखती।'-तुगा २६४१. -ज्ञा ९.४८०; १३.८०६.

**वाखणणी-णें**—वाखाणणी वगैरे पहा.

**वाखणें**—क्रि. भिणें; वाकणें पहा.

**वाखदोर, वाखबगार, वाखबट**—वाक दोर इ० पहा.

**वाखर**—पु. १ वस्तरा. (गो.) वाखोर. 'प्रभुतेजें नुरे वर्ज्ये तेजस्वी पर वाखर।'-मोरोरामायणें ५.-तुगा ३०८२. २ खुरपें. 'राम तो सदसि प्रशस्त महागमे पर वाखर।'-मोरामायणें ५; -मोद्रोण ९.७६. -वि. वाखासारखे पांढरे; शुभ्र(केंस). 'जाहाले केश सकळ वाखरो।'-राला २९.

**वाखल**—स्त्री. पोटाची खळगी; भुकेमुळें पोटांत पडलेली खळी.

**वाखलणें**—अक्रि. वाखा होणें; अतिशय आजारी पडणें; गर्भपात होणें.

**वाखळ**—स्त्री. वाकळ पहा.

**वाखा**—पु. १ दुःख; पीडा; उपद्रव; नाश; संकट. 'पद प्रणामी बहु होति वाखे।'-सारुह ५.२५. २ महामारी, पटकी वगैरेची साथ. 'आकांत वाखा प्रळयें।'-दा ३.७ ८२. ३ अकाली गर्भपात. ४ संहार; मारामारी; युद्ध. 'बेलोलखानाचा थोर वाखा केला.'-सभासद ४९. [अर. वाकिआ]

**वाखाडी**—स्त्री. (गो.) तोफा सोडणारें जहाज.

**वाखांडी**—स्त्री. वाकंडी पहा.

**वाखाण-णा**—नपु. स्तुती; चर्चा; उहापोह; व्याख्यान; विवरण; स्पष्टीकरण.-ज्ञा १८.१७४५. [सं. व्याख्यान, वि+आ+ख्या; प्रा. वक्खाण; पं. बं. बखाणना; हिं बखानना; सिं. वखाणु; गु. वखाणवुं] ०णी-स्त्री. नांवाजणी; स्तुती. ०णें-क्रि.१ स्तुती करणें; नावाजणें; चाहां करणें. 'चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती।'-तुगा १४. २ वर्णन करणें; स्पष्ट करणें; विवरण करणें. 'सुचिलें तेंहि पुढें प्रशस्ते। वाखाणिजेल प्रसंगें।'-रास ५.७००.

**वाखार-री**—स्त्री. दुकान; कोठी; वखार पहा. 'भरील वाखारी श्रवणाच्या।'-एभा ३.८७२. 'तो देखे ज्ञानाची वाखारी।'-ज्ञा ७.१३५. **वाखारी वोखारी**-स्त्री. (महानु.) भांडारांतील नगद शिलक. 'भाडार फोडोनि वाखारी। ने तें नुपसाहे।'-दृष्टांतपाट ८१.

**वाखाळणें**—क्रि. वाखलणें पहा. चुकीनें वाखाणणें या अर्थी वापरतात.

**वाखील**—न. (गो.) अस्वल.

**वाखें**—न. १ आळें.-मसाप २.२.५७. २ (गो.) दिवाळें.

**वाखो**—पु. (कु.) वाखा पहा.

**वाखोर**—पु. वाखर पहा.

**वाखोरणें**—क्रि. वाकोरणें पहा. **वाखोरें**-वाकोरें पहा.

**वाखोरा**—पु. घर; वाखार पहा.

**वांखोरी**—स्त्री. माळ? -शर.

**वाखोरें**—न. खिसा; कप्पा. 'न्हाणवी तंव आपण चोळीचें वाखोरें पाहिलें।'-नागदेवस्मृति ३६.

**वाखोल्या**—स्त्रीअव. (व.) वाकुल्या पहा.

**वाग**—स्त्री. १ रहदारी; चाहूल; वापर; वागणूक २ वाहण्यास, नेण्याआणण्यास सोईस्करपणा, सुलभता. 'आठकीचा वाग'=आठ माणसांचें ओझें. [ वागणें ]

**वांग**—पु. १ सोनें, रुपें वगैरेस मोरचूत वगैरेमुळें पडलेला डाग. २ धातूच्या पत्र्यावर दिसणारे हातोड्याचे ठोके. ३ तोंडावरील मुरमाच्या पुटकुळ्या. 'वांग तिळ सुरमें लासें।' –दा ३.६.५०. [ सं. व्यंग ]

**वांग**—पु. बधिरता; जडपणा; शैथिल्य ( भारामुळें येणारें ). ( क्रि० येणें. )

**वांग**—पु. भलारी; शेतकाम करतांना म्हणावयाचें गाणें.

**वांग**—पु. एक मुलींचा खेळ. –मखेपु ३३६.

**वागनखा**—पु. एक वनस्पती.

**वागजाई**—स्त्री. वाघजाई, एक देवता. 'वागजाई देवी म्हणे तूं वागवाणी।' –सप्र ५.३१.

**वागटी**—स्त्री. १ एका माशाचें नांव. २ (मावळ) रानमांजराची एक जात.

**वांगड-ड-डी**—पुस्त्री. १ ( गो. कु. ) सोबत; सहचर. २ कुल; बेटाळें. 'भारद्वाज गोत्राच्या मंडळीला जसें त्या वांगडांत घेतलें...' –हिंदु ११.२.३०. **वांगडें**-क्रिवि. बरोबर; संगती. [ सवंगडी ]

**वागणूक**—स्त्री. वर्तन; राहणी; व्यवहार; चालचलणूक; सामान्यत: स्थितिगति. **वागणें**-क्रि. १ राहणें; स्थितिगति; अस्तित्व, चलनवलनादि व्यापार; वर्तन; व्यवहार; संबंध असणें; येजा करणें वगैरे. 'करी तिरंदाजी वागूं नेदी राउताला।' –ऐपो ८६. २ ( मनांत कामक्रोधादि विकार ) घोळत असणें; वाटणें; चालू असणें. 'या नियमावर विचार करतां असें बुद्धिस वागूं लागलें.' ३ ( ग्रंथ, पद्धति, तऱ्हा, मत, चाल ) प्रचारांत, चालू, व्यवहारांत असणें. ४ ( ना. ) प्रकृति नीट राहणें. **वागायला निघणें**-आजारी मनुष्य हिंडूंफिरूं लागणें. **वागायाचा**-वि. नेहमी वापरावयाचा; रोजच्या उपयोगांतला, धडोतीचा. 'हा कागद वागायाचा, हा सनदेचा.' **वागदार**-न. ( कु. ) ज्यांतून पुष्कळ येजा होते असें दार; वापराचें दार.

**वागबारस**—स्त्री. वसुबारस; गोवत्सद्वादशी; कार्तिक शुद्ध-द्वादशी. कांहीं ठिकाणीं अश्विन वद्य द्वादशी. या दिवशीं गोवत्सपुजा करतात.

**वागरजाळ**—न. ( कु. ) फडकीं व वागाळीं यांचें जाळें.

**वागराटी**—स्त्री एक वनस्पती.

**वागरु-रू**—न. जाळें; 'संसार वागरू चुके।' –भाए ४०. 'वागुरे मृग पडिला' –ज्ञाप्र ६९.

**वागवटी**—स्त्री. उक्ति; भाषण; बोलणें. 'ऐसा प्रेम होतसे कष्टि। आल्या पुसे वागवटी' –नव १५.१४, –नव ३.८५.

**वांगवांग**—क्रिवि. कसकस; वखवख; किरकिर; अंग, जीव, प्रकृति वगैरे बरोबर न चालणें; कुथुकुथु करणें. ( क्रि० करणें ).

**वाग(व)विणें**—सक्रि. १ वागणें प्रयोजक भार संभाळणें; निभावून घेणें; सांभाळणें; खपवून घेणें; जोपासना करणें. २ (ल.) लाबविणें; उडविणें; लबाडीनें घेऊन जाणें. **वागवून घेणें**-संभाळून घेणें; ( मूल चाकर वगैरेस ) सदयतेनें चालवून घेणें; निभावून घेणें.

**वागळ**—वागूळ पहा.

**वागळ-ळी-ळें, वाग्ली-ळी**—स्त्री. एक प्रकारचा मासा. याची शेपटी करवतीसारखी असते. याचें खत झाडास घालतात. याचे प्रकार-बोलाड, पलवा, वानवसा, भाटया, आध्या, शेवते इ०. –कृषि ७५६.

**वागा**—पुस्त्री. १ करगोटा; कडदोरा. 'जयजय तिमया कोनेरी। तुझा वागा सोनेरी।' –मध्व २७१. २ दोरे; लगाम. 'डोळेयांचिआं वागा ओढोनि।' –शिशु ६०८. 'तेथ गाडिया वागा। राउतें करीति श्रीरंगा।' –शिशु ५३१. ३ ( महानु. ) वाङ्‌निश्चय. 'उदारे वागा केला श्री गजमोहनु।' –मातृकी रुक्मिणी स्वयंवर ९५. ४ एक प्रकारचा अंगरखा; पोशाख.

**वांगा**—वि. ( व. ) तिरपा; चकणा; तिरवा. [ सं. व्यंग ] **वांगें पाहणें**-तिरवें पाहणें.

**वागाटी**—स्त्री. एक वनस्पती.

**वागावुंद**—वि. ( गो. ) उडाणटप्पू.

**वागारा**—पु. लगाम; दोर. 'सारथी आपुडीत वागारे।' –उषा ७३.२८. 'मोटका देओ वागारां हातु घाली।' –शिशु १०११.

**वागां(घा)रा**—पु. चाहूल. [ वागणें ]

**वागाळ**—न. ( कु. ) वाघूळ पहा.

**वागी**—पु ( गो. ) झिंगा मासा.

**वांगी**—स्त्री. एक फळभाजीचें झाड; याचे फळास वांगें म्हणतात. वांगा पुरणाची, वांगीं पोहे; वांगी भात हे याचे पदार्थ करतात. [ सं. वृंताक; हिं. बैंगण ]

**वागुजास्त**—स्त्री. सोंपवणूक. 'ठाणीं वागुजास्त करावी।' –रा ५.१३२. [ फा. वा-गुझास्तन् ]

**वागुजी**—स्त्री. 'गाढी वागुजी गोपाळा राणें राया' –शिशु ५१२.

**वागुर-रा**—स्त्री. पक्ष्यांस पकडावयाचें जाळें; पाश; बंधन. 'तंव पांगितु जाळातें। चिरितु वागुरेतें।' –भाए ४०.३१८. –ज्ञा ४.२०३. [ वाक+दोर ]

**वागुरी**—स्त्री. घोड्याची चाल. –अश्वप १.१८८.

**वागु(गो)ऱ्या**—स्त्रीअव. चिंध्या; लकतऱ्या; चिरफळ्या. ' नव्या साडीच्या पोरीनें वागुऱ्या करून टाकल्या. '

**वागू(ग)ळ**—स्त्रीन. १ वटवाघूळ. २ पाकोळी. [ स. वल्गुली, वाग्गुद ]

**वागूळ करणें**—( नाशिक ) रंवथ करणें ( क्रि० करणें ). [ ऊगाळ ]

**वांगें**—न. वांगीचें फळ. वांगी पहा. **वांगेसट**–स्त्री. चंपाषष्ठी मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी.

**वांगेलिसा**—पु. ( ख्रि. ) प्रेषित. ( इं. ) इव्हांजेलिस्ट. –ख्रिपु.

**वागेश्वरी**—स्त्री. सरस्वती. ' जी आपुलिया जिव्हाची वागेश्वरी। ' –ज्ञा १०.८.

**वागोरा-रे-ऱ्या**—वागुरा पहा.

**वाघ**—पु. १ एक क्रूर मांसाहारी जंगली प्राणी; एक वन्य पशु. २ एक उड्या मारणारा कीटक. ३ बुद्धीबळांतील शेळ्या मेंढ्या खेळांतील हत्ती. ४ एक मुलांचा खेळ. –वि. ( ल. ) जागरूक व भयप्रद. [ सं. व्याघ्र; प्रा. वग्घ; पं. हिं. बं. बाघ; सिं. बाघु; गु. वाघ ] ( वाप्र. ) **०डांभणें**–गाऱ्याजवळ ( वाघ आल्यास त्यावर मारा करील अशी बंदूक बांधून ठेवणें. सामाशब्द– **०जाई**–स्त्री. व्याघ्रदेवता; एक क्षुद्र देवता. **०जोर**–पु. ( व्यायाम ) एक प्रकारचे दंड काढण्याची पद्धति. –व्यायाम मासिक मार्च १९२३. **०टं**–न. लहान वाघ; वाघ शब्दाचें तिरस्कारदर्शक रूप. **०डोळ्या**–वि. मोठ्या, बटबटीत व पाणीदार डोळ्यांचा. **०नख**–न. १ वाघाचीं नखें सोन्यांत मढविलेला लहान मुलांचा एक दागिना. २ वाघाच्या नखांच्या आकाराचें पोलादी हत्यार. ३ वाघाचा पंजा. **०नख सांखळी**–स्त्री. मद्रासकडील महाराष्ट्रीयांत प्रचलित असलेला एक दागिना. **०नखी**–स्त्री. १ एक झाड. २ एक पोलादी हत्यार. **०बकरी**–स्त्री. १ एक खेळ. **०बीळ**–न. वाघाची गुहा. **०मान**–पु. मुख्य मान. ' तुम्ही आपला जो वाघमान करावा तो करून घेतला. ' –भाव६८. **०माऱ्या**–वि. १ वाघास मारणारा. २ ( ल. ) अतिशय बळकट, शूर, धाडसी. ३ अतिशय लागणारा ( हरिक, सुपारी वगैरे पदार्थ ). **०मुंगी**–स्त्री. भयंकर दंश करणारी मुंगी. **०मेंढी-मेंढ्या**–स्त्री. बुद्धिबळांतील एक खेळाचा प्रकार. **०यी**–स्त्री. सुंगट जातीचा मोटा मासा. **०री**–पु. जाळ्यांत पशुपक्षी पकडणारी एक जात व तींतील व्यक्ति; फासेपारधी; यांचे सांकेतीक शब्द–रुवा=गुरू; माती=मृतमांस; माड, बिलाडी=पोलीस; झेमी=घरफोडी; माढनो=चोरलेलें जवाहीर; हाथवान=चोरीचें कापड; तारखो=रुपया; पिलीऊन=सोनें; धोलीऊन=रुपें; चहई जावन=लग्न; खावरी=वाघानी; दातरड=घरफोडीचें हत्यार; विरिश्रो=किल्ल्यांचा जुडगा; बांदो=साथीदार; भुऱ्यो, माकडो=युरोपिअन; वस्तू=पैसे इ०. **०रूं**–न. वाघास तुच्छतादर्शक शब्द. **०वडाई**–स्त्री. वाघजाई; क्षुद्रदेवता. ' फूजिति वाघवडाइआं। '–शिशु ५२७. **०व बकरी**–एक मुलींचा खेळ. –मखेपु ३५५. **०वें, वाघावें**–न. १ वाघांचा उपद्रव. २ ( ल. ) उपद्रव; त्रास; पीडा; कहर. ' आमच्या विरुद्ध काय वाघवं उठलंय तें तूं पहातच आहेस ' –झांमू १७७. **वाघाचा डोळा**–पु. ( संकेत ) रुपया. **वाघाची जाळी**–स्त्री. वाघास लपून बसण्यास योग्य झाडी, वेलांची गुंतागुंत वगैरे. **वाघाची मावशी**–स्त्री. मांजर. **वाघाचें कातडें**–न. १ व्याघ्रचर्म; वाघाचें चामडें. २ ( ल. ) अधिकार, सत्ता गेल्यावरहि ज्यास लोक भितात असा मनुष्य. **०कातडें पांघरणें**–आव आणणें; पोकळ सत्ता, सामर्थ्य दाखविणें; ढोंग करणें. **वाघाडक्या**–पु. मंत्रसामर्थ्यानें वाटसरूंचें वाघांपासून संरक्षण करणारा मांत्रिक. **वाघी**–स्त्री. १ वाघ्याची भंडार ठेवावयाची–वाघाच्या कातड्याची पिशवी. २ वाघाच्या तोंडाचा पुढें आकार असलेली जलद चालणारी नौका, होडी. ३ वाघाच्या कातड्यासारखी पिवळ्या रंगाची, वर टिपके असलेली घोड्याची झूल. ४ लाकूड तासण्यासाठीं त्याच्याखालीं ठेवावयाचा सुताराचा एक खांच पाडलेला ठोकळा. ५ दोन टोंकांचा खिळा ६ एक प्रकारचा सोनाराचा चिमटा. –वि. वाघाच्या रंगाचा; वाघासारखा. ' एक वाघी पिवळी पुंडी। ' –दाव २८१. **वाघी कवडी**–स्त्री. टिपके असलेली कवडी. **वाघीण**–स्त्री. स्त्रीजातीचा वाघ; वाघाची मादी. **वाघी तंबाखू**–स्त्री. पानावर टिपके असलेली तंबाखूची जात. **वाघेरें**–वि. वाघानीं भरलेलें. –लोक २.७७.

**वाघचबका**—पु. एक फुलझाड व फूल; बचनाग.

**वाघचघडा-डें**—पुन. ( वाघाचें मांस लावल्यानें बरा होणारा रोग ) तळहातास होणारा रोग.

**वाघटी**—वागटी पहा.

**वाघंटी**—स्त्री. एक झुडुप. **वाघंटें**–न. वाघंटीचें फळ; गोविंदफळ; याची भाजी करतात. [ सं. व्याघ्राटकी ]

**वाघड**—पु. कापसाची एक जात. याचा कापूस बोंडांतून ओढून काढावा लागतो.

**वाघण, वाघीण**—स्त्री. आगगाडीचा मालाचा उघडा डबा. [ इं. वॅगन ]

**वाघ(घू)ळ**—स्त्रीन. उडतें खोकड; वटवाघूळ. [ सं. वल्गुली, वाग्गुद ]

**वाघळी, वाघाळें**—स्त्रीन. एक प्रकारचा. मासा. वागळ पहा.

**वाघा**—स्त्री. लगाम. वागा पहा. ' सरसीया वाघा धरुनि मुठी। ' –उषा १४२०.

**वाघाट, वाघांटा-टी-टें**—नपुस्त्रीन वाघांटीफळ. वाघंटी पहा.

**वाघिन्सा**—पु. (व.) (अप.) वाङ्निश्चय पहा.

**वाघुर-रा-री, वाघूर-रा**—न. जाळें. वागुर इ० पहा. 'मग व्याघ्रपाश वाघुरा घेऊन कुक्षेसी।' –होला ४५.

**वाघुरडें**—न. ओढाताण; तगादा; मानहानि. (क्रि० करणें).

**वाघूळ**—न. पाकोळीच्या जातीचा एक प्राणी; वटवाघूळ.

**वाघूळ**—स्त्री. रंवथ. वागूळ करणें पहा. [ उगाळु ]

**वाघेटी-टें**—वाघटी पहा.

**वाघेर**—पु. गुजराथेंतील एक लुटारूंची जात. (वाघ शब्दांत) वाघरी पहा. [ वाघ ]

**वाघेला**—पु. रजपुतांतील एक जात. [ वाघ ]

**वाघेश्वरी**—स्त्री. व्याघ्रदेवता; एक क्षुद्र देवता. 'वाघेश्वरी इत्यादि देवतांच्या बाबतींत...' –खेया.

**वाघोडी**—स्त्री. एक खेळ. 'वाघोडी आणि आटापाट्या।' –भवि २७.२०.

**वाघोणी**—स्त्री. (गो.) गोम; घोण.

**वाघोबा**—पु. वाघ पहा.

**वाघोरा-रें**—पुन. वाघुरडें पहा.

**वाघोळें**—न. (गो.) वाघूळ पहा.

**वाघ्या घा**—पु. (अव. वाघे.) खंडोबास वाहिलेला पुरुष; खंडोबाचा भक्त, उपासक. 'वाघे मुरळया भजन करिती।' –देप ९३.३. [ का. वग्गे=भक्त ]

**वाङ्निश्चय, वाङ्मय**—वाक् शब्दामध्यें पहा.

**वाचक**—पु. शब्द; भाषणाचा विभाग, तुकडा, अवयव; वाक्य; शब्दसमूह. –वि. १ दर्शक; दाखविणारा; अर्थाचा. उदा० काल–देश–स्थल–वृक्ष–अग्नि–वाचक. 'अन्य व्यावृत्ति सिद्ध। वाचक नव्हे।' –अमृ ५.१३ २ वाचणारा. 'मुका होय वाचकाचा।' –अमृ ६.६७. ३ महारांचा धर्मगुरु. –अस्पृ ४२. [ सं. वच् ] **वाचणी**–स्त्री. १ वांचन; लिहिलेल्या अक्षरांचें उच्चारण. २ वाचावयाचा धडा; पाठ. **वाचणें**–क्रि. लिहिलेलीं अक्षरें उच्चारणें; पठण करणें. (गो.) वाचप. [ सं. वच्=बोलणें ] **वाचन**–न. पठणक्रिया; वांचण्याची क्रिया; अभ्यास; पटण.

**वांचणें**—अक्रि. १ जगणें; जिवंत राहणें; जिवाचा संभाळ; संरक्षण करणें. 'वाचणें तें आतां खोटें संसारीं।' –तुगा ४६. २ निभावणें; बचावणें; पार पडणें; धोक्यांतून निसटणें. ३ आजारांतून पार पडणें; बरें होणें.

**वाचनालय**—न. ग्रंथालय; ज्या जागेमध्यें वाचण्याकरितां ग्रंथादि ठेवलेले असतात अशी जागा.

**वाचनिक**—वि. १ उच्चारित; जाहीर; साक्षात्; प्रतिपादित; निर्दिष्ट; स्पष्ट केलेला; घोषित (विधिनिषेध, नियम वगैरे) अनुमानित याच्या उलट. २ मूळ ग्रंथांतील; उल्लिखित; मूळ ग्रंथांतील वचनांत असलेला.

**वाचस्पति**—पु. बृहस्पति; देवगुरु. –ज्ञा १०.८.

**वाचा**—स्त्री. १ वाक्; वाणी; वागिंद्रिय. २ भाषण; बोलणें; शब्द; वचन; बोल. 'वदलासि न तूं कधींहि अशी वाचा।' –मोकर्ण ५ ३७. ३ आकाशवाणी; अशरीरिणी वाक्. ४ अवसरणी. [ सं. वच्=बोलणें ] **वाचा उकठणें-पालटणें-परतणें-फिरणें-मुरडणें**-बोलणें खुंटणें; बोलणें खोटें पडणें; मागें घेण्याची पाळी येणें; गप्प बसावें लागणें. **वाचा नरकांत घालविणें**–खोटें बोलणें; वचन मागें घेणें. **वाचा फुटणें**–बोलण्याची शक्ति येणें. **वाचा बसणें**–बोलण्याची शक्ति नाहींशी होणें; वाणी खुंटणें; बोबडी वळणें. **वाचा विटाळणें**–१ खोटें बोलणें; वचन न पाळणें. २ व्यर्थ भीड घालणें; निरर्थक शब्द वेंचणें, खर्च करणें. **०ट-ल-ळ**–वि. बडबड्या; बोलका; बोलघेवडा; वटवट करणारा. 'वाचाट हा चाट वदोन राहे।' –सारुह ८.१५. (वाप्र.) **०दत्त**–वि. १ वाग्दत्त; वाणीनें दिलेलें; वाङ्निश्चित. २ वचनानें दिलेलें; कबूल केलेलें. **०बरळ**–वि. बडबड्या; बरळणारा. 'गुरूतें वाचाबरळ।' –विपू २.६. **०रंभण**–न. परिस्फुटता; स्पष्टपणें वाचेनें निदर्शन; बोलण्यांत रूढी. 'राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेला वाचारंभण किंवा नामधेय अजून मिळालें नव्हतें।' –टिळकचरित्र १. **०विदळ**–वि. (बो.) वाचाट; वात्रट; अद्वातद्वा बोलणारा. **वाचांश**–पु. १ (चुकीनें वाच्यांश). शब्द; चकार शब्द; उच्चार (क्रि० काढणें; करणें). २ उल्लेख; बोलणें; चर्चा. (क्रि० काढणें; निघणें). ३ परिस्फोट; लावालावी. (क्रि० करणें). ४ वचन; करार. (क्रि० करणें). **वाचाशक्ति**–स्त्री. १ वक्तृत्व; व्याख्यानसामर्थ्य; बोलण्याचें चातुर्य. २ (रूढ) वाचण्यांतील कौशल्य; स्पष्टपणा; वाचनशक्ति. ३ वाचाळपणा. 'तुम्ही अमळसें तोंड आटपून धरीत जा. भारी वाचाशक्ति करूं नका.' –शास्त्रीको. **०सिद्धि**–स्त्री. बोललेलें खरें होण्याचें सामर्थ्य; अमोघवाणी. **वाचाळ**–वाचाट पहा. 'तुका म्हणे वाचा वाचांळते।' –तुगा ७०. **वाचाळता**–स्त्री. बडबड. 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे।' –राम १६५. **वाचाळ पंचविशी**–स्त्री. बडबड. (क्रि० लावणें). 'तिची वाचाळपंचविशी आतां सारखी चालू झाली।' –गणपतराव. **०पंचांग**–न. चऱ्हाट; बडबड; वटवट. **०वाणा-णी**–वि. बोलका; बडबड्या. –क्रिवि. चावटपणें; वाचाटपणें. **वाचाळी**–स्त्री. बडबड. 'एक म्हणती सांडी वाचाळी।' –दा ८.१०.१९; –ज्ञा १८.१७०९. **वाचिक**–न. वृत्त; बातमी; हकीकत; वर्तमान. –वि. वाणीसंबंधीं; बोलण्यानें, शब्दानें घडलेलें. **०कर्म**–१ वाणीनें केलेलें काम. (विशेषतः पातक, खोटें, कडू बोलणें वगैरे). **०प्रतिकार**–पु. तोंडानें केलेला विरोध; शाब्दिक विरोध. 'त्यांचा वाचिक प्रतिकारहि आम्हाला करवत नाहीं।' –केले २.५०३.

**वाची**—वि. वाचक; दर्शक; दाखविणारें. उदा० गुण-काल-देश-धर्म-वाची.

**वा( वां )चून, वाचौनि, वांचौनिया**—क्रिवि. शिवाय; खेरीज; सोडून; विना; विरहित. ' परिणामीं भवदुःखा । वांचौनि नाहीं । '-ऋ ३०; -ज्ञा ३.४४.

**वाचे**—वाचा शब्दाची सप्तमी. वाचेमध्यें; तोंडांत. ' सदा सर्वदा नम्र वाचे वदों वे । ' -राम २४.

**वाचेदयाळ**—वि ( कु ) वाचाळ.

**वाचेवाद-ध**—स्त्री ( कु. ) शब्दानें दर्शविलेली क्रिया.

**वांछा**—स्त्री. इच्छा; मनीषा; हेतु. -ज्ञा १७.१७६. [ सं. वञ्छ्=इच्छिणें ] **वांछनीय**-वि. इच्छिण्याजोगें **वांछिणें**-क्रि. इच्छा करणें. **वांछित**-वि. इष्ट; इच्छित. -ज्ञा १६.३३८.

**वाच्य**—न. १ उद्दिष्ट; बोलावयाची, सांगावयाची गोष्ट; व्याख्यानाचा विषय. -ज्ञा १८.१६८२. २ (व्या.) प्रयोग. कर्तृवाच्य; ( कर्तरि ); कर्मवाच्य; ( कर्मणि ). -वि. १ बोलण्यास, उल्लेख करण्यास योग्य, शक्य, इष्ट, जरूरीचें -ज्ञा ११. ४४. २ कर्तृविषयक; विधेयात्मक; गुणवाचक; शक्यतावाचक वगैरे ( शब्द ). ३ विशेषणाप्रमाणें विभक्ति रूप होणारें. ४ दूषणीय; अश्लाघ्य. ' जो आपल्या धर्मातील वाच्यस्थलें दाखवील तो पाखंडी । '-आगर ३.२८. [सं.] **वाच्यता**-स्त्री. चर्चा; गवगवा; प्रसिद्धि; सांगत फिरणें. ( क्रि० करणें ). **वाच्यार्थ**-पु. १ शब्दशः अर्थ; स्पष्टार्थ. २ जें बोलावयाचें तें; बोलण्यांतील उद्दिष्ट. **वाच्यांश**-पु भाषण; शब्द; बोललेली किंवा बोलावयाची गोष्ट; वाचांश असाहि प्रयोग करतात. ' वाच्य वाचक वाच्यांश । त्रिपुटीत ज्याची सत्ता अंश । '-ज्ञानप्र ३२१. **वाच्यालंकार**-पु. भाषणांतील, वाक्यांतील सौंदर्यदर्शक स्थल; सामान्यतः यांस अर्थालंकार म्हणतात-शब्दालंकार याच्या उलट. यांपैकीं कांहीं पुढें दिले आहेत:-उपमा; अनन्वय; उपमेयोपमा; प्रतीप; रूपक; परिणाम; उल्लेख; स्मृतिमान्; भ्रांतिमान्; ससंदेश; अपह्नुति; उत्प्रेक्षा; अतिशयोक्ति; तुल्ययोगिता; दीपक; प्रतिवस्तूपमा; दृष्टांत; निदर्शना; व्यतिरेक; विनोक्ति; समासोक्ति; परिकर; परिकरांकुर; श्लेष; अप्रस्तुतप्रशंसा; प्रस्तुतांकुर; पर्यायोक्त; व्याजनिंदा; व्याजस्तुति; आक्षेप; विरोधाभास; विभावना; विशेषोक्ति; असंभव; असंगति; विषम; विचित्र; अधिक; अल्प, अन्योन्य; विशेष; व्याघात; कारणमाला; एकावली; मालादीपक; यथासंख्य; पर्याय; परिवृत्ति; परिसंख्या; विकल्प; समुच्चय; समाधि; प्रत्यनीक; काव्यार्थापत्ति; काव्यलिंग; अर्थांतरन्यास; विकस्वर; प्रौढोक्ति; संभावना; मिथ्याध्यवसिति; ललित; प्रहर्षण; विषादन; उल्लास; अवज्ञा; अनुज्ञा; लेश; मुद्रा; रत्नावली; तद्गुण; पूर्वरूप; अतद्गुण; उत्कर्ष; मीलित; सामान्य; उत्तर; चित्र; सूक्ष्म; व्याजोक्ति; विवृतोक्ति; युक्ति; लोकोक्ति; छेकोक्ति; वक्रोक्ति; स्वभावोक्ति; भाविक; अत्युक्ति; निरुक्ति; प्रतिषेध; विधि; हेतु; रसवत्; प्रेयस्; ऊर्जस्विन ; समाहित; भावोदय; भावसंधि; भावशबलता. इ० यांचें वर्णन काव्यप्रकाश किंवा प्रतापरुद्र वगैरे साहित्यावरील ग्रंथांत पहावें.

**वाज**—स्त्री म्यान; खोळ. ' एक वाज मढीव मखमली लाल नवी, ममेत कचक लोखंडी वर मुलामा सोनेरी. ' -समारो ३.२४९. [ सं. वज्=जाणें ]

**वाज**—बोलणें; प्रवाद ' अगा प्रकृती परौता । एकु आथी पाडसता । एमा वाजु तो तत्त्वता । '-माज्ञा १३.१०२९.१४.७९

**वाज**—पु. १ श्रम २ (गो) आळस; कंटाळा -तुगा २२०५. -वि पुष्कळ ' मनामध्यें आले वाज । ' -दावि १८१. [ अर. वजअ्=दुःख ]

**वांज वांजट, वांजनिथि, वांजा**—वांझ, वांझट इ०पहा.

**वाजगस्त**—स्त्री. सवाय पहारा. याचे उलट चोरगस्त.-मोल.

**वाजगस्त, वाजगुदस्त**—वि. परत दिलेलें; परावृत्तादाय -राज्य. [ फा. बागुझाश्त=मुक्त, परत केलेलें ]

**वाजघट**—वि. ( व. ) उघडउघड. [ फा. वाझ्=उघडा ]

**वाजट**—न. १ प्रसिद्धि; डंका; गवगवा; बभ्रा; बोभाटा; वाच्यता; परिस्फुटता. -केसरी २२.१२.३६. २ जाहिरी; प्रसिद्धि; प्रसार. ( क्रि० करणें ). -वि. १ प्रसिद्ध; बोभाटा झालेला. २ जाहीर केलेला. ३ वाचाट; व्यर्थ बडबडया; वाद घालणारा. ' चाट चावट वाजट । ' -दा २.३.३०. ' उच्छृंखळ पापी धीट वाजट । '-स्वानु ४.४. ४ वाजणारा; नाद करणारा; आवाज करणारा. ' सरत्न वर मेखळा लसित घंटिका वाजटा । ' -निमा चित्रोधरामायण, सर्ग ३. श्लोक १८. ' त्या पादुका वाजटा । ' -आसीता १०. -क्रिवि. प्रसिद्धपणें; उघडपणें. [ वाजणें ]

**वाजणें**—अक्रि. १ शब्द करणें; नादणें; आवाज काढणें. २ चर्चेचा विषय होणें; प्रसिद्ध होणें. ३ लागणें; विषय होणें ( थंडी, हींव ). ' माथां वाजती घाये । '-एरुस्व ८.४१. ४ शिवशिवणें; आवाज करूं लागणें ( दांत ). ' वाजतां दातोरीं । काई आइकिजेना । ' -शिशु ५५१. ५ वाहणें; सुरू होणें ( वारा ). ' वाजतिया वायूतें जरी होकारी । ' -ज्ञा ९.१२५. ' अहंकुवावो वाजतां थोरू । अवघाचि खवळे भवसागरू । '-एभा २.९५. ६ आदळणें; चिकटणें; बाधणें; उद्भवणें; ' परी पाखंडता अंगीं वाजे । '-एभा २०.४८. ' बाळ म्हणोनि धरितां व्याळ । अनर्थ वाजे रोकडा । ' -मुआदि ३१.१००; १६.१०. ७ ( राजा. ) चिरकणें; पिंजणें ( वांसा, कळक वगैरे ). ८ ( घडयाळ ) ठोके पडणें; घटिका, तास भरणें. ' आठ वाजले. ' [ सं. वद्; प्रा. वज्ज; हिं. बजना; सं. वाशृ-शब्दे. वाश्यते-वास्सए-वासे-वाजे. -भाअ

१८३३ ] **बारा वाजणें**-घटिका पूर्ण भरणें; नाशाची वेळ येणें; नाश होणें. **०गाजणें**-१ गर्जना, गडगडाट, कडकडाट इ० होणें. २ गाजावाजा, प्रसिद्धि, बोभाटा, बभ्रा होणें. **०गाजत**-क्रिवि. वाद्यांचा आवाज करीत; गजरानें; थाटामाटानें; डामडौलानें (क्रि० जाणें; येणें-मिरवणूक वगैरे). **वाजता**-वि. आवाज करणारा; खणखणीत. **वाजता नारळ**-पु. पाणी असलेला, आवाज करणारा नारळ. गोटा नव्हे तो. **वाजता पुडा-वाजतें पूड**-पुन. जिकडून थाप मारावयाची ती मृदंगाची बाजू; डग्गयाची नव्हे ती. **वाजती घांट**-स्त्री. (ल.) फार बोलकी, वटवट करणारी व्यक्ति. **वाजतें गाळ**-न. एक मुलींचा खेळ. -मखेपु ३४१. **वाजतें फूल**-न एक मुलींचा खेळ. -मखेपु ३४०. **वाजतें वारें, वाजत वारा**-पुन. संकट; आपत्ति; त्रास. 'उभयतांस मी वाजतें वारें।' -अफला १.४. 'तुम्हावरी वाजतवारा येथौनि धरिजैल।' -सूत्रपाठ १०४.

**वाजंतर, वाजंतें, वाजंत्रीं, वाजंत्रें, वाजांतर**—न. वाद्य; सूर, सनई, संबळ इ० वाद्यसमूह. 'वाजंत्र्यांचा नाद गंभीर। वानरीं केला भुभुक्कार।' -भारा किष्किंधा ९.४७. 'ऐसें नाहीं कोणी वाजंत्र।'-एभा २३.९. 'दमामे नगारे वाजंतरें।'-वेसीस्व ७.११. (कु.) वाजांतर. [सं. वादित्र] **वाजंत्री**-पु. वाजंत्र वाजविणारा. **वाजप**-न. (गो.) वाद्य; वाजंत्रीं.

**वाजपूस, वाजपुशी**—स्त्री चौकशी; विचारणा; वास्तपुस्त; शोध; तपास. 'सावकार येथें कोण आहेत म्हणून वाजपूस करावयास लागले.' -ख ८.३९७४. [फा. बाझ्+पुर्स]

**वाजपेय**—पु एक यज्ञविधि; सप्तसोमसंस्थापैकीं एक सोमसंस्था. [सं.]

**वाजब-बी-वी, वा(जि)जीब-बी, वाजावाजवी**—वि. न्याय्य; रास्त; योग्य; उचित; आवश्यक; मुनासब; कायदेशीर; उजु. 'तें करणें वाजीब व लाजिम आहे' -रा १०.२८०. [अर. वाजिब्] **वाजबमिति, वाजीब मिती**-स्त्री. ज्या दिवशीं विशिष्ट गोष्ट घडली किंवा घडावयाची ती दस्तऐवजांत नमूद केलेली मिति, तिथि, दिवस. **वाजबुल्-अर्ज**-स्त्री. लेखी आज्ञा. 'वाजबुल् अर्ज पातशहापासून दस्खत करून मागितली.' -दिमरा १.८६. [अर. वाजिबल् अर्झ]

**वाजव(वि)णें**—सक्रि. १ शब्द करणें; आवाज काढणें (वाद्य वाजवून). २ जाहीर करणें; डंका, दौंडी पिटणें. [वाजणें प्रयोजक] **वाजवणा**-पु. वाद्य वाजविणारा.

**वाजा**—वि. नीट.

**वाजा, वाज्याच्या शेंगा**—स्त्रीअव. (खा.) गोवारीच्या शेंगा; बावच्या.

**वाजागाजा, वाजावाजा**—पु. गाजावाजा; प्रसिद्धि; गवगवा; बोभाटा; दणका. (क्रि० करणें.) [वाजणें+गाजणें] **वाजेवाजे**-पुअव. वाजागाजा; प्रसिद्धि. (क्रि० करणें.)

**वाजिअ**—वि. जाहीर; प्रसिद्ध. [अर. वाझीह्=उघड, स्पष्ट]

**वाजिवणें**—वाजणें पहा.

**वाजिवाह**—न. अश्वशास्त्र; शालिहोत्र. 'रत्नपरीक्षा लक्षण। जाणे आपण वाजिवाह।' -एभा ११.५१७.

**वाजी**—स्त्री. १ अपवाद; निंदा. 'म्हणून देहा एवढेपणाची वाजी।' -विपू ७.५१. २ बोभाटा; बभ्रा. 'याची करु काय वाजी।' -राला ४४. [वाजणें]

**वाजी**—स्त्री. कंटाळा; त्रास; दुःख. 'कामाचिये वेळेमाजीं। आणुं नको मज वाजी।' -आपद ८०. [अर. वाजअ्=दुःख] **०येणें**-क्रि. कंटाळणें. 'किती धोऊं वाजी आलों। डाग ढळेना' -दावि ५००.

**वाजी**—पु. घोडा. 'वाजीचें मन जाणता सकलही राजी शिपाई जया।' -र ६. [सं. वज्=जाणें] **म्ह०** वाजीवर गोमाशी ताजी-संपत्काळचे मित्र. 'वाजीवर गोमाशी ताजी। तैसे गुलाम करिती हांजी।' -अमृत ७३. **०करण**-न. १ मंत्रतंत्र औषधादिकांनीं कामवासना वाढविण्याची क्रिया. २ कामेच्छा वाढविणारें औषध, रसायन. **०तळ**-न. घोड्याची टाप, पाऊल. 'वाजी तळांची थडथड.' -वेसीस्व ६.७४.

**वाजे, वाजेह्**—क्रिवि. स्पष्ट; विशद; उघड. 'बाजे मरातब कृष्णराव यांस कलमी केले त्यावरून वाजे होईल.' -रा १०.१६७. [अर. वाझिह्=स्पष्ट, उघड]

**वाजे, वाजेकरी-लोक**—बाजे, बाजेलोक पहा.

**वाजेरप, वाजेवुंक, वाजोंचें**—अक्रि. (गो.) कंटाळणें; आळसणें. [अर. वाजअ्=दुःख; त्रास]

**वांजेल**—वि. (गो.) वांझ; निष्फल.

**वाजो**—क्रिवि. (व.) यथेष्ट; मनास येईल तसें. 'आमच्या मनाप्रमाणें वागत नसशील तर जा वाजो कुकडे बी।' -वशाप ५१.१२.४५१.

**वाजौटी-ठी**—स्त्री. वांझ; वंध्या; निपुत्रिक. 'निराहार तेचिया वाजौठी।' -भाए १९७.

**वाज्य**—क्रिवि. मेटाकुटीस; दुःखाप्रत. वाज पहा. 'बहुवीस तेणें गुणें वाज्य आलें।' -राराभा १५.२६६. [अर. वाजअ्= दुःख, त्रास]

**वांझ**—स्त्री. १ वंध्या; निपुत्रिक स्त्री. 'शल्या तैसी नवांझ वेणेची।' -मोकर्ण २७१४. -ज्ञा १२.१३५. २ निपुत्रिक, संतानाक्षम पुरुष. ३ निष्फल उद्योग; बेफायदा धंदा. -वि. निष्फल; निरर्थक; फोल. 'कोरडेचि बोल फोस वांझ।' -तुगा

१०८३. [ सं. वंध्या; प्रा. वंज्झा; पं. वंझा; सिं. वांझ; हिं. बांझ; गु. बांझणी; बं. बांझा; का. बांजि ] ०खडा-पु. गर्भधारणा न व्हावी म्हणून घ्यावयाचें औषध. ०ट-टोळी-स्त्री. वंध्या; वंध्येस उपहासात्मक शब्द. (गो.) वांझडो-टो. -वि. व्यर्थ. 'तैसें दृश्य का द्रष्टा या दोन्ही दशा वांझटा।' -अमृ ७.२४४. ०तिथी-तीथ-स्त्री. ज्या दिवशीं कोणतेंहि कर्म, विधि विहित नसतो असा दिवस. वांझा-वि. वांझ पहा. १ ज्या फुलापासुन फल उत्पन्न होत नाहीं असें. २ गरे नसलेला ( फणस ); दाणे नसलेली ( शेंग, कणीस वगैरे ). ३ ज्यास फुलें येतात पण फळें येत नाहींत असा ( वृक्ष-पोपया, बकुल वगैरे ). ४ निष्फल; बेफायदा; निरर्थक ( धंदा, श्रम, काम, हंगाम ). ५ ज्या दिवशीं व्यवहार झाला नाहीं, जमाखर्च नाहीं असा ( दिवस ). वांझीतिथी-तीथ-वांझतिथी पहा. वांझी पुनव-पूर्णिमा-स्त्री. पौषशुद्ध पौर्णिमा. या दिवशीं अनेक मुलें असलेल्या स्त्रीस सुवासिनी म्हणून बोलावितात. वांझें-वि. निष्फळ; व्यर्थ. -ज्ञा १८.११९. वांझेढक-ग-पुअव. बिनपाण्याचे, पाऊस न आणणारे मेघ, ढग. वांझो-वि. (गो.) वांझा. वांझोटा-टी-डा-ळा-वि. (उप.) वांझ; निपुत्रिक. 'जैसी एकचिवये वांझोटी।' -ज्ञा ६.१२१ वांझोलें-ळ-ळें-वांझोळ-ळें-न. वांझ फूल. 'म्हणोनि वांझोळें व लगती देखा।' -ज्ञा १०.३३३. -वि. व्यर्थ; निष्फळ. 'ये दोन्हीहि वांझोळें। दोन्ही जालीं।' -अमृ ८.१७.

वांझ—पु. १ (कों.) सुकत आलेला, बिनपाण्याचा नारळ. २ (गो.) खोबरें नसलेला नारळ.

वांझा-झें—पुन. वांधा; हिशोबासंबंधानें भानगड, गुंता; 'हें वांझें नाना फडणीसच काढून टाकील.' -अस्तंभा १६४.

वांज-जां वाजंगणें, वांजसा—वांयां, वायंगणें, वायसा इ० पहा.

वाट—स्त्री. १ रस्ता; मार्ग. 'कीं भीष्में धरिली ती वरिलीच तुझ्याहि वाट लेकांहीं।' -मोभीष्म १.२८. २ (ल.) वर्तनक्रम; पद्धति; परिपाठी; तऱ्हा; प्रकार; रीत. 'पहिली जी नीट वाट वाहो ती।' -मोआश्रम १.९. ३ (ल.) उपाय. 'मग पोट भराया काढिली वाट।' -दावि ८१. ४ (ल.) परिणाम; गति; निकाल. 'माझ्या फिर्यादीची वाट काय झाली कोण जाणे.' ५ बेंबीच्या खालीं पोटांत वाटीच्या आकाराचा जो उंचवटा येतो तो ( ही सरली म्हणजे पोट दुखूं लागतें ). [ सं. वाट, पथिवस्तु निवाटःस्यात्। -त्रिकडांशेष. वर्त्मन्; प्रा. वट्ट; हिं. वाट ] (वाप्र.) ०करणें-क्रि. १ मार्ग करून देणें. २ (ल.) वर्तनक्रम ठरविणें; मार्ग दाखवून देणें; व्यवस्था, मांडणी वगैरे करणें. ३ नाहींसा करणें; दूर करणें. 'तेव्हेळीं शिशुपाळाचें राऊत। पारकेयांवरी वाट करिती।' -शिशु ९६४. ०घडणें-परिणाम होणें; गति होणें; मार्ग निघणें. 'अद्वैतशास्त्र नावडे यासी। पुढें वाट घडेल कैसी।' ०चुकणें-आकस्मिक भेटणें; अनेक दिवसांनीं घरीं आलेल्यास म्हणतात. 'आज फारा दिवसांनीं वाट चुकला.' -मोर १३. ०धरणें-१ मार्ग अडविणें, रोखून धरणें. 'एवढ्या रानामध्यें जाण। वाट धरून बैससी कोण।' -रावि. २ मार्गप्रतीक्षा करणें; वाट पहाणें. ०पाडणें-वाटेंत चोरी करणें; लुटणें; दरोडा घालणें. 'किरातसंगें वाट पाडित।' -रावि १.१०५. ०पाहणें-मार्गप्रतिक्षा करणें; खोळंबून राहणें; वाटेकडे डोळे लावून बसणें. ०मारणें-मार्गांत गांठून लुटणें; वाटेंत दरोडा घालणें. ०लागणें-निकाल लागणें; उरकणें; संपणें; खलास होणें; विल्हेस लागणें; दूर होणें; नष्ट होणें. ०लावणें-१ निकालांत काढणें; विल्हेवाट करणें. २ खाऊन टाकणें; संपविणें. ३ मोडून तोडून टाकणें; नाश करणें. ४ मार्गांतून दूर करणें; हांकलून देणें. ०वावरणें-१ निरर्थक खेप घालणें; व्यर्थ हेलपाटा घालणें. ०वाहणें-रहदारी असणें; चालू असणें; वाटसरू, प्रवासी वगैरेनीं गजबजलेला असणें; वापर असणें. 'तुका म्हणे वाहे वाट। वैकुंठींची घडघडाट।' ०वाहती करणें-वाट मोकळी करणें; घालवून देणें; वाटेस लावणें. 'मग जाणतया जें विरू। तयाची वाट वाहती करूं।' -ज्ञा १६.५७. ०सरणें-आंत्रमार्ग निरुद्ध होणें. 'या धक्क्यानें क्षुधामांद्य होणार बहुधा वाट सरली असेल.' -मौनयौवना. ०सुधारणें-पळणें; चालतें होणें; पाय काढणें. 'आपली वाट सुधार कसा.' -तोबं १७. ०होणें-परिणाम, गति होणें; निकाल लागणें. चार वाटा करणें-उधळणें; दूर दूर करणें; विखुरणें; पळविणें; घालविणें. चारहि वाटा मोकळ्या, बारा वाटा मोकळ्या-पूर्ण स्वातंत्र्य; सर्व जग फिरावयास मोकळें असणें; स्वैरस्थिति; अनिर्बंध गति. तिवाटांची माती येत नाहीं समजत नाहीं-पूर्ण अज्ञान; कांहीं न समजणें. देखली वाट पाहणें-करणें-गेल्या मार्गानें परत येणें. मधल्या वाटेस-दोहोंच्या मध्यें; दोहों मार्गांपैकीं कोणताहि न पतकरतां, कोणाचाहि फायदा न घेतां ( क्रि० येणें; जाणें; नेणें; आणणें ). वांकडी वाट करणें-आडवळणास जाणें; मुद्दाम मार्ग सोडून जाणें; वळसा घेणें. वाटा घेणें-क्रि. लुटणें; लुबाडणें. 'तुजकारणें चोर घेती वाटा। तूं भुंजविली वीरा सुभटा।' -कालिका १४.६६. वाटा लावणें-वाटेस लावणें पहा. 'लादून वाटा लाविलें। विचारें अविचारासी।' -दा ५.९.४८. 'बळें लाविते लोभ दादूनि वाटा।' -दावि ३६४. वाटेग लावणें-(गो.) रस्ता धरणें. 'हांगा बसुं नाका वाटेग लागा.' वाटेचा पाय-वाटेचें पाऊल आड वाटेस पडणें-कुमार्गास लागणें; चुकी होणें. वाटे जाणें-खोडी करणें; कुचेष्टा करणें. वाटे-वाटेस लावणें-१ मार्गास लावणें; रास्त मार्ग दाखविणें. २ निरोप देणें; पाठवणी करणें; रवानगी करणें. ३ हांकून

देणें; घालविणें. **वाटेवर आणणें**-ताळयावर आणणें; सुधारणें; योग्य मार्गावर आणणें. 'गंगे जा वाटेवरि आण, अभय द्यावया न द्दा भागे।' -मोरउद्योग १३.५६. **वाटेवर पडणें**-सहज प्राप्य असणें; सुलभ असणें; सुसाध्य असणें. 'माझी मुलगी वाटेवर पडली आहे' -भाव १२. **वाटेवर येणें**-शुद्धीवर येणें; योग्य मार्गास लागणें; ताळयावर येणें; व्यवस्थित वागूं, बोलूं, करूं लागणें; वर्तनक्रम सुधारणें. **वाटेस जाणें**-खोडी करणें; कुरापत काढणें; त्रास देणें. **वाटेस लागणें**-१ चालू होणें; योग्य मार्गानें जाणें. २ नाहींसें होणें; संपणें. **वाटेस लावणें**-१ योग्य मार्गास लावणें. 'सर्वत्र धर्म रक्षक राजे आहेत लाविती वाटे।' -मोकर्ण २९.४६. २ निरोप देणें; पाठवणी करणें; हांकून लावणें. सामाशब्द- **०करी-काढू-काढया**-पु. वाटाडया; रस्ता दाखविणारा; मार्गदर्शक. **०खर्च-खर्ची**-पुस्त्री. प्रवासांत खर्चावयाकरितां लागणारा पैसा; प्रवासखर्च. 'जरी द्दा वाटखर्चीस पीठ देतां।' -कचेसुच ५. **०घेणा**-पु. वाटमाऱ्या; लुटारू. 'वाटघेणा वाल्हा कोळी। अजामेळा पडतां जळीं।' -निगा १२७. **०चा चोर-पोर**-पु. कोणीहि अनोळखी मनुष्य; उडाणटप्पु; भटक्या. **०चा वाटसरू**-पु. अनोळखी प्रवासी; कोणताहि संबंध नसलेला मनुष्य; कोणीहि प्रवासी; पांथस्थ; वाटेनें जाणारा-येणारा. **०चाल**-स्त्री. प्रवास. **०चालन**-न. (कातकरी) लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं वधूस वरगृहीं नेतात त्यावेळीं वाटेंत देण्यांत येणारी दारू. -बदलापूर ११९. **०तीट**-स्त्री. आक्रमावयाच्या मार्गांतील अडचणी, संकटें वगैरेस उद्देशून म्हणतात; रस्ते व त्यांतील संभाव्य विघ्नें इ० 'वाटेतिटेनें संभाळून जा.' **०पाडी**-स्त्री दरोडा. -गुजा. [वाट द्वि] **पाडिया-पाडो-डू-डया**-पु. वाटमाऱ्या; लुटारू; चोर; दरवडेखोर. 'म्हणे आजि वाटपाडिया। कैशी दया उपजली।' -दे कृष्णजन्म १९. 'वाटपाडयासी कैसी माया।' -ह २.१९१. **०भेट**-स्त्री. रस्त्यांत पडलेली गांठ; आकस्मिक भेट. **०माणूस**-पु. सामान्य मनुष्य; कोणत्याहि दर्जाची व्यक्ति; रस्त्यावरील मनुष्य. -नवाकाळ १६.८.२७. **०मार**-स्त्री. १ रस्तालूट; रस्त्यावरील हल्ला. २ रस्त्यावर मित्रत्वानें थांबविणें, अडविणें. ३ (बुद्धिबळ) प्यादें दोन घरें जात असतां मध्येंच एक घर आल्यासारखें धरून मारणें. **०मारू-माऱ्या**-पु. ठग; लुटारू; रस्तेलूट करणारा. **०मार्ग**-पु. रस्ता; मार्ग; रीत; पद्धति; सामान्य नियम; साधारण व्यवहार, क्रम इत्यादि वाचक सामान्य शब्दप्रयोग. वाट पहा. **०मार्ग करणें-घालणें-दाखविणें-पाडणें-शिकविणें-सांगणें**-सामान्यतः दिशा दाखविणें, सांगणें; उपदेश करणें; सल्ला देणें. **०मार्गी**-पु. प्रवासी; पांथस्थ. **०वाटमार्गी लागणें**-१ योग्य दिशेनें जाणें; मार्गावर येणें. २ मृत्युपंथास लागणें. **वाटमार्गी लावणें**-१ योग्य दिशा दाखविणें; मार्ग दाखविणें. २ निरोप देणें; पाठवणी करणें; वाटेस लावणें. **०वणी**-न. १ वाटेंतील पाणी; गटारांतील, रस्त्यांत वाहणारें पाणी. 'नाहीं आड ना विहीरवणी। घाला वाटेचें वाटवणी। विनोद मेहुणीं मांडिला।' -एरुस्व १२.१४८. २ (सांकेतिक-स्त्रियांमध्यें रूढ) मूत्र. **०वधा**-पु. वाटमाऱ्या. 'किंबहुना ते चुकले। वाटवधेया।' -ज्ञा ७.१७४.१३.५४७. **०वधें**-न. वाटमार; वाटमऱ्याचा धंदा; वाटेंतील अडथळा, विघ्न. 'तया इंद्रादि पदें। करिताति वाटवधें।' -ज्ञा १२.६१. **०शेक**-क्रिवि. रस्त्याचे बाजूनें; दुतर्फा; वाटेनें. **०सखा**-पु. प्रवासांतील सोबती. **०सर-सरू-सारू-सुरू**-पु. प्रवासी; पांथस्त; मुशाफरी; रस्त्यानें जाणारा. **वाटाडी-डया**-पु. रस्ता दाखविणारा; मार्गदर्शक. **वाटेकरू**-पु. वाटाडया. 'किंभक्तीचा वाटेकरू। ज्ञानाचा निढारू।' -भाए २५२. **वाटेचा चोर-वाटेचा वाटसरू**-पु. कोणीहि जाणारायेणारा सामान्य मनुष्य. 'वाटेच्या वाटसरूला देखील हें समजेल.' -अस्तंभा ३. **वाटेचें सोवळें**-न. (बायकी) सोंवळें वस्त्र नेसून मार्गक्रमण केल्यास त्या सोंवळयास दोष लागतो यावरून त्या वस्त्रास म्हणतात. **वाटेंतील कांटा**-पु. अडथळा; विघ्न. 'फडणविसांनीं आपल्या वाटेंतील वगंभटाचा कांटा नाहींसा केला.' -अस्तंभा ६८.

**वाट**—पु. तोलण्याचें वजन (सुमारें पांच शेर वजनाचें).

**वाट**—पु. वाटिका; आश्रम. 'गोमतीच्या तटीं वाट वल्मिकीचा।' -मोरामायण १.२५७.११७.

**वाट**—स्त्री. (प्र.) वांट. रेडी; रेडकी; म्हशीचें वासरूं.

**वाट-टं**—न. (व.) मोठी पसरट वाटी. याचा ताटासारखा उपयोग करतात.

**वाटकुळें**—वि. (गो.) वाटोळें; गोल. [सं. वृत्त] **०पण**—न. गोलपणा; वाटोळेपणा.

**वाटकोळ-खोळ वाटकूळ, वाटखूळ**—पु. उशीर; पुष्कळ वेळ; वाढवेळा. [वाढणें+वेळ] -क्रिवि. पुष्कळ वेळपर्यंत; दीर्घकालपर्यंत; उशीर होईतो.

**वाट(ड)गा**—पु. मोठी पसरट वाटी. [सं. वृत्त] **वाटगें**—न. (खा.) मोठी वाटी. [वाटी]

**वाटगें**—न. शिदोरी; पाथेय. [वाट]

**वाटघाट**—स्त्री. १ खल; बारीक चूर्ण करणें; चिरडणें; ठेंचणें; चूर्ण करून मिसळणें (औषधें, पदार्थ वगैरे). २ (ल.) वाटाघाट, बोलाचाली; खलबत; खटपट; तजवीज; घडण; बनाव. ३ (ल.) खल; चर्चा; वादविवाद. [वाटणें+घाटणें]

**वांटचा**—क्रिवि. ऐवजीं; बद्दल; बदली; जागीं; आगचा. [वांटा+चा]

**वाटण**—न. १ वरवंटयानें बारीक करण्याची क्रिया. २ अशा रीतीनें बारीक केलेला पदार्थ. [ वाटणें ]

**वाटणा**—पु. ( प्र. ) वाटाणा. एक द्विदल धान्य; एक कडधान्य.

**वांटणी**—स्त्री. १ विभागणी; हिस्सेरशी. २ पृथक्करण; निरनिराळे भाग पाडण्याची क्रिया. ३ हिस्सा; वांटा; भाग. ४ ( पत्ते ) पिसल्यानंतर सर्व खेळणारांस विशिष्ट संख्येइतके पत्ते देण्याची क्रिया व पाळी. ०पत्र-क-न. ज्या लेखांवरून सह-मालक अथवा भागीदार आपले हिस्से निराळे करून घेतात तो लेख; विभागणीपत्रक; यादी.

**वाटणें-वांटणें**—सक्रि. १ निरनिराळे विभाग करून भागीदारांस देणें; विभागणें; हिस्से, तुकडे करणें; भाग पाडणें. २ निरनिराळया लोकांस योग्य प्रमाणांत देणें. 'दक्षिणा वांटणें.' ३ पृथक् काढून ठेवणं. 'जें महर्णी वाटलें। विरक्तां भागा फिटलें।' —ज्ञा ५.१४७. [ सं. वंट्=विभागणें ] **वांटप**-न. विभागणी; वांटणी; मालमत्तेची हिस्सेरशी. **वांटपपत्र**-न वांटणीपत्र. **वांटपी**-पु. वांटप करणारा. **वांटा**-पु. हिस्सा; भाग; अंश. (गो.) वांटो; वांटे. **वांटा उचलणें**-मध्यें सहभागी होणें; अंशभाक् असणें; हात असणें; भागीदार होणें (पापाचा, यशाचा, पुण्याचा).

**वाटणें**—सक्रि. १ वरवंटयानें घांसुन बारीक करणें; चूर्ण करणें; चक्काचूर करणें; पिष्ट करणें. २ ( ल. ) घासाघीस, चर्चा, खल, छाननी करणें; खोदखोदून चौकशी करणें. **वाटूनघाटून**—क्रिवि. १ चिरडून भरडून; बारीक चूर्ण करून. २ ( ल. ) अत्यंत त्रास देऊन; छळ करून; गांजून गांजून. ( क्रि०खाणें; पिणें; गिळणें ). 'हा वाटूनघाटून माझा प्राण खातो, मला प्यायला पाहतो.' **वाटप**-न. ( कु. ) वांटून तयार केलेला पदार्थ, मसाला. —क्रि. ( गो. ) वाटणें; चूर्ण करणें. **वाटपण**-न. ( गो. ) घासाघीस. **वाटपिठाचा**-वि वाटून केलेल्या पिठाचा ( उंडा, वडा इ० ). **वाटली डाळ**-स्त्री. चण्यांची डाळ भिजवून वाटून केलेला खाद्यपदार्थ. **वाटली डाळ करणें**-( वाप्र. ) १ संपुष्टांत आणणें. २ नामशेष करणें, जवळजवळ नाहींसें करणें. ३ उगाच चवीपुरतें खाणें.

**वाटणें**—अक्रि. १ भासणें; भावना होणें; समजणें. 'तुज वाटे हे जागृति। मज आली अनुभवा।' —ज्ञा ७.२०८. २ मनांत येणें; इच्छा होणें; सुचणें. 'संसार सोडावासा वाटतो.'

**वाटमुशी**—स्त्री मुशी नांवाच्या माशाची एक जात.

**वाटरूं**—न. म्हशीचें रेडकूं; पारडें.

**वाटला**—क्रिवि. ( अशिष्ट ) ( कों. ) वाटोळा; सभोवतीं; सभोवार; आसपास. [ वाटोळा ]

**वाटली**—स्त्री. ( गो. ) वाटी; पेज पिण्याचें भांडें; वाटगा; तवराळें.

**वाटव**—पु. वाटीव-मनको.

**वाटवं**—न. ( ना ). पोतें.

**वाटवणें**—क्रि. पुन्हां मार्गस्थ होणें; थोडा वेळ थांबून पुन्हां चालावयास लागणें; मार्ग धरणें; रस्ता सुधारणें. [ वाट ] **वाटविणें**-उक्रि. १ मार्गांत बाजूस किंवा मागें टाकणें; पलीकडे जाणें; बाजूनें पुढें जाणें; वळसा घालून जाणें. 'ही खांदेरी वाटविली म्हणजे शहर दिसूं लागेल' २ ओलांडणें; उल्लंघून जाणें; मागें टाकणें; टळणें ( काळ, समय इ० ). 'एवढी अंवस वाटविली म्हणजे यांस गुण पडेल.' वटावणें पहा. [ वाट ]

**वाटवा**—पु. १ बटवा; वाटोळी सरकबंदांची पिशवी; सराफांची नाणें ठेवावयाची पिशवी. 'काच वाटव्यामाजी घालून। तोंड बांधून टाकिती।' —जै १६.११. २ कप्पे, खण असलेली पिशवी; मोठी चंची. ३ ( ना. ) पोतें. 'वाटव्यांत धान्य भरलें.'

**वांटवा**—क्रिवि. बद्दल; ऐवजीं; वांटचा. —शर. [ वांटा ]

**वाटवें**—न. ( व. ) पोतें; गोणता. वाटवं पहा.

**वाटाउ**—पु. वाटसरू. 'तेथ भीये तरि वाटाउवांजवळि। ग्रामप्रांतीं।' —भाए ४९३.

**वाटाघाट**—स्त्री. १ चर्चा; खल; विचारविनिमय; वादविवाद. २ कसुन प्रयत्न; परिश्रमपूर्वक काम; त्रास; मेहनत. ३ श्रांत स्थिति; थकवा. ४ दुर्दशा; कष्टप्रद स्थिति ( ऋणकोची सावकारानें, मजूराची मालकानें केलेली ). [ वाटणें+घाटणें ]

**वाटाणा**—पु. एक द्विदल धान्य; कडधान्य; मटार. [ सं. वटधान्य; वटदाण —भाअ १८३३ ] **वाटाण्याच्या अक्षता लावणें-देणें**-साफ नकार देणें; विनंति अमान्य करणें ( वाटाणे कपाळास लावल्यास चिकटत नाहींत यावरून ). 'बाबा हातोहात तुम्हाला वाटाण्याच्या अक्षता देतील.' —भाऊबंदकी १२७.

**वाटांदुळा-वूळ**—पु. सडीक तांदुळांतील जाड कणी.

**वाटारणें**—क्रि. वटारणें पहा.

**वाटाव-वो**—पु. वटाव पहा. उणीव; कमीपणा. 'न पडेगा वाटावो। आणिकांचा।' —ज्ञा १३.७५२.

**वाटावणें-विणें**—वटावणें पहा.

**वाटावाट**—स्त्री. सारांश समजण्याकरितां घोळघोळून केलेली चौकशी; चर्चा; खल; वाटाघाट; वादविवाद. [ वाटणें द्वि. ]

**वांटावांट**—स्त्री. अनेकांस वांटण्याची क्रिया. [ वांटणें द्वि. ]

**वाटाळ**—क्रिवि. ( व. ) रस्ता सोडून; आडमार्गानें. [ वाट ]

**वाटिका, वाटी**—स्त्री. फुलझाड वगैरेचा बाग; बगिचा; लहानसें उद्यान. ( समासांत ) पुष्पवाटिका=फुलबाग; वृक्षवाटिका=उपवन; इक्षुवाटिका=ऊसाचा मळा इ. 'निकट पुरपतीची वाटिका रम्य पाहे।' —मुरामायण अयोध्या ११.

**वाटि(टी)व**—स्त्री. (काव्य) १ अंश. 'ते तुझिया प्रकाशाची वाटिव' -विउ ३.११. २ पुरुषार्थ; पराक्रम. 'वाटिवावीण हांव। बांधिती झुंजी।' -ज्ञा १.१७२. 'तरी तुझा मोडीन दरारा। वाटिवेचा।' -कथा ५.४.७२. तंवेळीं यांची वीरवाटीव। कोठें गुप्त ठेविली होती सर्व।' -मुआदि ४२.६३. ३ प्रशंसा. 'कीजे भारिव थोर वाटिव तुझी गंधर्व-विद्याधरीं।' -आयज्ञरक्षण ७.४. [वाटणें]

**वाटी**—स्त्री. १ लहान वाडगा; बशीसारखें खोलगट भांडें. २ नारळाचा अर्धा भाग; एक कवड. ३ गुडघ्यावरील हाड; गुडघी रोग. 'वाटी वटक वायगोळा।' -दा ३.६.२२. ४ सामान्यत: खोलगट पदार्थ; फुलाचा पेला; पोकळ गोळयाचा अर्धा भाग वगैरे. ५ रत्न बसविण्याकरितां केलेलें कोंदण. [सं. वर्तिका-वट्टिआ-वटी-वाटी-भाअ १८३२]

**वाटीगर**—पु. एक फुलझाड. वाटोगर पहा. 'जाईजुई राजसेवंती। मंदार वाटीगर मालती।' -मुरंशु ५.१४.

**वाटीव**—वि. वाटलेलें; चूर्ण केलेलें; पीठ केलेलें.

**वाटु**—पु. (गो.) एक जातीचा मासा. -मसाप ३.३.

**वाटु(ली)व**—स्त्री. वाट; प्रतीक्षा. 'कैसी अवस्था भूतळीं। वाट्ट पातां।' -शिशु १७१. 'वाटुली पाहतां सिणले नयन। बहु होतें मन आर्तभूत।' -तुगा ६१३.

**वाटू(टो)ण**—न. (तंजा.) वाटवण पहा.

**वांटेकर-री-दार, वाटेलदार, वाटेली**—पु. विभागी; भागीदार; हिस्सेदार; पातीदार.

**वांटेचा**—वि. वांटचा; ऐवजीं; बदली. [वांटा]

**वाटेनसून**—क्रिवि. (गो.) वाटेनें.

**वाटेपत्र**—न. वाटणीपत्र पहा.

**वाटेय**—पु. विषय. -हंको.

**वाटोगर-रें**—पुन. बटमोगरा. 'ते नवे वाटोगरें उमलतांती।' -शिशु ३०१.

**वाटोणी-णें**—न. वाटवणी पहा.

**वाटोली**—स्त्री. वाट. 'डोळे माझे शिणले। पाहतां वाटोली।' -नामदेव, स्तोत्रमाला १५३९.

**वाटोवा**—पु. बटबा. वाटवा पहा.

**वाटोळा**—वि. १ गोल; वर्तुळाकार; गोलाकार; चेंडूसारखा. २ दीर्घवर्तुळाकार; लांबट व गोल; नळकांडयासारखा. [सं. वर्तुल; प्रा. वट्टुल]

**वाटोळा**—वि. वाटोळें करणारा; नाश करणारा. 'उदंडचि वरें बुडविलीं वाटोळया।' -ब ४९६. **वाटोळा खूर**-पु. १ अतिशय खर्चिक घोडा असल्यास त्यास म्हणतात. २ (ल.) उचल्या; भामटा; सोदा. **वाटोळा गोटा-गोळा-धोंडा**-पु. (ल.) बोलण्या मध्यें वगैरे कधीं सांपडावयाचा नाहीं असा मनुष्य; धूर्त मनुष्य; सर्वांशीं किंवा सर्व प्रसंगीं सारखा वागणारा, सर्वांशीं गोड असणारा, जमवून घेणारा मनुष्य. **वाटोळें-वाटोळें लांबोळें करणें**-(वाटोळें=शून्य यावरून) नाश करणें; नाहींसें करणें; समूळ नष्ट करणें. 'सुयशाचें करिल कां न वाटोळें।' -मोउद्योग ७.२६. **वाटोळें-वाटोळें लांबोळें होणें**-नाश होणें; नाहींसें होणें; नष्ट होणें. **वाटोळे चणे**-पु अव. (गो.) वाटाणे. **वाटोळ्या गंजिफा**-स्त्री. एक खेळ. -मखेपु १५९.

**वा(वां)ठ**—स्त्री. म्हशीची रेडी. वांट पहा. **वांठीचा पिता**-पु. (संकेत) मूर्ख; जड बुद्धीचा. **वांठरूं**-न. रेडूक, रेडकू.

**वांठ**—वि. चकित; तटस्थ; आश्चर्ययुक्त. 'ऐसा महिष घनवट। गंगा तैसी चोखट। जया देखी जगीं सुभट। वांठ जहाली।' -ज्ञा २.२१३.

**वांठणें, वांठरणें**—अक्रि. (थंडी, त्रांब इ०मुळें) आंखडणें; वांकडें होणें.

**वाठाण**—न. वठाण पहा. 'कीं वाठाणीं नलगे दीपु।' -गीता १२.९२.

**वाठार**—न. वटार पहा. १ गांवाचा, शहराचा भाग; पेठ; पुरा; बोड. २ गल्ली; बोळ; आळी.

**वाठि(ठी)व**—पु. वाटिव पहा. 'जेविं वाटिवेचे आदित्य उदैलें।' -शिशु ५४७. 'कीं शृंगाराची वांठीव पान्हैली।' -शिशु ५९७.

**वांठीं-ठयें**—न. गवताचा, पेंढयाचा मुडा.

**वाड**—न. (राजा.कु.) वाढें; उंसाचा शेंडा. [सं. वृधु=वाढणें]

**वाड**—स्त्री. १ मोकळी जागा; रिकामी जागा; रिता ठाव. २ रिकामपण; फुरसत. [वाढणें]

**वाड**—वि. (काव्य) १ थोर; मोठें; पुष्कळ; प्रचंड. 'परि भीमकाचें भाग्य वाड। पुरत परमार्थाचें कोड।' -एरुस्व १४.८४. 'करा आतां मजसाठीं वाड पोट।' -तुगा १२९५. २ अफाट; विस्तीर्ण; अवाढव्य; अमर्याद. 'कपी वीर तो वाड ज्याला उडाला।' -राक १.८. ३ भव्य; बलिष्ठ; भयंकर; आश्चर्यकारक; विस्मयकारक. 'अभ्रीं वाढुनि वाड धाड पडली तेणें थरारी धरा।' -आपूतनावध ४१. 'वटबीजीं असे वाड। फोडूनि पाहतां वर दिसे झाड।' -दा १०.९.२. 'कुमारें सर्पास्त्र घातलें वाड।' -ह २८.१६१. [सं. वृधु-वृद्ध-वडु-वाढ-वाड] ०पण-न. विस्तार; मोठेपणा; भव्यपणा; अधिकपणा. 'वाडपणाचा डांगोरा। तो दंभु ऐसा।' -ज्ञा १६.२१७; -ज्ञा १०.१७६.

**वाड, वाडणें**—वाढ, वाढणें पहा.

**वांड**—वि. हूड; व्रात्य; खोडकर; उनाड. [सं. वंड-भाअ १८३३; वड्=विभाजनें, वेगळा राहणारा. -ग्रंथमाला; प्रा. वंठ= अविवाहित; का. उंडिग]

**वाडकर-री**—पु. १ वाडीकर; वाडीचा मालक. २ वाडींत राहणारा; सांवतवाडीकडचा मनुष्य. ३ गांवढा.

**वाडकुलें**—न. (कों.) लहान वाडी; लहानसें आवाड; परसूं.

**वाडकोड**—न. कौतुक; लडिवाळपणा; आवड. 'उठोनि नृपति वाडकोड।' -दावि ३५६. [कोड द्वि]

**वाडखो**—क्रिवि. (व. ना.) १ वाढूळचा; केव्हांचा; फार वेळचा. २ इतक्यांतच; एवढ्यांतच; आतांच. [वाढ वेळ]

**वाडगा**—पु. मोठी वाटी.

**वाडगी**—वि. (कों.) म्हातारा; वृद्ध; वाढलेला. [वाढणें]

**वाडगें**—न. आवार, परसूं; घराभोंवतालची मोकळी जागा; घर नसलेली किंवा पडक्या घराभोंवतालची कुडलेली जागा. 'वाडग्यांत गवताची गंज आहे.' -मराठी तिसरें पुस्तक पृ. ७५. २ (व.) जनावरें कोंडण्याकरितां केलेलें आवार. [सं. वाटक]

**वाडदिवस, वाडदीस, वाडप, वाडपी-प्या, वाडया वाडलें, वाडवण, वाडवीस, वाडवेळ**—(राजापूर प्रांतीय) वाढदिवस-दीस इ० पहा.

**वाडभर**—क्रिवि. पुष्कळ वेळ.

**वाडव**—पु. वडवानल पहा. 'दुर्वार वाडवशिखेसि न मानिजेले।' -र ३९.

**वाडवडील**—पु.अव. पूर्वज; बापजादे; वडील माणसें वगैरे [वडील द्वि.]

**वाडवल**—पु. एक जात व तींतील व्यक्ति; बागवान. [वाडी]

**वाडवळ**—न. शेतकरी लोकांतील एक विधि; डवरा. [वाढ+वेळ]

**वाडसणें, वाडणें**—सक्रि. (कों.) (वाढलेला भाग) छाटणें; तोडणें; कापणें. 'झाड वाडसून टाक.' 'बेत आंगलें ती वाडी टाकी.' -भिल्ली. [वाढ]

**वाडा**—पु. १ भव्य व मोठी इमारत; प्रासाद; थोरामोठ्याचें घर; राजवाडा; सरकारवाडा. 'मग गणेशा करूनि नमन। वाडियांत आला जाण।' -कथा ६.१९.१२६. २ शहरांतील पोट विभाग; आळी; वसती. उदा० गौळवाडा; ब्राह्मणवाडा; कुंभार वाडा; देऊळवाडा. ३ खेडेगांवाचा, मौजाचा भाग; कोंड. ४ आवाड; आवार; कुंपण घातलेली जागा; बंद केलेली जागा. 'वाडांचे कूपी खातीचे जळे।' -कृमुरा ७.४६. ५ गुरें, मेंढ्या, शेळ्या बांधण्याकरितां केलेली जागा (उघडी किंवा छपर घातलेली); बेडें. 'देती आपुलाला झाडा। गाई बैसविल्या वाडां।' -तुगा १८६. ६ शेळ्यामेंढ्यांचा बसलेला समुदाय. 'शेतें खतण्यासाठीं त्यांत वाडे बसवितात.' [सं. वाट; प्रा. वाड] **वाडोवाडीं**-क्रिवि. (महानु.) दर वाड्यांतून. 'आर्तातें परमेश्वर वाडोवाडीं गिवसती।' -दृष्टांतपाठ ३७.

**वाडाचार**—पु. १ (कर) वंशविस्तार. २ आचारविचार. 'बहुत नाहीं वाडाचार।' -दावि १०. [वाढ+आचार]

**वाडाळणें**—सक्रि. वारवणें; आसडणें; पाखडणें.

**वाडि**—स्त्री. वाट. 'मज निघावा खिडियेरे वाडि पाहों दे।' -पंच ५.७.

**वाडी**—स्त्री. १ कुंपण घातलेली लहान बाग; बगीचा; वृक्षसमूह; राई. 'नातरी सांडून कल्पतरूची वाडी।' -भाए ६२२; -ज्ञा ८.१४०. २ वाडगें; आवार; वाडकुलें; मळा. ३ मोठ्या गांवाजवळील लहान वस्ती; झोंपड्यांचा समूह; लहान गांव. 'जेथ पातां चहूं कडी। अठरा गाउआं बाहिरि वाडी।' -शिशु ३२१. [सं. वाटिका; प्रा. वाडिआ; गु. हिं. वाडी; बं. वाटी] ०**वतन**-न. वतनवाडी पहा. **वाड्या**-पु. वाडीचा वतनदार; वाडीवाला; घरंदाज; शेतीवाडीचा मालक.

**वाडी**—(राजा. गो.) पिशाच्चादिकांकरितां थोडें अन्न वाढून ठेवतात तें; काकबली; भिकाऱ्यास द्यावयाची उंडी; गोग्रास. [वाढणें]

**वाडु**—वाड पहा.

**वाडूळ**—वाढवेळ पहा.

**वाडें**—न. १ वाढें; उंसाचा शेंडा. २ खजूराचें आखें; अर्धें ओझें.

**वांडें**—न. माल; विकण्यास आणलेले जिन्नस; मालाचा सांठा. [सं. वाणिज्य] **वांड्याचें वांडें**-सगळा माल; सर्व सांठा.

**वाडें**—न. वाडी पहा. देऊळवाडें; आईतवाडें.

**वाडें**—क्रिवि. कौतुकानें; आश्चर्यानें. 'प्रत्यक्ष ग्यां कोंडुनियां कवाडें। लावूनि आल्यें निरखाल वाडें।' -आकृष्णचरित्र ४८.३०. [वाड] **वाडेंकोडें**-क्रिवि. १ कौतुकानें; मोठ्या आवडीनें; लाडिकपणानें; प्रेमानें. 'द्यावा प्रसाद हा सर्वांला भक्षूं वाडेंकोडें।' -मोसुदाम ५४ (नवनीत पृ. ३७८). -ज्ञा १५. ४४८. २ सहज; लीलेनें; सहजपणें; अनायासें. 'एकेचि शरें वाडेंकोडें। मस्तक उडविलें आकाशीं।' -जै ६८.८९. ३ लबाडीनें; धूर्तपणें. 'जे मायेनें ठकिलें वाडेंकोडें। ते माया सभूळेसीं उडे।' -एभा २.९१. [कोड-कोडें द्वि.]

**वांडें**—न. रहाटाच्या माळेचा लोटा, मडकें.

**वांडें**—न. १ (कु.) अचानक लाभ; घबाड. २ रखेली; उपस्त्री.

**वाडोवाड**—वि. मोटमोठा. वाड पहा. [वाड द्वि]

**वाडोळ**—पु. वाढवेळ पहा.

**वाड्रीक**—पु. (गो.) लग्नसमारंभ.

**वाढ**—स्त्री. १ शरीराची उत्तरोत्तर होत जाणारी वृद्धि; आकार मोठा होणें; जाडें होणें. २ आधिक्य, प्रमाणांत, मापांत,

**विजयाभिनंदन**—पु. पुढें होणाऱ्या एका शकर्त्याचें नांव.

**विजयावर्त**—वि. कर्णमूळाचें ठिकाणीं एक व उरावर एक असे भोंवरे असलेला ( घोडा ). -अश्वप १.८८ [ सं. ]

**विजरे**—पु. प्रांताधिकारी; पोर्तुगीज गव्हर्नर; व्हाइसरॉय. 'गोवेकर विजरे यांचा व स्वामींचा स्नेह झाला आहे.' -शारो १.९२. [ पोर्तु. इं. व्हाइसरॉय ]

**विजवटा**—वि. व्रात्य; द्वाड; खोडकर; उच्छृंखल; दुर्वर्तनी; कुलकलंक; दुर्गुणी. 'शिवाजीच्या मरणानंतर त्याच्या विजवटया लेकानें...' -नि ९६८. 'उगीच विजवटी हे आणिली काल भाची' -सारुह ४.६६. [ सं. वीज+वत् ! विद्यावत्=दीडशहाणा-भाअ १८३४. विजयवर्तिक-भाअ १८३४ ]

**विजवरा**—पु. बिजवरा पहा.

**विजवा**—स्त्रीअव. ( अशिष्ट ) वीज याचें अनेकवचन. 'स्वरुपाचे तुटती तारे कडारे कड विजवा पडतील तुटून।' -पला ४.१७. 'भूकंपा उलुका भालु रीत घन विजवा कडकडती।' -ऐपो ३११. [ सं. विद्युत् ]

**विजळणें**—अक्रि. बिलबिलीत होणें; ( आंबे, अन्न वगैरे नासुन ) लिबलिबीत होणें; चोथापाणी होणें ( दुधाचें ); नासणें. [ सं. वि+चल् ]

**विंजाई**—स्त्री. एक क्षुद्र देवतता. 'विंजाई देवी म्हणे मी विंजवनी।' -सप्र ५.२७. [ सं. विंध्य+आई ]

**विजात**—स्त्री. भिन्न जात. -वि. १ भिन्न जातीचा; निराळा; वेगळा. 'माणसांसी भुंके। विजातीनें चावे थुंके।' -तुगा ३११२. २ ( अपशब्द ) द्वाड; व्रात्य; त्रासदायक; अवखळ ( मूल ) [ सं. वि+जाति ] **विजाती**-वि. भिन्न जातीचा; निराळा; वेगळा; असाधारण; असामान्य. **विजातीय**-वि. १ भिन्न जातीचा, वर्गाचा, प्रकारचा, कुलाचा; अन्य. २ विलक्षण; अपूर्व; नवीन व आश्चर्यकारक; तऱ्हेवाईक. ३ तऱ्हेतऱ्हेचा; नानारूपी; बहुविध; अनेक प्रकारचा. 'परमेश्वराचे विजातीय चातुर्य, उपकारबुद्धि व अपारशक्ति हे गुण दिसून येतात.' -मराठी सहावें पुस्तक पृ. ७७. [ सं. ]

**विजायली**—वि. इजायली पहा.

**विजार, विजारत, विजारदार, विजारा**—इजार, इजारत, इजारदार, इजारा इ० पहा.

**विजावळी**—स्त्री. वेगळेपणा; भिन्नता; वेगळीक. 'तैं तरी या सुवर्मा। विजावळी आत्मया कर्मा।' -ज्ञा १८.२६९.

**विजु, विजुका, विजू, विज्जु**—स्त्री. वीज; विद्युत्; विद्युल्लता. 'संहारमेघांचां पोटीं। उकलेति कोळ विजुचिआं पुटीं।' -शिशु १०१९. -ज्ञा ११ २०४. 'जैसे विजुचे कल्लोळे।' -जै ४३.१८. 'जैसी मेघांत विज्जुनभा' -ज्ञाप्र ४२४. [ सं. विद्युत् ]

**विजृंभणें**—अक्रि. १ जांभई येणें. २ प्रगट होणें; दिसूं लागणें. 'आनंदसमुद्रीं संक्रीडत घडिघडि रोमांच विजृंभती' -आविश्वा. [ सं. ]

**विजोगत**—स्त्री. अपघात; आपत्ति; अनर्थ; दुःखकारक घटना. ( क्रि० येणें; पडणें. ) [ सं. वि+युज् ] **विजोगाचा दिवा**-पु. ( व. ) विचित्र माणूस; विलक्षण व्यक्ति. 'तुमच्यासारखे विजोगाचे दिवे जगांत नाहीतच.'

**विजोड**—वि. १ विशोभित; विषम; न शोभणारें; विसंगत. 'असल्या विजोड संबंधानें नांवाजलेल्या कुटुंबास कलंक लागतो.' -टि ४.१३५. २ न जुळणाऱ्या रंगाचें, भागाचें; न बसणारें, जमणारें. [ सं. वि+युज् ]

**विज्वर**—वि. भयंकर; प्राणांतिक, दुर्धर; वाईट; नाशकारक. 'संभाजी महाराज औरंगजेब याणीं नेऊन विज्वर प्रसंग गुजरला' -मराचिथोशा २.

**विंझण - णा - णें, विझवणा - विंझणवारा**—विंजणा, विंजना पहा. ( अशिष्ट ) इझणा-ना. 'उखा घाली विंझणवारा' -कथा १.६.१९७.

**विझणें**—अक्रि. १ मालवणें; शांत होणें; थंड होणें ( दिवा, अग्नि वगैरे ). २ ( ल. ) थंडावणें; शांत होणें; मिटणें; दबणें ( भांडण, राग वगैरे ) [ सं. उपशमन ; सिं. उझणु ] **विझण**-न. विझवण्याची, मालवण्याची स्थिति. [ विझणें ] ०**घालणें**-विझविणें. ०**पडणें**-विझणें. **विझवणें**-सक्रि. मालवणें; शांत करणें. [ विझणें प्रयोजक; सिं. उझाइणु; गु. विसामणु ]

**विझणें**—उक्रि. भोंक पडणें; छेदणें; टोंचणें. 'विझती शस्त्रांचे घायटे।' -दा ३.७.४. [ सं. विध्; म. विंधणें ]

**वि( विं )झणें**—न. सुताराचें छेद पाडण्याचें हत्यार. [ सं. विध् ]

**विंझुणवारा, विंझुणा, विंझुणें**—विंजणा पहा.

**विट**—पु. १ जार; उपपति; ठक; लुच्चा मनुष्य; धूर्त; व्यसनी; छंदी. 'भीष्मा मर्दाया अरि, विट जेंवि सतीकुचा मरायास।' -मोभीष्म ११.५४. 'जपति जसे पीडाया व्यसनीं सुजनासि सर्वकाळ विट।' -मोआदि २८.८. २ गांडू; गांडमराऊ. ३ जांवई. -हंको. ४ ( नाट्य ) राजाचा मित्र; रंगेल मनुष्य. [ सं. ]

**विटक-र, विटका**—वि. १ नासलेलें; विटलेलें. 'आंबट तिखट विटक जाणोनि। करी त्याग स्वीकार।' -स्वादि ५.२. ३४. २ विटणारा, उडणारा, फिका पडणारा ( रंग, कपडा ). [ विटणें ]

**विटंक**—न. घरटें; खुराडें. 'कपोत हुंकार करी विटंकीं।' -सारुह ५.१४. -वि. ऊंच व घनदाट; निबिड; अवाढव्य. 'ऐसा हा एकु। विश्वाकार विटंकु।' -ज्ञा १५.६२. [ सं. ]

**विटकणी**—स्त्री. १ वेडावणी; विचकणी; वाकुली. ( क्रि० दावणें; दाखविणें ) २ कुचाळी; टवाळी; थट्टा. [ विट ]

**विटकर, विटकूर**—स्त्री. १ वीट; विटेचा तुकडा; रोडा; ढोला. २ विटेची पूड; इटकर-कूर. **विटकरी**-वि. विटेसारखा; विटेच्या पुडीसारखा ( रंग ).

**विटकळणें**—अक्रि. सुटें होणें; फांकणें.

**विटकुली**—स्त्री. ( प्र. ) विडकुली पहा. लहान विडी.

**विटगळला**—वि. ( व. ) विटका; वेडाविद्रा; किळसवाणा.

**विटणें**—अक्रि. १ निस्तेज होणें; मळकट होणें; तजेला नाहींसा होणें; फिका पडणें ( रंग, रंगित वस्तु ). 'झऱ्याच्या पाण्यानें तांब्याचीं भांडीं विटतात.' -पदाव १.१४३. २ शिळें होणें; आंबणें; ताजेपणा, तजेला, सौंदर्य, तेज, तकाकी नष्ट होणें. ३ कोमेजणें; मलूल होणें; शिळपणें; म्लान होणें ( एखादें झुडुप-अकालीं अथवा फार वृष्टि झाल्यामुळें ). ४ ( ल ) कंटाळणें; तिरस्कार वाटणें; ओकारी येणें; नकोसें होणें. 'जरि तूं करुणाळा गोसावी। भणौनि विटसीना।' -ऋ ५२. 'स्वकन्येच्या टायीं सदय परि झालाचि विटता।' -मोकृष्ण ६२.३४. [सं. विट्= घाण; विट् ध्वनि करणें, शाप देणें ]

**विटप-पी**—पु. वृक्ष; झाड.

**विटंबणें-बिणें**—उक्रि. १ उपहास, थट्टा, फजिती करणें; अनमानणें; चेष्टा करणें; लाजविणें. 'विटंबिले भट। दिला पाटी वरी पाट।' -तुगा २३६. २ विघडविणें; कुरूप करणें. 'रूप विटंबील श्रीपती।' -एरुस्व १६.२७. [सं. विडंव्] **विटंब**-पु. विटंबना; फजिती; चेष्टा. 'वोहरेवीण वाधावणें। तो विटंबु गा।' -ज्ञा १३.८३७. **विटंबना-णा**-स्त्री. फजिती; मानहानि; अप्रतिष्ठा. 'काय विटंबना सांगों किती। पाषाण फुटती ऐसें दुःख।' -तुगा २२६०. **विटंबवाणें**-वि. अपमानकारक; मानहानीचें. 'त्या कृष्णासी सोयरिक करणें। तेंचि आम्हां विटंबवाणें।' -एरुस्व २.२७.

**विटबंदी, विटेबंदी**—वि. विटांनीं बांधलेलें; इटबंदी. [ वीट+बंदी ]

**विटवणी**—न. हानिकारक पाऊस; अकालवृष्टि; अतिवृष्टि; ( अशा वृष्टीवर विहिरीचें पाणी पिकास द्यावें लागतें). [विटणें+पाणी]

**विटवणें**—सक्रि. वेडावणें; कंटाळा आणणें. 'मातलें माकड विटवी पंचानना।' -तुगा २४०३. 'हा ठायवरी पांडवा। पदार्थजातीं आघवा। विटवी तो होआवा। वैराग्य लाठु।' -ज्ञा १५.२५७. [ विटणें प्रयोजक ]

**विटविट**—स्त्री. विघाड; नाश; विस्कटलेली स्थिति, अवस्था. -क्रिवि. किड्याच्या बुजबुजाटाप्रमाणें; किडे घोंगावूं लागतात तसें. [ विट द्वि. ]

**विटा**—पु. एक प्रकारचा भाला; इटा पहा. 'त्यामागें विटे बाण भाले.' -मराचियोशा ६९. **विटेकरी**-पु. विटा नांवाचें शस्त्र धारण करणारा; इटेकरी. 'पुढें धावती विटेकरी।' -ऐपो १४५.

**विटावणें**—सक्रि. वेडावणें. 'कीं विटावूं लागे फुंजे।' -ज्ञा १३.७६०. 'हरिदासासी विटावी।' -एभा २३.२५८. [ विटणें प्रयोजक ] **विटावीट**-स्त्री. फटफजिती. 'तेथ विटावीट आघवी। होइजे जे स्वभावीं।' -सिसं ४२.१०१.

**विटाळ**—पु. १ दोष; अपवित्रता; अशुद्धता; विशिष्ट प्राणिमात्र, वस्तुजात यांमध्यें असणारी अशुचिता. 'तरी आतां दिठीचा विटाळु गेला।' -ज्ञा ११.१९२. 'या स्त्रीजिता नित्य विटाळ पाही।' -सारुह ८.११. २ अशुद्ध, अपवित्र वस्तूच्या संसर्गानें प्राप्त होणारा दोष; अशुचिता; अस्पृश्यसंसर्गजन्यदोष. ३ स्त्रियांचा ऋतुस्राव; रजःस्राव. 'रजस्वलेचा जो विटाळ। त्यामध्यें जन्म यांसि।' -दा ३.१.११. ४ अभाव, अलिप्तता वगैरे दाखविण्यास हा शब्द योजतात. 'आम्हा विषयांचा विटाळु सदा।' -शिशु २०१. 'त्यांस देशभाषेचा विटाळहि सोसत नाहीं.' -नि २. [ सं. विष्ठा; प्रा. विट्ठा; प्रा. विट्टाल ] ( वाप्र. ) **०करून घेणें**-विधवेनें वपन करून घेणें. **०कालवणें**-विटाळ पसरणें; एकापासुन दुसऱ्यास याप्रमाणें दोष सर्वभर होणें. **०जाणें**-१ वेळीं अवेळीं रजःस्राव होणें. २ रजःस्राव होण्याचें अजिबात बंद होणें. **विटाळणें**-उक्रि. १ अशुद्ध, दूषित, भ्रष्ट, अपवित्र करणें; विटाळ करणें; होणें. 'जैसे पुत्र विटाळले।' -विपू १.८४. २ केवळ स्पर्श होणें, नाममात्र संबंध येणें. 'जेवण न जातां तोंड मात्र विटाळलें.' **०चंडाळ**-पु. नानाप्रकारचा विटाळ; सर्वसामान्य विटाळ. **विटाळशी**-स्त्री. रजःस्वला; ऋतुस्नात स्त्री. **०चंडाळशी**-स्त्री. विटाळशी.

**विटाळी**—स्त्री. ( व. ) विटकर; विटेचा भुगा.

**विटाळें**—न. विटा पाडावयाचा लांकडी सांचा. [सं. इष्टकालय]

**विटी**—स्त्री. विटूदांडूच्या खेळांत दांडूनें उडवावयाचा लहान लांकडाचा तुकडा. [ सं. यष्टि ] **विटीदांडू**-पु. विटी आणि दांडू घेऊन खेळावयाचा एक खेळ. 'मराठी राज्य काबीज करणें म्हणजे विटीदांडूचा खेळ.'

**विटी**—स्त्री. विडा. 'मंदस्मित मुखभर विटी।' -लक्ष्मीनारायण कल्याण, ग्रंथमाला [ सं. वृत्=वळणें; वीटिका ]

**विटोरिया**—पु. बुरखुंडा; भुट्टा. 'जैसे दाणे काढी कणसाचे। मग काय प्रयोजन विटोरियाचें।' -अफला २९.

**विटोला**—पु. ( ना. ) तात्पुरता घातलेला चुला. [ वीट ]

**विट्ट**—पु. १ अतिशय वीट. २ बेरंग; पाणउतारा; तेजोभंग; फटफजिती.

**विठलाई**—स्त्री. एक क्षुद्रदेवता. ' विठालाईदेवी म्हणे सांगो कायी । ' -सप्र ८.५.२४.

**विठाई, विठाबाई, विठोबाई**—स्त्री. विठोबास प्रेमांतील लाडकें नांव. ' विठाई माउली । ग माय माझी विठाई माउली । '

**विठी, विठीदांडू**—विटी, विटीदांडू पहा.

**विठीव**—स्त्री. पौरुष. ' आंगीं कस धरिती पण विठिवेवीण. -गीताचंद्रिका २३.

**विठू , विठुमिया**—पु. पोपट.

**विठू , विठो, विठोबा**—पु. विठ्ठल देवाचीं नांवें.

**विठूबोका, विठ्या**—पु. बोका; माजलेलें मांजर.

**विठोबारखुमाई**—पु. ( अव. ) १ विठ्ठल व रुक्मिणी. २ ( ल. ) समवयस्क वधूवर; योग्य जोडपें.

**विठ्ठल**—पु. पंढरपूरची प्रसिद्ध देवता. [ सं. वित्=ज्ञान+ ठ=शून्य, +ल=परिपालक. अज्ञानांचा कैवारी; विष्णु-विठु+ल; का? ] **विठ्ठलपंती तांब्या**-पु. विठ्ठलपंत नांवाच्या मनुष्यानें प्रचारांत आणलेल्या घाटाचा तांब्या. **विठ्ठल सवाशीण-सवाष्ण**-स्त्री. जीस विठ्ठल हाच केवळ आधार आहे अशी स्त्री, विधवा; विकेशा विधवा. ' गतभर्तृकेच्या मनांत तसला झोंक पाहिजे असेल तर तिनें अगोदर विठ्ठलसवाष्ण झालें पाहिजे ' -आगर ३.११.

**विठ्ठलसुंदरांतक**—पु. ( सांकेतिक ) राघोबादादा. ( विठ्ठलसुंदर हा निजामाचा दिवाण होता त्यास मारणारा ). ' म्हणे म्यां बहुतेक दिधलीं दुःखें । त्या विठ्ठलसुंदरांतकें । ' -अफला.

**विडकुली**—स्त्री. लहान विडा; पट्टी.

**विडनिंबू-लिंबू**—न. ईडनिंबू-लिंबू पहा.

**विडंब**—पु. डौल; थाट; तऱ्हा; ढेवण. ' जेवीं आरिशाचें प्रतिबिंब । दिसे समरूपें स्वयंभ । तैशी स्वरूपतेची शोभ । सम विडंब दोहींचा । ' -एभा २४.३०९. [ सं. ]

**विडंबन-ना**—नस्त्री. १ उपहास; फजिती; टवाळी; थट्टा; चेष्टा. एखादी गोष्ट वस्तुतः आहे त्याहून भिन्न स्वरूपांत दर्शवून तिची टवाळी करणें; उपहास करणें; कुचेष्टामिश्रित दोषदिग्दर्शन. यांत कुचेष्टा हा एकच हेतु नसून विडंबित गोष्ट सुधारण्याचाहि हेतु असतो.. २ नक्कल; सोंग; बतावणी. ३ दुसऱ्याचें रूप धारण करणें; दुसऱ्याची आकृति धारण करणें. [ सं.विडंब् ] **विडंबित**-वि. १ फजित; उपहास केलेला, झालेला. २ ज्याची नक्कल, अनुकरण, बतावणी केली आहे तो.

**विडवर**—न. निकृष्टावस्था; पूर्ण विनाश; फजिति; गाळण; हबेलंडी. -क्रिवि. अव्यवस्थित; हिडिस; ओंगळवाणा; भ्रष्ट; निकृष्ट. ' राज्य झालें असें बहु विडवर । उपद्रव फार प्रजेसी । ' -कथासारामृत २७.७५.२५.४७. [ सं. विट ]

**विडा**—पु. १ नागवेलीचीं पानें, सुपारी, कात, चुना, लवंग, वेलदोडे वगैरे घालून केलेली पट्टी; तांबूल. विडयाचे प्रकारः-कातरविडा; कापूरविडा; कुलपीविडा; गोविंदविडा; गोंदविडा; मोडविडा; मोदकविडा इ०. २ विड्याचें साहित्य, पानसुपारी वगैरे. [ सं. वीटिका; प्रा वीठिआ ] **०उचलणें**-( पूर्वी एखादें बिकट काम करण्याचा प्रसंग आला असतां दरबारांत मध्यें विडा मांडून ज्यास तें काम करावयाची ईर्षा असेल त्यानें तो विडा उचलून घ्यावा अशी पद्धति होती. त्यावरून ) प्रतिज्ञा करणें; पण लावणें; कार्याची जबाबदारी घेणें. ' जो धरून आणील अनुशाल्वाला । तेणें विडा उचलावा । ' -जै १३.९. **०देणें**-१ निरोप देणें; पाठवणी करणें ( समारंभ पुरा झाल्यावर विडे वांटावयाची चाल आहे यावरून ). ' केशवपति रायाचा । विडा घेऊन आज्ञेचा । '-ज्ञाप्र १०२९. २ कामावरून कमी करणें. **०पाऊड**-पु. विडादक्षिणा; विडा पैसा. ' विडा पाउड भीतरां । घेऊनि रिघती गाभारा । ' -ज्ञा १८.४६.

**विडाल-क, विडालक**—पुनपु. बिडाल; बिडालक पहा. मांजर. ' बदके विडाळके पाकोळ्या । ' -होला ११४.

**विडाळू**—न. पोटांतील आंतड्याचा भाग. ' सात अंगुळें स्नेहाळी । आठ अंगुळें पित्ताची खोली । विडाळू बोलिजे जवळीं । दोन अंगुळें । ' -कथा ५.७.१७५.

**विडि, विडी**—स्त्री. १ विडा; तांबूल. ' विडि करूनि समर्पि महासती । ' -नरहरि, दानव्रत १७. ' राव होता सुखसदनीं । विडिया देतसे मोहिनी । ' -कथा २.९.९३. ' धरा शांतता खाउंद्या विडी । ' -होला ८३. २ तंबाखू घालून केलेली पानाची सुरळी; विडीचे प्रकारः-फर्मास, तोकडी, लवंगी, बीचबंद. ३ लग्नसमारंभांत वधूवरांस तोडण्याकरितां देण्यांत येणारी पानाची सुरळी, लवंग, खोबऱ्याची काचळी इ०. ४ वसवी; शेंवी; मांडळ; वलय; कडें; लोखंडाची वाटोळी चापट कडी ( ही मुसळ, काठी, दिवटी यांच्या शेवटीं, नांगराचा फाळ बसविण्याकरितां, चाकांच्या तुंब्याभोंवतीं व तुंब्याच्या आंतील भागास, रहाटाचा आंस फिरण्याकरितां, जात्याच्या मायणींत, हत्याराच्या मुठीस वगैरे बसवावी लागते ). ' विद्युल्लतेची विडि । वन्हिज्वाळांची घडी । '-ज्ञा ६.१२४. [ सं. वीटिका; विटि ]

**विडुळणें**—अक्रि. बिलबिलीत, लिबलिबीत, थलथलीत होणें ( एखादें फळ अधिक झाल्यामुळें, उबून, नासून ); नासणें; चोथापाणी होणें ( दूध, दहीं वगैरे ). **विडूळ**-वि. १ आंबलेलें; नासलेलें; कुबट झालेलें; शिळें; बेचव; पांचट ( पाणी, दूध, दहीं, फळें वगैरे ). २ निस्तेज; फिका; उतरलेला ( चेहरा,मुद्रा ). ३ मुळमुळीत; रूक्ष; पाणचट; नीरस ( भाषण ). ४ किळसवाणा; घाणेरडा; तिरस्करणीय ( मनुष्य, कृत्य ). [ विट ] **विडोळ, विढूळ, विढोळ, विढोळणें**-विडूळ, विडुळणें पहा.

**विढार**—न. विढार पहा. बिऱ्हाड; राहण्याची जागा; निवासस्थान. ' पावे सुरवाडिक विढार । '–विपू २.४.

**विढाळ**—वि. तेजःपुंज; देदीप्यमान; चकचकीत. ' कीं मुक्ताफळांचा गोळा विढाळ । ' –रावि ४. [ वि+ढाळ ]

**विण**—शअ. वांचून; वीण पहा. ' तें उकललियाविण । ' –विउ १.२.१३७.

**विणची वेळ**—स्त्री. संध्याकाळची वेळ; सूर्यास्तसमय; तिन्हीसांजा. **विणचां**-क्रिवि. ( राजा. ) संध्याकाळीं; सुमारें चार घटका दिवसा.

**विणणें**—उक्रि. १ ग्रथन करणें; गुंफणें; तंतु वगैरे एकमेकांत गुंतवून वस्त्रादि तयार करणें. २ पलंग, माचा, खाट इत्यादि नवार, सुंभ, दोरी वगैरेंनीं जाळीसारखें काम करून भरणें; गुंफणें. ३ टोपली, चटई, वेणी वगैरे गुंफणें; तंतु, दोरे, पेड एकत्र ग्रथन करणें. ' कर्पूरकर्दळीचें हिंदोळें । मृणाळसुताचेनि पाटें विणिलें । ' –शिशु ७७४. ४ तुणणें; दोरा भरणें; जाळीकाम करणें. [ सं. वे; सिं. उणणुं; गो. विणय ] **विणकर**-स्त्री. वीण; पोत; विणण्याची तऱ्हा; सफाई. [ विणणें ] **विणकर-री-पु.** विणणारा; कोष्टी; साळी. **विणकाम**-न. विणण्याची कला; कृति. **विणणावळ**-स्त्री. विणण्याची मजूरी. **विणतर**-स्त्री. ( बडोदें ) विणकाम; जाळी; वीण. ' एक विणतरीची टिपाई व खुर्च्या ठेवाव्या. ' –स्वारीनियम ७१. **विणाई**-स्त्री. १ विणकर. २ विणणावळ. **विणपी**-पु. ( गो. ) विणणारा; विणकर. **विणावणी**-स्त्री. वीण; विणकर; विणण्याचें कार्य. ' मगतिये विणावणीचेनि आधारें । ल्हाना चौकडिया पटत्व भरे । ' –ज्ञा ९.१०७. ' म्हणौनि अविवेचिया विणावणी । ब्रह्मी पढति प्रपंच रंगाची वाणी । '–माए ५८२. **विणीव**-वि. १ विणलेलें. २ वेणी घातलेलें.

**विणती**—स्त्री. १ देवास फूल, तांदूळ, सुपारी वगैरेचा लावलेला कौल. ( क्रि० लावणें; देणें; टेवणें). २ देवानें असा कौल लावून दिलेलें उत्तर, कौल. [ सं. विनति ]

**विणवणी**—स्त्री. कण्हणें, कुंथणें, वेणा देणें, या क्रिया. **विणवणें**-अक्रि. कण्हणें; कुंथणें; विव्हळणें; वेणा देणें. [ वेण ]

**विणवनी**—स्त्री. विनवणी पहा. ' ऐसी आइकौनी विणवनी । ' –शिशु १६६.

**विणा**—पु. वीणा पहा. तंबोरा.

**विणा**—शअ. ( प्र. ) विना पहा. वांचून; खेरीज; शिवाय.

**विणावणी**—स्त्री. उपाधि; यातायात. ' प्रपंचाचिया विणावणी । ' –विपू १.४३. [ विणवणें ]

**विणी**—स्त्री. वेणी पहा.

**विणुढणें**—अक्रि. रुजणें; अंकुर येणें. ' अध्यासें बीज विणुढलें । ' –गीता १३.१७७. [ विणें ]

**विणूं**—शअ. विना; वांचून. ' ऐसेनि काळ गेले बहुतां । तुआं विणूं । ' –शिशु १०४. [ सं. विना ]

**विणें**—अक्रि. १ प्रसवणें; जन्म देणें; उत्पन्न करणें. (प्राणि, पशु, पक्षी, किडे यांचे बाबतींत उपयोग. घोडी, गाढवी प्रसवणें म्हणतात; मानवी स्त्रीच्या बाबतींत तिरस्कारानें वापरतात ). ' दोघे एके ठायीं केलीं नारायणें । वाढविला तेणें आणि व्याली । ' –तुगा ९३. ' हे गांधारी जरि शतपुत्र मुनीच्या अनुग्रहें व्याली । ' –मोकर्ण ६.२५; –ज्ञा ८.८८. २ ( केळ वगैरे ) प्रसवणें; कोका बाहेर येणें. ३ ( डोळ्यांतून ) पू येणें. ४ उत्पन्न करणें; तयार करणें. ' वितां व्यर्थ काव्यें । अलवण हरीविण कविता । ' –वामन, नृसिंहदर्पण ३७. [सं. वी ] **म्ह०** व्याली आणि चाटायास विसरली. १ ज्या आईनें मुलांस नीट वळण लावलें नाहीं तीस म्हणतात. २ अर्धवट काम करणाऱ्यास म्हणतात. **विती-फळती-वितीगाभती**-स्त्री.वि. विणारी व फळणारी; विणारी व गाभण राहणारी; वांझ नव्हे अशी; दूधदुभतें देणारी ( गाय, म्हैस वगैरे ).

**विणें**—शअ. विना; वांचून; शिवाय. ' विणें त्यच्या देही खचित आपुला प्राण अबला । ' –विवि १.२०.१८७६.

**विणेकरी**—पु. वीणा धरणारा; तंबोरावाला. ' विणेकरी रवाब वाले । ' –दावि ७.२.१३.

**वितकळणें**—अक्रि. विहूळणें; नासणें; चोथापाणी होणें ( दूध, दहीं, ताक ). [ विटणें ]

**वितंड**—वि. १ प्रचंड; विशाळ; मोठें; प्रशस्त. ' तैशी तुझीं मुखें वितंडें । पसरलीं देखे । ' –ज्ञा ११.३७५. ' भव्यरूप वितंड । ' –दा १.२.१०. ' शिवधनुष्या ऐसें वितंड । ' –ह २६. ७८. २ मिथ्या; खोटें. ' नियोजिलीं वितंडें । ताळासि येती । ' –ज्ञा १३.२१. ' अवघें मायामय वितंड । स्वप्नवत् क्षणिक हें । ' –ह ६.६५. ३ विचित्र; अघटित; चमत्कारिक. ' यम वर देतसे वितंड कीं तूं सुख पावसी उदंड । ' –कथा ६.१६.१०५. [ सं. वि+तड् ] –क्रिवि. कुटिल बुद्धीनें; विनाकारण; अट्टाहासानें. ' येणें मांडिलेसे पाखांड । ऐसा निर्भर्त्सितां वितंड । ' –एभा २३. ५१९. **०वाद**-पु. अट्टाहासानें खोटा पक्ष स्थापन करण्यासाठीं वादविवाद; मिथ्या वाद; दुराग्रहपूर्वक वाद. (समासांत) वितंडमत-भाषण-कथा-प्रलाप. **वितंडा**-स्त्री. ( न्याय ) व्यर्थ काथ्याकूट, वादविवाद; अट्टाहासाचा वादविवाद. ( प्रतिपक्षस्थापनाहीनो जल्पः वितंडा ). [ सं. ]

**वितंडणें**—क्रि. ( महानु. ) वेगवेगळें करणें. ' ताट ताटांतु घाली । परजु परजांतु घाली । ऐसी वितंडौनि सांडी । ' –दृष्टांतपाठ ४०.

**वितणें**—अक्रि. वर्तणें; घडून येणें; गुजरणें. ' मुक्ताबाई म्हणे चांगया नवल वितलें ।' -चांगदेवगाथा २२. ' नवल वितलें पहा काई ।' -रास २.५५३. ' कृष्णातीरीं वितला प्रसंग हो ।' -सप्र १७.९. [ सं. वृत् ]

**वितणें**—अक्रि. (कों.) वितुळणें; पातळ होणें; विरणें. [ वितळणें ]

**विंतणें**—अक्रि. विटणें. ' बहुत विंतला याकाळें ।' -निगा ३७.

**वितत**—वि. पसरलेलें; ताणलेलें; ओढलेलें. [ सं वि+तत ]

**वितंत**—क्रिवि. सुसंगत; मिलाफदार; सुस्वर. ' तंत वितंत घन सुस्वर । वाद्यें वाजविती परम मधुर।' -ह १०.१३६. [ वि+तंतु ]

**वितथ**—वि. असत्य; खोटें; अप्रमाण; मिथ्या; निराधार. [ सं. वि+तथा ]

**वितरणें**—सक्रि. देणें; बहाल करणें. ' येणें प्रसन्न होवूनि अभय तूं वितर।' -भक्तमयूरकेकावली १०४. ' सौख्य सुधा वितरो. ' **वितरण**-न. देणगी; बक्षीस; लाभ. ' देओ वितरण जीमुती । पृथ्वी करी अनार्ती ।' -ॠ ५२. [सं. वि+तृ-तर् ]

**वितरेक**—पु. व्यतिरेक पहा.

**वितर्क**—पु. १ विचार; कल्पना; अंदाज; युक्ति; योजना; बेत; तरंग. या शब्दाचा बहुधा अनेकवचनी उपयोग करतात व अशा ठिकाणीं त्यामध्यें अफाटतेची, भ्रमणाची, दूरान्वयाची झांक असते. २ विस्तरशः विचार; सर्व बाजूंचा, शक्याशक्यतेचा विकल्पांचा, परिणामांचा वगैरे विचार. [ सं. वि=विशेष+तर्क ] **वितर्कण**-न. चर्चा; वाटाघाट; वादविवाद; सर्व बाजूंनीं विचार; साधकबाधक सर्व गोष्टींचा विचार. **वितर्कणें**-अक्रि. १ दूरवर तर्क चालविणें; अफाट कल्पना करणें; विलक्षण गोष्टी मनांत आणणें, योजणें. २ -सक्रि. मोकळेपणानें चर्चा करणें; कसून वादविवाद करणें; साधकबाधक सर्व गोष्टींचा पूर्ण विचार करणें. (गो.) वितर्कुक. **वितर्कित**-वि. सर्व बाजूंनीं चर्चा, विचार केलेला. **०दृष्टि**-स्त्री. (नृत्य) खालीं पहाणें, बुबुळ उंच करण, डोळे वटारून पाहणें ( आठवण व विचार दर्शविणारा अभिनय ).

**वितल**—न. सप्तपातालांपैकीं दुसरें पाताल. [ सं. ]

**वितवितणें**—अक्रि. (कों.) चरफडणें; धुसफुसणें; आरडाओरड करणें. [ उतणें ] **वितवितला**-क्रिक्रिवि. १ गैरशिस्तपणें; अजागळपणें; चिवडाचिवड करून ( खाणें वगैरे ). २ अजागळ; बावळी; गबाळ ( मुद्रा, वर्तणूक वगैरे ).

**वितस्ती**—स्त्री. वीत; अंगठयाच्या टोंकापासून करंगळीच्या शेवटापर्यंत अधिकतम अंतर. [ सं. ]

**वित(तु)ळणें**—अक्रि. १ विघरणें; विरघळणें; द्रवणें; पाझरणें. २ कोमेजणें; फिकें पडणें; निस्तेज होणें. ' गजबजले लोक समस्त । सकळ रंग वितुळला ।' ३ (ल.) फाटाफूट होणें; पांगापांग होणें; विस्कळित होणें; अस्ताव्यस्त पसरणें ( आभाळ, ढग, सैन्य, राजकारण. पंचाईत, जमाव, अज्ञान वगैरे ). ' तुझिये कृपेचेन बळें । वितुळती भ्रांतीचीं पडळें ।' -दा १.२.३. ४ विरणें; फिसकटणें; मधल्यामध्येंच मोडणें; नाहींसें होणें; जिरणें ( बेत, मसलती, युक्ति, कल्पना ). ५ दयेनें, करुणेनें मन आर्द्र होणें; अंतःकरण पाझरणें. [ सं. वि+ताल ]

**वितान**—न. १ छत; चांदवा; छत्र; आच्छादन; मंडप. ' अधिष्ठानावर सुंदर छत्राकार वितान होतें ' -सूर्य ३६०. २ विस्तार; पसारा. ' विविध याग वितानें ।' -ज्ञा १५.१८ ३ आकाश; शून्य. [ सं. वि+तन ]

**वितापात्र**—वि. (गो.) उद्धट; वात्रट.

**विताल-ळ**—वि. बेताल; विसंगत; विलं ाचा. चालतां बैसे विताळाचा येऊनि धका ।' -दावि २३.२. **विताळी**-वि. बेताल वाजविणारा; बेताल. ' विताळी तो विताळें वितंडें वेगळा। -दावि २३.३. [ वि+ताल ]

**विताळ**—वि. मोठया ताळूचें. ' एके दीर्घकंठें विताळें। विकटें एकें।' -ज्ञा ११.१३९.

**वितिपात**—पु. (अशिष्ट) (प्र.) व्यतिपात पहा.

**वितुटणी**—स्त्री. ताटातूट; वियोग; फाटाफूट. ' तरी विषयेंद्रियमिळणी । करूनि घाये वितुटणी ।' -ज्ञा १६.८९. [ वि+तुटणें ]

**वितुष्ट**—न. वैमनस्य; वांकडें; बेबनाव; भांडण. [ सं. वि+तुष्टि ]

**वितुळणें**—वितळणें पहा.

**वितृष्ण**—वि. निरिच्छ; ज्याला कोणतीहि इच्छा, गरज नाहीं असा. ' तरी सर्वविषयीं वितृष्ण ।' -ज्ञा १७.३१. [ सं. ]

**वित्त**—वि. ज्ञात; माहीत असलेलें; समजलेलें. [ सं. विद्= जाणणें ]

**वित्त**—न. १ द्रव्य; धन. ' जो बाधोनि असे डोळा । वित्ताशेतें ।' -ज्ञा १३.६८३. २ मालमत्ता; संपत्ति; ऐवज; मालकीच्या वस्तू. [ सं. विद्=मिळणें ] सामाशब्द- **०घोषणा**-स्त्री. द्रव्याचा ध्यास; पैशासंबंधी चिंतन; धनलोभ. **०प**-पु. कुबेर. **०पिसा**-वि. द्रव्याचें वेड लागलेला; पैशाशिवाय कांहीं सुचत नाहीं असा. **०पिसें**-न. द्रव्याचें वेड; धनलोभ. **०विषय**-पु. धनदौलत; मालमत्ता; ऐहिक संपत्ति; ऐवज; पैसा. [ सं. ] **०शाठ्य**-न. कृपणता; चिक्कूपणा; कवडीचुंबकपणा; कद्रुपणा; कार्पण्य. [ सं. ] **वित्तेश**-पु. कुबेर. ' रौप्याद्री तुळिला पदें प्रबळिला वित्तेश विध्वंसिला ।' -मुरामाण युद्ध १२५. **वित्तेषणा**-स्त्री. द्रव्याविषयीं इच्छा; धनलोभ. [ सं. ]

**विस्ताण**—न. वितान पहा. 'विस्ताणें गुढरे असंख्ये मानु।' –धवळेपु ४८. (पाठभेद).

**वित्पत्ति, वित्पन्न**—व्युत्पत्ति, व्युत्पन्न पहा. 'नांवासाठीं मेघे भार। नलगे फार वित्पत्ति।' –तुगा ४५८२.

**वित्रस्त, वित्रास**—वि. भयभीत; भ्यालेला; घाबरलेला; विषादयुक्त; सचिंत. 'इतकी खबर ऐकून मग भाऊ झाले वित्रास।' –ऐपो ४४६. [सं. वि+त्रस्त] **वित्रास**–पु. भय; भीति; दरारा.

**वित्रिभलग्न**—न. (ज्यो.) त्रिभोनलग्न पहा. [सं.]

**विथर**—पु. पांगापांग; विस्कटलेली स्थिति; गोंधळ; अस्ताव्यस्तपणा (कामधंदा, व्यवहार वगैरेचा). –वि. १ ओळंब्यांत नसलेली (भिंत, दगड, वीट). २ मिश्र; भेसळीचा; भलत्याच प्रकारचा, वाणाचा, वर्णाचा (कपडा, नाणें, वस्तु). ३ (ल.) विचित्र; अनियमित; गैरशिस्त; असंबद्ध (वर्तन, भाषण, कृत्य). विसंगत, असंबद्ध (बोलणें, बरळणें). [वि+थर] **विथरणें**–अक्रि. अनिर्बंध वागणें; बेताल होणें; मार्ग सोडून जाणें.

**विथविथ**—पु. (चित्पा.) कंडू; खाज. –मसाप २.३६७.

**विथानक, विथानीक**—वि. (अशिष्ट) व्यथानक पहा.

**विथापाक**—पु. (अशिष्ट) बिघडणें; नासणें (तयार होत असलेला पदार्थ, घटना); बिघाड; नाश.

**विथिका**—स्त्री. मार्ग. 'अशा प्रकारची नवी विथिका त्यांत निर्माण केली.' –नि ४४२. [सं. वीथिका]

**विद्**—पु. जाणता, ज्ञाता, ज्ञानी पुरुष. –वि. ज्ञानी.

**विद्गुडणें**—उक्रि. (कों.) लचकणें; उसण, करक भरणें; मुरगळणें.

**विदंग्द**—वि. (अप.) विदग्ध. 'तंव विद्गद मालतियां बोलिजे। हा हो जी राहिजे।' –शिशु ६७२.

**विदग्ध**—धावि. १ करपलेलें; जळलेलें. 'शुष्कें अथवा स्निग्धें। सुपक्वें का विदग्धें।' –ज्ञा १५.९. २ अर्धकच्चें; अर्धवट शिजलेलें (अन्न). ३ अर्धवट करपलेलें व अर्धवट कच्चें (अन्न). ४ उत्तम शिजलेलें; चांगलें भाजलेलें (अन्न वगैरे). 'शुष्कसुपक्व विदग्ध। चतुर्विध अन्नें उत्तम खाद्य।' ५ (ल.) कुशल; चतुर; हुशार; निष्णात. [सं. वि+दह्–दग्ध] **विदग्धाजीर्ण**–न. अन्न अर्धवट पचल्यामुळें होणारें अजीर्ण. यांत घशाशीं आंबट येतें. चार प्रकारच्या अजीर्णांपैकीं एक प्रकार.

**विदणी**—स्त्री. (ओसवाल) सुन. –बदलापूर २८३.

**विदध्वी**—वि. (ना.) आततायी; विक्षिप्त व खोडसाळ. [विदग्ध अप.]

**विदरा**—वि. कुरूप. 'सुत कोणासही नको विदरे।' –मोभनु ६.१०. 'शडांगुळें गेंगाणें विदरें।' –दा ३.६.४२. [सं. विरूप]

**विदरूं**—न. (कों.) लहान छिद्र, भोंक [सं. विध्]

**विदर्भ**—पु. वऱ्हाड. 'पूर्वी येकपुरीं विदर्भविषयीं दोघे द्विजाती भले।' –विरेश्वर, सोमवारचरित्र ५. [सं.]

**विदविदणें**—अक्रि. १ मऊ; बिलबिलीत होणें (फळें वगैरे). २ चरफडणें; वितवितणें. **विदविदा**–वि. बिलबिलीत झालेला; अविकलेला; अधिक झालेला; उतरलेला (आंबा वगैरे फळ).

**विदळ**—वि. १ डाकलग; डाक लावलेलें; हीणकस. 'विदळ बहु चोखा। मीनलिया वाला एका।' –ज्ञा १३.१००८. २ ज्यांत दळ, गर, सार नाहीं असें. [सं. वि+दल]

**विदळणें**—सक्रि. (महानु.) नाश करणें; निर्दालन करणें; मारणें. 'विदळीतु भवदुःखा नास्तिविद्या प्रकोपा।' –गस्तो ७. 'जयजय देव प्रबल। विदळितामंगळकुळ।' –ज्ञा १८.२ [सं. विदलनम्]

**विदळा**—पु. माघांत पिकणारा कुळीथ. –कृषि ३२७.

**विदा**—पु. पाठवणूक; निरोप देणें; रामराम करणें; आशीर्वाद; शुभचिंतन. [अर. बिदाअ] **विदाई**–स्त्री. निरोप; पाठवणूक; वियोग; पाठवणी; जातेसमयीं दिलेली भेट, देणगी. **विदा करणें**–निरोप देणें; पोंचविण्यास जाणें.

**विंदाण-न**—न. १ कौशल्य; चातुर्य; कारागिरी; लाघव. 'जिया अहंकाराचेनि विंदाणें। जगचि धरिजे।' –ज्ञा ७.२१. 'मांडिलें विंदान। ख्याल सुखाचें संधान।' –तुगा १३३. 'वेगीं विंदान पाहे माझें' –एरुस्व ९.१४. २ कपट; कारस्थान; युक्ति; व्यूह; कावा. 'छळितयां विंदाणा–। माजीं जूं तें मी विचक्षणा।' –ज्ञा १०.२८४. 'आटु वेगु विंदाणु। आशा शंका प्रतारणु।' –ज्ञा १३.२७१. ३ निग्रह; वेध; लक्ष. 'जैं इंद्रियां विंदाण लागे।' –ज्ञा ६.३६५. 'मुकलें पूर्वस्थान। स्वरूपाचें विंदान।' –भज २१. ४ लीला; चमत्कार, चरित्र; करणी; गती 'मायेचें परम विंदाण।' –रावि ६.६७. 'ऐसें कर्माचें विंदाण। भोगिल्यावीण सुटेना।' –शनि २०३. 'केलें विंदाण ठाईंच।' –दावि २.९५. [सं. विज्ञान] **विंदानी**–वि. कुशल; कारागीर. 'मंडपाची रचना हरुषें करी विश्वकर्मा विंदानी।' –धवळे उ १४. 'ऐसा व्यासें विंदाणियें। गीता प्रासादु सोडणिये।' –ज्ञा १८.४४. –पु. कारागीर. 'तरी आतां कोकुनामें विंदानी।' –कथा २.१५.१०१.

**विदारणें**—उक्रि. १ फाडणें; चिरणें. 'तें चौभेरी गिधीं विदारिजे।' –ज्ञा २.२००. 'विदारिन कुंभस्थळें।' –एरुस्व १०.५५. २ फोडणें; तोडणें; तुकडे करणें. ३ (काव्य.) ठार मारणें; वधणें; कत्तल करणें. 'हिरण्यकश्यप विदारिला। भक्त प्रल्हाद रक्षिला।' –तुगा २५२७. ४ (ल.) विचिकित्सा करणें; उघडणें; उकलणें; फोड करून सांगणें (विषयाची). ५ (ल.) पांगापांग करणें; फाटाफूट करणें; फांकाफांक करणें; पळवून, हुसकून लावणें. 'जैसा गज घटा आंतु। सिंह लीला विदारितु।'

-ज्ञा १.१६२. [ सं. वि+दृ=फोडणें, चिरणें ] **विदारक**-वि. फाडणारा; चिरणारा. **विदारण-णा-णी**-नस्त्री. विदारण्याची क्रिया ( सर्व अर्थी ). **विदीर्ण**-वि. फाडलेलें; भग्न. **विदारणीय, विदार्य**-वि. फाडण्यासारखें. **विदारित**-धावि. फाडलेलें. **विदारंक**-धाअ. ( गो. ) फाडावयास. **विदारून सांडणें-सोडणें**-पांगापांग करणें; उधळून लावणें; पळवून लावणें. ' कीं जलदजाल प्रभंजन । विदारून सांडी जैसा । ' **विदारण्या**-वि. भांडाभांडी लावणारा; भेद करणारा; चहाड; चुगलखोर; आगलाव्या.

**विदारणें**—अक्रि. ( कु. ) स्वैर, स्वच्छंदी होणें; उधळणें; व्यसनी होणें; अनिर्बंध वर्तन करणें. [ सं. वि+दृ ]

**विदारी**—पु. १ मणि किंवा मोती यांस वेज, छिद्र पाडणारा. २ क्षत्रिय माता व वैश्य पिता यांची संतति. [ सं. विध् ]

**विदाह**—पु. १ ज्वलन; पेटणें; जळण्याची क्रिया. २ भयंकर आग; धगधगित उष्णता; उष्मा. [ सं. वि+दह् ] **विदाहक, विदाही**-वि. १ जाळणारें. २ ( ल. ) पाचक; खाणारें; गंज चढविणारें ( धातूस ); नाशकारक; कुजविणारें.

**विदित**—धावि. १ ज्ञात; माहीत; ठाऊक; प्रख्यात. ' विदित पायांपाशीं सर्व आहे । ' -तुगा १५१२. २ कळविलेलें; जाहीर केलेलें; सुचित. [ सं. विद्=जाणणें ]

**विदिशा**—स्त्री. पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर या चार मुख्य दिशांतील प्रत्येकीं दोहोंपैकीं उपदिशा; आग्नेयी, नैर्ऋत्य, वायव्य व ईशान्य या दिशा. [ सं. ]

**विदुर**—वि. ज्ञानी; शाहणा; माहितगार; अनुभवी. [ सं. विद्=जाणणें ]

**विदुर**—पु. १ धृतराष्ट्राच्या धाकट्या भावाचें नांव. २ अनौरस मूल; मिश्र संतति; मिश्र संततीची एक जात. ३ ( सांकेतिक ) माहादजी शिंदे; पुढें दौलतराव शिंदे. ' विदुर पुढें गेले '-ख ४७५९. ' इनामगांव विदुरांकडून जप्त झालें । ' -अस्तंभा ८१. [ सं. ] **विदुर चांभार**-पु. मराठा चांभारांपैकीं एक पोटजात.

**विदुर**—पु. (शाप.) एक अल्कमृत्तिकाधातु. (इं.) बेरिलियम.

**विदुषी**—स्त्री. विद्वान स्त्री.

**विदू**—वि. जाणता; जाणणारा; ज्ञानी. ' भावे क्रीडा सर्व विदूंस माजी । ' -मॅगीश राधाविलास ३.

**विदूषक**—पु. नाटकांतील एक विनोदी पात्र; खुषमस्कऱ्या. [ सं. ]

**विदूसणें**—सक्रि. तोडणें; फोडणें; नाहींसें करणें. खराब करणें; बिघडविणें. [ सं. वि+दूष् ] ' हिऱ्यारत्नाची जोडी विदूसलि । ' -ऐपो १४४.

**विदेश**—पु. परदेश; अन्यदेश; भिन्नदेश. ' मार्गे चुके विदेशी एकले । ' -तुगा १५३८. ' विदेश पळणीं नागवण । ' -दा ३०.७.८१. [ सं. वि+दिश् ] **०गमन**-न. परदेशीं जाणें; देशत्याग; देशांतरास जाणें. **०वास**-पु. परदेशांत राहणें, रहिवास. **०स्थ**-वि. परदेशीं राहणारा. **विदेशी-य**-वि. परदेशी; परदेशांतून आलेला; परदेशचा. ' विदेशी कापडाची होळी केली । ' -के १७.५.३०.

**विदेह**—पु. १ जनक राजा. २ एक देश. ३ एक नगर. -वि. १ देहरहित; अशरीर. ' विदेहासि देहधर्म । आरोपिती । ' -ज्ञा ९.१५६. २ देहातीत; मुक्तदेह; देहाचा विसर पडलेला; देह असून नसल्यासारखा. 'तैसा देहींच जो असे । विदेह दृष्टि । ' -ज्ञा १८. ४३५. [ सं. वि+देह ] **०मुक्त**-वि. जीवंतपणींच मुक्त झालेला. ' अचेतन ते विदेह मुक्त । ' -दा ७.६.४६. **०मुक्ति**-स्त्री. ब्रह्मलोकांतील अखेरची मुक्त अवस्था. ' ब्रह्मलोकीं जाऊन जेथें अखेर मुक्ति मिळत असल्यामुळें विदेहमुक्ति अशीं दुसरीं नांवें आहेत । ' -गीर २९५. **०स्थिति**-स्त्री. १ देह व आपण निराळे अशी मानण्याची प्रवृत्ति, मनाची अवस्था. २ देहाची स्मृति नष्ट झालेली अवस्था; ज्ञानी पुरुषाची निर्विकल्प स्थिति, समाधि. ' तुकयास उबग न येई चित्तीं । विदेह स्थिति जाहाला । '. **विदेही**-वि. १ देहातीत; देहभान विसरलेला. २ शारीरिक अथवा ऐहिक विषयांची आसक्ति नष्ट झालेला.

**विदोर**—पु. ( विणकाम ) ताणा ताठ करण्यासाठीं हातखुंट्यास बांधलेली दोरी.

**विदोशा, विद्दोशा, विधोशा**—वि. विध्वंस करणारा; नाश करणारा; उधळ्या. [ सं. विध्वंस ] **विदोस, विधोस**-पु. ( अप. ) विध्वंस; नाश; वाटोळें.

**विद्‌वावळी**—स्त्री. ( गो. ) खरडपट्टी.

**विद्भोग**—पु. ( गो. ) दैन्यावस्था. [ विपत्ति+भोग ]

**विद्वाट**—स्त्री. ( गो. ) नासाडी. [ विध्वंस ]

**विद्ध**—धावि. १ वेधित; सच्छिद्र; भोंक पाडलेला; टोंचलेला. २ आकर्षित; गुंग केलेला. ' नादे विद्धा मुरारी । ' -गस्तो २५. [ सं. विध्=भोंक पाडणें ]

**विद्यमान**—स्त्री.न. साक्षी; समक्षता; हजेरी; गुजारत. -धावि. १ अस्तित्वांत असलेला; हयात असलेला. २ वर्तमान; सांप्रतचा. -शअ. देखत; समक्ष; हजेरींत; मार्फत; कडून. [ सं. विद्=असणें ]

**विद्या**—स्त्री. १ ज्ञान; विद्वत्ता. ' विद्या याचा अर्थ ज्ञान असाच विवक्षित आहे । ' -गीर २७३. २ ब्रह्मज्ञान; ब्रह्मात्मैक्यज्ञान. ' यासच विद्या असेंहि म्हणतात । ' -गीर २७२. ३ उपासनामार्ग; ज्ञानप्राप्तीचें साधन. ' विद्या म्हणजे ईश्वरप्राप्तीचा मार्ग आणि तो ज्या प्रकरणांत सांगितला असतो त्याजकडे

विद्या हेंच नांव अखेर देण्यांत येतें।' -गीर २०४. ४ कला. (चित्र, रंग वगैरे) चौदाविद्या पहा. [सं. विद् = जाणणें] ०गुरु-पु. १ शिक्षण देणारा, शास्त्रादि ज्ञान देणारा गुरु. परमार्थज्ञान देणारास मोक्षगुरु म्हणतात. २ अध्यापक; कोणत्याहि विषयांत प्रावीण्य मिळवलेला विद्वान मनुष्य. ०धन-न. १ ज्ञानरूप संपत्ति. 'ऐसें एकचि विद्याधन अद्भुत गुण न हा दुजांत वसे।' -विद्याप्रशंसा. २ अविभक्त कुटुंबांतील भागीदारानें स्वतःच्या विद्येपासून मिळविलेलें धन. हें स्वकष्टार्जित म्हणून खासगी समजलें जातें. ०परिषद्-स्त्री. शिक्षणपरिषद. 'मुसलमानांची अलीगड येथें विद्यापरिषद भरली होती.' -टि १.२६८. ०पात्र-न. विद्येचें स्थान; विद्वान मनुष्य. 'विद्यापात्रें कळापात्रें।' -दा १.८. २३. ०पीठ-न. १ विद्यामंदिर; ज्ञानमंदिर; विद्या शिकविणारी संस्था, स्थान. २ विश्वविद्यालय; (इं.) युनिव्हर्सिटी. ०बंधु-पु. गुरुबंधु; सहाध्यायी. ०वान्-वि. (विरू.) विद्यावंत; विद्वान; विद्येंत प्रवीण, निपुण; शास्त्री. ०वेतन-न. शिष्यवृत्ति; विद्याभ्यास आर्थिक मदत. 'दोन होतकरु विद्यार्थ्यांस सरकारी विद्यावेतन देऊन युरोपांत पाठविण्यांत आलें.' -ऐरा ५६. (प्रस्तावना) विद्यानंद-पु. ज्ञानापासून होणारा आनंद. विद्यानुराग-पु. विद्येची आवड, गोडी; विद्याप्रेम. विद्यानुरागी-वि. विद्येची आवड असणारे. 'ॲनराणीचे कारकीर्दीत बहुतेक सर्व विद्यानुरागी लोक राजनितिविषयक ...' -इंमू ४५०. विद्याभ्यास-पु. शास्त्राचें अध्ययन; शिक्षण. विद्यार्थी-पु. १ शिकणारा; अभ्यास करणारा; विद्यार्जन करणारा. २ (ऐतिहासिक कागदपत्रांत) शागीर्द. ३ शिष्य; चेला; विद्येकरितां गुरूची सेवा करून राहणारा. विद्यालय--न. शाळा.

**विद्याधर**—पु. एक देवयोनि.

**विद्युत्**—स्त्री. वीज; बिजली; एक नैसर्गिक शक्ति; (इं.) लाइटनिंग, इलेक्ट्रिसिटी. [सं.] ०कण-पु. विद्युच्छक्तियुक्त अत्यंत सूक्ष्म परमाणु. (इं.) इलेक्ट्रोन. 'पदार्थविज्ञानशास्त्रज्ञाला विद्युत्कणांची मालिका दिसते.' -विचारविलास २८. ०गतिशास्त्र-न. विजेच्या गतीसंबंधीं शास्त्र. (इं.) इलेक्ट्रो डायनामिक्स. ०घंटा-स्त्री. विजेनें वाजणारी घंटा. ०चक्र-न. वीज वाहण्याचा वाटोळा मार्ग. (इं.) सर्कीट. ०चुंबक-पु. विजेच्या प्रवाहामुळें ज्यांत लोहचुंबकाची शक्ति उत्पन्न होते असा लोखंडाचा तुकडा. (इं.) इलेक्ट्रो मॅग्नेट. ०चुंबकत्व-न. विजेच्या प्रवाहामुळें लोहचुंबकाची शक्ति उत्पन्न होण्याचा धर्म. (इं.) इलेक्ट्रोमॅग्नेटिझम. ०जन्य-वि. विजेपासून उत्पन्न झालेला. ०जागृति-स्त्री. विद्युलतेचे परिणाम दिसुन येणारी स्थिति. (इं.) इलेक्ट्रिफिकेशन; चार्जऑफ इलेक्ट्रिसिटि. ०धनु-न. वीजेचें वलय. (इं.) इलेक्ट्रिक आर्क. ०दर्शक-पु. विजेचें अस्तित्व दाखविणारें यंत्र. (इं.) इलेक्ट्रोस्कोप. ०दीप-पु. विजेचा दिवा. ०दृक्शास्त्र-न. विजेचा आणि दृष्टीचा संबंध अभ्यासिणारें शास्त्र. (इं.) इलेक्ट्रोऑप्टिक्स ०धातुशोधन-पु. विजेचा धातूंवर परिणाम अभ्यासिणारें शास्त्र. (इं.) इलेक्ट्रोमेटालर्जी. ०रोधक-वि. विजेच्या गतीस अडथळा करणारा; अप्रवाहक. (इं) नॉनकंडक्टर. ०परमाणु-पु. विद्युत्कण. (इं.) इलेक्ट्रॉन. ०पात-पु. वीज पडणें; विजेचा धक्का. ०पृथक्करण-न. विजेच्या साहाय्यानें पदार्थाचें पृथक्करण. (इं.) इलेक्ट्रोलिसिस ०प्रकंपन-न. विजेमुळें होणारीं आंदोलनें. (इं) इलेक्ट्रिक ऑसिलेशन. ०प्रवाह-पु. विजेचा प्रवाह. (इं.) इलेक्ट्रिक करंट. ०प्रवाहमंडळ-न. विद्युच्चक्र. (इं.) इलेक्ट्रिक सर्कीट. ०बल-न. विजेची शक्ति. (इं) इलेक्ट्रिक पोटेन्शल. ०मत्स्य-पु. विजेची वांब; एक मासा. (इं.) इलेक्ट्रिक ईल. ०मानसशास्त्र-न. मनुष्याच्या चेहऱ्यावरून त्याच्या ममांतील रहस्य शोधून काढण्याची विद्या. ०मापक-पु. वीज मोजण्याचें यंत्र. (इं.) इलेक्ट्रोमीटर. ०यंत्र-न. विजेनें चालणारें यंत्र. (इं.) इलेक्ट्रिक मशीन. ०रोधक-वि. विजेच्या प्रवाहास प्रतिबंध करणारा. (इं.) नॉन-कंडक्टर; बॅड कंडक्टर. ०लहरि-स्त्री. विजेची लाट. विजेनें उत्पन्न होणारें कंपन (इं.) इलेक्ट्रिक वेव्ह. ०वहन-न. वीज वाहण्याची, जाण्याची क्रिया. (इं.) कंडक्शन. ०वांब-स्त्री. विद्युन्मत्स्य; एक मासा. (इं.) इलेक्ट्रिक ईल. ०वाहक-वि. वीज वाहून नेणारा; विजेच्या प्रवाहास अनुकूल. (इं.) कंडक्टर. ०वाहकत्व-न. वीज वाहून नेण्याची शक्ति. (इं.) कंडक्टिव्हिटी. ०विच्छेदन-न. विजेच्या साहाय्यानें पृथक्करण. (इं.) इलेक्ट्रोलिसिस. ०संग्राहक-संचालक-पु. वीज सांठवून ठेवण्याचें पात्र. (इं.) अक्युम्युलेटर ०स्थापक-वि. विद्युद्रोधक. ०स्फुलिंग-न. विजेची ठिणगी. ०क्षेत्र-न. विजेनें व्यापलेली जागा. (इं.) इलेक्ट्रिक फील्ड.

**विद्युन्माला**—स्त्री. एक समवृत्त. याच्या चरणांत आठ अक्षरें असून म म ग ग हे गण असतात. [सं.]

**विद्युल्लता**—स्त्री. चमकणारी वीज; चपला. 'जैसी विद्युल्लता झळके मेघीं।' -तुगा ७३३. [सं.]

**विद्योत**—पु. प्रभा; तेज; लकाकी. [सं. वि+द्यु]

**विद्रधि**—पु. क्षत; चरणारा व्रण; गळूं; उठाणुं; काळपुळी; पूयुक्त फोड. वात-पित्त-कफ-रक्त-क्षत-त्रिदोष-ज विद्रधि. [सं.]

**विद्रा, विद्रूप**—वि. विरूप; कुरूप. [सं. विरूप]

**विद्रावक**—वि. वितळणारा. विद्राव्य-वि. वितळण्यासारखा; विरण्यासारखा, पाण्यांत विरघळणारा. (इं.) सोल्यूबल. विद्रुत-वि. विरघळलेलें; द्रवरूप झालेलें. (इं.) डिझॉल्व्हड.

**विद्रुम**—न. पोवळें; प्रवाळ. ' जीचा धरी अधर विद्रुम भावना कीं ।' –र. [सं.] ०**वर्ण**–वि. पोंवळयासारख्या रंगाचा. ' विद्रुमवर्ण अधर सतेज ।'

**विद्रोह**—पु. शत्रुत्व; वैर. [सं.]

**विद्रये**—वि. (गो.) विजवटा पहा. नाश करणारा.

**विद्वान्**—वि. ज्ञानी; जाणता; पंडित; पारंगत; व्युत्पन्न. [सं. विद्=जाणणें] समासांत याचें विद्वत् असें रूप होतें. सामाशब्द- **विद्वत्कुल**–न. पंडितांचा समूह. [सं.] **विद्वज्जन**–पु. विद्वान; तत्त्वज्ञानी; ज्ञानी; शहाणा. **विद्वत्ता**-स्त्री. पांडित्य; ज्ञान; शहाणपणा. **विद्वन्मंडल**–न. पंडितसमूह. **विद्वन्मान्य**–वि. पंडितांकडून सन्मानित; पंडितांस पर्यंत; आदरार्थी पत्रांत लिहितात. **विद्वत्संन्यास**–पु ज्ञानप्राप्तीनंतर केलेला त्याग. **विद्वांस**–वि. विद्वान. ' विद्वांसास, अधिक प्रीति। ' –दा ७.९.४५. [सं. विद्वान्चे अव]

**विद्वेष**—पु. द्वेष; तिरस्कार; मत्सर; हेवा. **विद्विष्ट**–वि. द्वेष केलेला; तिरस्कार केलेला. [सं.] **विद्वेषक, विद्वेषी, विद्वेष्टा**-वि. मत्सरी; हेवेखोर; वैरी; शत्रु; अत्यंत विरोधी.

**विध**—पु. प्रकार; तऱ्हा; जात; घाट; आकार.उदा० द्विविध; त्रिविध; बहुविध; नानाविध. [सं.]

**विध**—पु. विधी; नियम; रीति. ' नेणें पाळुं विध करुणा भाकी।' –तुगा १५६६. [सं. विधि]

**विंध**—न. छिद्र; भोंक; वेज. [सं. विध्=छेद पाडणें] ०**काम**–न. (कों.) छिद्रें, वेजें पाडण्याचें काम. **विंधणें**–न. छेद पाडण्याचें हत्यार; किंकरें. –क्रि. भोंक पाडणें; छेद, छिद्र, वेज पाडणें; रोंचणें; शस्त्रानें आघात करणें. ' दूर देखोनि विंधिला बाणीं।' –मुआदि ७.६५. **विंधरू-रु**–न. (कों.) छिद्र; भोंक.

**विधडणें**—क्रि. विघडणें; नासणें. ' प्रचीतीविण औषध घेणें। तरी मग धडचि विधडणें।' –दा १०.८.६. [सं. विघटन; वि+घड]

**विधणू**—स्त्री. अकालप्रसूतिमुळें प्राण्यांच्या गर्भाशयांत उत्पन्न होणारी शुष्कता, रुक्षता. [सं. विदहनम्]

**विधरणें**—क्रि. छिन्नभिन्न होणें; घायाळ होणें. ' विधरे वृंद जितांचा दुःखभरे।' –विक ३८. [सं. विध्]

**विधर्मी**—वि. १ अन्य धर्माचा. २ अधर्मानें वागणारा; पाखंडी; धर्मशत्रु. [सं.]

**विधवरा**—वि. विजवटा पहा.

**विधवा**—स्त्री. गतभर्तृका; पति निवर्तलेली स्त्री; नवरा मेलेली स्त्री. [सं. वि+धव=नवरा] ०**विवाह**–पु. गतभर्तृकेचें पुन्हां लावलेलें लग्न; पुनर्विवाह. [सं.]

**विधवार**—स्त्री. नाश; फडशा; उधळपट्टी. (क्रि० लावणें; लागणें; होणें). (गो.) विधवाडचें=नाश करणें. [सं. विविध+वाट]

**विधाता**—पु. १ निमार्णकर्ता; व्यवस्थापना करणारा; नियमन, स्थापना करणारा; सृष्टिकर्ता. २ ब्रह्मदेव. ' काय विधात्यानें घातलीसे रेखा।' –तुगा १६१५. [सं.]

**विधान**—न. १ स्थापना; आधान; स्वाधीन करणें; ठेवणें; कर्तव्य. ' तेथें राजा कौंडण्यपती । विधान स्थिति करितसे।' –एरुस्व ५.१४. ' पलंगीं पुतळयाचें करा ग विधान।' –प्रला १३९. २ सांगणें; कथन; अस्तिनास्ति पक्षीं म्हणणें मांडणें. ' धर्मशिक्षणाची आवश्यकता नाहीं असें बेधडक विधान करणें या सारखें धाडस नाहीं. '–केले १.१४९. ३ आदेशणें; नियम घालणें, स्थापित करणें. ४ आज्ञा; नियम; अनुशासन. ' मनुष्यावाचुनि विधाना। विषय नाहीं।' –ज्ञा १५.१७८.५ (कार्यास, कृत्यास, कामास) लावणें; नेमणूक; योजना. ' जे ते वैदिक विधानीं। योग्य म्हणौनि।' –ज्ञा १८.८१९. ६ विधि; पद्धति; क्रिया. उदा० पूजाविधान; होम विधान; व्रत विधान. ' यज्ञीचें विधान सरे।' –ज्ञा ४.१५०. ' प्रायश्चित्ताची विधानें। सांगेन ऐका स्थिर मनें।' –गुच २८.८०. ७ (व्या.) उपसर्ग, प्रत्यय; लावणें. [सं. धा=ठेवणें]

**विधायक, विधायी**—वि. १ स्थापना करणारा; नियमन करणारा; योजना, नेमणूक, व्यवस्था करणारा; उभारणी, जोडणी, आखणी करणारा. २ प्रत्यक्ष कृतिरूप; दृश्य परिणामी; कार्यकारी; परिणामकारक. ' त्यांचें कार्य विधायक स्वरूपाचें नसून विध्वंसक स्वरूपाचें होतें. ' –वस्व ५. [सं. धा=ठेवणें]

**विंधान**—न. संधान; नेम; योजना. (क्रि० करणें; बांधणें; धरणें; लावणें). [सं. वेधन]

**विंधारी**—पु. मोत्यांस वेजें, छिद्रें पाडणारा. [सं. विध्]

**विधि-धी**—पु. १ नियम; शास्त्राची आज्ञा; वेदविहित क्रिया, कर्मे वगैरे. ' विधीतें पाळित । निषेधातें गाळित।' –ज्ञा १२.७७. २ पद्धति; कर्म करण्याची रीत; धार्मिक कृत्याचा प्रयोग. उदा० उद्यापनविधि; उपासनाविधि; दानविधि; स्नानविधि; होमविधि; व्रतविधि; पूजाविधि. ' क्रियाविशेषें बहुतें। न लोपिसी विधीतें। निपुण होऊन धर्मातें। अनुष्ठिती ।' –ज्ञा २.२४९. ३ सामान्यतः नियम; आज्ञा; विधान; अनुशासन; आदेश; कल्प. ' विधि हाचि मान्य आहे।' –मोआदि ४.१४. ४ दैव; प्रारब्ध; नशीब. ' स्थिर न राहे माझी बुद्धि । तरी हा आपुलाचि विधि। सुजाण राया।' –कथा ६.१९.१५९. ५ ब्रह्मदेव; सृष्टिकर्ता. ' तें निर्मितो विधि विभूषण भूमिकेचें।' –वामन स्फुटश्लोक (नवनीत पृ.१४१). ' अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार बाहे विधी।' –केका १४०. ६ शास्त्रवचन; धर्मग्रंथातील वाक्य, आधार; प्रमाण. ७-

तऱ्हा; प्रकार; रीत. ' गन्हवारे हा विधी । पोट वाढविलें चिंधी ।' –तुगा ६२५. ' लिहिल्या विधे येईन मी त्वरें ।' –होला ३४. ८ योजना; क्रिया. ' कवण कार्याचिये विधि । तुम्ही आलेती कृपानिधि । '–एरुस्व ३.४३. [ सं. विध्=विधान करणें ] ०अंड–न. ब्रह्मांड; विश्व; भूगोल. ' तडतडि विधिअंड त्रास दे...'–वामन-सीता स्वयंवर. [ विधि+अंड ] ०किंकर–पु. कर्माचा दास. ' मग विधिकिंकर तो नव्हे । '–यथादी ३.२२९९. ०दृष्ट–वि. वेदविहित; शास्त्रोक्त; साधार; सप्रमाण. ०निषेध–पु. अमुक बरें, अमुक वाईट, अमुक करावें, अमुक करूं नये यासंबंधी नियम; बंधन; नियम; कर्तव्याकर्तव्य. ' एथ सारासार विचारावें । कवण काय आचरावें । आणि विधिनिषेध आघवे । पारुषता । '–ज्ञा १.२४६. [ विधि+निषेध ] ०निषेधातीत–वि. १ ब्रह्मज्ञान प्राप्त होऊन मुक्त स्थितीस गेल्यामुळें ज्यास सामान्य धर्मनियम बंधनकारक नसतात असा; सर्व नियमांच्या पलीकडे गेलेला. २ (उप.) स्वैर, अनिर्बंध वागणारा. [ विधि+निषेध+अतीत ] ०पूर्वक–वि. नियमानुसार; यथासांग; योग्य प्रकारें. [ विधि+पूर्वक ] ०भंजक–वि. (व्या.) नियम मोडणारा; सामान्य नियमांत न येणारा; अपवादभूत. [ विधि+भंजक ] ०भंजन–न. नियम मोडणें; अपवाद होणें. ०मंडळ–न. कायदे, नियम करणारी संस्था, सभा. (इं.) लेजिस्लेटिव्ह कौन्सिल. ०मंत्र–पु. विधियुक्त मंत्रसंस्कार; नियमानुसार सर्व धर्मकृत्य. 'मग जाहला विधिमंत्र । चारी दिवस। '–कथा १.७.२०७. ०मुख–न. सच्चिदानंद स्वरूपाचें वर्णन. –हंको. ०युक्त–वि. विधिपूर्वक; शास्त्रोक्त; वेदविहित; शास्त्राज्ञेप्रमाणें. ०लिखित–लिपी–स्त्री. ललाटरेषा; ब्रह्मलिखित. ' आपले सुख खास गमावशील ही विधिलिपी समज. '–कल्याणी, नवयुग. ०वत्–क्रिवि. विधीप्रमाणें; शास्त्रोक्त; यथायोग्य; वेदविहित पद्धतीप्रमाणें. ०वाक्य–न. शास्त्रवचन; वेदवचन; वेदवाक्य. ०वाचक धातुसाधित–न. कर्तव्यबोधक धातुसाधित; नियम घालून देणारें धातुसाधित. उदा० करावें; धरावें इ०. ०विधान–न. शास्त्राज्ञा किंवा नियम यांस अनुसरून सांगणें, बोलणें, योजणें ठरविणें, वर्तन करणें. [ विधि+विधान ] ०विवर्जित–वि. शास्त्रमर्यादेचें बंधन नसलेला; नियमांपलीकडील. ' मज विधिविवर्जिता व्यवहारु । आचारादिक । '–ज्ञा ९.१५७. ०विवाह–पु. यथाविधि लग्न. ' निर्धारेंसीं तुम्ही जाया । मी जाहलेंसे यदुराया । विधिविवाह तुवां कीजे । '–एरुस्व ४.१४. ०विशेषण–न. (व्या.) क्रियापदाबरोबर योजलेला गुणवाचक शब्द; विशेषणाचा एक प्रकार. ०वृत्ति–स्त्री. ( निषेधवृत्तीच्या उलट ) प्रत्यक्ष कृति, क्रिया करावयासाठीं आज्ञा करण्याची पद्धति. रोख, तऱ्हा, स्थिति, नियमन. –वि. ( निषेधक नव्हे तें) प्रत्यक्ष नियम, कृति, कार्य सांगणारें; अनुज्ञापक. ०संकुचित–संकोचित–वि. नियमबाह्य; अपवादभूत; नियमांत न येणारें. ०संकोच–पु. अपवाद. विध्युक्त–वि. वेदविहित; शास्त्रांत सांगितलेलें; धर्मग्रंथांत सांगितलेलें. ' किती आचमनें शौच्य विध्युक्त चाले । '–दावि १७९.४.– अप विध्योक्त. ' श्रीराम समर्थ विध्योक्त अर्चनें । '–सप्र ११.१३५. [ विधि+उक्त ]

**विंधी**—स्त्री. १ (कों.) भोंक; छिद्र; वेज. २ खोबण; कुसूंचें घर. [ सं. विध् ]

**विधु**—पु. १ चंद्र. २ ( लेखनांत अक्षरसंख्या ) एक ही संख्या. [ सं. ]

**विधुर**—पु. पत्नी मेलेला पुरुष; गतस्त्रीक मनुष्य; ज्याची बायको मेली आहे असा पुरुष. [ सं. ] –न. दुःख; कुश्चल; संकट. ' सर्वेहि हेतु सुखाचा स्वापत्यांचा तसा न विधुराचा । '–मोआदि ३५.८. विधुराग्नि–पु. बायको मेली तरीहि ठेवलेला स्मार्ताग्नि. [ सं. ]

**विधुर**—वि. व्यंग; अपूर्ण; अधुरा; अर्धवट; सदोष.

**विधुळणी**—स्त्री. धूळधाण; विध्वंस; नाश. विधुळणीस पडणें–मिळणें–होणें – पाडणें – मिळवणें – मिळवून टाकणें–धूळधाण करणें; विध्वंस करणें; नाश करणें; नायनाट करणें. [ सं. विधूलन ] विधुळणें–उक्रि. धुळीस मिळणें, मिळवणें; उधळणें; नाश करणें, होणें. ' आहाळी ते पूजा विधुळे । ' –ज्ञा १७.७. ' तेथ गुळीचा गाडा विधूळणें । '–ऋ १२०. ' ब्रह्मज्ञान विधुळिते । '–विउ.७.७५.

**विधूम**—वि. धूम्ररहित; निर्धूम; धूर नाहीं असा. [ वि+धूम ]

**विधेय**—न. १ विधीनें विहित गोष्ट; आज्ञापित गोष्ट; कर्तव्य. २ (व्या.) उद्देश्याविषयीं वाक्यांत जें सांगितलें असतें तें. [ सं. ] ०वाचक–वि. (व्या.) कर्मवाचक; उद्देश्यासंबंधी सांगणारें. ०विस्तार–पु. (व्या.) विधेयासंबंधीचा वाक्यांतील अधिक भाग; वाक्यांश.

**विधोटा**—वि. विजवट, विधवटा पहा.

**विंध्य**—पु. एक मोठा पर्वत. हिंदुस्थान व दक्खन यांमधील पर्वतांची रांग.

**विध्यर्थ**—पु. (व्या.) धर्म, शक्यता, योग्यता इ० अर्थाचा जो बोध क्रियापदाच्या रूपापासून होतो तो.

**विंधुका, विंध्रू, विंध्रूक**—पु. (कों.) लहान छिद्र. [ विंधणें ]

**विध्वंस**—पु. १ मोडतोड; भंग; चुराडा; स्फोट. २ सामान्यतः नाश. [ सं. वि+ध्वंस् ] ०क–वि. नाश करणारा. ०णें–उक्रि. नाश करणें; मोडणें, तोडणें, फोडणें इ०. ' भवासहित अज्ञानातें । ब्रह्मज्ञान विध्वंसिलें । ' ०न–न. नाश; मोड; तोड; चुराडा. विध्वंसित, विध्वस्त–वि. १ मोडलेला; तोडलेला; नाश केलेला. २ नाश पावलेला.

**विन-ना**—शअ. वांचून; शिवाय.

**विनक**—न. छावणी; तळ; राहुटी; तंबू. 'सेनेसमीप निवांत स्थान पाहून। विनक दीधलें आपुलालें।' -जै ७६.२९.

**विनग्न**—वि. अगदीं नग्न; पूर्णपणें नागवा; उघडा. [सं. वि+नग्न]

**विनट**—पु. १ प्रीति; आवड. 'मज कीरूं तुह्माचि विनटु।' -भाए ८३. २ मित्र; खेळगडी; प्रीतींतील मनुष्य. 'संकल्पु ययाचा इष्टु। अहंकारु विनटु।' -ज्ञा १४.११४. **विनटणें**-अक्रि. रंगून जाणें; मग्न होणें; गर्क होणें; तल्लीन होणें; आसक्त होणें; रमणें; रममाण होणें. 'कलत्र भावें विनटली।' -एरुस्व ३.४७. [सं. वि+नट्]

**विनत**—वि. १ वांकलेला; लवलेला; नमलेला; कललेला. २ नम्र; निरभिमानी; गरीब; लीन. [सं. वि+नम्]

**विनता**—स्त्री. गरुडाची आई. [सं.] ०**नंदन-पुत्र**-पु. १ गरुड. 'कीं यशवंत विनतानंदन। दंदशूक ऐकोन तटस्थ।' -ह १८.१७. २ अरुण.

**विनति, विनंती**—स्त्री. १ विनंती; प्रार्थना, विनवणी; अर्जी; विज्ञापना; स्तुती. २ नम्रता; विनय; लीनता [सं.] ०**व्याज**-न. प्रार्थनेचें मिष, निमित्त. 'म्हणतिलें विनति व्याजें।' -ज्ञा १४.२५.

**विनमोजबा-बी, विनमोहजबा-बी**—बिन मोजबा इ० पहा.

**विनय**—पु. नम्रता; लीनता; सौजन्य; मृदुता; भलाई; गर्वराहित्य. [सं. वि+नी-नय] ०**चातुरी**-स्त्री. सभ्यपणाचें प्रदर्शन; नम्रतेचें प्रदर्शन. 'मनीं धरुनि कामिनी मठामधि मुनी विनय चातुरी।' -ऐपो ३६८. ०**शील, विनयी**-वि. नम्र. ०**स्थ**-वि. नम्र; लीन; निगर्वी.

**विनय**—पु. तळ; छावणी. 'तेथें सैन्य करोनिया स्थिर। विनय आपुला दीधला।' -जै ११.१०३.

**विनयोग, विनयोगणें**—विनियोग-णें पहा.

**विनवण-वणी-वणूक**—स्त्री. प्रार्थना; विनंती; अभ्यर्थना; मिनतवारी. 'करूनि विनवणी। माथा ठेविलों चरणीं।' -तुगा ११६५. **विनवणें, विनविणें**-उक्रि. प्रार्थना करणें; विनंती करणें; आर्जव करणें. [सं. वि+ज्ञप; प्रा. विण्णव; गु. विनवुं]

**विनवणें**—अक्रि. कण्हणें; कुंथणें; विव्हळणें; इवळणें. विणवणें पहा.

**विनष्ट**—वि. उच्छिन्न; नाश केलेला; नाहींसा केलेला. [सं.]

**विना**—शअ. वांचून; शिवाय; खेरीज. 'विना काजेवीण वादकू।' -विपू १.५५. [सं.] ०**कारण**-क्रिवि. निष्कारण; व्यर्थ. ०**आधार**-वि. निराश्रित. (समासांत) पोटाविना, विणा-वीण-वांचून=कोरड्या मजुरीनें; खाण्यापिण्याशिवाय. वस्त्राविना=कपड्यांखेरीज.

**विनाणी**—पु. सुतार. 'विनाणियाचे विदेसी। बांदावेन्ध मंदिरासी।' -ख्रिपू १.३.८७.

**विनायक**—पु. १ गणपति. 'वरी सेंदुरें विनायक।' -शिशु ७६५. २ गरुड. 'एक उठतां विनायक। असंख्य संहारती दंदशूक।' -पांप्र ४५. [सं.] **विनायकी चतुर्थी**-स्त्री. प्रत्येक महिन्यांतील शुद्ध चतुर्थी; विनायकी चौथ. या दिवशीं गणपतीचें व्रत करितात.

**विनाश**—पु. उच्छिन्नता; नायनाट; विध्वंस; सत्यानाश; पूर्णनाश. [सं.] ०**काल**-पु प्रतिकूल कालदशा; नाशसमय. **म्ह०** विनाशकाले विपरीत बुद्धिः=नष्टकाल आला असतां भलतीच गोष्ट करण्याची बुद्धि होते. **विनाशित**-वि. नष्ट; उच्छिन्न. **विनाशी**-वि. १ नाश पावणारें; जें नासतें, कुजतें, बिघडतें तें. २ नाश पावणारें; बिघडविणारें. **विनाशोन्मुख**-वि. नष्ट होण्याच्या पंथास लागलेलें.

**विनास**—वि. नकटा; नाक नसलेला. [सं. वि+नासा]

**विनिगम**—पु. निश्चय; टराव; निर्धार. [सं. वि+नि+गम्]

**विनिगमक**-न. निश्चयास कारणभूत गोष्ट; प्रमाण; दाखला.

**विनिगुहन**—न. (नृत्य) ओठ लांब ओढून घेण्याची क्रिया. हा अभिनय फार श्रमद्योतक आहे.

**विनिमय**—पु. अदलाबदल; देवघेव; फेर मोबदल्याचा व्यवहार. [सं.]

**विनियुक्त, विनियोजित**—वि. नेमलेला; योजलेला; लावलेला; ठेवलेला (नोकरी, काम, वगैरेस). [सं. वि+नि+युज्]

**विनियोग**-पु. नेमणूक; योजना; आरोपण; उपयोग; व्यवस्था (काम, कारण, उपयोग यावर). 'विनियोग तो जाणा तुम्ही याचा।' -तुगा १५१२. **विनियोगणें**-क्रि. खर्च करणें; व्यवस्था करणें; योजणें. 'म्हणोनि स्वधर्में जें अर्जे। तें स्वधर्मेंचि विनियोजिजे।' -ज्ञा ३.१२५.

**विनिर्मुक्त**—वि. मोकळा; स्वतंत्र; बंधमुक्त.

**विनीत**—वि. १ नम्र; लीन; निगर्वी. २ नियम, शिस्त वगैरे पाळणारा, मानणारा; ताब्यांत, आटोक्यांत राहणारा. ३ मनोविकार ताब्यांत ठेवलेला; निग्रही. ४ शिकविलेला; सरावाचा; शिस्त लावलेला (पशु वगैरे). [सं. वि+नी]

**विनेता**—वि. मार्गदर्शक; उपदेशक; शिक्षक; पुढारी. [सं. वि+नी]

**विनोद**—पु. १ खेळ; क्रीडा; करमणूक. २ थट्टा; मस्करी; उपहास; चेष्टा. 'नये विनोद हा कामा मशीं संगें' -तुगा ११२. ३ कौतुक; चमत्कार. 'तैसा भला जाहला विनोदु। कथेचा इये।'

–ज्ञा ४.३. 'तेही कथेचा विनोद। श्रोतीं सादर परिसावा।' –मुविराट २३.११७. [सं. वि+नुद्] **विनोदणें**–क्रि. विनोद करणें. 'कोल्हाळ करित विनोदिनी' –दावि ७.२. **विनोदास्पद**–वि. थट्टेचा, उपहासाचा विषय; हास्यास्पद; चेष्टेचा विषय. [विनोद+आस्पद] **विनोदी**–वि. गमती; थट्टेखोर; चेष्टेखोर; करमणूक करणारा; हंसविणारा.

**विन्मुख**—वि. १ पाठमोरा; तोंड फिरवलेला. 'तुका म्हणे हरिसी विन्मुख। गांधारीचे उदरीं शतमूर्ख।' –तुकाराम, पदें (नवनीत पृ. ४४८). २ (ल.) प्रतिकूल; अनिष्ट; अप्रसन्न (दैव वगैरे). ३ फजीत; लज्जित; गोंधळलेला. [सं. विमुख]

**विन्यस्त**—धावि. ठेवलेला; स्थापित; निश्चित केलेला. [सं. वि+न्यस्=टाकणें]

**विन्यास**—पु. १ ठेव; अनामत ठेवलेली रक्कम. २ व्यवस्था; रचना; स्थिति. 'तेंचि मऱ्हाटेनि विन्यासें' –ज्ञा १५.५९३. ३ विवेचन; प्रतिपादन; निरूपण; विस्तार. 'तैसेनि सांगों सोलिवें। विन्यासें गा.।' –ज्ञा १५.६६; –अमृ ७.२३५. [सं. +न्यस्= ठेवणें, टाकणें]

**विन्हुणें**—न. (प्र.) विंधणें पहा. सुताराचें किकरें. (गो.) विन्हें.

**विन्हा**—शअ. विना पहा. 'चर्म चालेना अहंता विन्हा' –दावि २६.

**विपक्वद्रव**—पु. (शाप.) ज्याचा विपाक झाला आहे असा द्रव पदार्थ; कुजलेलें; नासलेलें द्रावण. (इं.) फर्मेंटेडलिकर. [सं.]

**विपचार**—पु. (अपचार किंवा विपत्चार) अनादर; अपमान; जिगजिग; त्रास; कंटाळवाणी स्थिति; बिघाड; नाश. 'बायको शाहणी असली तर संसार, नाहीं तर विपचार' [सं. वि+आचार]

**विपंची**—स्त्री. वीणा. 'जीच्या स्वरें लाजतसे विपंची।' –सारुह ६.३५.

**विपक्व**—वि. (शाप.) कुजलेला; नासलेला; विपाक झालेला. (इं.) फर्मेंटेड. –सेंपू २.४३.

**विपट**—पुस्त्रीन. वितुष्ट; वैषम्य; तेढ; वैर; वांकडें. 'कलिनें वादुनि पाडिलें विपट।' –मोवन ४.९८. 'तेणें कित्येक संहार झाला। विपट पाडिलें थोरथोरांला।' –दा १३.५.१३. 'गुरु शिष्यामाजीं पडला विपट।' –दावि ७.९.६६. [वि+पटणें]

**विपत्-द्**—स्त्री. १ संकट; अडचण; आपत्ति. (समासांत) विपत्–काल–अवस्था–उद्धार–धर्म–गुण–ग्रस्त–निवृत्ति. [सं.]

**विपतर**—वि. (अशिष्ट) व्रात्य; खोडकर; दुर्गुणी; वेड-पट; कुस्वभावी. [विपरीत]

**विपति-ती**—पु. गरुड. 'हरी वाटे काळा करिस विपती मृत्यु भुजगा।' –वामन, स्फुटश्लोक (नवनीत पृ. ८९). [सं. वि+पति]

**विपत्ति-त्ती**—स्त्री. (अप. विपत्त, विपत्य) आपदा; संकट; अडचण; विघ्न; दुर्धर प्रसंग. 'उत्तमा विपत्तीसंग घडे।' –तुगा ९३०. [सं. विपत्ति] ०**काल**–पु. संकटकाल; आपत्काल.

**विपत्नीक**—वि. विधुर. [सं. वि+पत्नी+क]

**विपत्य**—न. विपत्ति पहा. 'पाताळींचें आधिपत्य। तें तों मानिती विपत्य।' –तुगा २२३७.

**विपथ**—पु. कुमार्ग; वाईट मार्ग. [सं. वि+पथ] ०**गामी**–वि. कुमार्गी; दुर्वर्तनी; स्वैर.

**विपदा**—स्त्री. (अप. विपदात) विपत्ति; अडचण; संकट. [सं. वि+पद्]

**विपनणें**—क्रि. शास्त्रदृष्ट्या पाहणें. –शर.

**विपन्न**—वि. संकटांत पडलेला; विपत्तींत सांपडलेला.

**विपराळ**—वि. उखर; जलशून्य; रुक्ष.

**विपरिणमन**—न. बदल; फरक; रूपांतर. [सं. वि+परि+नम्न]

**विपरीत**—वि. १ उलट; विरुद्ध; उफराटें; विचित्र. 'केळि जशा विपरीत तशा उरु पावले तीं।' –राधावर्णन अकक २. –ज्ञा १.२१९. 'नये नानाचे मनास जाहलें विपरीत इतरांस।' –ऐपो ३०६. २ प्रतिकूल; अननुकूल; अप्रसन्न. 'आणि विकारांची जे वारी। ते विपरीत ज्ञानाची परी।' –ज्ञा १५.५२१. ३ अन्य; भिन्न प्रकारचा. [सं. वि+परि+इ=जाणें] ०**काल**–पु. प्रतिकूलसमय; कष्टदशा. ०**भावना**–स्त्री. १ विरुद्ध किंवा भिन्न रूप, आकार, स्थितिवगैरे. २ प्रकृतीमध्यें पडलेला फरक. ३ एखाद्यासंबंधीं बदललेली वृत्ति, कल्पना वगैरे. ४ (तत्त्व.) देहात्म बुद्धि; जीव व ब्रह्म यांमध्यें भेद आहे किंवा देह हाच आत्मा आहे अशा प्रकारची उलटी समजूत. ०**भोग**–पु. पुरुषायित संभोग. 'विपरीत भोग करून मनोरथ कळेल तसा पुरवून।' –प्रला ११७. ०**राशी**–पु. (शाप.) उलट केलेली संख्या. (इं.) इन्व्हर्स फंक्शन. ०**लक्षणा**–स्त्री. व्याजोक्ति; औपरोधिक वर्णन. ०**ज्ञान**–न. अन्यथाज्ञान; मिथ्याज्ञान; जग सत्य आहे असें म्हणणें. 'विपरीतज्ञान म्हणिजे देखणें। येकाचें येक।' –दा २०. १.२३. **विपरीतज्ञानाचा कोंभ फुटणें**–चूक होणें; भ्रम होणें. **विपरीतार्थ**–पु. परस्पर विरोधी, उलटसुलट अर्थ. 'तरी तितुके हि सत्य देख। विपरीतार्थ न मानिजे।' **विपर्यय**–पु. १ विपर्यास; विरुद्धता; उलटेपणा; उफराटेपणा. २ विरुद्ध दशा; प्रतिकूलता (यावरून) कष्टदशा; संकट; चूक; गैरसमज; उलटा-पालट वगैरे. [सं. वि+परि+इ=जाणें] **विपर्यस्त**–वि. विपरीत

केलेलें; विपर्यास केलेलें; उलटलेलें ( वाईट अर्थानें ). **विपर्यास**-पु. १ विपरीतपणा; विरुद्धता; उफराटेपणा. २ प्रतिकूलता; विपर्यय पहा. ३ बदल; फरक रूपांतर; अवनति. [सं.]

**विपल**—न. (प्र.) विपळ; पळाचा साटावा अंश; दोनपंचमांश सेकंद. [सं.]

**विपला(ळा)प**—पु. शोक; रडारड; आरडाओरड; हलकल्लोळ. [सं. विप्रलाप] **विपला(ळा)पणें**-अक्रि. शोक करणें.

**विपसळा, विपसळ, उपसळ**—वि. द्वाड; व्रात्य; खोडकर (मूल). [सं. उप+च्छल ?]

**विपसळो**—पु. (विरू.) उपसळो; उपद्रव; पीडा; त्रास (उंदीर, कुत्री वगैरेचा). [सं. उपसर्ग]

**विपस्टा**—स्त्री. (गो.) हाल; त्रास; अपेष्टा. [सं. अपेष्टा]

**विपक्ष**—पु. १ शत्रु; प्रतिस्पर्धी. 'विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं।'-र. २ प्रतिपक्ष; विरुद्धबाजू; प्रतिवादी. ३ विरुद्धार्थ; उलट बाजूची गोष्ट. ४ (न्याय.) विरुद्ध उदाहरण; ज्यांत प्रतिपादित वस्तूचा अभाव असतो अशी वस्तु. उदा० न्हदामध्यें अग्नि असणें संभवनीय नाहीं कारण तेथें धूर नसतो. संपक्ष पहा. [सं. वि+पक्ष] -वि. १ विरुद्ध; प्रतिकूल; प्रतिपक्षीय. २ निराधार; अप्रमाण; अप्रतिपादित (तत्त्व.) निराश्रित (व्यक्ति).

**विपाइला**—वि. विरळा; क्वचित; एखादा; थोडा; अल्प. 'परि ऐसे भक्त विपाइले। बहुवस नाहीं।'-ज्ञा ७.१०२. 'ऐसा नरू विपाइला।'-आमा (महानु.) विपाय पहा.

**विपाओ**—पु (महानु.) उपाय. 'एन्हवी इअेचा विपाओ।' -शिशु ८४६. 'आतां विपाअें वांचिती प्राण। विरहिणींचे।' -शिशु ७५२. [सं. उपाय]

**विपाक**—पु. १ परिणाम; शेवट; पूर्णत्वाप्रत गेलेली स्थिति; फल. (सामासांत) अन्न-कर्म-ज्वर-दैव-धर्म-अधर्म-धान्य-पाप-पुण्य-फल-बुद्धि-रोग-विपाक. 'विपाक न गणोनि म्यां प्रकट आपुल्या घातकें।'-केका ४२. २ पूर्ण वाढ; परिपक्वता. ३ कुजण्याची क्रिया; पदार्थाचें मद्यांत रूपांतर होण्याची क्रिया. (इं) फर्मेंटेशन. [सं. वि+पच्]

**विपाय-व**—पु. १ अपाय. 'तरी कैसा घडला जी विपावो। सुरतप्रसंगीं।'-कथा ५.११.१. २ विरळागति; क्वचितपणा; क्वचित् घडून येणारा योग, मेळ; असंभव. 'परी कैसेनीहि विपावो। असणियाचा।'-अमृ ८.७; -ज्ञा १७.२८. [सं. वि+अप+इ] **विपायिला**-वि. क्वचित; एखादा; विरळा. विपाईला पहा. **विपायें**-क्रिवि. क्वचित्; कदाचित्; दैवयोगेकरून; आपातत:; दैववशात्. 'विपायें कर्मभूमिचीये पेटें। नरदेह लांधले अवचटें।'-भाए ५१९. 'विपायें उमजलें होय निदें।'-अमृ १.१४.

**विपारणें**—अक्रि. खोडकर, व्रात्य, उनाड होणें; स्वैर वर्तन करणें. **विपारा**-वि. (अशिष्ट) १ हूड; हट्टी; द्वाड; (मूल). २ कुरूप; विद्रूप; विकल; वेडपट; मूर्ख. 'अंगहीन विपारा'-दा २.३.३५. 'रंभादिका दिसति त्यांजपुढें विपाऱ्या।'-साह्ह ८.१२८. ३ पायाळू; पायाकडून जन्मास येणारें; एक अपशब्द. [सं. विपरीत]

**विपाश**—वि. बंधमुक्त; फांसांतून सोडलेला. [वि+पाश]

**विपाळ**—पु. गंधर्व; अंतरिक्षांतील राजा. 'एकनामाच्या विपाळें। गंधर्वराजें गंधर्वमेळें। चित्रांगद वधिला बळें। कुरुक्षेत्रीं संग्रामीं।'-मुआदि २१.५२. [सं. वि=स्वर्ग, अंतरिक्ष+पाळ=पालक]

**विपिन**—न. अरण्य; रान; जंगल; वन. [सं.]

**विपुल-ळ**—वि. पुष्कळ; भरपूर [सं.] **विपुलता, विपुळात**-स्त्री. समृद्धि; रेलचेल; भरपूरपणा.

**विप्र**—पु. १ ब्राह्मण. २ (सांकेतिक) पैका; द्रव्य. 'विप्र रवाना जाला आहे तो पावलाच असेल.'-ख ३२२५. [सं.]

**विप्रकर्ष**—पु. अंतर; दूरपणा. [सं.] **विप्रकृष्ट**-वि. दूरचें; अंतरस्थ. [सं.] **०कारण**-न. (न्याय) दूरस्थ कारण. (इं.) रिमोट कॉज.

**विप्रकीर्ण(संयुतहस्त)**—पु. (नृत्य) स्वस्तिकाकार हात मनगटावरून खालीं सोडणें. [सं.]

**विप्रतिपत्ति**—स्त्री. १ मतभेद; मतांतर; मतमतांतर; भिन्न मतांतील वादविवाद; मतमतांतराचा गलबला. [सं.] **विप्रतिपन्न**-वि. १ विवादित; ज्याबद्दल मतभेद आहे, वाद आहे असें. २ मताचें खंडन करणारें; भिन्नमतप्रवर्तक; विशिष्टमताविरुद्ध.

**विप्रलंभ**—पु. साहित्यशास्त्रांत शृंगाराचा एक प्रकार. यांत नायक-नायिकेचा विरह वर्णन केलेला असतो. 'शोकदायक प्रसंगांतील विप्रलंभानें वाढविलेला करुणरस ...।'-विंध्याचल १५०. [सं.]

**विप्रलाप**—पु. १ आरडाओरड; भांडणतंटा; कोलाहल. २ वटवट; बडबड; टकळी. [सं.]

**विप्रिय**—वि. अप्रिय; नावडतें; न रुचणारें. 'वाचुनि विप्रिय म्हणे तांतडी चुकलें अक्षर साचें।'-कीर्तन १.३३.

**विप्लावणें**—अक्रि. प्रकट करणें. 'अर्थाचेनि अनानें। विप्लावलीं।'-अमृ ८.१३. [सं]

**विफल-ळ**—वि. निष्फळ; व्यर्थ; निरर्थक; फुकट. [सं. वि+फल] **०ता**-स्त्री. व्यर्थता; निरर्थकता. **विफळणें**-अक्रि. व्यर्थ करणें; निष्फळ करणें. 'परी विफळ ती आचरोनिया। नाटकी जैसे।'-ज्ञा १६.३७३. **विफळात**-स्त्री. विफलता; व्यर्थता. -क्रिवि. व्यर्थ; फुकट; निरर्थक.

**विबुध**—पु. १ देव; अमर. ' समुद्र मथितां ये वेळा । विबुधांसीं बहु श्रम जाला । ' —पांप्र. २ पंडित; ज्ञानीपुरुष; विद्वान मनुष्य. —ज्ञा १०.३१८. [सं.] ०**प्रिया**—स्त्री. एक समवृत्त. अक्षरें चरणांत १८. र, स, ज, ज, भ, र हे गण.

**विबोध**—पु. जागेपणा; जागृतता. ' निद्रा विच्छेदानें विबोध होतो । ' —गंगाधर, रत्नकल्लोळ [सं.]

**विभक्त**—वि. १ भाग केलेला; वांटणी झालेला; पृथक् केलेला; वेगळा; निराळा. २ दुष्ट भक्त; अभक्त; भक्ति नसलेला. ' हरि नरहरि रूपें क्रूरदैत्या विभक्ता । ' —वामन, नरसिंहावतार (नवनीत पृ. १२२) ०**भाव**—पु. वेगळेपणा; कुटुंबाची वाटणी झालेली स्थिति; असमाईकपणा.

**विभक्ति**—स्त्री. विभक्तपणा; तुटकपणा. ' विभक्ती सांडूनि भक्तीचें । मूळ शोधावें । ' —दा ४.१.३४. २ (व्या.) वाक्यांतील इतर शब्दांशी असलेला संबंधबोधक, नामास किंवा सर्वनामास होणारा विकार; प्रस्तुत विकारदर्शक नामाच्या अंत्यभागामध्यें होणारा फरक, लावलेला प्रत्यय. ३ भाग; वांटणी. ४ (अशिष्ट) भावार्थ; रोख; मतलब; तात्पर्य. [सं. वि+भज्] ०**कार्य**—न. विभक्तिप्रत्यय लावतांना नामाच्या अन्त्यस्वरास होणारा विकार. ०**सामान्यरूप**—न. विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी होणारें नामाचें रूप.

**विभग्न**—वि. मोडलेलें; चुराडा झालेलें; नाश पावलेलें; फुटून तुटून गेलेलें. [सं.]

**विभच्छ**—वि. (अप. विभक्त). मोडलेलें, भंग पावलेलें. ' तेथें भूमीचा कोण लेखा । विभच्छ झाली असेल कीं । ' —वेसीस्व ४.३०.

**विभजनीय**—वि. विभाग, तुकडे करण्यास योग्य; ज्याचे विभाग करावयाचें तें. [सं.]

**विभत्स**—वि. (प्र.) बीभत्स पहा. [सं. बीभत्स]

**विभर्त्सना**—स्त्री. निर्भर्त्सना पहा.

**विभव**—न. १ ऐश्वर्य; भाग्य; संपत्ति; मोटेपणा; थोरपणा. २ दुसऱ्या संवत्सराचें नांव. [सं. वि+भू]

**विभाग**—पु. १ अवयव; पृथक्भाग; वांटा; हिस्सा; अंश. २ भाग केलेली, वांटलेली स्थिति; विभजन. [सं. वि+भज्] ०**गुणन**—न मूळ रकमेच्या निरनिराळ्या अवयवांनीं गुणणें. **विभागणी**—स्त्री. वांटणी. हिस्से करणें; भाग पाडणें. **विभागणें**—उक्रि. भाग पाडणें; हिस्से करणें; वाटे करणें; वेगळे करणें; तुकडे करणें, होणें. **विभागदार**—पु. हिस्सेदार; वांटेकरी. **विभागभाक्**—पु. वडिलार्जित मालमत्तेतील वांटेकरी; ज्याला वंशपरंपरागत मालमत्तेत हिस्सा मिळण्याचा हक्क असतो तो. **विभाजित**—वि. वाटलेलें; हिस्से केलेलें. **विभागी**—पु. हिस्सेदार; वांटेकरी; भागीदार; तक्षिमदार; पातीदार. ' ग्रामीचा व्यवहार चालवयालागी । भ्रतार विभागी केला तेथें । ' —ब १२. **विभागीण**—स्त्री. वांटेकरीण. ' दासी माझी दैत्यदुहिता । विभागीण मज केली । ' —मुआदि १९.६४. **विभागु**—पु. विभाग पहा. **विभाजक**—पु. भागणारा; भाग पाडणारा. **विभाज्य**—वि. १ भाग पाडावयाची; जिचे हिस्से करावयाचे आहेत अशी; हिस्से पाडतां येण्यासारखी. २ (गणित) ज्या संख्येस दुसऱ्या संख्येनें पूर्ण भाग जातो अशी (संख्या). **विभाजत्व**—न. भाग जाण्याची स्थिति, पात्रता, योग्यता. (इं.) डिव्हिजिबिलिटि.

**विभाजा**—पु. नाश; चेंदा; रगडा; विध्वंस. ' रणीं कांडिला विभाजा । दैत्यदळाचा । ' —कथा ५.६.८७. [सं. वि+भज्]

**विभां(भा)डणें**—सक्रि. १ पराभव करणें; जिंकणें; जेरीस आणणें. ' अरिराजे विभांडावे । मग राजसूय यागां यावें । ' —शिशु ४६३. —ज्ञा १.२१६. २ फोडणें; छेदणें; नाश करणें; विद्ध करणें. ' पादरेणूंचेनि कुलिशें । पापपर्वत विभांडिती. ' —मुआदि ५.७४. ' तेआं मदनाचां शरीं । विभांडीनिलिया । ' —शिशु २७०. ' म्हणिपे भूतभजना विभाडिली । आणि विभाडिल फुडा । ' —ज्ञिपु १.३१.५५. [सं. वि+भण्ड] **विभांडू**—वि. भांडणारा; शत्रु. ' मागदराजे विभांडू । ' —शिशु ५१८.

**विभाव**—पु. काव्यहेतूच्या प्रकारांपैकीं एक; काव्यस्फूर्तीचें कारण; उद्दीपक गोष्ट. भाव, अनुभाव, स्थायीभाव पहा. [सं. वि+भू]

**विभावन-ना**—नस्त्री. १ विचार; संशोधन; तपासणी. २ कल्पना; तर्क; भावना; समज; समजूत. [सं.] **विभावनीय**—वि. १ विचार करण्यासारखें; संशोध्य. २ कल्पना करण्यास, समजण्यास योग्य, शक्य. **विभावित**—धावि. १ विचार केलेलें, शोधून पाहिलेलें. २ कल्पिलेलें; मानलेलें, गृहीत धरलेलें, समजलेलें.

**विभावसु**—पु अग्नि.

**विभाषा**—स्त्री. विकल्प; ऐवजीं, बदली गोष्ट; दुसरा मार्ग. [सं.]

**विभास**—पु. (संगीत) एक राग. [सं.]

**विभित्स**—वि. बीभत्स पहा.

**विभिन्न**—वि. १ विभाग केलेलें; तोडलेलें; तुकडे केलेलें. २ विस्कटलेला; उधळून टाकलेला; पसरून टाकलेला. ३ मिश्र केलेला; मिसळलेला. [सं. वि+भिद्]

**विभीतक**—पु. बिभीतक पहा. बिब्बा [सं.]

**विभीषणकाल-वेला**—पुस्त्री. ज्योतिःशास्त्राप्रमाणे एक विशिष्ट काळ; संकटकाल; अशुभवेला

**विभु**—पु. प्रभु; परमेश्वर. ' प्रभो, विभो अगाध किति तव करणी । ' —वि. सर्वव्यापी; व्यापक; महान्; चिरंतन. ' उणता

व पदार्थ या दोन्ही वस्तू नित्य व विभु पडल्यामुळें तदभाव विशिष्टकाल व स्थान मिळणें असंभवनीय आहे. ' –न्याप २०६. [ सं. वि+भू ]

**विभू**—पु. ( अप. व्यूह ) १ व्यूह; सैन्यरचना. २ ( ल ) कारस्थान; कट; बालंट; बेत; कूट; मसलत. ' तसा करुन दिग्विजय शेवटीं अवघड रचिला विभू। ' –ऐपो ३११. ३ रचना; कार्यपरंपरा. ' फळ झाडावरून पडतांना पाहिलें तेवढयावरून त्यानें केवढा विभू रचला ! ' –नि ३५०. [ सं. व्यूह ]

**विभूत-ति-ती**—स्त्री. १ भस्म; रक्षा; राख; अंगारा. ' होऊनि जंगम विभूती लाविती। शंख वाजवीती घरोघरीं। ' –तुगा २८३१. २.ऐश्वर्य; तेज; शोभा; यश; कीर्ति; भव्यता. ' नाना विभूति छंद बंद। नाना खाणी ' –दा १६.४.१९. करित असति जीच्या निर्विकल्पा विभूती। ' –सारुह २.८९. ३ अणिमादि अष्टसिद्धि. ४ ईश्वरांश; महापुरुष; ऐश्वर्यवान् पुरुष; पुण्य पुरुष. ' येथ विभूती प्रतिविभूती। प्रस्तुत अर्जुना सांगिजेती। ' –ज्ञा १०४१. [ सं. ] **म्ह॰** विभूतीचें मूळ रेडयाचे गांडींत–अनेक ऐश्वर्यवान् व्यक्तीहि मूळच्या गरीब स्थितींतील असतात.

**विभूषण**—न. अलंकार; शोभा; दागिना. [ सं. ] **विभूषित**–वि. अलंकृत; शोभायमान; सजविलेला.

**विभेद**—पु. १ वेगळेपणा; भिन्नता; विभागणी; अलग करणें. २ मिश्रण; मिसळ; भेसळ. [ सं. वि+भेद ]

**विभो**—पु. विभू पहा. ' नांदत्या घराला विभो लागला। पिळ पाडुन केला भुगा। ' –पला ८६.

**विभ्रम**—पु. १ चूक; दोष; स्खलन. २ भ्रम; भ्रांति; गोंधळ. ' संमोह विभ्रम भासे। गिळित धैर्याचीं आविसें। ' –ज्ञा ७.७७. ३ स्त्रियांचा प्रेममूलक हावभाव, चाळा, चेष्टा, विलास.भाव पहा. [ सं. वि+भ्रम ] **विभ्रांत**–पु. गोंधळ, गडबड, दर्शक अभिनय. –वि. गोंधळलेला; घोंटाळलेला; चुकलेला; गडबडलेला. [ सं. ]

**विभ्रमण**—न. प्रकाशकिरणांच्या गतींतील स्खलन, मार्गच्युति. –सूर्य २६. [ सं. ]

**विमंडल**—पु. १ ग्रहाची कक्षा. २ ग्रह आपल्या अक्षाभोंवतीं फिरल्यानें होणारें वर्तुल. [ सं. ]

**विमत**—वि. नापसंत; अपसंत; उलट; विरुद्ध; प्रतिकूल. [सं. वि+मति ] **विमति**–वि. १ बुद्धि चळलेला; भ्रमिष्ट; खुळा; वेडा. २ नापसंति; असंमति; प्रतिकूलता. [ सं. वि+मति ]

**विमनस्क, विमना**—वि. १ उद्विग्न; खिन्न; त्रस्त; गोंधळलेला. ' सैन्य सज्ज असतां अर्जुन विमनस्क म्हणजे उद्विग्न झाल्यावर ...' –गीर ९. २ मन उडालेला; विमुख; विरक्त; प्रेम उडालेला. [ सं. वि+मनस्+क ]

**विमर्द**—पु. ( कों. ) फुरसत; उशीर; कालवृत्ति; कालांतर; दीर्घकाल; मध्यांतर. ( क्रि॰ लागणें. )

**विमर्द-न**—न. १ घर्षण; घासणें; कुटणें; दळ २ ( ल. ) मारणें; ठार मारणें; नाश. [ सं. वि+ मृद् ]

**विमर्श**—पु. विचार; तपास; शोध; बुद्धि चालविणें. [ सं. ]

**विमल-ळ**—वि १ निर्मल; स्वच्छ; शुद्ध; निर्दोष. ' दोहीं वेगळें सारासार। विमळब्रह्म। ' –दा १२.५.१४. २ मंगल; शुभ ( काल, प्रसंग ). ' प्रहर दोन्ही निशा विमल क्षणी। प्रगटला निज उत्तम लक्षणी। ' [ सं. वि+मल ]

**विमलार्जुन**—पु. एक दैत्य. ' गळा बांधुनियां उखळासी दावें। उन्मळी त्या भावें विमळार्जुन। ' –तुगा २०. [ सं. ]

**विमा**—पु. १ एखाद्या वस्तूची, आयुष्याची घराची वगैरे ठराविक कालापर्यंत सुरक्षिततेची, ठराविक रक्कम भरून घ्यावयाची हमी; ठराविक हप्ते भरुन ठराविक कालीं अमुक रक्कम मिळेल अशी तजवीज. ( क्रि॰ उतरणें; भरणें; करणें ). २ अशा तऱ्हेनें भरावयाची ठराविक रक्कम, हप्ता. ३ सट्टा. [ फा. हिं. बीमा ] **विमेकरी-दार**–पु. जो कोणत्याहि गोष्टीचा विमा उतरतो तो.

**विमाता**—स्त्री. सापत्न माता; सावत्र आई.

**विमान**—न. आकाशयान; आकाशनौका; अंतराळांतून प्रवास करण्याचें साधन; देवांचा इच्छागमनी रथ. [ सं. ]

**विमार्ग**—पु. १ कुमार्ग; आडमार्ग; भलतीच वाट. ' तो विमार्गास लागला असतां वसुभूतीनें त्याला उपदेश करून आपला शिष्य केलें होतें. ' –चंद्रगुप्त ४२. २ अनीतीचा मार्ग; स्वैर वर्तणूक. [ सं. वि+मार्ग ]

**विमुक्त**—वि. मोकळा; स्वतंत्र; बंधनांतून सुटलेला. [ सं. वि+मुच् ] **विमुक्ति**–स्त्री. मुक्तता; मोक्ष; स्वतंत्रपणा; मोकळेपणा. **विमोचन, विमोक्षण**–न. सुटका; मोकळीक; मुक्तता; मुक्ति. [ सं. वि+मुच् ]

**विमुख**—वि. पराङ्मुख; पाठमोरा. ' सन्मुख विमुख जगेसीं। न घडे तुज। ' –ज्ञा ११.५३१. ॰**काल-ळ**–पु. प्रतिकूल काल; संकटकाल; आपत्काल; याचे उलट सन्मुखकाल.

**वियत्**—न. आकाश. [ सं. ] **वियद्गंगा**–स्त्री. आकाशगंगा. **वियच्चर**–वि. आकाशांत संचार करणारा.

**वियुक्त, वियोजित**—वि. पृथक् केलेला; तोडलेला; वेगळा, अलग केलेला; वियोग पावलेला; विरहित. [ सं. वि+युज् ] ॰**पत्र**–वि. ( शाप. ) निरनिराळया पाकळया असलेला ( हिरवा-चाफा, रामफळ ) ( इं. ) डायलिपेटॅल्स.

**वियुति**—स्त्री. ( गणित ) अंतर; फरक; वजाबाकी; कमीजास्तीपणा.

**वियोग**—पु. १ पृथग्भाव; वेगळेपणा; विरह; ताटातूट २ (गणित) फरक; अंतर; वजाबाकी. [सं. वि+युज्] **वियोगानल**-पु. विरहाग्नि; वियोगामुळें उत्पन्न होणारा ताप, संताप, त्रास. 'त्या वियोगानळेंकरून। अहाळले श्रावणारि रात्रंदिन।'—रावि. **वियोगी**-वि. वेगळा; पृथक्; अलग. 'योग नाहीं तो वियोगी।' —दा १७.१.२३. **वियोजक**-वि. १ (गणित) वजा करण्याची संख्या. २ पृथक् करणारा; वेगळें करणारा. **वियोजन**-न. वियोग करण्याची क्रिया; पृथक्त्व; ताटातूट; वियोग; पृथक्करण. **वियोज्य**-वि. (गणित) ज्यांतून वजा करणें ती संख्या.

**विर**—स्त्री. विरी. शक्ति; समर्थ. वीर पहा. 'पुरे काळ हा नुरे योग्यता विर निघुनी चालली।' -राला ११०. [सं. वीर्य]

**विरईपुरी**—स्त्री. मांसयुक्त पुरीचा एक प्रकार. -गृशि२.१९.

**विरका**—वि. १ विरणारा; चूर होणारा; कांडतांना तुटणारा, मोडणारा (तांदूळ). २ विरघळणारा. [विरणें]

**विरक्त**—वि. उदासीन; अनासक्त; निरिच्छ; भोगेच्छेपासून पराङ्मुख; वासनारहित. 'विरक्त करितो हरी स्वगुण नाम संकीर्तनें।'—वामन, नामसुधा १.५० [सं. वि+रज्-रञ्ज्] **विरक्ति**-स्त्री. १ वैराग्य; अनासक्ति; निरिच्छता. 'तरी विरक्तिवाचूनि केहीं। ज्ञानासि तगणेंचि नाहीं।'—ज्ञा १५.३६. २ उदासीनता; बेफिकीर वृत्ति.

**विरखंड**—न. (कों.) पोफळीच्या विरीचा तुकडा. २ (याची घडी घालून पोथीला गुंडाळीत असतात यावरून). पोथीस गुंडाळण्याचें साधन, पुष्टिपत्र. [विर+खंड]

**विरखुडी**—स्त्री. रेघ; रेघोटी; ओरखडा. [सं. वि+रेखा]

**विरंग**—पु. विरस; बेरंग; विसंवादी गोष्ट. 'पुढील याकाराचें माम। विरंग होईल म्हणोनि।'—वेसीस्व ८.५१. 'कांहींच विरंग नाठवे।'—दावि २७. —वि. १ वाईट रंगाचें; विटकें; रंग उडालेलें. 'येक सुरंग येक विरंग।'—दा१५.८.१०. २ रंगाशिवाय; मोकळा; रिकामा; लोकरंजनाशिवाय. 'विरंग जाऊं नेदी क्षण।'—दा १८.४.१०. [सं. वि+रंग]

**विरंगुळणें**—अक्रि. कांहीं काम करतांना रमणें, रेंगाळणें; विसांवा घेणें; गमणें; करमणूक करणें; खेळणें. [सं. वि+रज्-रञ्ज्=करमणूक करणें] **विरंगुळा-गोळा-गुळो**-पु. १ विसांवा; विश्रांति; विश्रांतिस्थान. 'मनाला विरंगुळा आतां काय तो एवढाच आहे!'—पकोघे. २ करमणूक; खेळ; वेळ घालविण्याचें साधन; मन रमविणें. ३ हरकत; अडचण; आळस. 'वरील कोंडयाचा गुंडाळा। झाडूनि केलिया वेगळा। कणु घेतां विरंगुळा। असे काई।'—ज्ञा १५.४६६.

**विरगेंमरी**—स्त्री. व्हर्जिन मेरी. -ख्रिपु.

**विरघळणें**—अक्रि. १ द्रवणें; वितळणें; विघरणें; पाघळणें; पातळ होणें. २ (ल.) विरणें; जीर्णपणामुळें पातळ, विरविरीत, झिरझिरीत होणें (वस्त्रवगैरे). ३ (ल.) (भय, दुःख, अनुकंपा इ० विकारांनीं) गळणें; ओशाळणें; मऊ पडणें; द्रवणें. 'सैनिकमन विरघळे दयेनें।'—विक २. (गो.) विरघुंक. [सं. विघरण]

**विरचणें**—उक्रि. रचणें; जुळणें; व्यवस्थित मांडणें; पद्धतशीर लावणें. रचणें पहा. [सं. वि+रच्] **विरचित**-वि. जुळविलेलें; रचलेलें; केलेलें; ग्रथित. 'श्री मुकुंदराज विरचित। विवेकसिंधु अध्यात्मग्रंथ।'

**विरंची**—पु. ब्रह्मदेव. 'हें परमभाग्य आंगीं। विरंचिही नाहीं।'—ज्ञा ११६२२. 'त्याचे चरणींचे रजःकण। शिव विरंची आपण।'—एरुस्व १४.९३. [सं. विरंचि]

**विरज**—वि. शुद्ध; निर्मळ; पांढरें. 'शुद्ध सत्त्वाचें विरजांबर। चिद्रत्नांचे अलंकार।'—एरुस्व १४.८७. [सं. वि+रज्=रंगविणें]

**विरज**—न. संघ; डाळें; इरजिक पहा. 'पेरावयासि घेतलें बीज। गांवकरी करूनि विरज।'—भवि ५४.१७६. **विरजे**-पुअव. इरजिकांतील लोक.

**विरजण**—न. १ दूध घट्ट होण्यासाठीं, दुधाचें दहीं होण्यासाठीं त्यांत घातलेला पदार्थ. २ घट्ट झालेलें, दहीं झालेलें दूध. ३ (कों.) दहीं करण्याचें भांडें. ४ (ल.) (विद्वत्ता, शहाणपणा, सद्गुण, पावित्र्य वगैरेस) कलंक लावणारें दुर्वर्तन; निष्फल करणारी गोष्ट; कोणत्याहि गोष्टीवर पाणी पाडणारी दुसरी तद्विरुद्ध गोष्ट. [सं. वि+रंज्ः -भाअ १८३४; विजन -भाअ १८३२] **०घालणें**-एखाद्याचें मन दुसऱ्याविषयीं कलुषित करणें, बिघडविणें, मोडता घालणें; आड येणें; निरुत्साह करणें. **०घालणें-पाडणें**-विफल करणें; नासणें; बिघडविणें; फिसकटविणें; अडथळा आणणें. **०पडणें**-विफल होणें; नासणें; बिघडणें. **विरजणी**-स्त्री. विरजणाचें भांडें. **विरजणें**-उक्रि. दुधाचें दहीं करणें. —अक्रि. (भांडणानंतर) शांत होणें; समजूत होणें; तडजोड होऊन भांडणतंटा मिटणें. **विरजणें**-न. विरजणी; दूध विरजण्याचें भांडें.

**विरजणें**—क्रि. (प्र.) विराजणें; शोभणें. 'गोपीगण विरजला।'—रास ५.१५२. [सं. वि+राज्]

**विरंजन**—न. रंग काढून टाकणें; रंग घालविणें; पांढरें करणें; ओपविणें; सफेतीकरण. (इं.) ब्लीचिंग. [सं. वि+रज्-रञ्ज्]

**विर(रि)जा-जिया**—पु. मित्र; सहाय्यकर्ता; मदतगार. 'मग वडवानलु तैसे याही। विरजा जैसा।'—ज्ञा १.११७. विरज=डाळें पहा.

**विरजाहोम**—पु. संन्यास घ्यावयाच्या वेळीं करावयाचा होम. 'विरजाहोम याचि नांवें। देह नव्हे मी हें जाणावें।'—तुगा ३८६९. [सं.]

**विरजीक, विरजे, विरडया, विरड**—इरजीक, इरजे इरडया, इरड इ० पहा. ' नलगे घालावें विरजे। हेल बैल देउनि दुजे। ' –मध्व ४०२.

**विरड**—स्त्री. उतवडा; गौण पीक; मोगण; इरड पहा.

**विरड**—स्त्री. (कु) १ अर्धा दिवस; एक वेळ; पूर्वाण्ह किंवा अपराण्ह. २ कामाचीं लांकडें वगैरे सांठविण्याचा माचा. ३ ओझ्याची खेप. ४ (राजा) वरंड.

**विरडणें**—अक्रि. पुरळ उठणें; खरूज येणें.

**विरड(ढ)णें**—अक्रि. उगवण; अंकुर फुटण. ' जियाचिये भूमिकेसि विरढे। ' –भाए २३३. ' विरढोन लागती गगनासी। ' –दा १५.४.१०. [सं. वि+रुह्=वाढणें]

**विरडा-ढा**—पु. (रा.) लहान रोप; माडा.

**विरडी-ढी-डे-ढें**—स्त्री. बिरडी-डे-ढी-ढें पहा.

**विरढें**—न. बिरढें; गुळखी; बूच; बांध ' ते प्रलयनळा धुम्राचें गुंडाळें। कीं काळकुटा बिरढें फूटलें। ' –शिशु १०२०.

**विरणा**—वि. विरका पहा. विरणे तांदूळ–विरणारे तांदुळ.

**विरंणा-रण्णा**—पु. लिंगायतांचा एक देव, साधु. ' येक म्हणती विरंणा कर्ता। येक म्हणती बसवंणा कर्ता। ' –दा १३.८. १४.

**विरणें**—अक्रि. १ विरघळणें; वितुळणें; पातळ होणें. २ (ल.) विरविरीत होणें; विरल होणें; वीण पातळ होणें (वस्त्र, कापड वगैरेची); जीर्ण होणें. ३ (ल.) द्रवणें; दयार्द्र होणें; पाझरणें (कोमलतेनें, दयेनें, सहृदयतेनें-अंतःकरण, मन वगैरे). ४ चुरणें; मोडणें; कणी होणें (तांदूळ कांडतांना, अगर इतर धान्य भरडतांना). ५ उडून जाणें; पातळ होणें; नाहींसें होणें (अभ्र, ढग वगैरे); जिरणें; लयास जाणें; दबून जाणें (संशय, हेतु, इच्छा); ' विराला हेत सर्वही. ' ६ तृप्त होणें; भागणें; शमणें; उडून जाणें (तहान, भूक वगैरे); ' सकलही तहान विरली हो भूक। ' ७ पांगापांग होणें; फाकाफाक होण; दाणादाण, पळापळ होणें; नष्ट होणें (शत्रू वगैरे). ' जीव नील वर्णापरी परस्परें शत्रू विराले तसे। ' –ऐपो ३९८. ८ मन उडून जाणें; दुःखित होणें; खेद करणें. 'कपि देखुनि सर्व मनीं विरती।'-श्री सेतुबंध २९.१३. [सं. विरल]

**विरणें**—सक्रि. (कों.) दाढीवर, भाजावणीवर गोंवर पसरणें. [सं. विकिर्]

**विरत**—वि. १ विराम पावलेला; स्तब्ध; थांबलेला; बंद पडलेला. २ विरक्त; निवृत्त; त्याग केलेला. ' विरत विषयभोगी चाड नाहीं सुखाची। ' –सुरामायण बालकांड. [सं. वि+रम्]

**विरति-स्त्री.** १ विराम; विश्रांति; बंदी; थांबण्याची, मोडण्याची, बंद पडण्याची स्थिति. २ विरक्ति; इच्छा, आसक्ति, वासना यांचा क्षय; अनासक्ति.

**विरतिकर**—पु (कु) वृत्तिकर; वृत्त्यंशी; वृत्ति चालविणारा. [सं. वृत्तिकर]

**विरथ**—वि. रथहीन.रथविरहित; रथांतुन उतरलेला. ' विरथ केला वंग राजा। ' –एरुस्व ९.५४. [सं.]

**विरधाळें**—न. वृद्धि; सुवेर; जननाशौच. [सं. वृद्धि+ आलय]

**विरपणें**—उक्रि. (कों.) तण काढणें; बेणणें; निंदणें; भांगलणें. **विरपणी**-स्त्री. (कों.) बेणणी; निंदणी. **विरपल-स्त्री.** (राजा.) शेताच्या दांडेपैंकीं राहिलेला चोथा, नांगरणीच्या वेळीं काढून टाकतात तो; नांगरटीनें उपटून काढलेलें रान.

**विरंबणें**—अक्रि. १ ओशाळणें; लाजणें; खालीं पहाणें; थिजणें; विरमणें. २ पचपचीत होणें, कचकचीत, बेचव होणें (भात). [म. वरमणें; सं. वर्म]

**विरमणें**—अक्रि. थांबणें; बंद होणें; थबकणें; विश्रांति घेणें. ' अशेषहि अज्ञान विरमे। ' –ज्ञा १५४२३. ' विरमशी तूं सांग कोणी कडे। ' -वेक ८१. [सं. वि+रम्]

**विरमणें**—अक्रि. वरमणें पहा. लज्जित होणें; शरमणें; द्रवणें. ' तैसें सधीर परी विरमलें । हृदय तयाचें। ' –ज्ञा २.३. [सं. वर्म]

**विरय**—स्त्री. (कु) कोंकणी देवदार वृक्ष.

**विरल-ळ**—वि. १ दूरदूर; झिरझिरीत; अंतरा अंतराद्रचा. २ दुर्मिळ; क्वचित् आढळणारा; असामान्य; केव्हां तरी घडणारा. –क्रिवि. क्वचित्; विरळा. [सं. विरल] **विरलणें**-उक्रि. विरल होणें. **विरलधातु**-पु. (शाप) दुर्मिळ धातु. (इं.) रेअर मेटल. **विरलपक्ष**-वि. विशिष्ट जातीचे प्राणि. (इं.) हिमेनोप्टेरा. **विरलागत**-वि. क्वचित घडणारे; असामान्य; दुर्मिळ; प्रासंगिक. [सं. विरल+आगत]

**विरली-लें**—स्त्रीन. इरली-लें पहा.

**विरवड**—स्त्री. इरड पहा. गौण पीक; मोगण.

**विरवणें**—सक्रि. (विरणें प्रयोजक पहा). जिरविणें; नाहींसें करणें. ' बहु भाग्य शिखंडीचे मोटयाऱ्याही मदासि ज विरवी। ' –मोभीष्म ११.५१.

**विरवदी-धी-ली**—स्त्री. स्त्रियांच्या पायांच्या बोटांतील चांदीचा दागिना. ' विरवल्या विंचमोरे. ' –स्त्रीगीतमाला ६. (तंजा.) विरविदी. –तंजा शिलालेख.

**विरवाळें**—न. (राजा.) विरजीक; इरजीक पहा.

**विरविरणें**—अक्रि. रवरवणें; मिरमिर लागणें. [ध्व.] **विरविरी-वीर-स्त्री.** चुरचुर; मिरमिर; रवरव.

**विरविरीत**—वि. झिरझिरीत; जीर्ण; विरळ. [विरणें]

**विरस**—पु वेरंग; मनोभंग. –वि. १ नीरस; बेचव; गोडी नाहीं असें. 'आवडीविण संभोगु। विरसु होअे।' –शिशु १८२. 'अमृत यापुढें विरस।' –मोसमा ५.९४. २ रुक्ष; कोरडा; पचपचीत; कवकवीत. ३ (ल.) निरुत्साही; निष्प्राण. [सं. वि+रस] **विरसणें**–अक्रि. निरुत्साह होणें; थिजणें 'बोलें ऐशामनीं विरसली।' –विक ७८.

**विरह**—पु. १ वियोग; ताटातूट; दूरीकरण (मित्र, प्रियमनुष्य यांचा). 'विरह तापें फुंदे छंद करित जाती।' –तुगा १३१. २ वियोगजन्य दुःख; ताटातुटीमुळें होणारी पीडा, हुरहुर; बेचैन. ३ वाण; अभाव; रहितता. [सं.] ०**ज्वर**–पु. विरहामुळें येणारा ताप; वाटणारें दुःख. **विरहाग्नि, विरहानल**–न. वियोगजन्य शरीरदाह; विरहामुळें होणारी शरीराची आग. 'अधिका विरहोनलु। उधावतु दिसे।' –शिशु ७७९. **विरहिणी**–स्त्री. पति अथवा वल्लभाचा वियोग झालेली स्त्री. 'विरहिणी कां जैसी। वल्लभातें।' –ज्ञा १३.३७४. **विरही**–पु. १ प्रियेचा वियोग झालेला. २ विहीन; वाण, राहित्य असलेला.

**विरहण**—न. आळ; आरोप. 'ज्याहीं चोरिलें त्यांसी सोडिलें। विरहण आलें मजवरी।' –ह ९.१८६.

**विरहित**—वि. विहीन; शिवाय; वेगळा; खेरीज; वांचून; विना. 'निमोली संपदा भयविरहित। सर्वकाळ चित्त समाधान।' –तुगा १९८३. [सं.]

**विरळ, विरळणें, विरळागत**—विरल, विरलणें, विरलगत इ० पहा.

**विरळा**—वि. दुर्मिळ; दुर्लभ; दुष्प्राप्य; एखादा; क्वचित् आढळणारा. –क्रिवि. क्वचित्; प्रसंगवशात्. [सं. विरल]

**विरा**—पु. (कु.) विरी पहा. 'सुपारीच्या फांदीच्या बुडाशी असलेलें जाड आवरण.

**विराकत, विराखत**—स्त्री. इराकत पहा.

**विराग**—पु. विरक्ति; वैराग्य; अनासक्ति; निरिच्छपणा; विषयपराङ्मुखता. –ज्ञा ९.४७०. [सं. वि+रंज्–राग] **विरागी**–वि. बैरागी; विरक्त; वैराग्यशील. –ज्ञा १८.१७६.

**विराजणें**—अक्रि. शोभणें; प्रकाशणें; सुंदर दिसणें. 'ते भीमकीस सिसफूल शिरीं विराजे।' –सारुह ८.१३५. [सं. राज्+ प्रकाशणें] **विराजमान, विराजित**–वि. शोभिवंत; शोभायमान; तेजस्वी; भव्य. 'कंठी कौस्तुभमणि विराजित।' –तुगा १.

**विराट–ट्**—पुन. १ विश्वव्यापी ईश्वर स्वरूप; स्थिरचरव्यापक पुरुष; ब्रह्माण्डदेह. 'सूक्ष्म हिरण्यगर्भ म्हणती। विराट ते स्थूळ।' –दा १०.१०.१४. 'कीं हे विराटाची योगस्थिति।' –दा १.७. ३२. –वि. भव्य; प्रचंड; अवाढव्य. [सं. विराट्] ०**देह–देही**–पु. विश्वस्वरूप; ब्रह्माण्ड; सृष्टि. ०**देह–देही–स्वरूप–रूप–शरीर**–वि. १ सृष्टिस्वरूपी; जगद्रूपी; विश्वरूपानें प्रगट. २ भव्य; अवाढव्य शरीराचा. ०**पुरुष**–पु. ब्रह्माण्डव्यापी ब्रह्म; विश्वपुरुष; सर्वव्यापी आत्मा.

**विराण, वैराण**—वि. ओसाड; उजाड. [वैराण] **विराणी**–स्त्री. दाढ भाजण्यापूर्वी आग पसरूं नये म्हणून तीसभोंवतीची जी जागा भाजतात ती. [वैराण]

**विराणा**—पु. विरंणा पहा.

**विराणें**—न एक वाद्य. –मब ३६.

**विरादस**—स्त्री. (गो.) बडीशेप.

**विराम**—पु. १ विश्रांति; विसांवा. 'नको वासना हेमधामीं विरामीं।' –राम ६५. २ थांबणूक; कुंठित होणें; मध्येंच बंद पडणें; स्थिरता. ३ लय; नाश; अंत; शेवट (क्रि० पावणें). 'मग ययाच्या विरामीं। मीचि होसी।' –ज्ञा १८.१३६७. 'पावे जनप्रतापें त्या तद्रिपुग्रीष्म जें विरामास।' –मोभीष्म ७. ३. ४ टप्पा; थांबण्याची जागा. [सं. वि+रम्] ०**चिन्ह**–न. थांबण्याची खूण; वाचतांना वाक्य संपल्यावर अगर मध्येंच कमी जास्त थांबावें यासाठीं वापरावयाची खूण.

**विराम**—वि. शून्य; ज्यांत राम, तेज, पराक्रम नाहीं असें. 'रामेवीण विराम भासत सभा कोणी न दीसे उभा।' –दावि ४९७. [वि+राम]

**विरालेंपण**—न. शून्यत्व; सर्व नाहींसें झाल्याची अवस्था. [विरणें]

**विरावणें**—अक्रि. (व.) विरमणें; विरल्यासारखें होणें (दुःखामुळें); थिजणें. [विरणें]

**विरावणें**—अक्रि. रममाण होणें; विश्रांति घेणें. 'मग राओ उर्वसीयेसि। विरावला तो।' –भाए ७६४. [वि+रम्]

**विरावा**—पु. मध्यस्थ; अडचण; खोळंबा. 'मध्यस्त विरावा कशास' –शिदि २८१. [वि+रम्]

**विरावें**—न. शौर्य; वीर्य; तेज. 'जन्म मायेचें मैंदावें। जन्म क्रोधाचें विरावें।' –दा ३.१.७. [सं. वीर्य]

**विरि**—स्त्री. विरी पहा.

**विरिंचि–ची**—पु. ब्रह्मा; ब्रह्मदेव; विधाता; सृष्टिकर्ता. विरंची पहा. 'करी स्तुती प्रेमरसें विरिंची।' –वामन चरित्र १.३३. [सं. वि+रच्] ०**अंड**–न. (काव्य) ब्रह्माण्ड; विश्व. 'भये तडाडी विरिंचिअंड।'

**विरी**—स्त्री. १ पोफळीच्या सांवळीस बुडाशीं असतो तो सुपासारखा भाग. २ विरीचा द्रोण. [सं. आ+वृ=आवरण घालणें]

**विरी**—स्त्री. वीर्य; तेज; बळ; सामर्थ्य; सत्त्वांश; (चुन्यातील) कस. 'पृथ्वीनें विरी सांडिली।' –दा १३.४.१०. 'त्या

ळेसच त्याच्या नीतिमत्तेची विरी गेली आहे असें समजावें.' -नीतिशास्त्रप्रवेश ४४६. [ सं. वीर्य ]

**विरीं**—शअ. पर्यंत; वेरीं. 'वेलिअें वाटोगरी। गुंफिजेती सेरोविरीं।' -शिशु ६३२. [सं. पर्यंत]

**विरु**—विरू पहा.

**विरुगोळा**—पु. विरंगुळा पहा.

**विरुद्ध**—न. अकल्याण; अभद्र; वाईट 'जें वडिला यां चिंतावें। वेरुद्ध मनें।' -ज्ञा १.२१४. -वि. प्रतिकूल; उलट; विपरीत; वेघ्न करणारें; अडथळा आणणारें. 'तें ज्ञानीं विरुद्ध काय आहे। ईं जाणावें कीं।' -ज्ञा १६.५६. (समासांत) आचार-उक्त-काल-जन-देश-धर्म-पथ्य-परिभाषा-मार्ग-रीति-लेख-वेद-शास्त्र-संप्रदाय-विरुद्ध. -धावि. अडथळा झालेलें; अडखळलेलें. [वि+रुध्=अडथळा करणें] ०भलें-वि. शुभाशुभ.

**विरुळ-ळें**—वि. विरळ पहा. 'वस्त्रांतून शोभति ते विरुळे।' -अकक २ किंकर; शुकरंभासंवाद १९. -ज्ञा ८.१७.

**विरुळ**—वि. विरळा पहा. 'ऐसा तो विरुळा संत' -दा ५.२.३८.

**विरुळा**—पु पाणसर्प; विरोळा. 'विरुळेआं रोखेंसी सरीसीं।' -दाव ३८८. 'कालिय विरुळया जळिंच्या मानी मनांत भूधरसा।' -सखारामतनय रुक्मिणीस्वयंवर १७. [सं. व्याल]

**विरू-रूं**—न. वैर; शत्रुत्व; वांकडें. 'हें काळें पाखिरू। मजसी सदा चिंती विरू।' -शिशु ८२१. 'काई माझें घेतलें विरूं।' -भाए ७७. 'जयांलागि मनें विरूं। आम्ही स्वप्नींहि न शकों धरूं।' -ज्ञा २.३५ -वि. विरुद्ध; उलट; आड. 'मग जाणतया जें विरू। तयाची वाट वाहती करूं।' -ज्ञा १६.५७. [सं. वैर; वि+ऋ=जाणें]

**विरूढण**—न. १ मूळ धरणें. २ (ल.) परिणामकारक होणें; प्रभावी होणें. [सं. वि+रुह्=वाढणें] **वि(रु)रूढणें**-अकि. १ वाढणें; मोठें होणें. 'पुत्रांकुर विरूढला चोखें' -मुआदि ३.३३. २ अंकुर फुटणें; रुजणें. 'तरी न विरूढती लिंचिलीं। आवडे तैसी।' -ज्ञा २.६६. 'विरुढे सरतेपणाचें वीज।' -स्वादि २.१.९ **विरूढी**-स्त्री. वाढ; अंकुर. 'तंव बाहेरी विरूढी करपे। रोमबीजाची।' -ज्ञा ६.२३४; २.७९.

**विरूप**—वि १ कुरूप; विद्रूप; बेडौल. २ भिन्न; वेगळा; निराळा [सं]

**विरूपाक्ष**- पु शंकर [सं.]

**विरूळ** वि. विरळ पहा.

**विरें**—न. विरीचा द्रोण; विरी पहा.

**विरे**—स्त्री. विरी पहा. वीर्य. 'पुरे काळ हा तुरे योग्यता विरे निघुन चालली।' -ऐपो ३७५.

**विरेक**—पु. १ रेच; ढाळ; मलविसर्जन. २ मल; विष्ठा. [सं. वि+रिच्-रेच] **विरेचन**-न. १ मलशुद्धि; हगवण; झाडा; ढाळ; रेच. २ ढाळक; रेचन; मलशुद्धिकारक औषध. [सं.]

**विरे(रें)वीर**—पु मुख्य वीर; वीरश्रेष्ठ; असंख्य वीर; वीर-समुदाय. 'विरेंवीर राक्षेस सर्वे बुडाला।' -राक १.४.३०. 'मग अपार शर सोडिले। विरेवीर त्रासिलें।' -जै ७९.८४.

**विरोचनात्मज**—विना. विरोचनाचा पुत्र; बलि. [सं.]

**विरोदी**—स्त्री. विरवदी पहा. (व.) इरुदी. 'रुचिरतर विरोद्या शोभती अंगुळीला।' -सारुह ६.३१.

**विरोध**—पु. १ विरुद्धभाव; प्रतिकूलता; वैधर्म्य; विरुद्ध मत; अडथळा; प्रतिबंध; वैर; शत्रुत्व; द्वेष. 'विरोधाचें मज न साहे वचन।' -तुगा २०६३. 'विरोध आम्हां मगधांत। निकट वास करूं नये।' -एरुस्व ६.८. २ प्रतिवर्तित्व; भेद; अंतर; विसा-दृश्य. [सं. वि+रुध्] **विरोधणें**-अकि. विरोध करणें. -ज्ञा ९.४७२. ०भक्ति-स्त्री. देवाशीं वैर करून त्याकडून आपला वध करवून घेऊन मोक्ष मिळविण्याची मार्ग. **विरोधी**-पु. साठ संव-त्सरांतील विसावा संवत्सर. -वि. विरोध करणारा; प्रतिकूल; प्रति-पक्षी. **विरोधी भक्त**-पु. विरोधभक्ति करणारा.

**विरोबा**—पु वीर; एक क्षुद्र देवता. -खेया.

**विरोली**—स्त्री. विरवदी-ली पहा.

**विरोळा-ला**—पु. पाणसर्प. विरुळा पहा. 'वाहती ते चपळ विरोळे जाण।' -ह २६ १५८. 'वीरांचे हस्त विरोळे पूर्ण। तळपताती ठायीं टायीं।' -रावि २८.६६. [सं. व्याल]

**विरोळा**—पु. वरोळी; शेताची मर्यादा दाखविण्याकरितां घातलेला मातीचा ओटा.

**विर्जुमाळ**—वि. (कों.) समायीक. -पहाणी खर्डा सातारी. [अर विराखत्=वडिलार्जित मिळकत]

**विर्ति**—स्त्री. (अप.) वृत्ति; इनाम. **विर्तिक**-वि. वृत्तिवंत; इनामदार.

**विर्मार**—वि. (गो.) बीमार; आजारी.

**विऱ्हडणें**—अकि. दुःखी होणें; विव्हल होणें. -तुगा.

**विऱ्हया**-वि विरही; दुःखी. 'ते तनूचेनि वियोगें। विऱ्हये नव्हती।' -ज्ञा ७.१८१. [सं. विरह]

**विऱ्हा**—पु. (कों.) ओढा; नाला; प्रवाह; पऱ्हया. [सं. वि+प्र+वह्]

**विलग**—पुन. १ वैगुण्य; उणेपणा; व्यंग; विसंगति; वैपरीत्य; अंतर. 'विलग पडों नेदावें। कथेमध्यें।' -दा १२.९.२९ २ उपद्रव; त्रास. 'कामक्रोधांचे विलग। उठावती अनेक।' -ज्ञा

१२.६२. –वि. अलग; भिन्न; विसंगत; अयोग्य; असंबद्ध; न जुळणारें; तुटक; अलिप्त. 'हे लोक साऱ्या गांवापासुन कांहीं काळ विलग राहिले होते.' [सं. वि+लग्] **विलगट**–वि. वेगळा; अलिप्त; भ्रष्ट. –स्त्री. फार लगट; विशेष लगट. 'विलगट हट नाहीं चाट मोकाट नाहीं।' –दावि ७.२. 'ते देवत्रयांची खटपट । सूक्ष्मरूपें विलगट।' –दा १२.८.९. **विलगणें**–अक्रि. दूर होणें; नाहींसा होणें; धुऊन निघणें. 'पदी श्रीरामाच्या दृढतर महादोष विलगे।' –सारुह ६.१६३. **विलगेस लावणें**–दूर करणें; बंदोबस्त करणें; बाजूस काढणें. 'ही किरकीर विलगेस लावा।' –पला ६.१३.

**विलंगी**—स्त्री. एक प्रकारचें कोळपें. कोळपें पहा.

**विलग्न**—वि. संलग्न; जुळलेलें; जोडलेलें; चिकटलेलें; मिळवलेलें. [सं. वि+लग्].

**विलंघणें**—उक्रि. १ उल्लंघन करणें; ओलांडणें; पलीकडे जाणें. २ (ल.) अतिक्रमण करणें; मर्यादेबाहेर जाणें. [सं. वि+लंघ्] **विलंघ्र**–वि. घोर; भयंकर; महान्. 'ऐशा गर्वोक्तीनें वदुनी पण करित ते विलंघ सती।' –कीर्तन १.१७.

**विलंची**—वि. कपटी; कुढया मनाचा.

**विलज्ज**—वि. निर्लज्ज; अविनयी; उद्धट. [सं वि+लज्जा]

**विलट**—न. कापसांतील जंतु.

**विलपणें**—अक्रि. शोक करणें; रडणें; विलाप करणें. 'तरी हे भार्या सगुण वेल्हाळ । वांचो म्हणोनी विलपत।' –मुआदि ३.५२. [सं. विलप्]

**विलंब**—पु. उशीर; अवकाश; मध्यंतर; दीर्घकाल. 'बहुविलंबाचें सन्निध पातलें।' –तुगा ६०७. [सं. वि+लंब्=लोंबणें] **विलंबिका**–स्त्री. पटकी अथवा महामारीच्या विकारांतील तिसरी व अखेरची अवस्था. पहिल्या दोन अलसिका व विषूचिका. **विलंबित**–वि. १ उशीर लागलेलें; लांबणीवर पडलेलें; लांबविलेलें, पुढें ढकललेलें (काम). २ सावकाश, मंद, (ताल). **०वृत्ति**–स्त्री. (ताल) मंदताल. –पु. मध्यलयीच्या दुपटीचा ताल. **विलंबी**–पु. साठ संवत्सरांतील बत्तिसावा संवत्सर. –वि. दीर्घसूत्री; दीर्घकाल लागणारें; उशीर करणारें; लांबण लावणारें.

**विलय**—पु. १ शेवट; नाश; प्रलय; अंतकालीन प्रलय. २ अंतर; विलंब; खंड. 'मिनलेयां वनमाळीं। वैदर्भीची अवच्छा निवर्तैली। ते सांघितां बोली। कथें विलयो पडेल।' –शिशु ८५६. [सं.] **विलया जाणें**–१ शेवट होणें; नाश होणें. २ व्यर्थ जाणें. 'काय आहलें न वाहतां भुई पेरिजे। तरी तो वेलु विलया जाइजे।' –ज्ञा ११.१६२.

**विलसणें**—अक्रि. १ शोभणें; विराजणें; चमकणें; प्रकाशणें; चकाकणें; झळकणें. –ज्ञा १८.८७७. २ वागणें; वर्तणें; असणें. 'तो कवणीं स्थिती असे। कैसेनि रूपी विलसे।' –ज्ञा २.२८९. [सं. वि+लस्] **विलसित**–वि. विराजित; शोभायमान; प्रकाशमान; तेजस्वी; सुंदर. –न. विलास; चेष्टा.

**विलक्षण**—वि. १ लोकोत्तर; चमत्कारिक; अलौकिक; असामान्य; विचित्र; नाविन्यपूर्ण. २ भिन्न; निराळा; वेगळयाच प्रकारचा, गुणाचा. 'ज्ञाता देहीं विलक्षण।' –दा १९.४.२७. ३ विपरीत. 'वचनभंग करितां विलक्षण' –दा ६.७.१०. [सं. वि+लक्ष्=पाहणें]

**विला**—स्त्री. प्रसंग; वेळ; काळ; संधि; हंगाम. [फा. विला] **दर इन विला**–या प्रसंगी; या ठिकाणीं.

**विलाचें जाळें**—न. समुद्रांत टाकावयाचें मासे पकडण्याचें मोठें जाळें; बुरीचें जाळें पहा.

**विलाज**—पु. इलाज पहा.

**विलात**—स्त्री. विलायत पहा.

**विलाप**—पु. शोक; दुःख; आरडाओरड; रडारड; आकांत. [सं. वि+लप्] **विलापणें**–अक्रि. मोटयानें शोक करणें; आकांत करणें; रडणें; आक्रंदणें. **विलापी**–वि. रडणारा; शोक करणारा.

**विलायची**—स्त्री. (ना.) वेलची पहा.

**विलायत**—स्त्री. १ मूळ देश; स्वदेश. २ उत्पत्तिस्थान; मूळचा प्रदेश (प्राणि, वनस्पति वगैरेचा). ३ (रूढ) परदेश; परकीय देश; विशेषतः इंग्लंड, यूरोप. ४ प्रांत; परगणा; प्रदेश; जनपद. 'तेरदळच्या विलायतीस शिवाजी तसवीस देतो.' –शिचप्र ५. 'विलायती खराब पडली होती.' –वाडसनदा १७४. [अर. विलायत्] **विलायती**–वि. १ परदेशी; इंग्लंडचा; यूरोपीय. 'हिंदुस्थाननें विलायती माल घेणें पातक होईल' –टि ३. २४. २ धूर्त; बिलंदर; कावेबाज; हुषार. ३ परदेशी; चमत्कारिक; लक्ष्यवेधक; असामान्य (याअर्थी कोणत्याहि विचित्र, सुंदर, अजब, कौशल्यपूर्ण वस्तूस लावतात). ४ (ल.) उनाड, उंडगा, खोडकर (मुलें). **०ऊंस**–पु. एक जातीचा ऊंस. **०कोंबडा**–पु. टर्की; गिनी फाउल. **०गवत-घास**–न. गिनी गवत; लसुणघास. **०चणा**–पु. वाटाणा. **०चिंच**–स्त्री. बारीक पानांचें बारीक शेंगा येणारें एक झाड. **०थुवर**–पु. एक जातीचा थोर; शेर. **०घोतरा**–पु. घोतऱ्याची एक जात. **०निवडुंग**–पुन. फडे निवडुंग; बिनकाटयाचा निवडुंग. **०बाभळ**–स्त्री. एक विशिष्ट वृक्ष. **०मूग**–पु. भुइमूग. **०मुळा**–पु. मुळयाची एक जात. –कृषि ६१८. **०मेंदी**–धी–स्त्री. एक वासाची, मेंदीची जात. **०वांगी**–स्त्री. टोमाटोचें झाड; बेलवांगी. **०वांगें**–न. टोमाटो; बेलवांगें. **०शेर**–पु. एक जातीचा शेर, हुरा. **०सन**–पु. ओरिसा, ओढया व बंगालचा कांहीं भाग यांत चालणारा एक शक. इ. स. ५९२ मध्यें सुरू झाला. सौरवर्ष व चांद्रमास.

**विलास**—पु. १ क्रीडा; खेळ; करमणूक; कालविनोदन; करमणूक ( विशेषतः स्त्रिया, नर्तकी, गाणारणी बरोबर ). २ चैन; मजा; रंगेलपणा; स्वैर भोग. ३ स्त्रियांचा प्रेमदर्शक हावभाव; कामचेष्टा; नखरा ( भ्रूसंकेत, लाजणें, मुरडणें वगैरे ). [ सं. वि+लस् ] **विलासिनी**—स्त्री. विलास करणारी स्त्री. –ज्ञा ९.३२३.' विलोकुनि विलासिनी जन पुनःपुन्हा कामुक।' –केका १०१. **विलासी**—वि. १ खेळकर; क्रीडासक्त; आनंदी. २ चैनी; कामुक; विषयलोलुप; भोगी; गुलहौशी.

**विलाहाळ, विलाळ**—पु. विल्हाळ पहा. ' त्या जेवणाचे विलाहाळ। अल्प अल्प सेवीतसे।' –वेसीस्व ८.७४. ' मग त्या आत्मनाचे विलाळ।' –वेसीस्व ८.७४.

**विलुप्त( दृष्टि )**—स्त्री. ( नृत्य ) पापण्यांची सारखी उघडझांप करणें व बाहुल्या न दिसूं देणें. हा अभिनय मूर्खपणा, उन्माद, दुःख, पीडा यांचा द्योतक आहे.

**विले**—विल्हे पहा. ' ऐसें एकामागें एक केलें। विलेनें नेमस्त लाविले।' –दा १६.१०.१५.

**विलेप, विलेपन**—पु.न. १ सुगंधी पदार्थ अंगास लावणें, उटणें, माखणें; उटी लावणें. २ उटणें; उटी; सुगंधीद्रव्य ( अंगास लावावयाचें ); चंदन वगैरे. ३ अंगास लावणें, चोपडणें, माखणें ( सामान्यतः ) [ सं वि+लिप् ] **विलेपित**—वि. माखलेलें; चर्चित.

**विलोकणें**—उक्रि. पाहणें; अवलोकणें; चिंतणें; जाणणें. [सं. वि+लोक् ] **विलोकन**—न. पाहणें; दृष्टि टाकणें; निरीक्षण; टेहळणी. **विलोकनीय**—वि. पाहण्यासारखें; दर्शनीय; चिंतनीय. **विलोकित**—वि. पाहिलेलें; निरीक्षण केलेलें; चिंतलेलें; टेहळलेलें. **०दर्शन**—न. ( नृत्य ) पाठीमागील वस्तु पाहणें. **०पुट**—न. (नृत्य) पापण्यांची उघडझांप.

**विलोभन**—न. फसवणूक. –नि ५३७. [ सं. वि+लुभ् ]

**विलोम**—वि. १ विपरीत; उलटा; माघारा; विरुद्ध दिशेचा. २ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या उतरत्या क्रमाच्या उलट पुरुष व स्त्री असतांना होणारा संबंध; हलक्या वर्णाचा पुरुष व वरच्या वर्णाची स्त्री यांचा संबंध व त्यासंबंधापासुन जन्मलेला; संकरज. [ सं. वि+लोम=केस. अंगावरील केसांची वाढ वरून खालीं असते यावरून ] **०क्रिया**—स्त्री. ( गणित ) दिलेल्या प्रमाणांतील संख्या उलट करण्याची क्रिया. **०त्रैराशिक**—न. व्यस्त त्रैराशिक. **०विधि**—पु. ( गणित ) दिलेल्या प्रमाणांतील संख्या उलट करण्याची क्रिया.

**विलोल**—वि. चंचल.

**विल्कल**—वि. मूर्ख; अजागळ; व्यंग. ' कितीयेक ती माणसें विल्कलेंसीं।' –दावि २८४. [ सं. विकल ]

**विल्लत**—वि. इल्लत पहा.

**विल्हन**—न. ( महानु. ) पातळ, झिरझिरीत वस्त्र. ' सोनें सेंदूर विल्हना तदुपरी क्षीरोदकी जो फूटा।' –प्रसादमालिका ५.

**विल्हय, विल्हणा, विल्हाणें**—स्त्रीपुन. वंश; कुल; गोत्र. [ अर. विल्हा ]

**विल्हा, विल्हे**—पुस्त्री. १ वर्ग; भाग; खातें ( मूळाक्षरांचें ). २ ( सामान्यतः ) प्रकार; दर्जा; विभाग. ३ ( किल्ला, भाग यास ) जोडलेला, समाविष्ट केलेला भाग; अंकित प्रदेश; प्रांत. [ अर. विल्हा ] **विल्हे करणें–लावणें**—१ निकालास लावणें; निकालांत काढणें. २ लिहिणें; व्यवस्थित मांडणें. ' दुसाला दसरीं विल्हे लावला.' –बाडबाबा २.८५. **विल्हेस लागणें**—व्यवस्था लागणें; बंदोबस्त होणें. ' तुका म्हणे तरी लागलों विल्हेसी।' –तुगा १८४५. **विल्हेस लावणें**—वर्गवारीनें, प्रतवारीनें, प्रकारानुरूप लावणें; व्यवस्था लावणें; जम बसविणें. **विल्हेस लावणें–देणें–करणें**—हवालीं, स्वाधीन, ताब्यांत देणें, करणें; सुपूर्त करणें. **विल्हेवाट, विल्हय**—स्त्री. १ उधळपट्टी; वासलात; फडशा; निकाल; धूळधाण. ' एकीची विल्हेवाट लावून दुसरी बरोबर सर्व सोहळे.' –टि ४.१३५. २ व्यवस्था; रचना; मांडणी; योग्य योजना. **विल्हेवार**—क्रिवि. वर्गवारीनें; जातवारीनें; खातेवारीनें; शिस्तवार; क्रमानें. **विल्हेवारी**—स्त्री. १ वर्गवारी; खातेवारी; वर्गीकरण; निवड. २ वर्णानुक्रमरचना. ' प्रकृत कोशाची रचना, त्यांतील गुणदोष, यांतील सारी नांवें यांचे विल्हेवारीनें दिले आहेत.' –नि १४४.

**विल्हाळ, विल्हळ**—वि. १ दीनवाणें; करुण; दुःखपूर्ण ( कथन, कहाणी, रडगाणें, कुरकुर ). ' जिवाचे विल्हाळ '=जिवाचे हाल. २ अभद्र बोलणारा; अपशकुनी; अशुभ बोलणारा. [ सं. विव्हल् ] **विल्हाळक**—स्त्री. काकळूत; पिरपिर; कुरकुर; रडगाणें. –वि. व्यर्थ; निष्कारण. ' तुका म्हणे असे हातीचे कंकण। तपासी दर्पण विल्हाळक।' –तुगा २७८१. **विल्हाळगौर**—स्त्री. नेहमीं कुरकुरणारी, पिरपिर लावणारी स्त्री; दुर्मुखलेली, अभद्र, अशुभ बोलणारी, चिंतणारी स्त्री. **विल्हाळणें, विल्हळणें**—अक्रि. १ रडगाणें गाणें; किरकिर करणें; शोक करणें. २ ( ल. ) वाचतांना, बोलतांना रडका आवाज, सुर काढणें; हेल काढणें. ३ नेहमीं मनांत अशुभ विचार आणणें; अभद्र बोलणें, चिंतणें. **विल्हाळ्या, विल्हळ्या**—वि. १ रडतोंड्या; किरकिऱ्या; पिरपिऱ्या; रड्या; रडगाणें गाणारा; तकरारी सांगणारा. २ अशुभ, अभद्र बोलणारा.

**विल्होर**—पु. ( व ) बिलवर.

**विवंचणें**—उक्रि. १ विचार करणें; चिंता करणें; मनांत घोळणें; चिंतन करणें. ' सुनमुखींचें वचन कानीं। ऐकोनी साधु विवंची मनीं।' २ विवेचन करणें; फोड करणें; स्पष्ट; करणें. ' हा अभिप्रावो संपूर्ण। विवंचूं गा।' –ज्ञा १५.४७७. ३ भेद करणें;

निवड करणें. 'तैसें दुःखितांचें शिणणें। हिरतां सकणवपणें उत्तमाधम नेणें। विवंचू गा।' -ज्ञा १६.१५५. ४ मानणें; कल्पना करणें. 'जें सर्वत्र सदा सम। तेथ विभाग अधमोत्तम। मतिवशें संभ्रम। विवंचिती।' -ज्ञा ४.७०. [सं. वि+वंच्] **विवंचना**-स्त्री. १ विचार; चिंता; घोर; काळजी; घोटाळा. (क्रि० पडणें). 'काय म्यां तेथींचें रांधिलें चाखोनि। तें हें करी मनीं विवंचना।' -तुगा २०३. २ सूक्ष्म विचार; विवेचन; विचारणा; सारासार विचार. 'लिंगत्रयांची विवंचना। विचारितां जीए सर्वस्वी ना।' -ऋ ४१. 'जेथें नाहीं विवंचना। तेथें कांहींच चालेना।' -दा १३.६.२९. ३ भेद; निवड. 'तैसी वासनांतराची विवंचना। मग आपैसी पारुखे अर्जुना।' -ज्ञा ५.१५५.

**विवज**—न. फोड; स्पष्टीकरण. 'सावज रूपाचें विवज आणवेना।' -दावि ४१९. [सं. वि+वच्]

**विवटणें**—अक्रि. स्पष्ट करणें. -मनको.

**विवटें**—न. (कुलाबा) एक जातीचा मासा.

**विवदणें**—अक्रि. १ वादविवाद करणें; चर्चा करणें; खल करणें; तकरार करणें; भांडणें. २ (महानु.) वाखाणणें; स्तुती करणें. 'लीळा निरंतर परमेश्वरू विवदना।' -गरतो ८३. [सं. वि+विद्] **विवदमान**-वि. भांडखोर; चर्चा करणारा; वाद करणारा. **विवद्धी**-वि. (ना.) खोडकर; भांडखोर; व्रात्य.

**विवर**—न. १ छिद्र; गुहा; बीळ; भोंक; पोकळी; भुयार 'सीतेच्या वाक्यांनीं जगतीला होय तत्क्षणी विवर।' -मोरामायण १.१६५. २ अवकाश; जागा. 'देवो देव भक्तालागीं। जिये विवरू देखे आंगीं।' -ज्ञा १८.१५९२. 'तें धर्मसुवर्णकाराचें यंत्रु। कीं मोक्षसिद्धीचें विवरू।' -ऋ २२. ३ स्पष्टीकरण; विवरण. 'नाना योग नाना विवर।' -दा १४.३.४६. 'तया विवरा अनुसंधान। देइजे निकें।' -सिसं ३७.२३. ४ (गणित) अंतर. 'भूमीपासुन सूर्य व ग्रह यांपावेतों रेषा कल्पिल्या तर त्या रेषांतील कोणास सूर्यांतरकोण किंवा विवर म्हणावें.' -सूर्य २३. ५ (ल.) दोष; छिद्र. 'छात्रीं नुरवीतिळहि खलदृष्टिसि गुरुराज कारुणिकविवर।' -मोणादि २.२४. [सं. वि+वृ]

**विवरण**—न. स्पष्टीकरण; सविस्तर निरूपण; फोड; उलगडा; व्याख्या. 'शास्त्रीं हेंचि विवरण।' -गुच १५.१४. [सं. वि+वृ] **विवरणें**-उक्रि. १ स्पष्ट करणें; फोड करणें; व्याख्या करणें; भाष्य, टीका करणें. 'तेवीं अष्टादसु विवरी। सायंत गीता।' -ज्ञा १८.४३. २ विचार करणें. 'हृदयीं विवरी गाधिकुमार।' -मुआदि ४०.८०.

**विवरु-रू**—पु. विस्तार; प्रकार; तपशील. 'ते पात्राराओ पात्रांगुरु। दावी हस्तकांचा विवरू।' -भाए ४५४. 'नाना भक्त मालिमां दत्त पैकांचा विवरु.' -चौऱ्याशींचा लेख [सं. वि+वृ]

**विवर्जन, विवर्जित**—वर्जन, वर्जित पहा.

**विवर्ण**—वि. रंग गेलेला; विटलेला; शुभ्र केलेला. [सं. वि+वर्ण]

**विवर्ण**—विवरण पहा. 'महावाक्याचें विवर्ण। वेगळें असे।' -दा १५.५.३०.

**विवर्त**—पु. १ भोंवरा. २ भास; भ्रम; भ्रांति; माया. 'माया ब्रह्मीचा विवर्त।' -विपू ३.२४. 'बोलतां परिणाम विवर्तु।' -भाए ५८३. 'मूळ तात्त्विक रूप सुटून दुसरें नांवरूप प्राप्त होतें तेव्हां त्यास विर्तत म्हणावें.' -गीर २३९. [सं. वि+वृ] ०**रूप**-वि. भासमात्र; मायावी. 'तेथें माया मिथ्या भान। विवर्तरूप भासे।' -दा ८.२.२. ०**वाद**-पु. मायावाद. 'प्रकृति ही स्वतंत्र दुसरी वस्तु नसुन एकजिनसी एका निर्गुण ब्रह्मावरच मनुष्याचीं इंद्रियें अज्ञानानें सगुण देखाव्याचा अध्यारोप करीत असतात या मतास विवर्तवाद म्हणतात.' -गीर २३८. **विवर्तन**-न. १ भ्रमण. २ (नृत्य) डोळा एका बाजूस फेंकणें, शृंगारद्योतक अभिनय. ०**उरू**-स्त्री. (नृत्य) टांच आंत घेऊन जंघाक्षिप्त मांड्यांची होणारी स्थिति. **विवर्तितकरण**-न. (नृत्य) हात पुढें करणें, त्रिक विवर्तन फेकणें व डावा हात रेचित करणें. ०**पार्श्व**-पु. (नृत्य) एकाच पायाच्या चवड्यावर उभें राहून कटि विवृत्त केली असतां वरचा सर्व भाग फिरविण्याची क्रिया. ०**पुट**-न. (नृत्य) खालच्या व वरच्या पापण्या जवळ आणून फिरविणें.

***विवश**—वि. पराधीन; परतंत्र. [सं. वि+वश्]

**विवशी, विंवशी, विवसी**—स्त्री. १ विघ्नदेवता; राक्षसी; भूत; डाकीण; हडळ. 'कीं लोटलेया विवसी। देखे निधान जेवि।' -ऋ १९. 'जैसी मंत्रज्ञातें विवसी। भुलवी कां।' -ज्ञा २.३१२. २ अपशकुनी, विघ्न आणणारी, दुर्दैवी स्त्री. ३ दुर्दैवाचा फेरा; कष्टदशा. 'स्वयंभू दीप विझतांच विवशी व्यापली दरबारांत।' -ऐपो ३०८. 'तरी ही राज्यास आली विवशी।' -नव १४.११५. ४ चिळस; शिसारी कंटाळा; खंत. 'तयां घायांची घेओनि विवशी। पळाला चैद्य तो।' -शिशु १०७३. 'जयांचीं जीवें घेती विवसी। तेचि जडोनि ठाके जीवेंसीं।' -ज्ञा ३.२३७. 'ते व्हेळीं घेओनि विवसी। मी जालां तापसी।' -शिशु १३२. ०**लागणें**-लावसटणें; सडणें; लांवसरणें; लागोरणें. ०**लावणें**-नाश करणें; त्रास देणें. 'आतां यादवां लावैन विवशी। तरी शैल्यु होअें।' -शिशु ८८९.

**विवसन, विवस्त्र**—वि. वस्त्ररहित, नग्न; अंगावर कपडा नसलेला. [सं.]

**विवसा**—पु. उद्योग; धंदा; काम; व्यवहार. [सं. व्यवसाय]

**विवसा**—स्त्री. (काव्य) इच्छा; कल; प्रवृत्ति; आकांक्षा. [सं. वि+इष्=इच्छा]

**विवस्कंध**—पु. सप्तस्कंधांतील पांचवा, नक्षत्र मंडळापासून शनिमंडळापर्यंतचा स्कंध; सप्तस्कंध पहा.

**विवस्था**—स्त्री. व्यवस्था पहा. [ व्यवस्था अप. ]

**विवस्वत, विवस्वान्**—पु. सूर्य. [ सं. ]

**विवळ**—वि. १ स्पष्ट; सुगम; सोपें. 'तरी बोलिले तेंचि सांगावें। विवळ करूनि।' –ज्ञा ५.१६४. २ सविस्तर. 'पुष्प तांबोल विवळी। पूजा अनुक्रमें चालविल्या।' –वेसीस्व ४.४०.

**विवळणें**—उक्रि. १ उदयास येणें; उगवणें; प्रकाशणें. 'एकां वैराग्य रवि विवळे।' –ज्ञा ४.१२८. २ स्पष्ट होणें; समजणें. 'म्हणोनि नेणणें जया विवळे।' –परमा ६.४. 'नातरी भरलेनी कावळे। दृष्टी आपभेची दिसे पिवळे। तें फिडलियां विवळे। जैसे तैसे।' –ज्ञाप्र ५४२. ३ उत्पन्न करणें; प्रसवणें, 'सूर्ये सूर्यांसी विवळे। कां फळ आवणयां फळे।' –अमृ ४.२१.

**विवळणें**—अक्रि. तळमळणें; कण्हणें; कुंथणें. 'हानी झाली विवळे।' –दा ३.७.३९. [ सं. विव्हल ] **विवळणी**–स्त्री. दु:ख; शोक; तळमळ. **विवळखोर**–वि. नेहमीं दुःख करणारा; तळमळणारा.

**विवळी**—स्त्री. एक पालेभाजी. 'चवळी विवळी कवळया शेंगा।' –अमृतसुदाम ३४.

**विवक्षा**—स्त्री. १ बोलण्यांतील हेतु, उद्देश; पुढें मांडावयाचा मुद्दा, मत; मनांतील धोरण, अनुसंधान; बोलण्याची इच्छा. २ इच्छा; हेतु; गरज; जरूरी. ३ व्याख्यान. वर्णन. 'तुझी करूं जातां विवक्षा। आदि कोणा न सांपडे।' –ह २२.१. [सं. वच्=बोलणें ] **विवक्षावशात्**–क्रिवि. वक्त्याच्या उद्देशानुसार, हेतूनुरूप; मताप्रमाणें. **विवक्षित**–न. विवक्षा पहा. –वि. १ वक्त्यानें उद्देशिलेलें; इच्छिलेलें; निर्दिष्ट; वक्त्याच्या मनांत असलेलें. २ विशिष्ट; महत्त्वाचा; प्रसिद्ध; प्रमुख; इतरांहून श्रेष्ठ (व्यक्ति, पुरुष ).

**विवाद**—पु. १ चर्चा; खल; खंडनमंडन. २ वाद; पूर्वपक्ष उत्तरपक्ष; उत्तर–प्रत्युत्तर. ३ कज्जा; खटला; फिर्याद; कायदेशीर भांडण. ४ भांडण; अपील; फेरतपासणी. 'अंमलदारांच्या फैसल्यावर विवाद जिकडे चालूं शकेल...'–खानगीखातें नियम१३१. [ सं. वि+वद्=बोलणें ] ०**ग्रस्त**–वादग्रस्त पहा. **विवादणें**–अक्रि. (काव्य ) वाद करणें; भांडणें; तंडणें. **विवादी**–वि. १ भांडखोर; तकरारी; वाद करणारा; फिर्यादी. २ अपीलंट; फेरतपासणी मागणारा. –खानगी खातें १३३. ०**स्वर**–पु. रागांतील नियमित स्वरांहून निराळा जो एखादा स्वर गायक कुशलतेनें रागरक्ति वाढविण्याकरितां रागास लावतात तो.

**विवार**—पु. १ विस्तार; प्रसरण; विकास; खुलावट. २ स्वर व उष्मवर्ण यांचा उच्चार होईइतका वागिंद्रियाचा विस्तार, विकास. बाह्यप्रयत्न पहा. [ सं. वि+वृ ]

**विवास**—पु. हद्दपारी; गृहत्याग; देशत्याग. 'निवास येथिल विवास केवळ छळणुक माझी पुरती.' –टिक १३०. [ सं. वि+वस् ]

**विवाह**—पु. लग्न; स्त्रीपुरुषांमध्यें दांपत्यसंबंध उत्पन्न करणारा विधि, संस्कार, पद्धति. याचे आठ प्रकार मनुस्मृतींत सांगितले आहेत–ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस, पैशाच. [ सं. वि+वह्; सिं. विहाउ; हिं. ब्याह ] **विवाहणें**–उक्रि. १ लग्न करणें; पत्नीचें पाणिग्रहण करणें. २ लग्न लावणें; लग्नांत देणें (मुलीस). **विवाहमेळ**–पु. विवाहप्रसंग; विवाह समारंभ; विवाहसंस्कार. 'म्हणसी मी सोयरा अति काळा। कां बोलाविसी विवाहमेळा।' –एरुस्व ४.१२. **विवाह होम**–पु. विवाहाच्या प्रसंगीं गृह्याग्निसिद्ध करून करावयाचा होम. **विवाहित**–वि. लग्न झालेला. **विवाही**–पु. व्याही; आपल्या मुलाचा किंवा मुलीचा सासरा. **विवाहोपचार**–पु. लग्नप्रसंगीं करावयाचे विधी, संस्कार, होम वगैरे विशिष्ट गोष्टी. **विवाह्य**–वि. लग्न व्हावयास योग्य, लायक, शक्य, जरूर; ज्याचें लग्न व्हावयाचें आहे असा.

**विविक्त**—न. एकांतस्थान; पृथक्स्थान. –वि. १ विशिष्ट; कृतलक्षण; निर्दिष्ट; स्पष्ट व पृथक् विचार केलेला. २ पृथक्; अलग; एकांत; आडवळणाची, बाजूची (जागा). [ सं. ] ०**पणें**–क्रिवि. एकीकडे; अलग; निराळें. 'आणि विविक्तपणें बसून कारभार करणें.' –राजे संभाजीचरित्र ६.

**विविदिषा**—स्त्री. जाणण्याची इच्छा. [ सं. विद्=जाणणें ] ०**संन्यास**–पु. ईश्वरज्ञान होण्याच्या इच्छेनें घेतलेला संन्यास. 'ऐसा जो त्यागविलास। या नांव विविदिशा संन्यास।' –एभा १८.१८३.

**विविध**—वि. नाना प्रकारचें; अनेक तऱ्हेचें. –ज्ञा १.९४. [ सं. ] ०**गुणाकार**–पु. (गणित) अनेक परिमाणांचा गुणाकार. ०**त्रैराशिक**–न. (गणित) बहुराशिक. ०**भागाकार**–पु. (गणित) अनेक परिमाणांचा भागाकार. ०**मिळवणी**–स्त्री. (गणित) अनेक परिमाणांची बेरीज. ०**वजाबाकी**–स्त्री. (गणित) अनेकपरिमाणांची वजाबाकी.

**विविक्षा**—विवक्षा पहा. तपास; विचक्षणा.

**विविक्षित**—विवक्षित पहा.

**विवृत**—धावि. विवरण केलेलें; स्पष्ट केलेलें; उलगडा, फोड केलेलें. [ सं. वि+वृ ]

**विवृति**—स्त्री. विवरण; स्पष्टीकरण; फोड; उलगडा.

**विवृत्त**—पु. वर्णोच्चार होण्याकरितां वायुसंबंधीं प्रयत्न, क्रिया. प्रयत्न पहा. [ सं. ] ०**कटि**–स्त्री. (नृत्य) एका पायाच्या चवडयावर उभें राहून दुसरा पाय अंतराळीं ठेवून अर्धी गिरकी मारणें.

**विवेक**—पु १ विचार; तारतम्यबुद्धि; समज; तर्क; बुद्धि. ' मज विवेकु सांगावा । मऱ्हाटा जी । ' –ज्ञा ३.१७. ' जैसा मूर्तिमंत विवेक । तैसा जाण राजा भीमक । ' –एरुस्व १.१२. २ सदसद्विवेक; संयम; समंजसपणा; चित्तवृत्तिनिरोध. ' मला अन्नाचा तिटकारा आला आहे पण विवेकानें खातों. ' ३ (वेदांत) नित्यानित्य, सत्यासत्य, यांमधील भेद जाणण्याचें ज्ञान; साधनचतुष्टयांतील पहिलें साधन. ' आहे दिठी डोळयां विवेकु । अपाडु जैसा । ' –ज्ञा १८.२७३. ४ वाटाघाट, चर्चा वगैरेमुळें होणारा समेट, तह. ' विवेक व्हावया प्रकार दिसत नाहीं. ' –खरे १५३९. [ सं. विच्= विवेक करणें ] ०जागविणें–तारतम्यबुद्धि जागृत करणें; विचार करणें. ' ते अनुभवी जाणती सम्यक । ज्यांनीं विवेक जागविला । ' ०वंत–विचारी; इष्टानिष्टाची निवड करण्यास समर्थ. ' देखा विवेकवंतु सुविमळु । ' –ज्ञा१.१४. ०वादी–पु. बुद्धिवादी; तर्ककर्कश; विचारास पटेल तेंच मानणारा. (इं.) रॅशनॅलिस्ट. ' तो प्रथम विवेकवादी ( रॅशनॅलिस्ट ) होता ' –सुदे १६७. ०सभा–स्त्री. पंडितांनीं चर्चा करावयाची जागा. रायगडांत शिवाजीच्या वाड्यांत होती. –शिदि ४१६. ०हंस–पु. विवेकी पुरुषरूपी हंस. –एभा १.२३. ०हीन–वि. अविचारी; विचार न करणारा; तारतम्यबुद्धि नसलेला. **विवेकाढ्य, विवेकी**–वि. विचारी; न्यायी; तारतम्य जाणणारा; बुद्धिवान; समंजस; शाहणा. ' प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी । ' –दा १२.१२.

**विवेचक**—वि. विवेचन करणारा; विचारी; तारतम्य पाहणारा. ०बुद्धि–स्त्री. सारासारविचार. ' विद्यार्थ्यांना कॉलेज सोडायला लावतांना विवेचन बुद्धि जरूर उपयोगांत आणली पाहिजे. ' –केले १.३४९.

**विवेचन-ना**—नस्त्री. १ निवडानिवड; तारतम्य; अवयवशः पृथक्करण करून केलेला विचार; सर्व बाजूंचा विचार; योग्यायोग्य विचार. २ स्पष्टीकरण; फोड; उलगडा. [ सं. विच्=विचार करणें ] **विवेचनीय**–वि. स्पष्ट करण्यास, निवड करण्यास, विचार करण्यास योग्य; तारतम्य पाहण्यालायक; योग्यायोग्य पाहण्यासारखा. **विवेचित**–वि. तारतम्य जाणलें आहे असा; योग्यायोग्य पाहिलेला.

**विव्वोक**—पु. विवेक. ' तारुण्यादि मदानें जो अनादर तयासि विव्वोक । ' –गंगाधर, रसकल्लोळ १३६.

**विव्हल-लित, विव्हळ-ळित**—वि. (प्र.) व्याकूळ; दुःखी; त्रस्त. [ सं. ह्वल् ] ' टाकिती विव्हाळा धरणी अंग । ' –तुगा १०९. **विव्हळा**–स्त्री. यातना; दुःख; पीडा. ' तो रोगिया जेविं विव्हळा । सवता होय । ' –ज्ञा १७.१०१. **विव्हळगौर**–स्त्री. नेहमीं रडकथा गाणारी, कुरकुरणारी, रडवी स्त्री.

**विव्हाव**—विवाह पहा. ' संभ्रमें मांडिला विव्हाव । ' –दा ३.२.३५.

**विशंक**—वि.क्रिवि. निर्भय; शंकारहित; निःशंक; निःसंशय. ' जिंकी कपटी जी श्री श्रीदश्रीशीं विशंक तोलावी । ' –मोसभा ४.११.

**विशकल**—वि. मोडून तुकडे झालेला; भंगलेला; फुटलेला; तुटलेला. [ वि+शकल ] ०न–न. तुकडे करणें; भाग पाडणें; फोडणें; तोडणें.

**विंशति**—वि. वीस. [ सं. ]

**विशद**—वि. १ स्पष्ट; प्रांजल; निर्मल; स्वच्छ; प्रगट; दिसण्याजोगें. ' मुळीं नसतां विशद । ' –दा १७.२.१५; –ज्ञा ९.२१०. २ उघडें; ऐसपैस; मोकळें; विस्तृत. [ सं. वि+शद् ] **विशदर्थे**–क्रिवि. स्पष्टपणें; स्वच्छपणें. ' आपणांस मामल्यापासून मुक्त करावें म्हणून विशदर्थे लिहिलें. ' –शारो १.६१.

**विशंभणें**—विसंबणें पहा. ' दोघेहि क्षण येक न विशंभती । ' –दा ३.३.३५.

**विशय**—पु. विषयाविषयीं संशय. –धर्मशास्त्रविचार, काणे.

**विशरण**—न. सडकेपणा; कुजणें; विध्वंस; विघात; विच्छेद; चकनाचूर. [ सं. वि+शॄ ]

**विशाखा**—स्त्री. सोळावा नक्षत्रपुंज. [ सं. ]

**विशाण**—विषाण पहा.

**विशाप**—वि. उःशापित; शापापासुन निवृत्त; शापमुक्त.

**विशांपति**—न. राजा; प्रजेचा नायक. [ सं. ]

**विशारत**—स्त्री. (अप) इशारत पहा. –तुगा ३७७८.

**विशारद**—वि. प्रवीण; निपुण; विद्वान; पटाईत. [ सं. ]

**विशाल-ळ**—वि. लांबरुंद; मोठा; भव्य; अवाढव्य; विस्तृत; अफाट. ' वरी बिंब तें लाल आल विशाळ । ' –मराठी पहिलें पुस्तक. –ज्ञा १.१९. ०कोन–पु. काटकोनापेक्षां मोठा कोन. ०स्कंध–वि. रुंद खांद्याचा. **विशाळणें**–अक्रि. मोठें होणें. ' आपण विवेकें विशाळला । ' –दा ९.९.३२.

**विशाळू, ईशाळू**—वि. (महानु.) विषयालु; विषयी. –दृष्टांतपाठ ५९.

**विशिख**—पु. १ यवन. –ख ५४७९. २ इंग्रज. –पया १७५. ३ बाण. –वि. शिखानष्ट; शेंडी नसलेला. [ सं. वि+शिखा= शेंडी ]

**विशिष्ट**—वि. १ कांहीं तरी ठळक गुण असणारा; कांहीं असामान्य गुणामुळें उठून दिसणारा; विशेष लक्षणयुक्त. २ युक्त; संबद्ध; अंगीं असणारा; अंतस्थ किंवा अधिष्ठित असलेला. उदा० घटविशिष्ट भूतल, जलविशिष्ट पात्र, अंतःकरण विशिष्ट चैतन्य, हस्तपादावयवविशिष्ट देव, शिखाविशिष्ट हिंदु इ०. ३ असामान्य;

असाधारण; श्रेष्ठ; निराळा. ' गुरुपद सर्वांत श्रेष्ठ। त्याहून नाहीं कोणी वरिष्ठ। कल्पवृक्ष म्हणावा विशिष्ट। तरी कल्पिले पुरवी तो।' –ह १.४८. ' विशिष्टां व्रतांचे फोक।' –ज्ञा १५.१९१. [ सं. वि+शिष्=भेद करणें ] ०उष्णता–स्त्री. ( शाप. ) पदार्थाचें एक अंश तपमान वाढविण्यास लागणारी उष्णता. ( इं. ) स्पेसिफिक हीट. ०गुरुत्व–न. ( शाप. ) पदार्थाचें पाण्याशीं तुलनात्मक भारमान. ( इं. ) स्पेसिफिक ग्रॅव्हिटी. ०ज्ञान–न. एखाद्या पदार्थाचें त्यांतील कांहीं विशेष गुणधर्मामुळें किंवा विशेष प्रसंगामुळें होणारें विशेष ज्ञान. याच्या उलट विषयज्ञान म्हणजे एखाद्या पदार्थाविषयीं सामान्यज्ञान. **विशिष्टाद्वैत**–न. रामानुजाचार्योचें मत. चिदचिद्विशिष्ट ईश्वर एकच होय व ईश्वरशरीरांतील या सूक्ष्मचिदचिदापासून पुढें स्थूल चित् व अचित् किंवा अनेक जीव व जगत् निर्माण होतात हें मत.

**विशी**—स्त्री. १ वीस वर्षांचें वयोमान. ' विशी विद्या तिशीं धन. ' २ वीस वस्तूंचा समुदाय, गट. [ वीस ] **विशी बाविशी किंवा विशी एकुणविशी**–किंचित् चढउतार; थोडा फरक.

**विशीं**—शअ. ( अप. ) विषयीं पहा. ' जें ज्ञानविशीं उणें।' –दा ५.७.२०. ' तधिपासुनि कोण्हे विशिचें सुख,न देखेचि।' –पंच २.४. ' प्रपंचविशीं सादर।' –दा २.१०.२७. ' कांहीं चिंता कोणा नाहीं कोणे विशीं।' –तुगा १०२.

**विशीर्ण**—वि. जीर्ण; कुजलेला; मोडकातोडका; पडका; चुराडा झालेला; चकनाचूर झालेला; अवयव वेगळे झालेला. [ सं. वि+शॄ ]

**विशुद्ध**—धावि. शुद्ध; स्वच्छ; निर्मळ केलेल; धुतलेलें. ' जयजयदेवविशुद्ध।' –ज्ञा १८.७. **विशोधित**–वि. अत्यंत शुद्ध; पवित्र; स्वच्छ; निर्मळ. [ सं. ] ०चक्र–न. ( योग ) कंठाच्या ठिकाणीं असणारें षट्चक्रांपैकीं एक कमळ. ' कंठी जाणिजे विशुद्धचक्र। तें षोडशदळ अतिशुभ्र। तेथें प्रतिपत्रीं षोडशस्वर। अकारादिक्।' –विउ १.५२. **विशुद्धि**–स्त्री. १ स्वच्छता. २ शुचिर्भूतपणा; पवित्रता. ३ बिनचूकपणा; निर्दोषता; अचूकपणा; बरोबरपणा.

**विशूचिका**—स्त्री. विषूचिका पहा. पटकींतील एक विकार

**विशृंखल**—वि. बंधमुक्त; अनिर्बंध; स्वैर; मोकाट. [ सं. वि+शृंखला ] ०पणा–न. उद्दामपणा; दांडगेपणा; उच्छृंखलपणा. ' यासी उपमाचि नसे दुसरी त्याच्या विशृंखळपणातें।' –मोसभा ४.५०.

**विशेख**—वि. ( अप. ) विशेष पहा. ' जया नाहीं सामान्य विशेख।' –रंयो १.८१७.

**विशेष**—पु. १ असामान्य गुण, धर्म, लक्षण, चिन्ह; वैशिष्ट्य; वैलक्षण्य; एकदेशीयता; असाधारणपणा; निराळेपणा; श्रेष्ठता. २ विशिष्ट गोष्ट, व्यक्ति; विशिष्ट गुणधर्मानें युक्त पदार्थ. ३ अपवाद. ४ ( गणित ) अंतर; फरक; विवक्षित प्रमाणापेक्षां अधिक. ' तया आणि खपुष्पा। विशेषु काई।' –अमृ ७.५३. –वि. असामान्य; असाधारण; सुप्रसिद्ध; एकाकी; बराच मोठा; अधिक; वरचढ. –क्रिवि. ( विशेषेंकरून ) मुदाम; मुद्दामहून; प्रामुख्यानें; फारकरून; बहुतकरून; आधिक्येंकरून. [ सं. वि+शिष् ] **विशेषगुण**–पु. पंचमहाभूतांचे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांच गुण. **विशेषण**–न. ( व्या. ) १ गुण अथवा संख्या दाखविणारा शब्द; नामाबद्दल अधिक माहिती देणारा शब्द. २ कर्त्याविषयीं विशिष्ट विधान करणारा शब्द; विधेय. [ सं. वि+शिष् ] **विशेषणें**–अक्रि. विशेष वर्णन करणें. ' अर्जुना तोचि योगी। विशेषिजे जो जगीं।' –ज्ञा ३.७५. ' हे कांई विशेषावें।' –दाव २७८. **विशेषतः**–क्रिवि. मुख्यत्वेंकरून; प्रायः; मुद्दाम; बळेंहून. **विशेषनाम**–न. ( व्या. ) वस्तूंचे अथवा स्थानाचें नांव; ज्या नामानें विशेष वस्तूचा, प्राण्याचा अथवा समूहाचा बोध होतो तें नाम. **विशेषलिंग**–न. विशेषविभूति; महत्त्वाच्या, प्रमुख विभूति. ' तेवीं माझिया विशेषलिंगां। नाहीं मिती।' –ज्ञा १०.३०१. **विशेषज्ञान**–न. ब्रह्मज्ञान; जीवाच, चैतन्याचें ज्ञान. **विशेषात्कार**–पु. असामान्यत्व; असाधारणता; चमत्कृति; वैशिष्ट्य; निराळेपणा. –क्रिवि. ( विशेषात्कारेंकरून, विशेषेंकरून ) मुख्यत्वेंकरून; मुद्दामहून; विशेषत्वानें, वैशिष्ट्यानें; प्रायशः; बहुतकरून; फारकरून. **विशेषित**–वि. प्रसिद्ध; विशेषगुणधर्मांनें ज्ञात; निर्दिष्ट. **विशेषें-करून**–क्रिवि. बहुतकरून; फारकरून; मुख्यत्वेंकरून; ' हें विशेषेंहि न घडेल। याचि लागीं।' –ज्ञा ६.४१७.

**विशेष**—पु. धूप; एका वृक्षाचा रस, चीक.

**विशेषक**—न. ज्या तीन श्लोकांमिळून एक कल्पना व्यक्त होते अशा तीन श्लोकांचा समूह.

**विशेषोक्ति**—स्त्री. अर्थालंकार. कारणसमुच्चय असून कार्योत्पत्ति होत नाहीं त्या ठिकाणीं हा अलंकार असतो.

**विशेष्य**—न. ( व्या. ) १ विशेषण ज्याचा गुण दाखवितें तें; नाम; द्रव्यवाचक शब्द. २ कर्ता; उद्देश्य.

**विशेष्यनिघ्न**—वि. विशेषण; विशेष्याच्या, नामाच्या लिंगवचनानुरोधानें असणारें.

**विशो-षो**—पु. विषय. ' केला लोकां यया। दिठीचा विषो।' –ज्ञा १८.१७३५.

**विशोक**— वि. शोक, दुःख, मानसिक त्रास यापासून अलिप्त. [ सं. वि+शोक ]

**विशोधित**—वि. शुद्ध केलेलें. [ सं. वि+शुध् ]

**विंशोपक**—पु. विसावा अंश. ( ज्यो. ) पंचांगाच्या आरंभीं निरनिराळ्या गोष्टींचे, फलाचे त्या वर्षांतील विंशत्यात्मक पद्धतीनें दिलेलें भाग, विसावे हिस्से दाखविणारें कोष्टक. [ सं. विंशति

**विशोभित**—वि. शोभाहीन; सौंदर्यहीन; बेडौल; बेढब.

**विश्रंभ**—पु. विश्वास; मैत्री; दृढस्नेह. [सं.]

**विश्रंभालाप**—पु विश्वासानें सांगितलेल्या गोष्टी; स्नेहानें, मित्रत्वानें सांगितलेल्या कथा.

**विश्रांत**—वि. १ श्रम, काम यांपासुन मुक्त; स्वस्थ. २ दमलेला; भागलेला; थकलेला. [सं. वि+श्रम्=दमणें]

**विश्रांति**—स्त्री. (रूढ विश्रांत) १ विसावा; आराम; सुट्टी; फुरसत; स्थिरता. २ करमणूक; आराम (श्रमानंतर); मनोविनोदन. ३ करमणुकीचें साधन; क्रीडादि मनोविनोदनाचीं साधनें. ४ (विनोदानें) कामापासुन, श्रमापासुन सुटका; कार्यराहित्य; कार्यशून्यता. 'एकच दौत आहे ती तुम्ही घेऊन गेला म्हणजे इकडे विश्रांति झाली म्हणून समजा.' ५ पर्यवसान; परिणामींची स्थिति; शेवटची स्थिति; अंतिम स्थिति; मोक्ष. 'चौकशी करतां त्या दोघांवर मात्र चोरपणाची विश्रांति झाली.' 'मनें मन घालूनि मागें। विश्रांति जालिया आंगें.'—ज्ञा १४.५०. 'ज्ञानासि सुजन्म जोडे। आपली विश्रांतिही वरी वाढे।'—ज्ञा १६.५९. **विश्रांति असणें**—आधार, आश्रय असणें; भरंवसा असणें; अवलंबून असणें. 'माझ्या आशांची विश्रांति तुम्हावर आहे.'

**विश्राम**—पु. १ विश्रांति; आराम; विसावा. 'समाधीसी तेथें विश्राम। मनोरम हरिपदीं।'—एरुस्व १.८६. २ विश्रांतिस्थान. 'ब्रह्मविद्येचा विश्रामु।'—ज्ञा १७.३३. **विश्रामणें**—अक्रि. विसावा घेणें. 'त्यांच्या ठायीं तुझें मन। विश्रामत नाहीं कीं।'—मुसभा ३.१४२. **०धाम**—न. विश्रांतिस्थान; लयस्थान. 'जें जगदादि विश्रामधाम। तयातें एक नाम।'—ज्ञा १७.३२८. **०शालिका**—स्त्री. विश्रांतिस्थान. 'जे महदादि विश्रामशालिका हे।'—ज्ञा १४.६७. **०शाळा**—स्त्री. धर्मशाळा. 'कीं निम्होळ संसारवाटेची विश्रामु शाळा।'—शिशु ३३.

**विश्रृंखल-ळ**—वि. विशृंखल पहा.

**विश्रुत**—वि. प्रसिद्ध; प्रख्यात; विख्यात; नांवाजलेला. **विश्रुति**—स्त्री. कीर्ति; प्रसिद्धि.

**विश्लेष**—पु. १ वियोग; विरह; ताटातूट (प्रेमीजन, पतिपत्नी यांची). २ (सामान्यतः) वेगळें करणें; ताटातूट; वियोग; पृथक् करणें; अलग करणें. ३ (गणित) वजाबाकी. **०जाति**—स्त्री. उणें संख्यांची बेरीज. **विश्लेषण**—न. (शाप.) पृथक्करण; विघटन. (इं.) डिसोसिएशन.

**विश्व**—न. जग; सृष्टि. 'तैसें व्यासमति कवळलें। मिरवे विश्व।'—ज्ञा १.३९. —वि. सर्व; सगळें; अचाट; अगणित. [सं.] **०कर-विश्वंकर**—पु. सृष्टिकर्ता. **०कर्मा**—पु. १ ब्रह्मदेवाचा पुत्र व देवांचा शिल्पकार, सुतार, कारागीर. २ हुषार कारागीर; शिल्पी. **०कारण**—न. (काव्य) सृष्टिनिर्माणकर्ता; ब्रह्मदेव. **०कुटुंबवादी**—पु. सर्व जग हें एक कुटुंब असुन सर्व लोक त्या कुटुंबांतील भागीदार आहेत असें मत असणारा. 'त्याचीं मतें नास्तिक्याकडे झुकत होतीं व तो जहाल विश्वकुटुंबवादी बनत चालला होता हें सुशीलेला ठाऊक नव्हतें.'—सुदे २०६. **०कुटुंबी**—पु १ सर्वसृष्टि हें ज्याचें कुटुंब आहे तो परमेश्वर. २ (ल.) उदार आश्रयदाता; जनकल्याणकर्ता; मोठ्या कुटुंबाचा धनी. **०कोश**—पु सर्व विषयांचें ज्ञान देणारा मोठा ग्रंथ. **०जनीन-जनीय**—वि. सर्वजगास योग्य, सोईस्कर, हितकर, लाभदायक, संबद्ध. **०जित्**—पु. एका यज्ञाचें नांव; जग जिंकणारा. 'ज्या विश्वजित् यज्ञांत यजमानानें आपलें सर्वस्व दान करावें असें सांगितलें आहे ...'—टि ४.५१. **०जीवन**—न. (काव्य) सृष्टीचा प्राण; परमेश्वर. **०दुनी**—स्त्री. सर्वजग; सर्वसृष्टि; सर्व मानवजाति अलमदुनीया याप्रमाणें. 'देवा विश्वदुनीच्या भाग्यानें शेत पिको.' [विश्व+फा. दुनिया] **०धाया**—पु. सृष्टीचा आधार; परमेश्वर. **०नेत्र**—पु. सृष्टीचा, जगाचा डोळा; परमेश्वर. **०पाल-विश्वंभर**—पु. जगाचें पोषणकर्ता; जगाचें पालन करणारा; परमेश्वर **०प्रयत्न**—पु. अचाट प्रयत्न; शक्य ते सर्व प्रयत्न. **०प्रामाण्य**—न. सर्व जगाला प्रमाण असें; सर्व जगास योग्य वाटणारें तें. 'जे विश्वप्रामाण्याची मुद्री। आणि तुझ्या हातें असे सुबुद्धी।'—ज्ञा १६.४६८. **०बाहु**—पु. ज्याचे हात सर्वत्र आहेत असा; परमेश्वर. —ज्ञा १३.८७४. **०बीज**—न. सर्वसृष्टीचें मूळ; आद्यकारण; परमेश्वर. **०ब्राह्मण**—पु. सुवर्णकार; देवशिल्प करणारी जात. **०भेषज**—न सार्वत्रिक औषध; सुंठ. 'मध आणि विश्वभेषज हे पदार्थ दारूंत मिसळून द्यावेत'—अश्वप २.१३४. **०मंगल**—न. सर्व सृष्टीचें कल्याण, सुख, सुदैव, शुभ. —वि. सर्वजगाचें कल्याण करणारा; शुभदायक. **०मतिचालक**—पु. सर्व जगाच्या मनांत प्रेरणा करणारा; सर्वांच्या बुद्धीस चालना देणारा. **०मूर्धा**—पु. ज्याचें डोकें सर्वत्र आहे असा; परमेश्वर. —ज्ञा १३.८७८. **०मोहिनी**—स्त्री. सर्व जगास भुरळ पाडणारी, भुलविणारी, मोहून टाकणारी.—ज्ञा १.२१. **०रचना**—स्त्री. सृष्टीची व्यवस्था; घटना. —ज्ञा २.९५. **०रूप**—वि. १ सर्व सृष्टीमधील वस्तूंचीं रूपें धारण करणारा; सर्व सृष्टीमधील वस्तूंच्या रूपांत असणारा; ब्रह्माचें उपपद. २ व्यापक; महत्त्वाचा. 'म्हणतां जाय पाप। प्रश्न असे विश्वरूप।'—गुच २६.९७. **०विद्यालय**—न. विद्यापीठ; अनेक विद्यांचें अध्ययन-अध्यापनादि कार्य करणारी संस्था. (इं.) युनिव्हर्सिटी. **०व्यापक-व्यापी**—वि. सर्वव्यापी; सर्वत्र भरून राहिलेलें, सर्व वस्तुमात्राशीं संबद्ध. **०व्याप्ति**—स्त्री. सर्व सृष्टीमध्यें भरून राहणें. **०संस्था**—स्त्री. (ज्यो.) सूर्य, चंद्र, ग्रह, तारे व इतर आकाशस्थ ज्योती ज्या आकाशाच्या प्रदेशांत कार्य करितात तो प्रदेश. (इं.) युनिव्हर्स. **०साक्षी**—वि. सर्व सृष्टीस पाहणारा. **०सृट्**—पु. सृष्टिकर्ता; जग

निर्माण करणारा; ब्रह्मा. **विश्वतः**-क्रिवि. सर्व ठिकाणीं; सर्वत्र. **विश्वतश्चक्षु**-पु. ज्याचे सर्वत्र डोळे आहेत असा, ज्याला सर्व दिसतें असा; परमेश्वर. -ज्ञा १३.८७. **विश्वतोभय**-पु. सर्व बाजूंनीं भय उत्पन्न करणारा; परमेश्वर. -एभा २.१०१. **विश्वतोमुख**-पु. सर्व बाजूंनीं ज्यास मुखें आहेत असा; परमेश्वर. -ज्ञा ११.२३३. **विश्वतोमुखीं**-क्रिवि. सर्वांचें तोंडीं; सर्वतोमुखीं; ज्याच्या त्याच्या तोंडीं; सर्वांच्या बोलण्यांत. **विश्वाचा जिव्हाळा**-पु. १ सृष्टीचाप्राण, जीव. २ (संकेतानें) शिव. **विश्वात्मक**-वि सृष्टिस्वरूपी. -ज्ञा १५.५९५. **विश्वात्मा**-पु. सृष्टीचा प्राण; जगदात्मा; सर्वव्यापी तत्त्व; ब्रह्म. **विश्वांघ्रि**-पु. ज्याचे सर्वत्र पाय आहेत असा. -ज्ञा १३.८७४. **विश्वानुसार**-वि. सृष्टींतील पदार्थांप्रमाणें. -ज्ञा १६.१७३. **विश्वाभिराम**-वि. जगाचा आवडता; जगत्प्रिय; परमेश्वर. **विश्वाभिमान**-पु देह हा मी व सर्व सृष्टि माझा भोग्य विषय होय असा अभिमान. **विश्वेश**-पु. सृष्टीचा स्वामी, मालक; परमेश्वर. -ज्ञा १५.४०. **विश्वेशराव**-पु. सर्व सृष्टीचा प्रभु; मालक; परमेश्वर. -ज्ञा १८. १८०१. **विश्वेश्वर**-पु. १ सर्व सृष्टीचा प्रभु; परमेश्वर. २ काशीक्षेत्रांतील मुख्य देवता. **विश्वोदयपंथ**-पु. माया. **विश्वोद्धार**-पु. सर्व सृष्टीचें रक्षण, तारण, उद्धरण. २ सृष्टितारक, रक्षक परमेश्वर.

**विश्वसनीय**—वि. खात्रीलायक; विश्वास ठेवण्यासारखा; विश्वासु; प्रामाणिक; पतदार. [सं. वि+श्वस्] **विश्वसित**-धावि. ज्यावर विश्वास, भरंवसा ठेवलेला आहे असा. **विश्वस्त**-वि. १ विश्वासून राहिलेला; ज्यानें भरंवसा ठेवलेला आहे असा. २ ज्यावर विश्वास ठेवला आहे तो; विश्वासु; खात्रीचा. ३ एखाद्या व्यक्तीची अथवा संस्थेची मालमत्ता सुरक्षितपणें ताब्यांत ठेवणारा. [इं. ट्रस्टी]

**विश्वा-स्वा**—पु. विसावा अंश; निश्चित प्रमाणाचा विसावा भाग; रुका किंवा रति यांचा विसावा भाग. [सं. विंशति] **आठराविश्वे दारिद्र्य**-पूर्ण दारिद्र्य म्हणजे वीस विश्वे पैकीं अठराविश्वे म्हणजे जवळ जवळ पूर्ण दारिद्र्य. ०**घाट**-पु. घाटांतील विश्वा नाण्यांतील जकात. बाजारावरील कर.

**विश्वामित्र**—पु. १ एक प्रसिद्ध ऋषि; श्रीरामाचा गुरु. २ (संकेतानें) अत्यंत त्रासदायक, पीडाकारक मनुष्य. [सं.] ०**सृष्टि**-स्त्री. विश्वामित्रानें उत्पन्न केलेल्या वस्तू. ब्रह्मदेवाशीं स्पर्धा करून विश्वामित्रानें प्रतिसृष्टि निर्माण केली अशी कथा आहे त्यापैकीं मनुष्याच्या डोक्यासारखा नारळ, गाईऐवजीं म्हैस, घोड्याऐवजीं गाढव हीं उदाहरणें देतात. **विश्वामित्री**-स्त्री. म्हैस (विश्वामित्र सृष्टींतील म्हणून संकेतानें). 'विश्वामित्री पोटीं तयाचा अवतार। नांव महाखर चांडाळाचें।' -तुगा २८४५.

**विश्वावसु**—पु. एकुणचाळिसावा संवत्सर.

**विश्वास**—पु. १ भरंवसा; खात्री; निश्चय; इमानदारी. २ श्रद्धा; मनाचा अनुकूल ग्रह. [सं. वि+श्वस्=श्वास घेणें] ०**घात**-पु. १ विश्वास दाखवून फसवणूक; बेभरंवसा; बेइमानी; दगलबाजी; खोटेपणा. २ (कायदा) विश्वासानें ताब्यांत दिलेल्या मालाचा लबाडीनें गैरशिस्त उपयोग करणें. ०**घातक-घातकी**-वि. बेमान; लबाड; खोटा; कृतघ्न. ०**जामीन**-पु. खात्रीसाठीं जबाबदार; विश्वासप्रतिभू. ०**निधि**-पु. अत्यंत भरंवशाचा माणूस. ०**प्रतिभू**-पु. विश्वासपणाबद्दल हमी घेणारा; एखादा मनुष्य खात्रीलायक आहे म्हणून हवाला देणारा. **विश्वासणें**-अक्रि. १ भरंवसा धरणें; विश्वास ठेवणें. २ अवलंबून राहणें; भरंवशावर राहणें; हवालीं करणें; स्वाधीन करणें. 'जो दुसऱ्यावरी विश्वासला। त्याचा कार्यभाग बुडाला।' -दा. ३ (काव्य) खरें, सत्य मानणें. **विश्वासला**-पु. ज्यानें विश्वास ठेविला आहे असा. 'विश्वासला आतुडवीजे चोरा।' -ज्ञा १६.२६०. **विश्वासिक**, **विश्वासुक**, **विश्वासू-क**-वि. प्रामाणिक; विश्वास ठेवण्यालायक; भरंवशाचा. 'मित्रा माझिये मती। विश्वासिक तूं एक।' -मुआदि ३५.४८. **विश्वासी**-वि. १ खात्रीचा; भरंवशाचा. २ भरंवसा ठेवणारा.

**विश्वेदेव**—पुअव. स्वर्गातील एक दहा देवतांचा समूह; यांस श्राद्धप्रसंगीं अवाहन करतात. 'अश्विनौदेव विश्वेदेव विभवें। आयुही हे जी।' -ज्ञा ११.३३२. [सं.]

**विष**—न. १ एक भयंकर मारक द्रव्य; जहर; वीख. याचे नऊ प्रकार मानतात ते-कालकूट, हलाहल, सौराष्ट्रिक, ब्रह्मपुत्र, प्रदीपन, काकोल (शृंगक), वत्सनाभ (बचनाग), शौक्तिकेय, (सक्तुक), दारद (हरिद्र). तसेंच याचे स्थावर व जंगम असे भेद आहेत. २ (ल.) अत्यंत कडू पदार्थ; घातक, मारक, बाधक अहितकारक पदार्थ. ३ (ल.) ज्यापासून अपाय, घात होण्याचा संभव आहे असें द्रव्य, संपत्ति वगैरे पदार्थ. [सं. विष्=पसरणें] **विष मानणें**-अत्यंत तिरस्कार, तिटकारा करणें. **विषाची परीक्षा पाहणें**-एखादा भयंकर प्रयोग, साहस, धाडस करणें. सामाशब्द- ०**कंठ**-पु. शिव; शंकर. [सं. विष+कंठ] ०**घटी**-स्त्रीअव. (ज्यो.) नक्षत्रांच्या अशुभ मानलेल्या चार घटिका. ०**घ्न**-वि. विषमारक; विषनाशक; विषहारक; विष उतरणारें. ०**द**-वि. विष देणारा. ०**दग्ध-दिग्ध**-वि. विषयुक्त; विष लावलेलें 'राजा सुधन्वा आमच्या हृदयांत विषदग्ध बाणाप्रमाणें सलत आहे.' -सुधन्वा नाटक ६. ०**दृष्टि**-स्त्री. घातक, मारक, नाशक नजर; ज्यावर पडेल त्याचा नाश करणारी नजर. -वि. घातक नजर असलेला. ०**नाशक**-वि. विष उतरणारें; विषाचा परिणाम कमी करणारें. ०**पदार्थ**-पु. विषारी, घातक, मादक पदार्थ; विष.

०प्रयोग–पु. विषाचा उपयोग; विष देऊन, चारून, घालून मारण्याची क्रिया; विषाची योजना. ०वल्ली–स्त्री. १ विषारी वेल. २ (ल.) दुष्ट, द्वेषी मनुष्य. ०वैद्य–पु. विषबाधेवर उपचार करणारा (वैद्य, मांत्रिक). ०व्रतति–स्त्री. विषवल्ली. ०हर–हारक–अपहारक–वि. विषाचा परिणाम नाहींसा करणारा; विष उतरणारा. **विषाचा मोहरा**–पु. जहरी मोहरा. (इं.) बेझोर.

**विषइ(ई)क**—वि. विषयी; विषयासक्त. 'वाटेल विषइका अघोर वाईट।' –दावि २०७.

**विषई**—शअ. विषयीं पहा.

**विषकट**—वि. (काव्य) अवाढव्य; विशाल; विस्तीर्ण; राक्षसी; प्रमाणाबाहेर मोठें. 'म्हणे विषकट हृदयायेक हेत। पूर्ण माझा करीका।' [सं. विष्=पसरणें]

**विषण्ण**—वि. खिन्न; दुःखी; म्लान; निरुत्साही. [सं. वि+सद्] ०दृष्टि–स्त्री. (नृत्य) बुबुळें इकडे तिकडे हालवून मध्येंच स्तब्ध करणें व अधोगत पाहणें.

**विषदु**—वि. विशद पहा.

**विषम**—न. संकट; अडचण. 'सांभाळा जी माझीं विषमें अनंता। जवळी असतां अव्हेरू कां।' –तुगा १५८८. 'एरव्हीं देहांतीं थोर विषम। या मार्गीचें आहे संभ्रम।' –ज्ञा ८.२४३. –पु. १ एक प्रकारचा ज्वर. –ज्ञा. २ भेदभाव. 'तो अधिंचि नाहीं आघवा। आतां विषय काई।' –ज्ञा ५.९५. –वि. १ सम नव्हे तें; सारखें नव्हे असें; दोहोंनीं भाग न जाणारी (संख्या); कमीजास्त; लहान मोठें; व्यस्त. २ असमान; एका पातळींत नव्हे असें; उंचसखल; वांकडातिकडा; भिन्न; सरळ नव्हे तो. 'परि ते भजती उजरी नव्हे। विषम पडे।' –ज्ञा ९.३४५. ३ अशुभ; विरुद्ध; प्रतिकूल; उलटा; उफराटा. 'तैसा विषमांहि जीवां–। लागीं उजुकारु बखा।' –ज्ञा १८.८४३. ४ कठिण; अवघड; त्रासदायक; मनाविरुद्ध; दुष्कर. 'अगा आपुला हा स्वधर्मु। आचरणीं जरी विषमु।' –ज्ञा १८.९२३. ५ बिनतोड; अतुलनीय; अपूर्व; जोड नाहीं असें. [सं. वि+सम] ०अपूर्णांक–पु. छेदापेक्षां अंश अधिक असलेला अपूर्णांक. ०कर्णतुल्य चतुर्भुज–पु. समभुज परंतु कर्ण सारखे नसलेला चौकोन. (इं.) ऱ्हॉंबस. ०कर्णायत–पु. समोरासमोरचे भुजसारखे असून कर्ण सारखे नसलेला चौकोन. (इं.) ऱ्हॉंबॉइड. ०काल–पु. अशुभ, प्रतिकूल, अमंगल वेळ, प्रसंग. ०केंद्र–वि. १ दीर्घवर्तुळाकृति. २ केंद्रापासुन च्युत झालेलें, बाजूला सरकलेलें, केंद्र सोडून फिरणारें. (इं.) एक्सेंट्रिक. ०ग्रह–पु (संगीत) गाल व ताल यांचा आरंभ व सम यांचा मेळ न बसणें. ०चतुर्भुज–चतुरस्र–पु. ज्या बाजू सारख्या व समांतर नाहींत असा चौकोन. (इं.) ट्रॅपिझिअम. ०छाया–स्त्री. सूर्य संपातांत असतां शंकूची दुपारीं पडणारी कमी जास्त छाया. ०ज्वर–पु. १ ज्याची येण्याची व उतरण्याची वेळ निश्चित नाहीं असा ताप; मुदतीचा ताप. २ अनियमितपण येणारा ताप. ०त्रिभुज–पु तिन्ही बाजूंची लांबी भिन्न असलेला त्रिकोण. ०पाचन–न. अपथ्यकर पदार्थ पचविणारें किंवा त्याचा दोष नाहींसा करणारें औषध किंवा पदार्थ; विषमज्वरावरील औषध. ०भाव–पु. १ कलुषितमन; वैषम्य; दुष्ट ग्रह; अंदेशा. २ भिन्नभाव; दुजाभाव; आपपरभाव; कमीअधिक लेखणें. ३ अमित्रत्व; शत्रुत्व; वैर. ४ कमी लेखणें; कमी प्रतीचा मानणें; हीन मानणें. ५ असमानता; विषमता; भेद. ०भुजत्रिकोण–पु. विषमत्रिभुज; ज्या त्रिकोणाच्या तिन्ही बाजू असमान असतात त्रिकोण. तो. ०भोजन–न. १ अवेळीं जेवणें; कमीअधिक खाणें; प्रमाणशीर न खाणें. २ अनियमित, अप्रमाण, जेवण. ०वात–पु. त्रिदोष; कुपित वात. 'तैसें देहांतींचेनि विषमवातें।' –ज्ञा ८.२१३. ०वासना–स्त्री. पापेच्छा; विषयी, कामुक, लोभी, इच्छा, आशा. ०वृक्षन्याय–पु. स्वतः लावलेलें झाड विषारी निघालें व त्यास विषारी फळें आलीं तरी तोडवत नाहीं, तसा एकदां आपला म्हटल्यावर तो वाईट निघाला तरी त्यास दूर लोटणें बरें नव्हे. ०वेळ–स्त्री. संकटकाल; आपत्काल; कठिण प्रसंग. ०साहस–न. धाडस; साहसकर्म; अचाट काम; धाष्टर्य. ०स्थ–वि. १ अडचणींत, संकटांत, दुःस्थितींत, हालांत सांपडलेला, पडलेला. २ वांकडा, तिरपा, उभा राहिलेला. ०क्षुरी–वि. एक प्राण्यांचा वर्ग; या वर्गांत गेंडा येतो. कारण त्याच्या पायाला तीन गेळें, खूर असतात. ०ज्ञान–न. भेदज्ञान; समस्थिति ढळल्याचें ज्ञान. 'महाप्रळय सेजे। खेळोनि आले निदिजे। विषय ज्ञानें उमजे। कल्पोदर्थी।' –ज्ञा १४.११२. **विषमान्न**–न. रोजच्या संवयींत नसलेलें अन्न; नेहमीं खाण्यांत नसलेलें अन्न (त्यामुळें पचावयास कठिण अन्न). **विषमालंकार**–पु. एक अर्थालंकार. इष्ट वस्तु मिळविण्याकरितां प्रयत्न करीत असतां ती प्राप्त न होतां अनिष्ट वस्तु प्राप्त झाली असतां हा अलंकार होतो. **विषमाशन**–उ. अवेळीं किंवा अप्रमाणशीर जेवण; अकालीं किंवा प्रमाणाबाहेर जेवणें.

**विषय**—पु. १ इंद्रियें किंवा मन यांस गोचर वस्तु; ज्ञानाच्या कोणत्याहि साधनानें माहीत होणारी गोष्ट. (याअर्थी सामासांत) विषयभोग, विषयत्याग, विषयासक्ति, विषयाभिरुचि, विषय–सेवा–सेवन–प्रीति–तिरस्कार–संबंध–कथन–निंदा–ज्ञान–सुख–दुःख. २ एखाद्या क्रियेचा कर्ता अथवा कार्य; एखादा विकार अथवा भावनेशीं संबद्ध गोष्ट; (कर्ता, करण, शक्ति, अथवा कार्याचा) प्रदेश, टप्पा, आटोका, स्थान वगैरे. उदा० कामाचा विषय स्त्री; मोहाचा विषय पुत्र; लोभाचा विषय वित्त; रोगाचा विषय शरीर; तसेंच क्रोध, हर्ष, दंड इत्यादींचा विषय. (याअर्थी सामासांत)

विवाद–व्याख्या–गायन–लेखन–गमन–विचार–धर्म–ज्ञाति–हास्य–काम–संकल्प–विधि–निषेध–विषय. ' निजस्मृतिस जाहलीं विषय तीं तव श्रीपदें ' –केका ८. ३ कार्य; कर्तव्य; कार्यक्षेत्र; अधिकार; व्यवसाय; योग्य धंदा, काम. उदा० बोलणें हा वागिंद्रियाचा विषय; मामलत करणें हा भिक्षुकाचा विषय नव्हे; रफू करणें हा दाभणाचा विषय नव्हे. ४ उद्देश; हेतु; ध्येय; मनांतील गोष्ट. ' तुम्ही जो हा उद्योग करीत आहां याचा विषय कोण?' ५ मुद्दा; प्रकरण; बाब; संबंध. ' शब्द साधनरूप विषय ज्यांत असतो त्याला व्याकरण म्हणावें. ' ६ द्रव्य; ऐवज; माल. ' त्यास साऱ्या वर्षांत शंभर रुपयांचा विषय पोंचतो. ' ७ महत्व; पर्वा; दरकार. ' स्वामीचा आशीर्वाद असतां इतरांचा विषय मानीत नाहीं. ' –रा ३.३२४. ८ कामेच्छा. ' जैसें थोर विषय सुभगे अंगीं । अंगसानें । ' –ज्ञा १६.२५३. ' रुचे विषय ज्या मिळे अमृत ते न मद्या पिती । ' –केका ४३. [सं.] ०द्वार–न. इंद्रिय. ' बहु हीं दुस्तर विषयद्वारें । ' –तुगा १८७४. ०नियामक समिति–स्त्री. सभेपुढें मांडावयाचे विषय ठरविणारी, निश्चित करणारी, निवडणारी मंडळी. ०पंचक–न. पांच इंद्रियांचे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांच विषय. ' शब्दस्पर्शरूपरसगंध । ऐसें हें विषय पंचक । ' –दा १७.८.१४. ०बद्ध–वि. इंद्रिय विषय लोलुप; कामी; भोगी; आसक्त. (याचअर्थी सामासांत) विषय–तत्पर–लंपट–लीन–लुब्ध–वश–दास–आसक्त–आधीन–आविष्ट–अंध. ०भोगोडा–पु. विषयाचा उपभोग. ' विषयभोगोडा करावया । ' –दावि ४१. ०वासना–स्त्री. भोगेच्छा; इंद्रियसुखेच्छा; ऐहिक वस्तूंच्या उपभोगाची इच्छा. ' विषयवासना नावडो ' ०विरक्त–वि. ऐहिक भोगांस विटलेला; भोगांचा त्याग केलेला. ०व्यापार–पु व्यवहार; धंदा; ऐहिक व्यवसाय; सुखसाधनांचें संपादन. ' विषयव्यापारीं सदा सादर । आपपर नावडे त्या । ' ०सुख–न. इंद्रियजन्यसुख; रतिसुख; सृष्टींतील निरनिराळ्या भोगांपासुन निरनिराळ्या इंद्रियांस मिळणारा आनंद. विषयाचरण–न. इंद्रियभोग; विषयोपभोग. ' पतंगा दीपीं आलिंगन । तेथ त्यासी अचुक मरण । तेवीं विषयाचरण । आत्मघाता । ' –ज्ञा ३.२०१. विषयानंद–पु. भोगसुख; निरनिराळ्या पदार्थांच्या उपभोगापासुन मिळणारें सुख. विषयोपभोग–पु. भोग्य वस्तूंचें सेवन; इंद्रियांस सुख देणाऱ्या वस्तूंचें सेवन. विषयी–वि. १ विषयासक्त; भोगसुखास लालचावलेला; कामी; गोडघाश्या. ' जरी विषयीं विषयो सांडिजेल । ' –ज्ञा ५.१२५. २ इंद्रियांस अगोचर वस्तूंचें अस्तित्व न मानणारा. ३ ज्या गोष्टीचें एखादी वस्तु कार्य अथवा कर्ता असतो ती (गोष्ट). विषयीकरण–न. इंद्रियांकडून स्वविषयाचें ग्रहण; इंद्रियाकडून त्या विषयाचें ज्ञान होणें. विषयीं–शम. संबंधीं; संबंधानें; बद्दल; धरून; अनुसरून; अनुलक्षून. पूर्वी षष्ठ्यंत नामापुढें लावीत हल्लीं सामान्यरूप करून जोडतात. उदा० घराचेविषयीं, युद्धाचेविषयीं=घराविषयीं, युद्धाविषयीं. [विषय· सप्तमी] विषी, विषीं–शम. विषयीं पहा. ' अगा आत्मजेच्या विषी । जिवु जैसा निरभिलाषी । ' –ज्ञा १२.१३२. विषो–पु. विषय पहा. ' अमाइक तंव नव्हसी । कवणा ही विषो । ' –अमृ २.३६.

विषाण—न. १ शिंग. २ सुळा; सुळका; शूलदंत. [सं.]

विषाद—पु. १ खेद; दुःख; निरुत्साह; निराशा. ' जी प्राणसंगें विषादु । तोपु वेता । ' –ज्ञा २.११७. २ विरक्ति; कंटाळा; तिटकारा. ' माझा तुला काय विषाद आला । ' –सारुह १.१०. ' विषाद धरिला म्हणो । ' –केका ४२. [सं. वि+षद्] विषादणें–अक्रि. खेद मानणें; दुःखी होणें. ' हें मनांत येऊन अमात्य फारच विषाला. ' –चंद्रगुप्त १२७. विषादी–स्त्री. खेद उत्पन्न होईल अशी स्थति, परिणाम. ' चौघांनीं भरी करून घातली गोष्ट विषादीला । ' –ऐपो ४१०. –वि. १ खिन्न; निराश; म्लान. २ लवकर निराश होणारा; निरुत्साही; लवकर कंटाळणारा, विटणारा.

विषानैनी—वि. सापासारख्या लाल डोळ्याचा (घोडा). घोड्याचें एक अशुभ लक्षण.

विषार—पु. १ विषबाधा; विषापासुन पीडा, उपद्रव. २ विषारीपणा; विषयुक्तता. ३ साप. [विष] विषारणें–अक्रि. विषबाधा होणें; विषप्रयोग होणें; विषापासुन पीडा, उपद्रव होणें. विषारी–स्त्री. एक कांटेरी वनस्पती. ही शेतांत उगवते व औषधी आहे. –वि. विषयुक्त. ०माशी–स्त्री. एक माशी. ही चावली असतां फोड येऊन दाह, मूर्च्छा, ज्वर हीं लक्षणें होतात. –योर २.६६. विषालु–ळू–वि. विषारी; विषयुक्त.

विषु—न. मेष व तूळ राशींचा आरंभीचा बिंदु. यांत सूर्यानें प्रवेश केला असतां संपात होतो. ०पद–न. शरत्संपात –मराठी सहावें पुस्तक पृ. २९८. ०चक्र–मंडल, विषुव, विषुवत, विषुव, द्वलय, वद्वृत्त–वन्मंडल, विषुववृत्त–न. (ज्यो.) १ नाडीमंडळ; नाडीवलय, वृत्त. ज्या महावृत्ताची पातळी भूगोलाच्या अक्षाशीं लंबरूप असते तें. २ भूमध्यवृत्त; दोन्हीध्रुवापासुन सारख्या अंतरावरून भूमध्यावरून जाणारें वृत्त; भूमध्यरेषा. विषुव–वत्–न. सर्व पृथ्वींत दिवस व रात्र यांचें कालमान सारखें असतें तो काल; विषुवकाल; संपात. विषुवच्छाया, विषुवती–स्त्री. सूर्य विषुववृत्तावर असतां माध्यान्हीं पडणारी शंकुच्छाया. विषुवांश–पु. खस्थ पदार्थाचें याम्योत्तरवृत्त विषुववृत्ताला ज्या बिंदूंत छेदतें त्या विषुवापासुन म्हणजे संपातापासून अंतर.

विषूचिका—स्त्री. पटकी किंवा महामारींतील पहिली अवस्था; हगओक. ' दुर्गा सोडी विषूचिका । हगि ओकी सुटली । ' –एरुस्व १४.६५.

**विष्क**—पु. इष्क पहा. 'अशामधीं कांहीं विष्क करावा।' –पला ४.३२.

**विष्कंभ**—पु. (ज्यो.) सत्तावीस योगांतील प्रथम योग. **०अंगहार**–पु. (नृत्य) एक हस्तपादांचा अंगविक्षेप. **०करण**–न. (नृत्य) उजवा हात अपविद्ध करणें, उजवा पाय सूची करून जमिनीवर आपटणें व डावा हात वक्षःस्थलावर ठेवणें. **विष्कंभापसृत अंगहार**–पु. (नृत्य) कुदित व भुजंगत्रासित करून उजवा हात रेचित करणें. **विष्कंभक**–पु. (नाटय) दोन अंकांच्या मध्यें पुढील कथाभागाची सूचना देणारा प्रवेश. [सं. वि+स्कंभ्=अडथळा करणें]

**विष्कळित**—वि. विस्कळित पहा.

**विष्टप**—पु. देव. [सं.]

**विष्टंभ**—पु. अडथळा; प्रतिबंध; अटकाव; विघ्न; नड; अंतराय; अडचण [सं. वि+स्तभ्]

**विष्टर**—पु. मधुपर्कसमयीं अतिथि वगैरेस आसनासाठीं द्यावयाची दर्भाची विशिष्ट आकाराची मुष्टि; दर्भासन. 'सिद्ध जाहला मधुपर्क देखा। विष्टर दिधला जगन्नायका।' –एरुस्व २४.१३७.

**विष्ठा-ष्टा**—स्त्री. मल; गू; मलोत्सर्ग. 'शास्त्रीची शूकरी माय। विष्ठा खाय बिदांची।' –तुगा ४१५ [सं.]

**विष्टि**—स्त्री. १ वेठ; मजूरी दिल्याशिवाय घेतलेलें काम. २ वाहतूक. 'चतुरंग दलाशिवाय फौजेचीं आणखी चार महत्वाचीं खातीं होतीं. तीं विष्टि, नौका, हेर आणि देशिक अशीं सांगितलीं आहेत' –हिंलइ ९. ३ (ज्यो.) सातवें करण. [सं.]

**विष्णु**—पु. १ त्रिमूर्तीपैकीं एक देवता; विश्वाचा पालनकर्ता. २ (संगीत) एका तालाचें नांव. यांत मात्रा सतरा व विभाग पांच आहेत. [सं.] **०क्रान्तकरण**–न. (नृत्य) उजवा पाय चालण्याच्या बेतांत पुढें करून कुंचित करणें व रेचित करणें. **०क्रांत-क्रान्ता**–पुस्त्री. एक औषधी वनस्पती, हिचीं फलें काळसर तांबूस रंगाचीं असतात. 'श्यामाक दूर्वांला विष्णुक्रांता।' –एभा २७.१७५. **०दैवतनक्षत्र**–न. धनिष्ठानक्षत्र. 'पुढें कोणे एके काळीं। विष्णुदैवतनक्षत्रमेळीं।' –जै २६.५. **०नाभ**–पु. ब्रह्मदेव. **०पद**–न. गयेस असलेली विष्णूच्या पावलाची प्रतिमा. २ आकाश. 'शरवृष्टि करिति भरिति क्षणमात्रें विष्णुचें पद भ्राते।' –मोकर्ण १८.६. **०पदी**–स्त्री. गंगा. **०पुराण**–न. अठरा पुराणापैकीं एक महापुराण. **०पुरी**–स्त्री. (संगीत) बंगालमधील विष्णुपुर या गांवावरून पडलेलें एका गायनपद्धतीचें नांव. **०बलि**–पु. १ सोळा संस्कारांपैकीं एक संस्कार. गर्भधारणेस प्रतिबंधक अशा प्रेताच्या प्रेतत्वनिवृत्तीसाठीं हा करावयाचा असतो. २ संन्याशाच्या मृत्यूनंतर तेराव्या दिवशीं करावयाचा विधि. **०भक्त**–पु. १ विष्णूचा उपासक. २ वैष्णवपंथांतील व्यक्ति. **०रथ**–पु. गरुड; विष्णूचें वाहन. 'शोभे विष्णु रथावरी निवसला सोनेसळा नेसला।' –र गजेंद्रमोक्ष ४९. **०लोक**–पु. वैकुंठ; स्वर्गांतील विष्णूचें स्थान. **०वर्धन**–पु. एक ब्राह्मणांचें गोत्र, वर्गाचें नांव. (प्र.) विष्णुवृद्ध. **०वात**–स्त्री. १ चार बोटें रुंदीची पांचपदरी कापसाची सुताची वात. २ चौदापदरी वात. **०वाहन**–पु. गरुड. 'जर्जर जाहला विष्णुवाहन बदकांचे दंश्यांनीं।' –ऐपो ४०३. **०शयन**–न. चातुर्मास (आषाढी एकादशीपासुन कार्तिकी एकादशीपर्यंत देव निद्रिस्त असतात यावरून). **०शृंखला योग**–पु. वामनद्वादशीच्या पूर्व दिवशीं एकादशीविद्ध द्वादशी असुन श्रवणनक्षत्र असेल तर हा योग मानतात. **विष्णूचीं तीन पदें**–दोन भुंवयांमधील प्रदेश. –योर १.२६.

**विष्वक्सेन**—पु. विष्णु; श्रीकृष्ण; ज्याला पाहून दैत्यांच्या सेना दशदिशा पळत सुटतात तो. –एभा १९.९८; –ज्ञा १०. २४१.

**विसकट**—पु. दाणादाण; अस्ताव्यस्त स्थिति; विस्कळित अवस्था. 'जेंवि महावात करी अभ्रांचा न लावितां पळ विसकट।' –मोभीष्म १०.११४. **विसकटणें**–उक्रि. १ अस्ताव्यस्त करणें; ओढाताण करणें; रचना बिघडविणें; उसकटून टाकणें; सारासारी, हलवाहलवी करणें; उधळून टाकणें. 'धर्माला वेधाया धावें तो विप्रकटक विसकटून।' –मोद्रोण १०४. २ (ल.) गोंधळ, घोटाळा, अव्यवस्था करणें. [सं. वि+शकलन] **विसकटाविसकट**–स्त्री. ओढाताण; धसकाफसकी; अव्यवस्था; खेचाखेच; गोंधळ; घोटाळा; पसारा; अस्ताव्यस्तपणा. **विसकणें**–विसकटणें पहा.

**विसकणें**—अक्रि. दूध यावयाचें बंद होणें, आटणें; उडणें (दुभतें जनावर). **विसका**–वि. आटलेलें; भाकड; उडालेलें (दुभतें जनावर).

**विसकरणें**—उक्रि. विसकटणें; उधळणें; अस्ताव्यस्त करणें; पसरणें. [सं. विष्किर्. –भाअ १८३४.]

**विसकळ**—स्त्री. १ (शब्दः) पसरलेली, विलग स्थिति. २ (ल.) अव्यवस्थित, घालमेलीची, घोटाळयाची, गोंधळाची स्थिति (धंदा, कारखाना, काम वगैरेची). –वि. १ (झाडें, घरें, वस्तु यांची) मोकळी; दूरदूरची; पातळ; बिनदाटीची (स्थिति). २ ऐसपैस; मोकळीचाकळी; लांबरुंद; उघडी; बंदिस्त नव्हे अशी (जागा, भांडें). ३ स्पष्ट; घळमळीत; मोकळेंचाकळें; बिनघोटाळयाचें; काठिण्यरहित (भाषण, लेखन). **विसकळणें**–उक्रि. अस्ताव्यस्त, गैरशिस्त, घोटाळयाचें, पांगापांग होऊन पडणें; गोंधळ माजणें; अव्यवस्थित होणें. **विसकळित**–धावि. १ अस्ताव्यस्त होऊन, पांगून पडलेलें. २ अव्यवस्थित, घोटाळयाचें, गुंतागुंत झालेलें.

**विस(सु)कुसणें**—उक्रि. विस्कटणें; विसकळित होणें; गोंधळणें; घोटाळणें; बिघडणें. ' एवं द्वैतासी उमसों । नेदी ऐक्यासी विसकुसों । '–अमृ २.६९. ' तेचि बुद्धि जालिया विसुकुसे । कैसेनि आतां । '–ज्ञा ८.६७. **विसकुस-सें**–स्त्रीन. बिघाड; गोंधळ; अस्ताव्यस्तपणा; कासाविसी. **विसकूस**–वि. गोंधळलेली; विसकटलेली.

**विसंगत**—वि. असंबद्ध; विजोड; बेताल; भरमसाट. [ सं. वि+संगति ]

**विसंच**—पु. बिघाड; घोटाळा; नाश. ' विसंच बहु जाला तरी लाज । '–दावि २६४. [ सं. वि+सञ्च् ] –वि. बिघडलेलें; नष्ट; नाहीसें. ' जेणें दृश्य केलें विसंच । तयास कैचा होय प्रपंच । '–दा ८.९.३२. **विसंचणें**–अक्रि. १ बिघडणें; नासणें; विकार पावणें. ' आकार लोपें न विसंचे । नित्यता गा । '–ज्ञा ८.१८०. २ त्रासणें; पीडा पावणें. ' क्रोधादि जलचरीं विसंचलों । '–विपू १.९०.

**विसण**—न. ऊन पाण्याची उष्णता कमी करण्यासाठीं त्यांत घालावयाचें थंड पाणी. [ सं. वि+शमन; अनुष्ण; प्रा. अणुसिण–विसण–पाइअ ]

**विसणणें**—अक्रि. आवेशयुक्त होणें; सरसावणें; चिडणें; उसळणें. ' आवेशें भुजा त्राहाटिती । विसणैले हांका देती । '–ज्ञा १.१३३. [ सं. आवेशन ]

**विसंधित**—वि. १ सांधा, जोड उखळलेलें; निखळलेलें. २ ( ल. ) असंबद्ध; विसंगत ( भाषण वगैरे ). [ सं. वि+संध् ]

**वि(वी)सनखी**—स्त्री. स्त्री. **विसनखीचा उपद्रव-पीडा-बाधा-दुःख**–स्त्री पु.न. संसर्गजन्यरोग; उपदंश; गरमी.

**विसनख्या**—पु. वीसनखें असलेला, कुत्रा वगैरे.

**विसप-ब**—पु. इसब; एक प्रकारचा त्वग्रोग. [ सं. विसर्पिका ]

**विसपगोल**—पु. इसपगोल पहा.

**विसंब**—पु. १ विश्रांति; विसावा. २ विस्मरण; त्याग.

**विसंबणें, विसंभणें, विसमणें**—अक्रि. १ विश्रांति, विसावा घेणें; भार टाकणें; थांबणें; विश्वास टाकणें. ' पुढती निरविसी संतां । नव्हे विसंबतां धीर तुज । '–तुगा ७१०. २ विसरणें; सोडणें; टाकणें; दूर ठेवणें. ' तूं मायावेघु तरि मज अज्ञाना । कां विसंबलासी । '–ऋ ३७. ' भणौनि न विसंबों ब्रह्मपदा । '–शिशु २०१. ' निधि निक्षेप जेंववि कृपणें । न विसंबिजे मानसी । '–मुआदि २५.१२८. [ सं. वि+भ्रं; वि+श्रम् ]

**विसर**—पु. १ विस्मरण; विस्मृति; आठवण नाहींशी होणें. ' विसर हा बरा काय । '–मोआश्रम २.१०२. २ विसराळूपणा; स्मरणशक्तींतील दोष, व्यंग. ३ स्मृतिभ्रंश; भ्रम; भूल; भुरळ; धारणाशक्तीचा ऱ्हास. ( क्रि० पडणें; होणें. ) [ सं. वि+स्मृ–विस्मरण; प्रा. विस्सरण ] **विसर पाडणें-घालणें**–विसरावयास लावणें. ' जो मातृस्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घाली । '–मोभीष्म ४.३९. **विसरीं पाडणें**–विसरविणें; विसरावयास लावणें. **विसरणें**–अक्रि. १ विस्मृति होणें; विसर पडणें; आठवण न राहणें. ' पशु चरों विसरेती '–दाव १८३. २ हयगय करणें; हेळसांड करणें. ' कीं देहभावो विसरैली । '–दाव १७२. **विसरत बोलणें**–असंबद्ध, विसंगत बोलणें; विचूक बोलणें. ' डुल्लत चालणें । विसरत बोलणें । नेणों काकुहास्य करणें । श्रीहरी नाथासीं । '. **विसरभोळा-ळ्या**–वि. विसराळु; विसरण्याचा स्वभाव असलेला; निष्काळजी; बेफिकीर. **विसरभोळ्या**–क्रिवि. विस्मरणामुळें; विसराळूपणानें; चुकून; हयगयीनें; अज्ञानामुळें. **विसरशील**–वि. विसराळू. –मोऐषिक १.१९. **विसरसांड**–स्त्री. दुर्लक्ष्य; हेळसांड; हयगय; क्षमा ( अपराधाची ). **विसराळू-ळ**–वि. १ विसरभोळा; लवकर विसरणारा; विसरण्याचा स्वभाव असलेला. २ निष्काळजी; हयगयखोर; बेफिकीर. **विसरी**–स्त्री. विस्मृति; विस्मरण; विसर. ' ते भोगूनि त्याची विसरी पडे जिवा । '–सिसं ७.१६. ' पाहून विसरी अवचित कोणीकडून येतो । ठरवून दृष्टीहि वत्सें सोडून देतो । '–होला ३६ **विसरून**–क्रिवि. विस्मरणानें; चुकून. ' परी कहीं न करिशी संभाषण । विसरौनियां । '–शिशु ८८.

**विसर्ग**—पु. मृदु महाप्राण; ह्कार; हाः या चिन्हानें दर्शवितात हा स्वरांच्यापुढें किंवा क, ख, प, फ, श, ष, स, हे वर्ण आले असतां पूर्व व्यंजनांतील अन्तस्थ अ स्वरापुढें येतो. तसाच अवसानीं येतो. प्रत्ययांच्या अंतीं असणाऱ्या स व र या व्यंजनाबद्दलहि याचा प्रयोग होतो. २ त्याग; विसर्जन; सोडणें; टाकणें. ३ पाद; पर्दन. ' विसर्गु पायूचें कर्म । कवण अपेक्षी याचे धर्म । '–गीता १३.४४०. [ सं. वि+सृज् ]

**विसर्जणें**—उक्रि. १ त्यागणें; सोडणें; टाकणें; सोडून देणें. २ मुक्त करणें; निरोप देणें; समाप्त करणें; बोळवण, पाठवणी करणें. ' सभा विसर्जोन रघुनाथ । प्रवेशते झाले सदनांस । ' ' निरंतरातें आह्वानिती । विसर्जिती गा । '–ज्ञा ९.१६३. [ सं. वि+सृज् ] **विसर्जन**–न. १ त्याग; सोडणें; मुक्त करणें; टाकणें; उत्सर्ग. ' किरणविसर्जन. ' २ पाठवणी; बोळवण; निरोप देणें; बरखास्ती. उदा० देवताविसर्जन. सभाविसर्जन. ०**क्रिया**–स्त्री. शरीरांतून बाहेर टाकण्याची क्रिया. ( इं. ) रेडिएशन. **विसर्जित**–वि. १ त्यक्त; मुक्त केलेला; सोडलेला; टाकलेला. २ बरखास्त केलेला; बोळवण, पाठवणी केलेला; निरोप दिलेला.

**विसर्प**—पु. इसब; धांवरें; एक त्वग्रोग. ' खोकलें खरूज अत्यंत । विसर्प एकां '–गीता १३.२४९७. [ सं. ] **विसर्पिका**–स्त्री. विसर्प.

**विसवटा**—पु. विसांवा; विश्रांति.

**विसा[स]वणें** ...आर्कि. १ विसावा घेणें; विश्रांति घेणें. 'आइके जेथ वाचा विसवे। ते साधुकथा।' -ज्ञा ९.१८७. २ क्षणभर थांबणें; स्थिरावणें. ३ (एकाच स्थितींत किंवा फार वेळ स्थिर राहिल्यामुळें अवयव, गात्र) स्तंभित होणें; ताटकळण; वळत नाहींसें होणें; संवय, सराव नाहींसा होणें. ४ आळसावणें; ढिलावणें; मंदावणें; शिथिल होणें (मनुष्याचें शरीर, उत्साह, गात्र वगैरे). ५ पडणें; खचणें; मोडणें (भिंत, िहीर, खांब, तुळई वगैरे). -न. विश्रांतिस्थान. 'जें आदिप्रकृतीच विसवण।' -ज्ञा ६.१२. 'संसारतापतप्तां जीवां। विसंवणें जें।' -ऋ ५१.

**विसंवता**-पु. विसांवा घेणारा. 'चंद्रसुर्याचा चौबारांमांदी दाटं। विसंवतेयांची।' -शिशु ९६. [सं. वि+श्रम्]

**विसवणें**—उक्रि. थंड करणें; शांत करणें; विझवणें. 'अंगाराचा ग्राम करुनि। निर्वाणस्वरूपीं विसवुनी।' -विपू ७ ३. [सं. वि+शम्]

**विसवा**—पु. विश्वा पहा. विसावा भाग.

**विसवाट**—न. घराभोंवतीचें आवार; कुंपण.

**विसंवाद**—पु. १ विरोध; विसंगति; अमेळ. 'म्हणोनिगा इये मातुचा। विसंवादु।' -ज्ञा ४.३८. २ भेद; वेगळेपणा; फरक. 'एथ एकमेकांचिये खुणे। विसंवादु तंवचि जिणें।' -ज्ञा १८. २९५. [सं.]

**विसवाविसवी**—क्रिवि. आळीपाळीनें विसावा घेऊन; पाळीपाळीनें; वारगीपारगीनें.

**विसविशीत**—वि. मिसमिशीत; मऊ; घट्ट किंवा दडदडीत नव्हे असें; पिळदार नव्हे तें; पातळ विणीचें.

**विसळणें, विसुळणें**—उक्रि. धुणें; खळबळणें; पाणी घालून खळखळून टाकणें. [सं. विक्षालन] **विसळवणी, विसुळवणी**-न. विसळण्याचें पाणी.

**विसा**—स्त्री वीस; खंडी; वीस संख्येच माप, समुदाय. [सं. विंशति]

**विसाड**—न. १ (प्र.) इसाड पहा. नांगराचा दांडा. २ कलम.

**विसाण**—न. विसण पहा. **विसाणणें**-उक्रि विसण घालणें.

**विसाप**-ब—पु. १ (प्र.) विसप-ब; इसब; एक त्वग्रोग. २ एक पालीसारखा लहान प्राणी; याच्या स्पर्शानें अंगावर विषारी कांटा उठतो. [सं. विसर्पिका]

**विसार-रा**—पु. बयाणा; आगाऊ घेतलेला पैसा; सचकार; इसारा. 'होतें गोविंदें विसारें। माप जालें एकसरें।' -तुगा १९६०.

**विसारणें**—सक्रि. दूर लोटणें; दूर करणें; विसरविणें. 'आपुला मधुर स्वरीं। हे सदां कोकिळांतें बिसरी।' -शिशु ८०३. 'ओभावीवो मधुकरू। विसारीं वो चकोरू।' -शिशु ८३९. [सं. वि+सृ; वि+स्मृ]

**विसालता पन्हा**—पु. स्नेह. 'लेकिन विसालता पन्हाचा जवाब मोहिबास येइतलग...' -पेद १.५. [फा.]

**विसावण**—न. विसण, विसाण पहा. [सं. वि+शमन; वि+शो=पातळ करणें -भाअ १८३४]

**विसा(वि)वणें**—अक्रि. विसवणें पहा. 'ते देखतां तिहीं लोकां। विसावली श्रीकृष्णचरणीं।' -शिशु १०८३.

**विसा(सां)वा**—पु. १ विश्रांति; आराम; कार्यनिवृत्ति. २ श्रमपरिहार; स्वास्थ्य; करमणूक. ३ श्रमपरिहाराचें, करमणुकीचें साधन. ४ विश्रांतिस्थान; आश्रय. 'विसांवा मोडला। साधुजनांचा।' -भाए १००. [सं. विश्राम; प्रा. वीसव; सिं. वेसांहि]

**विसाळ-ळा**—पु. १ ईर्षा; स्पर्धा; द्वेष. 'विसाळाचेनि नेटें। विष घ्यावस वाटे।' -दा २.६.१३. २ एकप्रकारची बाधा; पिशाचबाधा.

**विसिने**—क्रिवि. (भि.) वेंचून; गोळा करून. 'ते विसिने पारी चालतो वेट्यो' -भिल्ली १९.

**विसि(सी)फ**—पु. गुरें बसण्याच्या जागेंत आढळणारा किडा; विसाप. 'विसीफ भोवर गोचिड जाणा।' -दा ३.७.७. [सं. विसप]

**विसीं**—शअ. (अप.) विषयीं पहा.

**विसुरणें**—अक्रि. विसरणें पहा. 'मी माझेंपणु विसुरैले।' -दाव २५९.

**विसुरा**—पु. १ विचार; अभिप्राय; तात्पर्य. 'परिणामाचा हि विसुरा। सांगितला।' -ज्ञा १७.१५२. २ चमत्कार; विस्मय; आश्चर्य. 'अनंगा केउता हाथिएरु। फुन सदा विसुरा करी थोरू।' -शिशु २६५; -अमृ ७.२९४. ३ समुदाय. 'जे ते विश्वाळंकाराचे विसुरे।' -ज्ञा ६.५८. ४ चित्र. ५ भ्रांति; भ्रम. [सं. वि+स्मृ; विस्मय]

**विसुळणें, विसुळवणी**—विसळणें, विसळवणी पहा.

**विसूचिका**—स्त्री. विषूचिका पहा.

**विसूत्र**—वि. सरळ सुतांत नसलेलें; वांकडेंतिकडें; अनियमित; अपवादभूत; असामान्य; स्वैर. [सं. वि+सुत्र=दोरा]

**विसृंखळ**—वि. (प्र.) विशृंखल; अनिर्बंध; पाशरहित. 'हो भीम पळ विसंखळ खळखळखळ रक्तपूर दे बाहूं।' -मोसभा ६.११. [सं. वि+शृंखला]

**विसृत**—धावि. (प्र.) विस्तृत; पसरलेलें; विस्तारलेलें; लांबरुंद. [सं. वि+सृ]

**विसोरा**—पु. विसरा पहा. ' अनलें घेतल्या मंदिरा । माजि ठेवा विसोरा । ' –गीता २.१४४.

**विसोळ**—न. (गो.) बागायताभोंवतालची नंबरांतील जमीन. [सं. वि+शाली]

**विसोळा**—पु. घरटें. [सं. वि+शाला]

**विसोरें**—न. विसोरा–विसुरा पहा. ' विसोरें घरें सारें ' –दावि ३९६.

**विस्कटणें, विस्कटाविस्कट, विस्कळ, विस्कळणें, विस्कळित**—विसकटणें इ० पहा.

**विस्तर**—पु. १ विस्तार; प्रसार; पसारा; फैलाव २ लांबण; पाल्हाळ. ' कथवे बहु युक्त विस्तरें न मला ' –मोभीष्म ३ ३८. [सं. वि+स्तृ] **विस्तरणें**–अक्रि. १ पसरणें. २ लांबण लावणें; पाल्हाळ करणें.

**विस्तव**—पु. अग्नि; आग; जाळ; वन्हि. [सं वैश्वानर; इष्टावह; वैश्वदेव ?; विष्णु–विष्टु–विस्तु; –भाअ १८३३.] **मधून विस्तव न जाणें**–वितुष्ट असणें; वैर असणें. **विस्तवणें**–सक्रि. जाळणें (शब्दशः व लक्षणेनें).

**विस्तार**—पु. १ प्रसार; पसारा; फैलाव. २ (ल.) पाल्हाळ; लांबण; विकास; वाढ; विवेचन; प्रपंच (विषय, मुद्दा, बीज, गर्भ, रोप, प्राणि, काम, धंदा वगैरेचा). ' कल्याण नामा ग्रंथ विस्तारी ' –सप्र १०.१६. ३ रुंदी. ४ झाडाच्या फांद्या, पालवी वगैरेचा व्याप. ५ प्रजा; संतति; संतान. [सं. वि+स्तृ] **विस्तारणें**–उक्रि. पसरणें; वाढ होणें; वाढवणें. **विस्तारित, विस्तीर्ण**–पसरलेलें; वाढलेलें; अफाट; अवाढव्य.

**विस्तारणें**—सक्रि. (कु.) निरनिराळें करणें. उदा० सागुती वगैरे. [सं. वि+स्तृ]

**विस्तारी**—स्त्री. पत्रावळ. [सं. वि+स्तृ]

**विस्तावा**—पु. इस्तावा पहा.

**विस्तु, विस्तो, विस्तूव, विस्तोव, विस्तेव**—पु. (प्र.) विस्तव पहा. ' विस्तु देखिल नाहीं घरीं । ' –दावि १४८.

**विस्तृत**—धावि. विस्तार पावलेलें, केलेलें; अफाट; विस्तीर्ण; लांबरुंद; ऐसपैस; पसरलेलें; अघळपघळ.

**विस्तृति**—स्त्री. विस्तार पहा. वृद्धि; प्रसार; वाढ.

**विस्फुलिंग**—पु. अग्नीची ठिणगी. ' म्हणोनि आइके अर्जुना । जैसा विस्फुलिंग लागे इंधना । ' –ज्ञा ३.३२९. [सं.]

**विस्फोट**—पु. फोड; गळूं, उठाणु; वेड; करट; केसतुड. [सं.]

**विस्फोटक तूल**—पु. ज्वालाग्राही कापूस; स्फोटक कापूस; भडकणारा कापूस; नत्रिकाम्लांत भिजविलेला कापूस. (इं.) गनकॉटन. [सं.]

**विस्मय, विस्मो**—पु. आश्चर्य; चमत्कार; अचंबा; नवल. (क्रि० होणें; वाटणें). ' तंव तो पारधी विस्मो करी ।' –पंच २.१. –ज्ञा १.१७७. [सं. वि+स्मि] **०जनक**–वि. आश्चर्यकारक. **विस्मयावह**–वि. आश्चर्यकारक. **विस्मापक**–वि. आश्चर्यकारक; चमत्कृतिजनक; चकित करून सोडणारें; थक्क करणारें. **विस्मापन**–न. आश्चर्यकारक गोष्ट; चमत्कृति. **विस्मावणें**–अक्रि आश्चर्य पावणें; चकित होणें. ' विस्मावला नाम धिग म्हणत । ' –दावि २. **विस्मित**–धावि. आश्चर्यचकित. ' विस्मित होऊनि इंद्र ठेला । ' –तुगा ८१. –ज्ञा १.५५९.

**विस्मर**—पु. १ विस्मरण; विसर; दुर्लक्ष. २ भूल; भ्रांति. [सं. वि+स्मृ] **विस्मरण**–न. विस्मर; विसर. **विस्मृत**–धावि. विसरलेलें; आठवण नसलेलें; लक्षांतून गेलेलें. **विस्मृति**–स्त्री. १ विसर; विस्मरण; विसराळूपणा; धारणाशक्तीचा अभाव, नाश. २ भूल; भ्रम; भ्रांति. **विस्मृतिखालीं पडणें**–संवयीची होणें.

**विस्रगंध**—पु. कच्चया मांसाचा वास; कुजकट घाण. [सं. विस्र+गंध]

**विस्वर**—पु. बेसूर आवाज; कर्कश आवाज; बदसूर; अपसूर. [सं.]

**विस्वा**—विश्वा पहा.

**विस्वा**—पु. (अप.) विसावा पहा. ' विस्वा न मिळे घडीभरी । ' –गीता २.२१५८.

**विस्वाद**—वि. अरुचिकर; ज्यास स्वाद नाहीं असें; बेचव.

**विस्वास, विस्वासघात, विस्वासणें**—विश्वास इ० पहा.

**विहग, विहंग, विहंगम**—पु. पक्षी; पांखरूं; आकाशांत संचरणारा. ' झडपुनि तंव कर्में भाग नेला विहंगीं । ' –मुरामायण बाल. [सं. विह=आकाश+ग=जाणारा] **विहंगममार्ग**–पु. (योग) त्वरित समाधि साधण्याचा मार्ग; याच्या उलट पिपीलिका मार्ग. ' पिप्लीका मार्गें हलु हलु घडे । विहंगमें फळासि गांठी पडे । ' –दा २०.२.१०. ' लंगलें लयेतें अलक्षी । विहंगममाग । ' –दा १४.४.३४. २ (ल.) कोणतेंहि कार्य लवकर साधण्याची पद्धति, रीत, मार्ग.

**विहनन**—न. हत्या. [सं. वि+हन्]

**विहरण, विहार**—नपु. १ क्रीडा; खेळ; करमणूक; गंमत; मजा; मौज. २ आनंदानें फिरणें, चालणें, भटकणें; सुखसंचार. ' जया ब्रह्मांडीं विहरण । ' –विपू ४.६. ३ बौद्धांचा मठ; रहाण्याची जागा. ४ राहण्याचें ठिकाण, स्थान. ' किं महाबोधें विहार । केले जैसे । ' –ज्ञा ५ १३८. **विहरण**–न. आळ; अपयश; निमित्त. ' गणेश गेला लाडू घेऊन । मजवरि आलें विहरण । ' –ह ८.३०. ' म्हणे पुसावयासि गेलों सांकडें । तों विहरण मजकडे आलें कीं । '

-भवि ८.१४१. [सं. वि+हृ-हर्] **विह(हा)रणें**-अक्रि. विहार करणें; क्रीडा करणें. **विहारी**-वि. १ विहार करणारा; क्रीडा करणारा. २ रंगेल; चैनी; इष्कबाज; छंदी.

**विहावो**—पु. लग्न; विवाह. -क्षिपू.

**विहा(ह्या)ळी**—स्त्री. विहार; क्रीडा; शिकार. 'विचरे कामविहाळी। विषमपणेंचि निहाळी।' -आपद ५१.२. 'कन्हणी एकि वेळीं। एदु निगाला विह्याळी।' -भाए २५६.

**विहिणें**—सक्रि. विधान करणें; सांगणें; उपदेशिणें. 'तुम्हां वर्णविशेषवशें। आम्हीं हा स्वधर्मुचि विहिला असे।' -ज्ञा ३.८८. [सं. वि+धा] **विहित**-धावि. १ शास्त्रानें सांगितलेला, घालून दिलेला, निर्दिष्ट केलेला, उपदेशिलेला. 'येर योगिये कर्मा धारें। विहितेंचि निजाचारें।' -ज्ञा ३.४४. 'विहित तयासी यांची सेवा।' -तुगा ३३१४. २ योग्य; उचित; रास्त. 'वाङ्‌नियम सदैव विहित कां गमला।' -मोसभा ३.७. ३ ठेवलेला; दिलेला; स्वाधीन केलेला. **विहितत्व**-न. कर्तव्यता; नियतत्व; कार्यप्रवणता. 'एऱ्हवीं विहितत्वें मांडी। परी घालिता आसुरवाडी। तेथ पोळला ऐसा सांडी। आदरिलेंही।' -ज्ञा १८.१८९.

**विहि(ह)रा, विहीरा**—पु. १ मोठी विहीर; कुवा; बाव; बारव. 'सुते जों जों हातें करुन विहिरा हा उपसिजे।' -सारुह ७.१४२. [सं. विवर -भाअ १८३२] 'जैसा न मोडलिया विहीरा।' -ज्ञा १५.२६९. २ झरा; पाझर. 'झुरे विहीरें पाझर।' -दा १६.४.७.

**विहीण**—स्त्री. आपल्या मुलाची किंवा मुलीची सासु; व्याह्याची स्त्री.

**विहीत**—स्त्री. (कों.) (प्र.) वीत पहा.

**विहीन**—वि. रहित; विरहित; उणीव किंवा अभाव असलेलें; शिवाय, खेरीज, वांचून असलेला; शून्य. (समासांत) जलविहीन-कूप, प्राणविहीन-देह; धनविहीन; अन्नविहीन, ज्ञानविहीन; एतद्विहीन, तद्विहीन. -ज्ञा २.३२४. [सं. वि+हा]

**विहीर**—स्त्री. आड; कूप; कुवा; बाव. **०हुंडा**-पु. बागाईत किंवा पाटस्थळ जमिनीवरील सारा, कर. 'नंतर धूर्त विशाळमती। सांगे विहीरहुंडा ठरोती।' पैमा. **०वणी**-न. विहीरींतलें पाणी. 'नाहीं आड ना विहीरवणी।' -एरुस्व १२.१४८.

**विहू**—पु. विभू पहा. १ व्यूह; सैन्यरचना. (क्रि० रचणें). २ कारस्थान; कट; बालंट. **विहू रचणें**-१ उपाय योजणें; तजवीज करणें. २ युक्ति लढविणें; क्लृप्ति काढणें. **विहू उभा करणें**-कट करणें; कारस्थान रचणें; मसलत उभी करणें.

**विह्वल-लित, विह्वळगीर**—विव्हळ इ० पहा.

**विळ**—पु. १ ब्रह्मदेवाचा दिवस. 'जै चौकडिया सहस्र जाये। तैं ठायेठायो विळुचि होये।' -ज्ञा ८.१५६. २ काळ; वेळ. 'तुजपाशीं आम्ही बसतो सारा विळ।' -होला ८५. [सं. वेला]

**विळौनि**-क्रिवि. एका वेळेंत. 'वरुं अमरांमाजी अमरपती। विळौनि ते चवदा निमति।' -एभा ८.२५३. (पाठभेद). **विळचा**-क्रिवि. एका वेळीं. 'आम्ही दोघे विळचा तये वृक्षि मिळो।' -पंच ३.१०.

**विळखा-का**—पु. वेढा; वळसा; वेटोळें; मिठी; पकड; फेरा; लपेटा. [का. ओळगु; सं. विश्लिष्टा-विलिसा-विळखा. -भाअ १८३४]

**विळचण**—न. (कों.) विसण; विसावण.

**विळत**—स्त्री. (कों.) १ कुदळयाचे शेवटीं लावावयाचें लोखंडी अग्र. २ (व.) वखरास वगैरे चिकटलेली माती काढावयाचें हत्यार; तुत्या.

**विळपणें**—क्रि. शोधणें; धुंडणें. 'विळपतां सांपडे जवळींच।' -दावि १८.

**विळवणें**—अक्रि. विवळणें पहा. [विव्हळ]

**विळवणें**—उक्रि. १ (राजा.) वळवणें; (ओझें वगैरे) वर उचलून देणें; डोक्यावर चढविणें. २ (ल.) टपका ठेवणें, लादणें; दोषारोप करणें.

**विळविणें**—उक्रि. वेळणें; वेळविणें; हलविणें.

**विळविळणें**—अक्रि. (साप, किडा वगैरे प्राणी अंगावरून) वळवळत जाणें; मऊ, गुळगुळीत स्पर्श करीत जाणें. [सं. वलन]

**विळविळीत**—वि. गिलगिळीत; मऊ; थिलथिलीत.

**विळसण**—न. (व) विसण; विसावण.

**विळा**—पु. कोयता; कापण्याचें हत्यार; विशेषतः पिकें कापण्याची तीक्ष्ण धार असलेली कोयती. [का. ईळिग] **विळाभोपळा**-वांकडें; वैमनस्य.

**विळासु**—पु. विलास पहा. 'बोलिकेआं देवांचा विळासु।' -शिशु १५६.

**विळी**—स्त्री. भाजी चिरण्याचें साधन. 'काळखड्गा ऐसी विळी। किंवा असिलतेसारखी पळी।' -मुरंशु ३७७. [का. इळिगे]

**विक्षा**—स्त्री. पाहणें; टेहळणी. 'विक्षा विक्षा भक्तिमार्गेचि विक्षा।' -दावि ४६९. [सं. वीक्ष्]

**विक्षिप्त**—वि. १ टाकून, फेकून दिलेला. २ पसरलेला; विसकटलेला. ३ भ्रमिष्ट; खुळा; चळलेला; बावरलेला (मंत्रतंत्र, भूतबाधा वगैरेमुळें). ४ (ल.) तऱ्हेवाईक; विचित्र; लहरी. 'तो गृहस्थ थोडा विक्षिप्तच होता असें मला वाटतें' -पकोघे. [सं. वि+क्षिप्] **०करण**-न. (नृत्य) हात व पाय पुढच्या किंवा मागच्या बाजूस जसे एकदां टाकले असतील तसेच पुन्हां

टाकणें. ०आक्षिप्तक करण–न. (नृत्य) हातपाय हवेतसे दूर फेकून पुन्हां जवळ आणावयाचे ही क्रिया.

**विक्षेप**—पु. १ (शब्दशः) वर, बाजूला, इकडेतिकडे टाकण्याची क्रिया. २ चित्ताची व्यग्रता; लक्ष्य न लागणें; विचारांचा, मनाचा गोंधळ, गडबड, घोटाळा; मनाची चंचलता. 'तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं। विक्षेपांची पाणिवळें झाडिलीं।' –ज्ञा ६.४७१. ३ विषाद; आश्चर्य; अचंबा.–पया २०६.'कीर्तनामाजीं येताचि विघ्न। विक्षेप पावलें सकळांचें मन।' ४ बुद्धिभ्रंश; भ्रम; भ्रांति (जादूटोणा, मंत्रतंत्र, भूतबाधा वगैरेमुळें). ५ विपरीतज्ञान; भ्रम उत्पन्न होण्याचें एक कारण (दुसरें कारण आवरण). 'तो विक्षेप जडभ्रांति।'–यथादी १.२३७. 'परी दोन्हींमध्यें विक्षेप। शून्यत्वाचा।' –दा ८.५.६१. ६ (ज्यो.) शर; ग्रहाचें याम्योत्तर अंतर. ७ अडथळा; विघ्न. [सं. वि+क्षिप्] ०केंद्र–न. (ज्यो.) शरकेंद्र. ध्रुव–पु. (ज्यो.) ग्रहाच्या कक्षेचा परमकल. ०वृत्त–न. ग्रहाची कक्षा.

**विक्षोप**—विक्षेप पहा. 'विक्षोप आणिला राज्याला।'–ऐपो १३१.

**विज्ञ**—वि. विद्वान; जाणता; ज्ञानी पुरुष; विशेषज्ञ. 'तदुचित करवीती विज्ञ दैवज्ञ दानें।' –सारुह २.५.

**विज्ञप्त, विज्ञप्ति**—स्त्री. विनंति; विज्ञापना पहा. **विज्ञप्त**–वि. विज्ञापित; विनंति केलेलें; सांगितलेलें. 'यांस पूर्वी विज्ञप्त केलेल्या गोष्टींची आठवण करून यावी'. –विवि ७.१४१.१८७६. [सं. वि+ज्ञा]

**विज्ञात**—धावि. विशेष माहितीचा; ओळखीचा; माहीत असलेला; ठाऊक असलेला; कळलेला; समजलेला.

**विज्ञाता**—वि. जाणता; जाणणारा.

**विज्ञान**—न. १ विशेषज्ञान; शास्त्रीयज्ञान; तत्त्वज्ञान. २ ब्रह्मज्ञान; ईश्वरविषयक सत्यस्वरूपाचें ज्ञान; अपरोक्षज्ञान. 'एकाच मूलभूत अव्यक्त द्रव्यापासून भिन्नभिन्न अनेक व्यक्त पदार्थ प्रत्येकीं कसकसे निर्माण झाले हें ज्यानें समजतें तें विज्ञान होय.' –गीर १६६. 'मुक्तीचा ठेवा हारतला। विज्ञानाचा मठु फुटला।'–भाए ८८. ३ सामान्यज्ञान; माहिती; परिचय; ओळख. ४ अनुभवज्ञान; जाणीव. ५ प्रपंच; जग. 'जें ऐसेंही परि विरुळे। इये विज्ञानाचिये खोळे। हालविलेंही गळे। तें परब्रह्मो।' –ज्ञा ८.१७ [सं.] ०परंपरा–स्त्री. ज्ञानपरंपरा पहा. ०मय कोश–पु. आत्मा अथवा चैतन्याच्या आवरणाच्या पांच कोशांपैकीं चौथा कोश; जड वस्तूमध्यें जीवाची, चैतन्याची जाणीव. पंचकोशपहा. ०शास्त्र–न. ज्ञानाचें व स्वरूप व उत्पत्ति यांचें शास्त्र. (इं.) एपिस्टोमॉलॉजी. ०संतति–स्त्री. ज्ञान विषयांची किंवा कल्पनांची परंपरा, श्रेणी. बौद्धमताप्रमाणें आत्मा पंचस्कंधात्मक असतो व विज्ञान हा पांचवा स्कंध होय. बौद्धांच्या एका पंथाच्या मतें विज्ञान म्हणजेच पूर्ण आत्मा होय. ०स्थिति–स्त्री. सिद्धावस्था; सिद्धदशा; ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान झाल्याची अवस्था. 'ज्ञान प्राप्ति होतां सोहंपण। नाहंपणें विज्ञान स्थिति।' –स्वादि ११.४.८७. **विज्ञानात्मा**–पु. वस्तुमात्राचें ज्ञान, आधिभौतिक ज्ञान म्हणजेच विज्ञान अथवा आत्मज्ञान ऐहिकापलीकडे आत्मा असा निराळा पदार्थ नाहीं हें मत. बौद्ध अथवा नास्तिकांचें असें मत आहे.

**विज्ञापक**—वि. ज्ञान देणारा; उपदेशक; शिक्षक. [सं. वि+ज्ञा] **विज्ञापणें**–उक्रि. १ ज्ञान देणें, सांगणें, कळविणें; ठाऊक, माहीत करणें. २ विनंति करणें. **विज्ञापन**–न. ज्ञानदान; शिक्षण; उपदेश; शिकवण. **विज्ञापना**–स्त्री. १ नम्रपणें श्रेष्ठ, थोर गृहस्थास केलेली विनंति, प्रार्थना, अर्ज; सांगणें; माहिती देणें; ठाऊक करणें. २ वरप्रमाणें केलेली विनंति, दिलेली माहिती; सांगितलेली गोष्ट; खुलासा; तकरारअर्जी. 'भवतारका जी सुजाणा। एक विज्ञापना पायांपाशीं।' –तुगा ७३१. ३ सामान्यतः ज्ञान देणें; शिकवण; उपदेश; दिग्दर्शन. ४ वडील मनुष्यास पत्र लिहितांना विनंतीवजा वापरावयाचा शब्द, मायना. **विज्ञापनीय**–वि. सांगण्यासारखें; विनंति करण्यासारखें; माहिती देण्यासारखें. **विज्ञापित**–धावि. १ आदरपूर्वक सांगितलेलें, कळविलेलें, सुचविलेलें, दिग्दर्शन केलेलें. २ ज्यास विज्ञापना केली आहे तो. **विज्ञाप्ति**–स्त्री. (प्र.) विज्ञाप्ति. विज्ञापना पहा. **विज्ञाप्य**–वि. विज्ञापनीय पहा. **विज्ञेय**–वि. जाणण्यास योग्य; ज्यासंबंधीं ज्ञान करून घ्यावयाचें तें.

**वी**—विणें, प्रसवणे या क्रियापदाचें रूप. 'खरा जनक तूं जना इतर कोण हो देव वी।' –केका ४.२६.९३. 'नवी रीति प्रेमा विटवुनि दयासागर नवी।'–मोरामायणें १.४०६. [विणें]

**वी**—पु.स्त्री. १ गमन. २ पक्षी. –हंको. [सं. वीक]

**वीकर**—वि. चंचळ. 'होत करकर चित्त वीकर।'–दावि ८१. [सं. विकृत]

**वीख**—न. विष; विख पहा. [विष] म्ह० वीख घेववतें पण भीक घेववत नाहीं (भिक्षा मागण्यापेक्षां मरण सोपें वाटतें). **विखार–री**–विषार–री पहा.

**वीखीं**—विषयीं; विखीं पहा. 'विरे मस्ति वीखीं उद्धवें।' –दावि ३५५. **वीखो**–पु. विषय. **वीखया**–विषयी. 'कन्हणी एकु वीखया असे' –दृष्टांतपाठ ३७. [सं. विषय]

**वीचि**—पु. लाट; तरंग; जललहरी. 'देहाभिमाचा वारा। आतां बाजो ठेला वीरा। तें ऐक्य वीचि सागरां। जीवेशा हे।' –ज्ञा १४.३०५. [सं.] **वीचितरंग न्याय**–पु. पाण्यांत एक लाट उत्पन्न होते. तिला मागची लाट पुढें ढकलते, हिला तिच्या

मागची, असें होत होत क्रमाक्रमानें सर्व लाटा किनाऱ्यावर आपटून फुटत असतात. त्याप्रमाणें एका पिढीचीं माणसें मरण पावतात. त्याच्या मागून त्यांच्या जागीं दुसऱ्या पिढीचीं माणसें येतात, पुढें तींहि मरतात. ही जगाची रहाटी.

**वीज**—स्त्री. १ घर्षणानें उत्पन्न होणारी एक निसर्गशक्ति; विद्युत्; सौदामिनी; बिजली. 'जैसी वीजुची दाटी।' –उषा ७३. २ मेघगर्जना; विजेचा कडकडाट. 'वीज कडकडली.' 'कडकडून वीज पडली.' ३ वज्र; कुलिश; वीज पडणें. [सं. विद्युत्; प्रा. विज्ज; पं बिज्ज; सिं. विजु; गु. वीज] **विजेचें चमकणें**–विजेचें लखलख करणें. (ल.) क्षणिकपणा. 'पाण्यावरचा बुडबुडा पहा. **विजेसारखा**–वि. चंचल; क्षणिक. **वीज विहिरा**–पु. वीज पडून तयार झालेली विहीर, डबकें. हा केव्हांहि कोरडा पडत नाहीं अशी समजूत आहे. [वीज+विहिरा] **वीजुलता**–स्त्री. विद्युल्लता. 'कल्पांताचीया वीजुलता।' –उषा ९८.

**वीजण-णें**—न. विंझण्यानें-पंख्यानें वारा घालणें. [सं. व्यजन] **वीजणें**–क्रि. वारा घालणें; पंखा वारणें. 'मग पद्मिनीचा पाणि–वाळां। वीजितीं हलुहलुं।' –शिशु ७८८. –एभा १५.१७४. **वीजन, वीजण-णा**–पुन पंखा. 'न घालि वो वारें वीजनें। कमळदळाचें।' –शिशु ८३४. 'च्यामरें वीजणे विळासनी।' –वेसीस्व १.८४. [सं. व्यजन]

**वीजन**—न. (महानु.) बैठक; आसन. 'भिक्षुकांचीं वीजनें। तेणें डोळे घाती।' –ऋ १५ [हिं. बिछाना]

**वीट**—पु. १ कंटाळा; ओकारी; तिरस्कार; शिसारी. 'मनीं वीट मानु नये। शिकवणीचा।' –ज्ञा २.२.१०. –मोभीष्म ४.५०. २ मेकाड; मोवा; एक रोग. ३ अनादर; अपमान; वाईट प्रकारें वागविणें. बिघाड, विचका झालेली स्थिती (मसलती, कामें, पदार्थ इ० ची). ४ खेद. 'कां दरिद्रलिये बुद्धी वीट। तोही नाहीं।' –ज्ञा १४.३२८. [विटणें] **वीटणें**–विटणें पहा. 'परंतु बहु मंद मी म्हणुनि सत्श्रुती वीटती।' –केका ५९.

**वीट**—स्त्री. ईट; इमारतीच्या बांधकामासाठीं मातीचा भाजलेला किंवा कच्चा चतुष्कोनी एक पदार्थ; ईट पहा. 'चयनांतील हेमाच्या बदल्याने त्यासि भार घनवीट। जाणीं म्हणती तेव्हां पासुनचि इष्टकेसि जन वीट।' –मोअश्व. [सं. इष्टका; प्रा. इट्टा; हिं. ईंट] **०बंदी**–स्त्री. विटांनीं बांधणें; विटांचें बांधकाम. –वि. विटांनीं केलेलें (बांधकाम).

**वीट**—पु. १ विट पहा. २ वाईट चालीचा माणूस. 'समूह जेथें बसती विटांचें।' –सारुह ६.५५. [सं. विट]

**वीटा**—स्त्री. विटी (खेळांतील दांडू बरोबरची). 'वीटा-हस्तीं ओपिली' –मुआदि ३०.१११; –मोआदि २४.९.

**वीटा**—पु. एक प्रकारचा भाला. इटा पहा. 'नवुसे रंगीत भाले। वीटेपटेवाले।' –होला १६६.

**वीटि-टी, वीटिका**—स्त्री. १ विडा. (संस्कृताचा डौल आणून यद्देनें बहुधां योजतात). 'सकल सोयरि आणिती वीटिका।' [सं.] 'मुखीं घेतसें कापुरें युक्त वीटी' –लक्ष्मीनारायण कल्याण नाटक शके १६०४.

**वीड**—पुन. १ मनगटाचें माप (बांगडी वगैरेसाठीं). 'तुझ्या हाताचा वीड मजपाशीं आणवा.' २ माप; नमुना. ३ जात; प्रकार. वीड पहा.

**वीड**—स्त्री. ईड; एक प्रकारचें लिंबू (झाड व फळ); ईड-लिंबू.

**वीडी**—स्त्री. १ विडा. 'मीं नेदीं फोडी। तरि गोसावी नेसति वीडी।' –भाए १३८. २ धूम्रपानाची विडी, बिडी. [सं. वीटिका, विटी]

**वीण**—स्त्री. १ निपज; जन्म; वेत; खोप; जनन. 'वाक्त्रयाचिये खाणीं। लागली शब्दरत्नांची वीणि।' –ऋ २५. २ विण्याचा काल; निपज होण्याचा ऋतु, काल, हंगाम [विणें]

**वीण**—स्त्री. १ सणंग; थान; विणलेली वस्तु. २ विणायाची घाटणी, प्रकार, बनावट, विणकाम. [विणणें]

**वीण**—शअ. शिवाय; खेरीज. 'परि श्रवणें वीणु सुख पाविजे।' –दाव १०; –ज्ञा १३.२२. विना पहा. [सं. विना]

**वीणा**—स्त्री. एक प्रकारचें भोपळयाचें तंतुवाद्य; तंबोरा. याचे पुष्कळ प्रकार आहेत. 'हा गे नाद वीणे। तुज न साहे उच्च गाणें।' –शिशु ६९४. "सुरमुनिस रुचों देती निजवीणेचाहि न राजन्य।' –मोभीष्म ११.७६. [सं.] **०काव्य**–न. (वीण्याच्या नादावरोबर गावयाची कविता) रसात्मक, भावपूर्ण काव्य; भावगीत. (इं.) लीरिक. [सं.] **०पाणी**–स्त्री. सरस्वती. [सं.]

**वीत**—वि. गेलेला; नाहींसा झालेला. [सं.] सामाशब्द– **०कल्मष**–वि. ज्याचें पाप व दोष नाहींसे झाले आहेत असा. **वीतकाम-क्रोध-लोभ-मोह**–ज्याचा काम, क्रोध, मोह इ० नाहींशी झाली आहेत असा. [सं.] **०राग-वीतरागी**–(अशिष्ट) विरागी. ज्याच्या इच्छा, आकांक्षा नाश पावल्या आहेत किंवा ज्यानें विकार ताब्यांत ठेविल आहेत असा. २ विरक्त; वैराग्यशील. –ज्ञा ४.६१; –भाए १८४. –पु. विरक्तता; वैराग्य. **०रागता**–स्त्री. वैराग्य. 'वीतरागतेसारिखा। जोडूनि ठेविला सखा। तो आघवीयाचि भूमिका। सवें चाले।' –ज्ञा १८.१०४३. **०शोक**–वि. शोकरहित. [सं.]

**वीत**—न. १ वेत पहा. २ प्रसूति; जनन; वीण पहा.

